


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








प्रगतिपथावरील कारखानदारीचें
आजचें शुभचिन्ह

**स्वस्तिक**

दीपावली शुभचिंतन



आधुनिक जगांत रबरी वस्तूंच्या उपयुक्ततेने निरनिराळीं क्षेत्रें काबीज केलीं आहेत. निर्मितीचा यांतील बराच मोठा वाटा उचलून भारतांत स्वस्तिकनें मानाचें स्थान मिळविलें आहे. आता रबरी वस्तूंची निर्यात हा या यशस्वी वाटचालीतील महत्वाचा टप्पा आहे.




स्वस्तिक रबर प्रॉडक्टस् लि.
खडकी, पुणें - ३




## श्रेयनामावलि —

वहुरंगी कलाकृति : विकार विलसित :– काम • क्रोध • लोभ • मोह • मद आणि मत्सर.

पंक्चरलेलीं मनोराज्यें :– एक तुफान विनोदी राजकीय बिगचित्रमालिका.

वार्षिक 'वि'शालजोड्या आणि फॅन्सी ड्रेस स्पर्धा :– कांहीं 'बड्याबड्यां'ची भंबेरी उडविणारी विचित्रमालिका.

"जिंकूं किंवा मरूं" एक दुरंगी मर्मभेदिका आणि "दान" महात्म्य :– दिवाळीचे फटाके • फुलबाज्या आणि (कांहीं) अॅटमबाँब.

साहित्य

कथा• : • वि. स. खांडेकर • पु. भा. भावे • अरविंद गोखले • वामन चोरघडे • सौ. शिरीष पै. • जितेंद्र अभिषेकी • दिलीप चित्रे • वि. वा. पत्की • प्रा. सदानंद रेगे • मा. कृ. पारधी • प्रा. विजया राजाध्यक्ष • गोपालकृष्ण भोबे • प्रभाकर अत्रे • प्र. श्री. नेरूरकर • वसंत फेणे.

विनोदी कथा–लेख : • जयवंत दळवी • डॉ. कु. दमयंती सरपटवार • रमेश मंत्री • वसंत सबनीस–" यम जिंकला–यम हरला "

खास लेख : • न. वि. गाडगीळ • विद्याधर गोखले • अरविंद ताटके • आनंद साधले • के. टी. देशमुख • सरोजिनी बाबर

कविता • कुसुमाग्रज • बा. भ. बोरकर • इंदिरा • शंकर रामाणी • वृंदा लिमये • पद्मा लोकूर • शांता शेळके • कोंडबा • निर्मला देशपांडे • मधुकर केचे • अं. दि. माडगुळकर.

☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆

❋ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत ३ रु. + रजि. पोस्ट १ रु. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.



•Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57

• रंगीत छपाई प्रिमिअर ऑफसेट वर्क्स, मुंबई. जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस व आशा प्रिंटरी, मुंबई.

• मुद्रण स्थळ : स्टेट्स पिपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, मुंबई १. • ब्लॉक्स बॉम्बे प्रोसेस स्टुडिओ, प्रभात प्रोसेस स्टुडिओ, मुंबई.

'दीपावली'चा पुढील अंक १ डिसेंबरला प्रसिद्ध होईल.



टे. नं. ७७७६५








## आज उरीं खंत असे

घरांघरांतून शतलक्ष दीप उजळावेत म्हणून त्यानें तेजाची पूजा बांधली, उपभोगांच्या समिधा अर्पून तो यज्ञ पूर्ण केला. आणि आज तो ऋत्विजच अंधाराच्या पडद्याआड निघून गेला आहे.

मुलांच्या चेहऱ्यावर स्मितांचीं शतलक्ष फुलें बहरावींत म्हणून त्यानें त्यांचीं कुसुम कोमल मनें जपलीं—जोपासलीं. आणि आज विक्राळ काळानें माळ्यालाच उचलून नेलें आहे.

जगांत साधुत्वाची, शांतीची शान राखली जावी म्हणून त्यानें जन्मभर माणसांतल्या "देवत्वा"ला आवाहन केलें. पण तें करणारा आवाजच आज मूक झाला आहे.

घरोघरीं पणत्या पेटतील. आकाशींच्या पणत्यांशीं त्यांची स्पर्धाही लागेल. चंद्रज्योति, भुई नळेही गरजतील आणि सृष्टीला प्रकाश देण्याचा आवही आणतील. चंदन आणि अत्तरांचा सुगंध मनाला उल्हसित करील.

तरीही——

आमचा एक कांचनदीप मात्र जळत जळत, जगाला प्रकाश देत देतच चंद्रसूर्यांच्या भेटीला गेला आहे—ही खंत मात्र उरीं सलतच राहील.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. दीनानाथ दलाल यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

# हितगुज...

दीपावलीचा एकविसाव्या वर्षाचा हा खास अंक तुमच्या हातीं देऊन आम्ही सरस्वतीपूजन केलेलें आहे. लक्ष्मीपूजन तुम्ही करा आणि आनंदोत्सव साजरा करा. कोणतीच काळजी करूं नका. यंदा पीक भरपूर येणार असा अंदाज राष्ट्रांतील जबाबदार व्यक्तीकडून नित्य व्यक्त केला जात आहे. तशी प्रतिवार्षिक सर्व पिकें यंदा भरपूर येतील. दिवाळी अंकांचें पीकहि भरघोंस आलें आहे. गेल्या वर्षींपेक्षां पंधरा वीस अंक यंदा जास्तच आहेत.

हीं कशाचीं लक्षणें? का कागदाची किंमत एकदम शून्यावर आली; कीं छपाईचे दर कमी झाले; का प्रथितयश लेखकांनीं मोबदला न घेण्याचा निश्चय केला; कीं जाहिरात देणारे कारखानदार व व्यापारी एकदम उदार झाले?...असें झालें तरी काय म्हणून दिवाळी अकांचें अहीमहीसारखें हें वाढतें प्रमाण?

कुणीं शृंगाराशिवाय सारें व्यर्थ म्हणतो, तर कुणीं विनोद हाच सर्वश्रेष्ठ आहे असा प्रचार करतो. कुणीं तात्त्विकतेचा भोक्ता, तर कुणाला ललिताशिवाय कांहीं आवडत नाहीं. कुणाला नित्य राजकारण हवें तर कुणाला इतिहास हवा. असा हा आवडी निवडीचा गलबला; परंतु जशी ज्यांची आवड तसा त्यांना पुरवठा करायचें व्रतहि अनेक 'ठेकेदारांनीं' घेतलेलें आहे. महाराष्ट्रांतील साडेतीन कोटी (कीं चार) लोकांना कदाचित् मिठाईचा तुटवडा भासेल पण दिवाळी अंकांचा नाहीं. चालू काळ हा मोठ्या कठीण अवस्थेंतून जात आहे हा विचारवंतांचा टाहो मात्र या तणातणींत खोटा वाटूं लागलेला आहे. नियतकालिकांच्या दुनियेंतलें उधाण पाहिलें म्हणजें लेखकांना, मुद्रकांना व या क्षेत्रांतील अन्य संबंधितांनाहि चांगले दिवस आलेले नाहींत असें कोण म्हणेल? म्हणून म्हणतों—आनंदोत्सव साजरा करा. दुःखें काय, क्षणभराचीं असतात. मळभासारखीं तीं येतात आणि जातातहि. असो !

स्वस्थपणें कांहींतरी योजनाबद्ध असें तयार करून लोकाभिरुचीला वळण लावावें असा विचार-देखील करणें हें आज अर्थहीन झालेलें आहे. अशा परिस्थितींत साहित्य, संस्कृति व कला यांतील जें जें कांहीं चांगलें आणि नवीन देतां येईल तें तें निर्भेळ असें निवडून या खास अंकांत सादर करीत आहोंत. रसिक वाचकांना तें आवडेल आणि यांतील जें जें कांहीं आवडलें त्याचें रसग्रहण पत्ररूपानें ते कळवितील अशी अपेक्षा करतों.

हा खास अंक दर्जेदार व्हावा म्हणून आमचे मित्र व महाराष्ट्रांतील प्रथितयश लेखकांनीं आम्हांला वेळोवेळीं सल्ला देऊन अमोलिक मदत केली. 'टॉम अँड बे' कंपनीचे मॅनेजिंग डायरेक्टर श्री. गणेशराव तांबे यांच्या सहकार्याचा हात हें दीपावलीचें मोठें पाठबळ. संपादन कार्यांत नेहेमींच आपुलकीनें मदत करणारे श्री. अच्युत बर्वे व श्री. गोपालकृष्ण भोबे व मुद्रणकार्यांत श्री. प्रभाकर अत्रे व श्री. चंद्रकांत दळी यांनीं मोलाची कामगिरी केली आहे. जाहिरात विभागाचे सौंदर्य वाढविण्यांत श्री. श्री. स. दाभोळकर यांचा वांटाहि मोठा आहे.

अंकाची छपाई करणारे जन्मभूमी प्रेसचे कामगार बंधु व संचालक, रंगीत चित्रांची छपाई करणारे प्रिमियर ऑफसेटचे श्री. शहा व जगदीश्वरचे श्री. भालचंद्र पाठक, बाँबे प्रोसेसचे कामत व प्रभातचे श्री. कडव आणि वितरण संस्थेचे संचालक श्री. बाबुराव बागवे यांचें या मंगलप्रसंगीं अभिष्टचिंतन करतों.

याशिवाय कार्यालयांतील सर्व सहाय्यकांचेंहि मनःपूर्वक आभार मानतों.

—दीनानाथ दलाल

अनुक्रमणिका




—वि. स. खांडेकर

सत्याचे मुखवटे मोजतां मोजतां मी थकून गेलो. सौंदर्याच्या मखमली पडद्याआड चाललेला उनऊनीत रक्ताचा आणि लुसलुशीत मांसाचा बाजार पाहून माझें मन उबगलें. सकाळपासून संध्याकाळपर्यंत देवालयांत, शाळा–प्रशाळांत, नगरांतल्या चौका चौकांत मांगल्याच्या मंत्रांचा कंठरवानें चाललेला उद्‌घोष माझ्या कानांवर पडत होता. पण तो ध्वनि किंचित् मंदावला, म्हणजे कुणातरी अनामिकाचें काळीज कापून सोडणारे कण्हणें मला अस्वस्थ करून सोडी ! मनांत येई, ज्या धरित्रीच्या आधारानें आपण जीवन रसाचा आस्वाद घेत आहों तीच दुःखानें गुदमरून गेली आहे, कष्टानें आपले हुंदके आंवरीत आहे आणि युगायुगांच्या सहनशीलतेला न जुमानतां तिची अंतरीची व्यथा या अस्फुट क्रंदनाच्या रूपानें प्रगट होत आहे.

मानवी अस्तित्वाची ही गढूळ महानदी, आंधळें ढोंग आणि अनियंत्रित भोग यांच्या दोन तटांमधून अखंड वहात रहावी असाच सृष्टीचा संकेत आहे कीं काय हें मला कळेना ! प्रक्षुब्ध महासागरांत बुडूं लागलेली माझी श्रद्धा भिरभिरत्या डोळ्यांनीं आधार शोधूं लागली—एखादें जहाज, एखादी फळी, निदान एखादी काडी !

कुठें तरी दूर दूर जावे, जिथें हा दानवी दंभ दिसणार नाहीं, जिथें हें अमानुष क्रौर्य असणार नाहीं, अशा जागीं जावे असें माझ्या मनानें घेतले. मात्र अशी जागा पृथ्वीतलावर कुठें आहे हें माझें मलाच माहीत नव्हते !

☆ ☆ ☆

निराश मनःस्थितींत एके दिवशीं मध्यरात्रीं मी घर सोडून निघालो.

राजमार्गानें नगराबाहेर पडायला फार वेळ लागला असता. म्हणून मी अरुंद, काळोख्या बोळांतून जाऊं लागलो. अधुनमधून माझी पावलें ठेंचाळत. माझ्या नाकांत दुर्गंधी भरे. जाग्या असलेल्या एखाददुसऱ्या घरांतला मिणमिणता दिवा डोळे मिचकावून माझी थट्टा करी. त्याची ती मस्करी माझ्या जिव्हारीं लागे. मी झपझप पावलें टाकी.

चालतां चालतां माझी पावलें घुटमळलीं. मी एकदम थबकलो. कुठून तरी, मन धुंद करून सोडणारा सुगंध येत होता. काळोखांत मी न्याहाळून पाहिले. एका खाटकाचें जुनाट, पडकें घर होतें तें. घरासमोरच्या मोडक्या फाटकावर रातराणी दरवळली होती.

मी डोळे मिटून त्या सुगंधाच्या समुद्रांत स्वतःला झोकून दिले. त्याच्या तळाशीं असलेले मोत्यांचे शिंपले वेचूं लागलो.

इतक्यांत कसली तरी कुजबूज माझ्या कानीं पडली. मी डोळे उघडून पाहिले. आजुबाजूला चिटपाखरूंसुद्धां नव्हते.

मी स्वप्नांत आहे कीं काय हें मला कळेना. आकाश लवून पृथ्वीच्या कानाशीं लागले होते—पृथ्वी मान उंचावून, जिवाचें कान करून ऐकत होती.

चांदण्या रातराणीच्या फुलांना म्हणाल्या, 'किती सुरेख आहांत ग तुम्ही ! छे बाई ! द्रृष्ट लागेल आमची तुम्हांला !'

फुलें उत्तरली,

'खऱ्या सुंदर आहांत तुम्ही !'

चांदण्या उद्‌गारल्या, 'अंऽहं ! तुम्हीच ! तुम्ही फुलायला लागलांत ना ? तें पाहायला आम्ही साऱ्या धांवत अंगणांत आलो.'

फुलें म्हणाली, 'कांहींतरीच काय बोलता ! तुम्ही नाचायला लागलांत ना ? ते डोळे भरून पाहायला आम्ही आमच्या अंगणांत धांवत आलो.'

☆ ☆ ☆

कुणाच्या तरी चाहुलीनें मी माझ्या तंद्रीतून जागा झालो. दहा-बारा वर्षांचें एक भिकाऱ्याचे पोर माझ्याजवळ येऊन विचारूं लागले, 'दादा, माझं कुत्र्याचं पिल्लू दिसलं कां कुठं ?'

मी नकारार्थी मान हलविली. त्याचा चेहरा चिंताग्रस्त झाला. त्याचे समाधान करण्याकरितां मी म्हणालो, 'अरे वेडचा, तुला पोटापुरती भीक मिळताना मारामार ! त्यांत ही कुत्र्याची भर कशाला हवी ?'

त्याच्या चेहऱ्यावरला रुष्टतेचा भाव मला स्पष्ट जाणवला. क्षणभर थांबून तो म्हणाला, 'असं कसं म्हणता दादा ? ही पहा मी न खातां त्याच्यासाठीं ठेवलेली भाकरी.'

चिंध्यांच्या झोळींतून त्यानें काढलेल्या शिळ्या भाकरीच्या चतकोराकडे मी पहात राहिलो. जणुं कांहीं त्या तुकड्याला सुवर्णाचा रंग होता, चंदनाचा सुगंध होता !

तो आपल्या पिल्लाचा शोध करीत पुढें निघून गेला.

मी घरीं परत आलो. शांत चित्तानें झोंपी गेलो. माझ्या स्वप्नांत मी प्रचंड वणव्यांतून पार झालो. भयाण वाळवंट तुडवून माणसांची वस्ती गांठली. खवळलेला महासागर ओलांडला. या प्रत्येक प्रवासाच्या शेवटीं मी निरखून पाहिलें. फाटक्या सदऱ्याच्या बाहींतून पुढें आलेल्या कृश हाताचे एक चिमुकलें बोट मला सुरक्षितपणें पुढें नेत होते !








माझं तिच्यावर प्रेम होतं.
तिचंही माझ्यावर प्रेम होतं.
ती माझी काळजी घेत होती.
आणि तरीही मी घातलेल्या लग्नाच्या
मागणीला मात्र तिनं नकार दिला.
कां असं ? कां ?



गांवची वस्ती अनेक कोशार्थ मागें पडली. मोकळ्या रानांत आम्हीं प्रवेश केला. लेण्यांचा हिरवाचार डोंगर डाव्या अंगाला दिसूं लागला. आणि वाटेच्या कडेला मी माझी कोरी करकरीत "ॲम्बॅसेडर" थांबविली. गाडी थांबली तरी अद्याप हिमानी कसल्या तरी तंद्रींत होती. मी कांचा वर केल्या, किल्ल्या बोटाभोंवती फिरविल्या आणि शेजारीं बसलेल्या हिमानीला म्हणालो—

"उतरा मिस् मुखर्जी, आपलं स्टेशन आलं".

"आलं ?" सावध होत हिमानीनें विचारलं "इथेंच आहेत लेणीं?"

"त्या पलीकडच्या डोंगरावर आहेत." मी डोंगराच्या दिशेनें बोट दाखवीत म्हणालो. "इथून सरासरी मैल दीड मैल आपल्याला चालत जावं लागेल. मग डोंगर चढावा लागेल."

"डोंगर किती उंच आहे ?" हिमानीनें डोंगराकडे पहात विचारलें.

"आहे सात–आठशे फूट उंच."

"चढायचं जीवावर आलं आहे का ?"

"तसं नाहीं कांहीं, पण एक प्रकारची गुंगी आली आहे, वाटतं गाडींतून खालीं उतरूंच नये. तुम्ही गाडी चालवीतच रहावं आणि मी नुसतं स्वस्थ बसावं."

"त्यालाहि माझा आक्षेप नाहीं." गाडींत पाय ठेवीत मी म्हणालो. "म्हणजे तेंच मला पाहिजे आहे. तूं नेहमीं शेजारीं बसावंस ...डी चालवावी. आहे मान्य ? चलायचं पुढें ?"

मी शुभ्र कपड्यांतल्या हिमानीवर दृष्टी टाकली. क्षणभर तिनें माझ्या दृष्टीला दृष्टी दिली व मग आरक्त चेहऱ्यानें डोळे वळवीत ती म्हणाली —

"नको नको, लेणीं पहायला आलों आहोंत. लेणीं पाहून जाऊं या!"

"लेण्यांच्या बापाचें आपण कांहीं देणें लागत नाहीं." परत आसनावर टेकत मी म्हणालो. "आपण आनंदासाठीं बाहेर पडलो आहोंत. नोकरी करून तूं थकली आहेस. काम करून मी आंबलो आहे. गाडींतून धांवण्यांत तुला आनंद वाटत असेल तर आपण तसंच करूंया. तुझा आनंद तो माझा आनंद !" मी समोरच्या चाकावर हात ठेवला. माझा हात कडेला सारत हिमानी म्हणाली—

"नको. आपण इथेंच उतरूं या. मी कांहीं तरी बोलले."

"कांहीं तरी नाहीं हिमानी. तूं बरोबर बोललीस." माझ्या हातावर क्षणभर विसावलेला हिमानीचा हात धरीत मी म्हणालो.

"माणसाला गति चढते. माणसाला संगत चढते. मग दुसरं कांहींच नको असं वाटूं लागतं" मी हिमानीचा हात घट्ट दाबला. अपेक्षा अशी होती कीं नेहमींप्रमाणें हिमानी आपला हात सोडवून घेईल. पण तिनें तसें केलें नाहीं. सावकाश तिनें कॉफीची बाटली खांद्याला लाविली. जेवणाचा डबा पिशवींत टाकला. मी तिच्या बांधेसूद गोऱ्या देहाकडे, तिच्या शुभ्र रेशमी साडीकडे, तिच्या काळचाशार डोळ्यांकडे, तिच्या विपुल मऊ केश राशीकडं पहातच राहिलो. तिचा हात अद्याप माझ्या हातांतच होता. त्या हातावरील माझा



दाब वाढतच होता. तो दाव असह्य होईल इतका वाढता असला पाहिजे. कारण तोंडानें "सू" करीत हिमानी म्हणाली "हात मोडायचा विचार आहे का ?"

"सॉरी हिमानी !" मी हलकेंच हिमानीचा हात सोडला. हिमानीनें माझ्यासमोर पंजा धरला व ती म्हणाली; "पाहिलंत !" माझ्या बोटाचे ठसे तिच्या हस्तीदंती हातावर उमटले होते. हळुवारपणें तिचा हात कुरवाळीत मी म्हणालो,

"क्षमा कर हिमानी मला भान राहिलं नाहीं. तुला दुखापत करायचा माझा विचार नव्हता."

"माझ्या दुखापतीचं राहूं द्या !" गाडींतून खालीं उतरत हिमानी म्हणाली. "तुम्ही स्वतःला दुखापत करून घ्याल अशी मला नेहमीं भीति वाटते."

"मला दुखापत होईल याची तुला भीति वाटते हिमानी ?" पाय वाटेला लागत मी प्रश्न केला. हिमानीचा हात अद्याप माझ्या हातांतच होता. तिनें तो काढून घेतला नव्हता. हें अगदीं अघटित घडत होतें. माझें मन आंतल्या आंत फुलून आलें. मी विचारलें—

"तुला माझी खरंच इतकी काळजी वाटते का हिमानी ?"

"वाटते" हिमानी म्हणाली. "तुम्ही जिना चढतां तो धांवत धांवत, उतरतां धांवत, गाडी हाकतां तीहि भर वेगानें. कुठलीहि गोष्ट कधीं संथपणानं करीत नाहीं. तुमच्या धडपडया स्वभावाची माणसाला काळजी वाटते !"

"माणसाला ?" मी हिमानीचा हात किंचित् दाबला.

"होय." ती म्हणाली. "तुमच्या आईलासुध्दां तुमची फार काळजी वाटते. तसं त्या माझ्यापाशीं पुष्कळदां म्हणाल्या."

"मीहि तेंच म्हणतो. माझी काळजी करायला आतां कुणी तरी पाहिजे. जन्मभर आईनं माझी काळजी केली. लहानपणीं वडील गेले, तेव्हांपासून केली. आतां ती थकली—म्हातारी झाली. आतां तिची आणि माझीहि काळजी करायला कुणीतरी पाहिजे."

"तेंच त्या म्हणतात." हिमानीचा स्वर पालटला. शरीर किंचित् कांपलें.

"तेंच मीहि म्हणतो" हिमानीच्या मऊ हातावर नवी पकड घालत मी म्हणालो. "मला आतां माझं माणूस पाहिजे. माझी काळजी करणारं, नेहमीं माझ्यावरोवर राहणारं, माझं सगळं ऐकणारं, कारखान्यांतून मी घरीं परत आलों कीं, माझे कपडे काढणारं, मला खाऊं-पीऊं घालणारं, माझ्यावर प्रेमाचा वर्षाव करणारं !"




—पु. भा. भावे

मी हिमानीकडं पाहिलं. तिचा श्वास जोरानें चालला होता. चेहरा लाल झाला होता. हाताचा कंप वाढला होता. डोळ्यांत कसली तरी ठिणगी उजळली होती. टक लावून ती माझ्याकडे पहात होती. माझे शब्द ऐकत होती. बोलतां बोलतां मी थांबलो. हिमानीचा देह थरकला. हळूंच माझ्या हातांतला हात ती काढूं लागली व म्हणाली—

"तर मग करून टाका दोहोंचे चार हात !" आणि तिच्या डोळ्यांतली ती ठिणगी विझली. तिनें हात सोडविण्यासाठीं बळ लावलें. माझ्या हातांत चुळवुळणारा तिचा हात न सोडतां मी म्हणालो—

"एकदां दोहोंचे चार हात करून झाले. हिमानी, दोन वर्षांतच पहिली बायको गेली. पुन्हां मी एकटाच राहिलो. ज्योतिषानें मला सांगितलें आहे कीं, मराठी मुलीशीं ह्यापुढें लग्न करणें......"

माझें वाक्य पूर्ण झालें नाहीं. गवतांत लपलेल्या एका खडकाची मला ठोकर लागली. माझा झोंक गेला. हिमानीचा हात माझ्या हातांतून सुटला. मी दहा—पांच पावलें पुढें धडपडत गेलो. हिमानी माझ्या पाठोपाठ धांवली व कावऱ्या बावऱ्या स्वरांत म्हणाली—

"तरी मी म्हणत होतें. आणि आतां तिनें माझा हात धरला. माझ्या काळजानें उडी घेतली आणि मी विचारलं—

"काय म्हणत होतीस हिमानी ?"

"कांही नाहीं" आपले शुभ्र दांत दाखवीत हिमानी हसली आणि म्हणाली, "जरा पायाखाली पहा."

अनुक्रमणिका



## कशाला राहसी—

तुझिया घराला कवाडे हजार
रखवालीसाठी
प्रत्येक दाराच्या कपाळाला आहे
लोखंडाची आठी

आहे का माहीत जमीन दारची
मंत्रावली आहे
उंबऱ्याच्या खाली वादळात रात्र
कालवली आहे

अल्याड वेढतो हिरवा खंदक
शेवाळले जळ
जुनाट केसाळ सर्पांनी तयाचा
व्यापलेला तळ

तुला न ठाऊक परी मी पाहिली
शंभरदा तरी
तुझ्या दारापाशी बसलेली आहे
एका काळी नारी

कंजारी केसात गुंफलेले तिच्या
ठिणग्यांचे कडे
उघड्या काजळी स्तनांस गेलेले
रगताचे तडे

कान देउनी ती वाकलेला स्वर
खुपसते नभी
कशाला राहसी भावल डोळ्यांनी
सौधावर उभी ?

—कुसुमाग्रज

"पहातो आहे." मी उत्तर दिलें.
"तुम्हांला लागलें तर नाहीं ?" तिनें विचारलं.
"लागलें आहे !" मी म्हणालो.
"कुठें ?" तिनें वावरून प्रश्न केला.

"इथें." मी माझ्या हातांतला तिचा तळवा माझ्या छातीवर ठेवला. आतां मात्र झटक्यानें तिनें हात मागें घेतला.

"सरळपणानें चालणार कीं नाहीं ?" तिनें विचारलें.

"चालणार" झाली तेवढी प्राप्ति तुर्तास पुरें झाली, असें ठरवून मी म्हणालो. आम्ही दोघेहि समोरचा डोंगर जवळ करीत जोडीनें चालूं लागलो. तो सरत्या पावसाळ्यांतला एक कोरडा दिवस होता. सभोंवतीं सारें हिरवेचार होतें. ओढ्या-नाल्यांतून किंचित् निवळलेलें पाणी खळखळत होते. ओलसर भुई पायांतळीं दबत होती. आकाशांतून आळसटलेल्या ढगांचे कळप तरंगत होते. पिळलेल्या स्पंजसारखे ते ढग दिसत होते. ढगांच्या पापणी-आड सूर्य गेला कीं, एकदम अंधेरल्यासारखें वाटत होते. आणि ती पापणी उघडतांच सर्वत्र सोनेरी प्रकाश उधळला जात होता. त्या छाया प्रकाशांतून हिमानीच्या जोडीनें चालतांना स्वप्नांतून चालल्यासारखें वाटत होते. चालतां चालतां हिमानी मध्येंच थबकली आणि छाती भरून [illegible] घेत म्हणाली——

"पाहिलेंत ?"

"काय ?" मी तिच्याकडे पहात विचारलें.

"कसला तरी सुगंध आला. तुम्हांला नाहीं आला ?"

"नाहीं. मला फक्त नुसता तूं लावलेला एप्रिल व्हायोलेटचा सुगंध येतो आहे. तुला कसला सुगंध आला ?"

"माझ्यापासून थोडे दूर व्हा आणि पहा ?"

"तेंच काम कठीण आहे" मी हिमानीपासून किंचित दूर सरकलो व म्हणालो—

"पहा—पहा. कसलें तरी गवत, कुठली तरी फुलें, ओढ्यांतलें पाणी; ही ओली भूमि, हें पावसाळी आकाश, साऱ्यांचा मिळून एक सुगंध येतो आहे. येतो आहे ना ?"

"येतो आहे !" शिकारी कुत्र्याप्रमाणें नाक वर करून मी म्हणालो.

"हा पावसाळ्याचाच सुगंध आहे." ती हर्षभरानें उद्गारली. The Essence of Autumn — वर्षार्की ! "मला नेहमीं एक कल्पना सुचते."

"कुठली कल्पना सुचतें तुला ?"

"प्रत्येक ऋतूला एक वेगळा सुवास असतो. त्या ऋतूचाच ता सुवास असतो. हिंवाळ्याला थरारणाऱ्या थंडीचा, उबदार शेकोट्यांचा, निळ्याभोर आकाशाचा, वाफाळलेल्या अन्नपाण्याचा सुवास असतो ! तसाच शिशिर, ग्रीष्म, हेमंत, वर्षा ह्यासारख्या ऋतूंना आपापला सुगंध खास असतो ! त्या ऋतूंचा केवळ अर्क, असा सुगंध कुणीं बनवील तर ? The spirit of spring, The spirit of Winter – शिशिरार्क, ग्रीष्मार्क, ह्यासारखीं नांवें त्या अत्तरांना द्यायची ? कुपी उघडली कीं तो ऋतु मूर्तिमंत जिवंत झाला पाहिजे !"

"ब्रेव्हो हिमा ब्रेव्हो ! काय सुंदर कल्पना आहे !" मी कौतुकानें हिमानीकडे पहात राहिलो. आपल्याच कल्पनेनें हिमानी आनंदली होती. ती चेहरा वर उचलून म्हणाली——

"आहे ना ?"

"अगदीं बंगालच्या काव्यपरंपरेला शोभेल अशी कल्पना आहे. तुझं डोकं मोठं विलक्षण आहे. हिमा तुझं मन मोठं विलक्षण आहे !"

"हें अत्तर सुध्दां मोठं विलक्षण होईल; पण कोण करील असं अत्तर ?"

"मी करीन ?"

"होय ?"

"हो !"

"कधीं कराल ?"

"सहा ऋतूंचं सौंदर्य जिच्यापाशीं आहे, अशी मुलगी मला मिळाली म्हणजे."

माझं वाक्य ऐकतांच हिमानीच्या डोळ्यांत एकदम पाणी आलं. तिची वृत्ति पालटली. ती एकदम विषण्ण झाली. गेलीं तीन वर्ष पाहतों आहे, तिचं हें असंच होतं. हंसता हंसता तीं रडूं लागते. प्रेमांत येते न येते तोंच तटस्थ होते. आनंदानं बहरते न बहरते, तोंच कोमेजून जाते. कां तें कळत नाहीं. कदाचित् [illegible] बंगाली

( पान १९२ वर पहा )










**आमच्यांत असा एक संकेत, एक नातं निर्माण झालं आहे. आकर्षण नाहीं, सहवास नाहीं, नात्याचा नि जातीचा संबंध नाहीं. पण मैत्रिण, प्रेयसी, पत्नी या पलिकडचं असं कांहीं आत्म्यांना जोडणारं लेणं !**

**—अतूट, अदृश्य !!**



तिचं माझं काय नातं आहे हें एका शब्दांत सांगतां येणार नाहीं. चार पांच वाक्यांत समजावून देणंहि कठीण आहे. ती माझ्या रक्ताची नाहीं कीं जातीची नाहीं. बाल मैत्रिण् म्हणणंहि बरोबर ठरणार नाहीं. परकरी असतांना आमच्या आळींत ती कांहीं वर्षं राहात असे. प्राजक्ताचीं फुलं न्यायला आळीतल्या इतर मुलींच्यासह आमच्या अंगणांत येत असे. पण मी कधीं तिच्याशीं बोललो नाहीं कीं कधीं तिच्यासाठीं प्राजक्ताचं झाड हालवलं नाहीं. मुली आल्या कीं, आमच्या भुंकणाऱ्या टिप्याला आवरणं व बांधून ठेवणं हेंच मला करावं लागे. आमच्या आळीकर-पोट्टयांची लगोऱ्याची टोळी होती, त्यांतच मी असे व पोरीबाळींशी बोलतहि नसे. तिच्या वडिलांची बदली होऊन तिचं बिऱ्हाड गेलं कधीं हेंही मला लगेच समजलं नाहीं. आणि कालांतरानें कळलं तेव्हांहि विशेष वाटलं नाहीं.

पण आतां अनेक वर्षांनीं ती भेटली, जुनी ओळख उकरली गेली, अन् एक दिवस दोघांत एक नात्याची भावना निर्माण झाली. मानलेल्या बहिणीचं नातं तर नक्कीच नाहीं. सख्खी बहीण नव्हती तरी



अनुक्रमणिका

मला वहिणीच्या मायेची भूक कधीं भासली नाहीं. कुणाला वहीण म्हणून मानणं ही कल्पनाच मला खुळी वाटते. वहिणीच्या, आणि मैत्रिणीच्याहि पलीकडे आमचं भाव–विश्व एकमेकांत गुंफल आहे. त्याचे धागे एकमेकांच्या आत्म्यापर्यंत पोंचले आहेत.

तिला प्रेयसी म्हणणं हें पापकर्म ठरेल. तिच्यावर माझं त्या दृष्टीनें प्रेम नाहीं. एकमेकांच्या शरीरांचं आकर्षण आम्हांला अगदीं नाहीं. एकमेकावांचून राहणं अशक्य आहे असं तर विलकूल नाहीं. माझ्या संसारांत मी सुखी आहे. गुरफटून गेलो आहे. विवाहानंतर कां होईना, पण माझ्या पत्नीवर मी प्रेम करीत आहे. आणि तिनें तर परोपरीचं प्रेम करून, त्यापायीं आलेला विरोध व अडचणी उल्लंघून लग्न केलं होतं तिचा पति हेंच तर आमच्या स्नेहाचं सूत्र आहे.

तसा आमचा स्नेह सारा ह्या दोन अडीच वर्षांचा! ह्या काळांत आम्ही पंधरावीस वेळांच भेटलों असूं. आणि आतांशा तर भेटीहि तुटपुंज्या होतात. भेटून बोलायचं काय? नुसतं बघणं, स्मित करणं, मान डोलावणं आतां पुरेसं होतं. तेवढ्यानें माझ्या काळजाचे ठोके तालावर पडतात. जगण्यांतला एक अदृश्य अर्थ हातीं लागतो. तिला कसलंसं वेळ येतं. असार आयुष्य सरळ सूत होतं.

अडीच एक वर्षांपूर्वी मला ती दिसली तेव्हां मी तिला कसं ओळखलं ह्याचंच आश्चर्य वाटतं. वटांनी भरलेलं कपाळ, नाकांत नि गळ्यांत काळा दोरा, शेंदरी रंगाचा कांठा मारलेला परकर व लवलव हालचाल एवढीच पुसट आकृति आठवत होती. आणि आतां दोन तपानंतर बघत होतो ती आंबोडा बांधलेली व पांढरी शुभ्र साडी नेसलेली प्रौढ स्त्री. कपाळावर ठसठशीत कुंकू आणि गळा भुंडा. नाक वांकदार व खूप पुढें आलेलं. आणि हालचालींत जडता.

तरीहि मला वाटलं ती दमयंती असावी. हातांतली पानपट्टी तोंडात न घालतां मी मुठींत दडवली व फळविक्याच्या गाडीपुढें ती उभी होती तिथें रेंगाळलो. लंच टाईम् असल्यानें आजुबाजूच्या कचेऱ्या रिकाम्या झाल्या होत्या. सर्व उपहार गृहें, इराण्याची हॉटेलं गजबजली होती. रस्त्यावर लोक रेंगाळत होते, उगाचच उभे होते. कोपऱ्यावरच्या फळांच्या गाड्यापुढें उभं राहून केळीं नि चिकू खात होतो. त्यांतच ती एक बाजूला थांबून केळी खरेदी करीत होती.

गर्दीतून बाहेर येईपर्यंत मला आणिक निरीक्षण करायला वेळ मिळाला. नक्की खात्री होईना, पण तिला विचारायचं धाडस करायचं ठरविलं. रुमालांत फळं बांधून ती वळली तेव्हां मी तिला सामोरा गेलों व म्हटलं,

"एक्स्क्यूज्... पण आपण दमयंती.. म्हणजे पूर्वी दौंडला.... त्या नानासाहेब....."

ती दमयंती नसावी असं एकदम तीव्रतेनें वाटलं व मला धड बोलतां येईना. कुणा तिऱ्हाईतानं अडवलं म्हणून प्रथम तिचं मोठं कपाळ आठ्यांनीं भरलं. पण मग एकदम तिचा चेहरा सौम्य झाला. स्मितानें फुलला. जणुं सगळ्यांना ऐकूं जावं असं ती मोठ्यानें म्हणाली,

"दिनकर ना?–"

ती दमयंतीच तर–माझा अंदाज चुकला नाहीं, विस्मृतीतली व्यक्ति मला आढळली, ह्याचा मला आनंद झाला. मी तिला ओळखलं तसंच तिनेंहि मला ओळखलं. बालपणीं असलेल्या ओळखीला असं निरभ्र रूप असतं.

"इकडे कुठें?"

"मी इथें एका ट्रॅव्हल सर्विसमध्यें नोकरी करते. दोन वर्षं झाली..."

"असं? कधीं पाहिलं नाहीं..."

"एवढ्या गर्दीत नि ह्या अफाट मुंबईत कुठल्या चटकन् भेटी–व्हायला?'–घरचे ठीक आहेत सगळे? आई, बाबा...तुम्ही इथें असतां?"

"हो. आज पंधरा वर्षं. शिकायला आलो नि इथेच बँकेत चिकटलों. आई वडील दौंडलाच असतात...."

"खूप वर्षं झाली नाहीं? दौंडहून आम्ही नगरला गेलों. नि मग नानांच्या सारख्या वदल्या होत गेल्या. आतां ते मजजवळच असतात.."

गर्दी वाढत होती. उन्ह तापत होतं. धक्के चुकवीत व घाम पुसत आम्ही समोरा समोर उभे होतों वीस एक वर्षांपूर्वीचे दिवस आठवीत. त्या दिवसांत आम्ही एकमेकांशीं एक शब्दहि बोललो नव्हतो. एकमेकांसमोर कधीं उभं राहिलो नव्हतो. एकमेकांबद्दल



—अरविंद गोखले

ओढ नव्हती. आतांहि ती वाटली नाहीं. जुन्या आठवणी उगाळण्यांत अगर ओळख नव्यानें वाढविण्यांत फारसं स्वारस्य नव्हतं. सुट्टीची वेळ संपत होती व आम्हांला आपल्या कामावर जायची घाई होती.

"चला, ह्याच दिशेनें जाणार ना तुम्ही?–" मी हात दाखवीत म्हटलं व मग पान तोंडांत कोंबलं.

फूटपाथ पकडून आम्ही निघालों. न बोलतां. निरोप घ्यायच्या वेळीं तिला घरीं येण्याचं आमंत्रण द्यायचं, तिच्या वडिलांना भेटायला जायचं मी ठरवीत होतो. तेवढ्यांत ती म्हणाली,

"कुठें राहातां तुम्ही?"

"माटुंग्याला. तुम्ही?"

"पार्ल्याला. माझे सासू सासरे आहेत...."

तिचं लग्नहि झालं होतं! त्यांत अशक्यहि कांहीं नव्हतं, पण गळ्यांत मंगळसूत्र दिसलं नाहीं म्हणून मला चमत्कार वाटला. मी तशांतहि म्हटलं,

"आलं पाहिजे एकदां. काय करतात तुमचे मिस्टर? ओळख करून..."

तिची पावलं जड पडूं लागली. चेहरा ताठर झाला. नाक अधिकच धारदार वाटूं लागलं. समोर बघत ती खरखरीतपणें म्हणाली

अनुक्रमणिका

"ते हयात नाहींत. दोन वर्षांपूर्वी...."

"अॅम् सॉरी. माफ करा हं. मला कल्पना नव्हती..."

ती कांहीं बोलली नाहीं. एकदम रस्ता ओलांडूं लागली. मला विचित्र वाटलं. वाईट वाटलं. इतक्या वर्षांनीं ही भेटली, अन् वाईट बातमी ऐकावी लागली. तिला दुखवलं गेलं. मीहि तिच्या मागोमाग रस्ता ओलांडला.

परत आम्ही फूटपाथ धरून बरोबरीनें चालूं लागलो. तिची ढवळलेली मनःस्थिती ताळ्यावर आल्यासारखी दिसली. पदर लपेटून ती शांतपणें चालत होती.

कुठें तरी आम्ही थबकलो. डाव्या दिशेनें हात दाखवीत ती म्हणाली,

"मी ह्या लेनमधून जाते...भेटा परत. जुनी माणसं भेटली कीं बरं वाटतं. कुणीं भेटत नाहीं पूर्वीचं...."

"भेटेन ना. नानासाहेबांना नमस्कार सांगा...अन् सॉरी हं मघांबद्दल तुमच्या दुःखांत..."

तिचा चेहरा परत विचित्र झाला. उग्र, व्याकूळ. क्षणकालच! मग ती निरोप न घेतां वळली. चिंचोळ्या बोळांत निघून गेली.

मी जरा वेळ तिथेंच रेंगाळलो व मग बँकेंत गेलो. तिच्या दुःख दाखविण्याचं, निघून जाण्याचं मला विशेष वाईट वाटलं नाहीं. नवरा मेल्याचं अजून दुःख ताजं आहे ह्याचं नवल वाटलं. हिला आपण नेमकं ओळखलं ह्याबद्दल स्वतःचं परत कौतुक वाटलं. काय करायचंय् हिला परत भेटून?—असा विचार करीत मी तिला विसरायचं ठरविलं.



संध्याकाळीं घरीं येतांच बायको सामोरी आली आणि मला एकदम दमयंतीची आठवण झाली. मी कपडे पालटत म्हटलं,

"अग, आज गंमत झाली एक. वीस वर्षांपूर्वी आमच्या आळींत एक मुलगी राहात असे—ती आज अचानक भेटली. इतकी वर्षं झाली, इतकी वेगळी दिसते ती, पण मी नेमकी ओळखली. बघ माझी स्मरणशक्ति..."

"झाला कां तुमचा पूर्वीचा खेळ सुरू? नेहमीं कांहीं तरी चाळा हवा असतो तुम्हांला—" बायको माझं बोलणं मनावर न घेतां फराळाच्या बशा मांडूं लागली.

मी चमकलो. हिला वाटलं, माझा पूर्वीचा हा चाळाच अजून चालूं आहे. होय! माझ्या मनाला कांहीं तरी चाळा हवा असतो. छंद नाहीं. तसे छंद मी पूर्ववयांत केले होते. पक्षी मारून पेंढा भरून ठेवायचे, ओळखीच्या माणसांच्या लकबी लिहून ठेवायच्या. बाथरूममध्यें कुणीं गायला लागलं कीं, तें टेप रेकॉर्ड करून टाकायचं. मित्रांच्या लग्नांतल्या अक्षता एका छोट्या पुडींत ठेवून त्यांच्या पुत्रजन्माच्या वेळीं नजर करायच्या. वेगवेगळे, विचित्र छंद. पण आतां वयपरत्वें त्यांत रस वाटेनासा झाला. आतां गंभीरपणें वेगवेगळीं कल्पनाचित्रें रंगवतो. आयुष्यांतील कोडीं सोडवीत राहातो. कांहीं महिन्यांपूर्वी एखादं लहान मूल मोठेपणीं कसं दिसेल ह्याचीच घरीं चर्चा करीत बसत असें. मालकाचा, तोंडाचं बोळकं नि भुरभुरतं जावळं असलेला, छोटा नंदू मोठेपणीं कसा टकल्या, तोंडांत चिरूट धरणारा, तिरसट माणूस दिसेल. बँक मॅनेजरची फ्रॉक घालणारी, बॉब केलेली अष्टवर्षीय बेबी लग्न झाल्यावर गर्भारशी होऊन पोकळ कपडे कशी घालेल, आमचा रामा गडी जख्खड म्हातारा झाल्यावर—एक ना दोन. बायकोला व मुलाला कधीं विनोदी तर कधीं अभद्र वाटणारी चित्रं—पण मी मनःपूर्वक अशी कल्पनादृश्यं काढी व त्यांत रमे. गेल्या महिन्यांत, अगदीं बालपणीच्या, न भेटलेल्या व्यक्तींचे जीवनक्रम आतां कसे चालूं असतील ह्याच विचारांत मी गढलो होतो. त्यांचा वर्तमान काळ, पण माझ्या मनांत ती भविष्यभाष्यें! आयुष्याला कसं वळण लागतं, संधि येते म्हणजे काय, अपघात कां व्हावेत, माणसाचं प्राक्तन अखेर कसं ठरविलं जातं, जीवनाच्या डावांत जवळीकीचे व वियोगाचे प्रसंग कां यावेत...हलकें हलकें मी आयुष्याचा अर्थ लावूं पाहत होतो. जीवनाचं कोडं सोडविण्यांत गुंगत होतो. माझ्याच मगदूराप्रमाणें. मला पुस्तकांचा आधार नको होता. पत्नी मित्रांशीं वाद घालायचा नव्हता. केवळ कल्पना. नुसता विचार....

चहा पोहे संपवून मी दिवाणखान्यांत आलो आणि एकदम दचकून थबकलो. दमयंतीची भेट मी मनाआड केली होती. पूर्वायुष्यांतील व्यक्तींचा विचार करतांना तिची आठवण आली नव्हती. ती माझ्या लेखीं कोणी नव्हती. तसलीं चित्रं रंगविण्याचा चाळा केव्हांच आटोपला होता. आजकाल, आजकाल....

"अभद्र!" बायको माझ्या तोंडावर हात ठेवून परवां म्हणाली होती तें आठवलं अन् मी मनांतले भरकटते विचार ओढून घेतले. 'इतर कांहीं चालेल, पण असलं कांहीं मनांत आणूं नका, विचारसुद्धां










करूं नका–' अशी तिनें शपथ घातली होती. मला तसं कांहीं वाटत नाहीं, मी ठीक आहे असं तिला हंसून म्हटलं होतं. पण तिच्या डोळयांत टचकन् पाणी आलं. तिनं देवाला नवस केला. मोठ्या भावाला आणून त्याच्याकडून माझी पत्रिका पाहिली व तत्त्वज्ञान ऐकवायला लावलं. डॉक्टर दिवाडकरांना बोलावून माझी प्रकृति तपासली.

'वेडी–' मी स्वतःशींच पुटपुटलों. बायकोचा कळवळलेला चेहरा मला दिसला. अन् मग एकदम दमयंतीची उस्कटून गेलेली आकृति आठवली....

दमयंती दुसऱ्या दिवशीं दिसली नाहीं. दोन एक आठवडे भेटली नाहीं. मला तिची फारशी आठवणहि आली नाहीं. आली तेव्हां भेट घ्यावी असं वाटलं नाहीं. तरीहि मधल्या सुट्टींत एकदां मी त्या फळविक्याजवळ थांबलो. एकदां ती गेली त्या गल्लीशी रेंगाळलों. पण ती जशी अचानक आली तशीच पुन्हां अदृश्य झाली.

बँकेचं काम संपवून मी त्या दिवशीं घाईनें निघालो तेव्हां इमारतीच्या दारांतच दमयंती उभी असलेली दिसली. मला आश्चर्य वाटलें. हिचं कुणाकडे काम आहे? कीं माझ्यासाठींच.....

"तुमच्यासाठींच थांबले आहे–" ती विलक्षण आपलेपणानें म्हणाली, "वेळ आहे तुम्हांला?—"

खरं म्हणजे मला वेळ नव्हता. बायकोला लवकर येतो म्हणून कबूल केलं होतं. नाटकाची तिकिटं मिळाली तर ती काढून ठेवणार होती. नाटकाला नऊवारी नेसून आली तर वाटेंत गजरा घेऊन यायचा ठरलं होतं. एक किचकट स्टेटमेंट पुरं केल्यानें जीव आंवलाहि होता. पण दमयंती मुद्दाम आली, तिचं कांहीं काम आहे, हें उमगून मी म्हटलं,

"हो. भरपूर..."

"आपण कुठें तरी बसूं?–कुठें–ओव्हलवर?–नरीमन पॉईंटवर?"

न बोलतां आम्ही कफ्परेडकडे गेलो. स्वच्छशी, निवांत जागा पाहून समोरासमोर बसलो.

दोघांच्यामध्यें आपली पांढरी पर्स उभी करीत दमयंती म्हणाली,

"मला तुमच्याशीं बरचंसं बोलायचंय्. राग नाहीं ना येणार?.. एवढ्या ओळखीवर इतकं धाडस करतेय. पण वाटलं, बालपणीचे दिवस आपण एका छोट्या जगांत काढलेले आहेत. एकमेकांना लहान पाहिलें आहे. तेव्हां..."

आश्चर्यानें मी पाहात होतो व 'राग नाहीं अगदीं–बोला तुम्ही'– अशा अर्थानें मान हलवीत होतो.

ती बराच वेळ बोलली नाहीं. गवताची पातीच आवेगानें ओरबडत राहिली. मग प्रश्न विचारायचं सोडून म्हणाली,

"मिसेस् दिवाडकर माझी मैत्रिण आहे. तुम्ही डॉक्टर दिवाडकरांच्याकडे गेलां होतांत—"

"बरेचदां जातो. ते आमचे फॅमिली डॉक्टर आहेत...परवां त्यांनीं मेडिकल चेक अप् केला त्याचं म्हणतां काय? अहो, तो माझ्या बायकोचा खुळेपणा. उगाचच ती भेदरली. कांहीं सुद्धां मला झालं नाहीं. अगदीं ठणठणीत..."



## सुंदरतेस—

अशरीरिणी अनिकेतिनी चिरचंचला सौदामिनी
प्रतिभेचिया स्फटिकांत तूं क्षण बिंबणारी पद्मिनी
असुरां सुरांस अदाय तूं स्वस्वामिनी निष्कामिनी
संसारसार तिलोत्तमा प्रमदा चराचर-गामिनी

चिरविस्मयाचें लास्य तूं स्मरयौवनाचें हास्य तूं
इथल्या सुखांत भुके सदा त्यांचें उदार उपास्य तूं
रंगांतली नवदीप्ति तूं शब्दांतली ऋतशक्ति तूं
रुधिरांतली अनुरक्ति तूं स्वरवेदनेंतिल भक्ति तूं

क्षण-नश्वरांतिल बोलकी तूं ईश्वराची पालवी
नवसर्जनाची गर्भमात्रा नित्य लीला लाघवी
चिर जागृतींतिल स्वप्न तूं तृप्तींतली तृष्णा नवी
आत्मोत्सवांतिल माधवी निद्रेंतली वरजान्हवी

तुज लोकितां ओलांडितों अपमृत्युचीं मी पायरी
स्थिर अंतरीं होशील का अशरीर मी होतां तरी ?

—बा. भ. बोरकर

---

"तुम्हांला कांहीं झालं नाहीं. डॉक्टर त्यांच्या बायकोलाहि म्हणाले. तुम्हांला खरंच कांहीं न होवो..."

ती अंमळ थांबली. दिवाडकरणीनें हें सारं दमयंतीला कां सांगावं? दोघींच्या बोलण्यांत माझा उल्लेख आला म्हणून? बायकांना कसलेहि विषय गप्पांना चालतात तर...

तेवढ्यांत ती माझ्याकडे टक लावून म्हणाली,

"तुम्ही घडधाकट आहांत. पण घडधाकट माणसंहि अचानक मरतात. आतां हिंडती फिरती असतात नि एकदम गतप्राण होतात—"

अभद्र! माझ्या पत्नीचा आर्त उद्‌गार मला आठवला. मी विचित्रपणें हंसलो. दिवाडकराकडून ही गोष्टहि दामयंतीपर्यंत पोंचली वाटतं. हंसण्याचा यत्न करीतच मी म्हटलं,

"तुमच्यापर्यंत आमचा खेळ पोंचला वाटतं. अहो, हा मनाचा नुसता चाळा. मला असं कांहीं तरी घोळवायला लागतं. आयुष्याकडे अनेक अंगानें बघण्याकडे माझा ओढा आहे. तें माझ्यापुरतं! इतरांनीं उगाच..."

"मला याबद्दल कुतूहल आहे. मी याच कोड्यांत अडकलें आहे. सांगा, मला सांगा सारं..प्लीज्..."

मी थबकलो नि दमयंतीकडे न्याहाळून पाहूं लागलो. तिचं धारदार नाक, विस्तृत कपाळ, पांढरा शुभ्र पोशाख, गंभीरपणें बसण्याची ढब...ही स्त्री चारचौघींसारखी नाहीं. ही अभद्र म्हणणारी नाहीं कीं, वायफळ बोलणारी नाहीं. हिलाहि आपल्यासारखं जाणवलं आहे? हिला समजेल? आपल्या चिंतनांत, चाळ्यांत ही सामील होईल?

एकदम मी बोलूं लागलो. घरीं बोलण्याला बंदी झाली होती. विचार घोळवायची चोरी होती. मन कसं अंधारून आलं होतं. आपलं म्हणणं कुणीं सरळपणें समजून घेईल हें दिसेनासं झालं होतं. आणि आतां दमयंती तळहातावर हनुवटी टेकून माझ्याकडे डोळे लावून होती.

"स्वतःसंबंधी नाहीं, पण एकंदरीनेंच आजकाल मला ह्या गोष्टीचं कोडं वाटतं. विचार करावासा वाटतो. कल्पना कराव्याशा वाटतात. कशी सुरुवात झाली कोणास ठाऊक! कदाचित् कांहीं वर्षांपूर्वी आमच्या बँकेतला रामदास रावते ट्रेनमध्यें पेपर वाचतां वाचतां मेला—ती आठवण आली असेल. तो कोण पुढारी भर सभेंत मेल्याचं वाचलं म्हणून असेल. पण माणसांनीं असं अचानक मरावं? शरीरं झिजण्याचा, आजार होण्याचा, नातलगांनी जमून शुश्रूषा नि पराकाष्ठा करण्याचा, निरवानिरव करण्याचा, शोकाला आणि वियोगाला सामोरं जाण्याचा, तुळशीपत्र नि गंगाजळाचा स्पर्श होण्याचा—सगळा सोहळा न भोगतां अकस्मात् नाहीसं व्हायचं! प्रसूतिवेदना, नामकरणविधी, मौंजीबंधन, शिक्षण, विवाह, पहिली रात्र नि पुत्रजन्म—सगळे सोपस्कार ओळीनें नि समारंभानें उरकणाऱ्या जीवाला अखेरचा विधी असा उरकावा कां लागतो? कांहीं माणसं अशी कां मृत्युमुखीं पडतात? घडधाकट, चालतीं बोलतीं, आयुष्याचा डाव रंगून खेळणारीं? अर्ध्या डावांतून माणसाला कसं उचललं जातं? त्याला मृत्यूची चाहूल असते? अन् मग अर्धवट सोडलेल्या खेळाचं काय? खेळ मांडायला तरी काय अर्थ? कोण जामीन? .."

धाप लागली व मी थबकलो. दमयंती अजून तशीच होती. तशीच बघत होती. मला वाटलं ती बोलेल. पण ती नुसतं म्हणाली,

"बोला ना...तुम्ही असं बोललांत कीं बरं वाटतं!"

मला परत विचित्र वाटलं. वाटलं, माझं बोलून झालं. आतां तिनें बोलावं. चर्चा करावी. पण ती तशीच मूक पाहून मी पुढें म्हटलं,

"रावते गेला नि मागें कोण गोंधळ झाला. बँकेतले कागद त्यानें कुठें ठेवले हे कुणाला कळेना. कांहीं कामं अर्धवट सोडलेली सांपडली. त्याचा वाङ्निश्चय झाला होता व भावी पत्नी भेटायला निघाली होती. उलट नेने मास्तर एकसष्ठीचा समारंभ आटोपून आले. सगळी निरवानिरव केली नि 'निजतो, कुणीं त्रास देऊं नका. सगळ्यांचं सगळं देऊन टाकलंय्—' असं म्हणाले व तक्याला टेकतांच शांतपणें गतप्राण झाले. हें सारं काय आहे? जीवनाला अर्थ आहे, सूत्र आहे, प्राक्तन म्हणून कांहीं चीज असेल, आयुष्य हें वाहातं मानलं, कांहीं सरत नाहीं मरत नाहीं हे खरं धरलं, तर ह्या अपघाती, अकस्मात मृत्युमागेंहि कांहीं कार्यकारणभाव असेल. मेला म्हणून सरला नाहीं. खेळ अर्धा टाकला तरी दान पडत राहातं..."

"असं म्हणतां?" ती खोलपणें म्हणाली व हनुवटीखालचा हात काढून बोटं मोडूं लागली. मी तिच्या हालचालीकडे बघत म्हटलं,

"असं मला आपलं वाटतं हं! मी आपला उलट सुलट विचार करतो. स्वतःशींच. स्वतः पुरता. मला माझ्याबद्दल भय नाहीं वाटत. मी स्वतः एकाएकीं..."

तिनें एकदम माझ्याकडे पाहिलं व मी थबकलों. मला वाटलं ती म्हणेल, अभद्र! असं बोलूं नका...पण पर्स उचलून छातीशीं धरीत ती म्हणाली,

अनुक्रमणिका

"माझे पति अचानक गेले..."

हृदयाचा ठोका थांबल्यासारखं मला झालं. ती विधवा आहे हें मी विसरून गेलों होतो. ती त्या दिवशीं अस्वस्थ कां झाली हें मला लगेच उमगलं नव्हतं. माझी गांठ घेऊन ही चर्चा करण्यांत तिचं वैयक्तिक दुःख गुंतलं असेल ही कल्पना ह्या क्षणापर्यंत मला शिवली नव्हती.

रामदास रावतेंची वाग्दत्त वधु पाहायची मला फार इच्छा होती. नेने मास्तरांच्या पाठशाळेचं काय झालं ते प्रयत्न करूनहि मला कळूं शकलं नाहीं. माणूस अचानक जातो तें मी पाहिलं होतं, कल्पना करीत होतो. त्याच्या पश्चात् काय घडेल ह्याची चिंता मी रेखीत असे. फक्त तशी सजीव... आणि आतां दमयंती समोरच बसली होती.

"असेंच एक दिवस ऑफिसांतून येत होते अन् वाटेंत कुठल्याशा विजेच्या तारेचा धक्का लागून लगेच तिथेंच गेले. त्यांना कल्पना होती कीं, काय तें कसं सांगूं! मुद्दाम हात तर त्यांनीं लावला नव्हता. पण मग ऑफिसांतलं सगळं काम कधीं नव्हे तें निपटून टाकलं होतं नि 'उद्यां येणार नाहीं रे बहुतेक' म्हणून सहकाऱ्याला म्हणाले होते. वाटेंत वाण्याचे बरेच दिवस राहिलेलें सगळं बिल त्यांनीं चुकतं केलं होतं. जणुं निरवानिरव करीत होते...पण तसं म्हणावं तर मला त्यांनीं कांहीं सांगितलं नाहीं. मीच उलट बजावलं होतं कीं, संध्याकाळीं सिनेमाला जाऊं. त्यांच्या आवडीची अंजिरी साडी नेसून नि अबोलीची वेणी माळून मी गॅलरींत केवढा वेळची वाट पाहात होते. ते आले. पण..."

एकदम दमयंती थांबली. डोळे कोरडे होते, पण काळजांतली कालवाकालव लपत नव्हती. आणिक असेंच बसलों तर ती ओक्साबोक्शी रडेल असं मला वाटलं. कदाचित् तिलाहि. कारण घाईनें उठत ती म्हणाली, "उशीर झाला. तुमची बायको वाट पहात असेल. उगाच काळजींत पडतील त्या तुम्ही वेळेवर नाहीं गेलांत तर..."

भ्रमिष्टासारखा मी घरीं आलों. बायको काळजी करीत दारांत उभी होती. माझा हात धरून ती म्हणाली,

"उशीर कां झाला?"

तिला कांहीं सांगायचं नाहीं हें मी आधींच ठरवलं होतं. कपडे पालटत मी विचारलं,

"नाटकाची तिकिटं काढलीस?"

नऊवारीची घडी माझ्यापुढें मिरवीत ती हंसत आंत घरांत गेली. वाट पाहणारी बायको, नाटकासिनेमाचा बेत, नवऱ्याच्या आवडीची साडी. फुलं!...आयुष्य वेगानं धांवत होतं. आखीव, अखंड. कांहीं थबकलं नव्हतं. थांबलं नव्हतं, मी हालत बोलत होतो. हंसत खिदळत होतो. फक्त कांहीं काळापूर्वी दमयंतीचा नवरा अचानक मेला होता.

पाहतां पाहतां माझ्या मनाच्या चाळचाला वेगळं वळण मिळालं. ह्या क्षणीं आपण एकदम मेलो तर त्या आधींच्या प्रत्येक कृतीला नि शब्दांना काय अर्थ येईल, आपल्यामागें आयुष्याचा डाव कसा खेळला जाईल ह्याचा विचार करायचं मी टाळूं लागलों. आणि एकेक क्षण गेला, आपण मेलो नाहीं, आपलं आयुष्य वाहातं आहे, आपल्या बोलण्या चालण्याला नेहमींचाच अर्थ आहे ह्या भावनेनें मी सुस्कारा सोडूं लागलो. अबोलीची वेणी माळून दमयंती गच्चींत ताटकळत उभी राहिली होती. रावतेला भेटायला त्याची वधू अजून वाटचाल करीत होती. मी मात्र अपघात चुकवून, हृदयाचे ठोके नीट मोजीत बायकोला वेणी घेऊन दिली. ती वेणींहि सुकली. आमच्या संसाराची वाटचाल व्यवस्थित चालूं राहिली. एकेक क्षण धोका टाळून मला पुढें ढकलीत होता. आयुष्य अखंड आहे हें पटवून देत होता....

आठवडाभर वाटलं कीं, दमयंती पुन्हां बँकेच्या दाराशीं येईल. पण ती परत फिरकली नाहीं. अन् मी एक दिवस सरळ तिचं ऑफीस शोधून तिची गांठ घेतली.

"दिनकर?" दचकून ती म्हणाली. जणुं माझं अस्तित्व ती विसरून गेली होती. मी चालता बोलता होतो. ठणठणीत होतो अन् हिला मात्र त्याचं...माझ्या विचाराची मला लाज वाटली. दमयंतीचा काय दोष? ती कामांत गढून गेली होती. मी असा अचानक आलो होतो, म्हणून ती चकित झाली असेल...मनाआड झालेली माणसं तिच्या लेखीं मृत्युमुखीं पडलेली असतील...परत मी माझे भरकटणारे विचार अडवले. भिंतीवर लावलेले जगाचे प्रचंड नकाशे पाहूं लागलो.

"चला, कॉफी घेऊं—"आपली पांढरी पर्स उचलून ती उठली व आम्ही जवळच्या एका कॉफीगृहांत गेलों. समोरासमोर बसतांच मला विचित्र झालं. कशाला मी आलों. आवेगानें नकळत. तिला लाजवायला? रडवायला? तिचा पति अकस्मात् मेला व मी क्षणोक्षणींचा घात टाळून जगतो आहे हें दाखवायला?

"रागावलांत त्या दिवशीं भेटलें तुम्हांला म्हणून?—" ती कॉफीच्या कपांत साखरेचे ठोकळे टाकीत म्हणाली.

"छे छे. असं म्हणूं नका. उलट तुम्ही आपलेपणानें आलांत तें मला फार आवडलं. आलांत, माझं मन समजावून घेतलंत—"

"मला मग फार वाईट वाटलं तुम्हांला अडवलं त्याचं. तुमची पत्नी घरीं ताटकळत होती..."

"तुम्हांला कसं..."

"नऊवारी नेसून ती तुमच्याबरोबर नाटकाला गेली. मी त्या दिवशीं मिसेस् दिवाडकरबरोबर थिएटरवर गेले होते. नाटकाचं

आनंदी माता हेंच म्हणणार...

**शहाणं माझं बाळ..**

त्याचा मला कसलाच त्रास नाहीं., एकदां त्याला

**डोंगरे बालामृत**

आणि

**डोंगरे ग्राइप वॉटर**

एक एक चमचा दिलं किं माझं बाळ खूष. हीं दोन्हीं औषधें त्याला आतां चांगलींच मानवलीं आहेत.



के. टी. डोंगरे ॲण्ड कं. प्रा. लि.
मुंबई-कानपूर



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




तिकिट मिळालं नाहीं म्हणून निराश होऊन दूर उभी होते. तुमची बायको नाटकाची तिकिटं नाचवीत थिएटरपाशीं आली. तुम्ही दाराशीं तिला वेणी घेऊन दिलींत. किती फुलून गेली होती ती तुम्ही जवळ होतांत म्हणून..."

दूध न घालतां मी काळ्या कॉफीचा घोट घेतला व म्हटलं, "माफ करा हं..."

"इश्श्य–मी खिजवत नाहीं तुम्हांला. फार समाधानानें सांगत्येय्. पूर्वी मला असूया वाटायची. संतापून मी सवाल करायची कीं, सगळे नीट जगताहेत, नि माझ्याच आयुष्याला खीळ कां पडावी? मीच काय पाप केलंय्? माझंच सुख एकदम कां संपावं? पण परवां-पासून मी शांत झाले. अन्तर्मुख झाले. तुम्ही करतां तसलाच विचार, तोच विवेक..."

मी तिच्याकडे बघत राहिलों. अन् तिच्यासारखंच मलूल हंसलो.

"परवां तुम्हीं संध्याकाळीं भेटलांत. माझ्या काळजांतले पडसाद मला ऐकवलेत. रात्रीं तुमचं सुरळीत चाललेलं आयुष्य बघितलं. अन् तेव्हांपासून माझ्या मनांत एक चाळा सुरू झाला. चाळा म्हणा, खेद म्हणा–तुम्ही करतां तसा....सांगूं ?"

मी अति उत्सुकतेनें बघत राहिलो.

"क्षुल्लक मानूं नका. अन् वेडावांकडा अर्थ लावूं नका. तुम्ही समजून घ्याल अशी खात्री आहे मला....मला वाटूं लागलं कीं, अडीच वर्षांपूर्वी हे अचानक गेले, अन् त्याच क्षणीं तुम्ही कसल्याशा भीषण अपघातांतून वाचलांत ! वेळ आली होती, पण काळ आला नाहीं. आमचं आयुष्य थबकलं. पण तुमचं सुरळीत चालूं राहिलं. जणुं माझ्या पतीनें हालचाल करायचं, वागायवाढायचं दायित्व तुमच्यावर टाकलं. ते गेले, मी भोवंडत बसले...पण तुम्ही अजून आहांत. तुमचा संसार सुरू आहे — नीट कसं व्यक्त करूं ? पण आतां मला आधार सांपडल्यासारखं वाटतंय्. धीर येतोय्. आयुष्यांतल्या अपघाताचा नि वाटचालीचा अर्थ उमगतोय्. तुमच्यापासून मी अपेक्षा नाहीं करीत कांहीं. तुम्ही तुमच्या आयुष्यांतच राहा. माझ्यासाठीं कांहीं करूं नका. पण तुमचं अस्तित्व हेंच मला खूप आधार देतंय्..."

तिच्या बोलण्याचा अर्थ लावण्याचा यत्न करीतच मी उठलो. तिला कामावर परतायचं होतं व मला पत्ते खेळायला क्लबांत जायचं होतं. तिनें मला थांबवलं नाहीं कीं, 'परत भेटा' म्हटलं नाहीं. मला अडवायची, ओढून घ्यायची तिला इच्छा नव्हती. माझ्या सहवासाची अगर सांत्वनाची तिला जरुर नव्हती. स्वतःच्या समाधानासाठीं तिनें एक सूत्र शोधलं. तिच्या अकाली निधनं पावलेल्या नवऱ्याच्या अनवाणी आत्म्याला तिनें माझ्या चाकोरींत चालवत ठेवलं. अन् त्या पादुकांचं ती पूजन करूं लागली.

क्लबांत जायचं टाळून मी घरीं परतलो. मी लवकर आलो ह्याचं बायकोला आश्चर्य वाटलं. 'तुझ्यासाठीं वेळेवर यायचं....अन् हे लवकर आलो तें दमयंतीसाठीं....' माझ्या मनांतला हा विचार तिच्याजवळ मी बोललो नाहीं. तिच्या तत्त्वज्ञानी भावाला समजणार नाहीं तें तिला तरी कसं उमगेल ? एका अकारण, अचानक नाहींशा झालेल्या संसारी तरुणाच्या आत्म्याचं ओझं माझ्यावर होतं. मला आयुष्यांतला प्रत्येक क्षण जगायचं होतं. जीवन भरभरून लुटायचं होतं.....

कांहीं दिवसांनी अशीच अचानक समुद्रकाठीं आमची भेट झाली. मी किनाऱ्यानें झपझप चालत होतो व ती लाटांच्या घडया पावलावर घेत होती.

"कुठें ?"

"असाच निघालों आहे..."

"आनंदाची बातमी न सांगतांच ? वहिनींना दिवस गेले आहेत नं ? दिवाडकर सांगत होती..."

"दिवाडकर हेर दिसत्येय् तुमची..." मी तिच्याजवळ उभं राहून लाटा चुकवूं लागलो.

"नाहीं हो. आजच सकाळीं ती अचानक भेटली. खरं म्हणजे मी तिला टाळते हल्लीं. तुम्हांला असं वाटेल म्हणून..."

"थट्टा केली मी. घरीं या ना एकदां..."





"पूर्वी आले असते. आतां नको. तुमचं आयुष्य पहायला, तुमच्याबद्दल बातमी काढायला नको वाटतं. फक्त तुमचं अस्तित्व ! तुम्ही चालतां बोलतां, कामावर येतां, घरी जातां—तुमचा संसार वाढतो आहे ह्याचं मला किती बरं वाटतं...."

तिला मूल झालेलं नसावं, मातृत्वाची इच्छा पूर्ण व्हायच्या आधींच ती विधवा झाली असावी असं मला वाटलं. खात्री पटली. म्हणूनच तिला आतां माझ्या संसारांत भर पडते आहे ह्यानें मन:शांति मिळत असावी. मला तिचं कौतुक वाटलं. तिच्या समाधानी वृत्तीचं. शांत बोलण्याचं. आतां तिच्या हालचालींत मोकळेपणा आलेला होता. धारदार नाक शोभून दिसत होतं. चेहऱ्यावरचा चिडीचा भाव लोपला होता. निसरड्या वाळूंत पाय रोवून ती खंबीरपणें उभी होती.

मावळत्या सूर्यासमोर उभी असलेली तिची निश्चल आकृति पाहून माझ्या मनावरचा जडपणा ओहोटून गेला. मृत्यूची धास्ती, दुसऱ्याच्या दु:खाबद्दलचा अपराधीपणा, एका आत्म्याचं ओझं— कांहीं मला जाणवेनासं झालं. प्रत्येक क्षण, प्रत्येक शब्द, प्रत्येक हालचाल मला सुंदर, अक्षर दिसूं लागली. मी माझ्यासाठीं जगत आहे—आणि माझ्या आयुष्याच्या आधारानें ती ! तिच्या ठसठशीत कुंकवांत माझ्या पत्नीचं सौभाग्य लपलं होतं. पत्नीच्या गरोदरपणानें हिची कुस निवत होती. माझ्या दैनंदिन कार्यक्रमानें हिचं संसाराचं थांबलेलं घड्याळ टिकटिकूं लागलं होतं. जणुं त्या दिवशीं ती अंजिरी साडी नेसून नि अबोलीची वेणी घालून सिनेमाला गेली होती. वारंवार जाते. तिचा नवरा नियमित घरीं येतो. क्लबांत जातो. समुद्रावर जातो. ती स्वत: संसारांत गढून गेली आहे. गृहिणीचं, मातेचं सुख उपभोगते आहे.

तिचं जीवन वाहतं आहे—

असेंच आम्ही कधींतरी भेटतो. समुद्रकाठीं, कॉफीगृहांत, फळ विक्याजवळ, बसस्टॉपवर. तुटपुंज्या, धांवत्या भेटी.

"घरीं निघालांत ?"

"हो. आज घरीं पत्त्याचा अड्डा आहे–"

"लवकर जा..."

शब्दांचीहि फारशी गरज भासत नाहीं. नुसता दृष्टिक्षेप, अस्पष्ट हास्य, ती दिसतांच मी फुलून जातो. हात हालवतो. ती मान डोलावते. डोळा भरून पाहाते. तिचं भोवंडलेलं मन भानावर येतं. कांहीं संपलं नाहीं, तुटलं नाहीं, अशा भावनेनें ती चालूं लागते. आणि धीरगंभीर वागणारा, व क्षणभंगुरत्वाचा विचार करणारा मी अधिक जिद्दीनें आयुष्यांत मिसळून जातो. जणुं दमयंतीच्या पतीचा अडलेला जीवनौघ मला पुढें रेटायचा आहे. मला दुप्पट बळ येतं नि तिला नवा हुरुप वाटतो. आमच्यांत असा एक संकेत, एक नातं निर्माण झालं आहे. आकर्षण नाहीं, सहवास नाहीं, नात्याचा नि जातीचा संबंध नाहीं. पण मैत्रिण, प्रेयसी, पत्नी या पलीकडचं असं कांहीं आत्म्यांना जोडणारं लेणं !

अतूट, अदृश्य !

•••














न. वि. गाडगीळ

**'परदेशी सैंया मत रुक जा' हें गीत ग्रामोफोनची तबकडी गात होती. माझ्यापुढें पेचप्रसंग निर्माण झाला होता. हें घेऊं, कीं तें घेऊं ? एक झगझगीत आकर्षक तर दुसरें मलिन मनाला मोह न पाडणारें ! काय करूं ? कसें करूं ?**

ती एक सुप्रभात होती. शरद ऋतु नुकताच सुरू झाला होता. आकाशांतील ढगआतां राजकारणी पुरुषांप्रमाणें गरजणारेच होत चालले होते. आतां ते वर्षाव करणारे नव्हते. "शरदके बादलग रजते हैं, बरसते नही" ही पंजाबांतील म्हण अनुभवावर आधारलेली आहे. गुरुदासपूरच्या सर्किट हाऊसहून त्या सुप्रभातीं निघून हा पंजाबचा सुभेदार सपत्निक डेरा बाबा नानक ह्या पवित्र तीर्थाला भेट देण्यास जात होता. हें गांव रावीच्या तीरावर तिच्या पूर्वेस अडीच तीन मैलांवर आहे. दोन्हीं बाजूच्या प्रदेशांना समृद्ध करणारी रावी आतां दोन्हीं प्रदेशांना कापून विभागांची रेषा बनली होती. करवलीचें काम करण्याऐवजीं करवतीचे काम तिनें केलें होतें. वांटणीनंतरच्या तात्पुरत्या तडजोडीनें तिच्यावरील पूल निम्मा निम्मा दोन देशांमध्यें वांटला गेला होता.

शिखांचे पहिले गुरु, गुरु नानक ह्यांचा मृत्यु ज्या गांवीं झाला, ते कर्तारपूर पाकिस्तानच्या हद्दींत रावीच्या तीरावर त्या पुलापासून तिच्या पश्चिम तटावर दीड मैलावर होतें. आणि त्या पुलाच्या मध्यावर उभें राहून माझ्याप्रमाणें तें अनेकांनी पाहिलें होतें व अनेक तें अजूनही पाहात आहेत. गुरु नानक यांचा धर्म समावेशक. दोन्हीं धर्मांतील लोक त्यांचे शिष्य होते. आणि मृत्युनंतर त्यांच्या देहाचें दहन कां दफन करावयाचें ह्याचा वाद झाला होता, आणि रात्रीं रावीच्या तीरावर त्यांचें प्रेत ठेवल्यानंतर पहांटे पहातात तों तेथें देह दिसला नाहीं. अर्धा भाग सब्जा व अर्धा भाग फुलें आणि याची वांटणी करून सब्जाचे दफन व फुलांचे दहन करण्यांत आलें, अशी आख्यायिका आहे. साऱ्या भारतांत नऊ वेळां यात्रा अगर "उदासी" करून सिलोन, इराण, मक्का मदिनेपर्यंत ते जाऊन आले होते. आणि वार्धक्य प्राप्त होतांच रावीच्या तीरावर नवें शहर वसवून त्याचें नांव कर्तारपूर ठेवलें होतें.

कर्तार म्हणजे ईश्वर, आणि त्याच शहराच्या जवळ जवळ समोर पण रावीच्या पूर्व तीरावर डेराबाबा नानक हें गांव वसविलें गेलें व त्या ठिकाणीं गुरुद्वार बांधलें गेलें आणि परंपरेनें आज त्या ठिकाणीं एका सुंदर पेटींत त्या गुरुद्वारांत मक्केच्या इमामानें गुरु नानक यांना अर्पण केलेलें एक महावस्त्र अगर झब्बा ठेवलेला आहे. त्या झब्ब्यावर जवळ जवळ ३०–४० वस्त्रांचीं वेष्टनें आहेत. व हें गुरुद्वार पवित्र मानतात.

शीख धर्मांत ज्या पांच-सात गुरुद्वारांना मोठी प्रतिष्ठा आहे, त्यांत डेराबाबा नानक ह्या गुरुद्वाराची गणना होते. अमृतसरचें दरबार साहेब हे मोठें गुरुद्वार. डमडम येथील गुरुद्वार महत्वाचें मानलें जातें त्या ठिकाणीं गुरु ग्रंथसाहेब, गुरु तेजबहाद्दूर यांनी पुनर्संकलित केला असें मानलें जातें. फत्तेगडसाहेब येथें गुरु गोविंदसिंग यांच्या मुलांना औरंगजेब बादशहानें भिंतींत चिणून मारलें म्हणून त्याचें महत्त्व आहे. अनंतपूर येथील गुरुद्वार–प्रथम खालसा पंथ येथें स्थापन झाला म्हणून – प्रसिद्ध आहे.

अमृतदीक्षा हा विधी येथें प्रथम झाला. पंचप्यारे यांच्या रक्तांतून तो करण्यांत आला, असी इतिहास आहे. खालसा म्हणजे शुद्ध. अनमत व हिंमतहीन अशा समाजाला गुरु गोविंदसिंग यांनी सिंह बनविलें. पांच "क" कारांनी त्यांना पंचहत्यारी बनविलें. केस, कंगवा, कच्छ, कंकण और कटचार यांनी एक वैशिष्टय शीख संप्रदायाला त्यांनी दिलें. पाटणा येथील गुरुद्वार गुरु गोविंदाच्या जन्मामुळें प्रसिद्ध आहे व नांदेड येथील त्यांच्या मृत्युमुळें प्रसिद्ध आहे.

चार वर्षांच्या कारकीर्दींत हीं पवित्र तीर्थें मी पाहिली होती. आणि वर लिहिल्याप्रमाणें त्या सुप्रभातीं डेराबाबा नानककडें चाललो होतो. शीखांचा इतिहास वाचला होता, दंतकथा ऐकल्या होत्या, त्यांतील संस्कारांचा प्रेक्षक झालों होतो. मक्केच्या इमामानें दिलेलें वस्त्र पहाण्याची इच्छा होती.

असें कथानक आहे कीं, रात्रीच्या वेळीं गुरु नानक शिष्यांसह मक्केला पोचले आणि निजतांना काबाच्या दिशेला पाय करून निजले. एका मुसलमानानें तें पाहिलें व त्याला राग आला. गुरुंनी त्याला सांगितलें कीं, जरा वळवून दुसऱ्या दिशेला कर. त्यानें तें करावें व त्याला त्याच दिशेला काबा दिसावा असें घडलें. आणि म्हणून मक्केच्या इमामानें संत मानून महावस्त्र (झब्बा) अर्पण केलें होतें. ह्या सगळ्या गोष्टी माझ्या मनाच्या संग्रहालयांत व स्मृति-खान्यांत दाखल होत्या.

ती सुंदर प्रभात होती. शरद ऋतूंतील सुसह्य व सुखमय थंडी हवा दिलबहार वहात होती.

कार्यक्रमांत रस्त्यावरील एका खेड्याला (लाट साहेबानीं भेट द्यावयाची होती) व त्यानंतर माजी सैनिकांची सभा होती. शेतकऱ्यांची सभा होती. आणि तेथें मानपत्र समारंभ पण होता. गांवापासून दोन फर्लांग दूर सभेची व्यवस्था होती. पण त्या ठिकाणीं जाण्यास गांवच्याच रस्त्यांतून मार्ग होता.

पंजाब म्हणजे सुपीक जमीन, स्वरूपाने काळी नव्हे, ताम्रमुखी पण नव्हे पण नयन मनोहर अशी होती. किंचित् नांगरल्यानें सुफलाम् सस्यशामलाम् होणार होती. तिला आळविण्यासाठीं सुनीत करण्याचीसुद्धां जरुर नव्हती. एका पंक्तीच्या लकेरीने प्रेयसी मुग्ध होऊन पदरी पडावी अशी ती सुलभप्राप्त पंजाबची जमीन आहे. सांगण्याचें कारण नाहीं कीं, गांवच्या पंचायतीनें रस्त्याच्या दोन्ही बाजूंच्या घरांना रंगसफेती देण्यास मालकांना सांगितलें होतें व तसें झालें होतें.

शासक ज्या सफाईने चुकांवर शासक सफेती देतो, तितकी कार्यक्षमत तेथें दिसून आली होती. त्या "पिंडांत" म्हणजे त्या खेडेगांवांत सूर्य जन्मल्यापासून कधी राजा, महाराजा अगर त्याचा आधुनिक प्रतिनिधि लाट साहेब आला नव्हता. त्या गांवच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं हा दिवस लिहिला जाणार होता व सकाळच्या सूर्याच्या सुवर्णकिरणांनीं जमिनीच्या कागदावर ती धुळाक्षरें लिहिलीं जात होतीं. गांवात प्रवेश करतांना दहा-पांच ठिकाणी उंटावर बसलेली माणसें पण खरीं शहाणपणा असणारीं दिसलीं. पंजाबमध्यें पूर्वी जांवयाला स्वारीसाठी उंट देत व मुलीला फणी करंड्याच्या पेटी ऐवजीं अगर अलीकडील अनुभवांत बोलायचें झालें तर फेस पावडरच्या डब्या ऐवजीं रेटिया अगर चरखा देण्याची वहिवाट होती. अजूनही ग्रामीण भागांतून रंगीत चरखा नूतन वधूला सासरीं धाडतांना तिची आई देत असते. आतां तें बदललें आहे. ज्या भागांत सतलजच्या जलसंपत्तीनें समृद्धि आणली आहे, त्या भागांत आतां जांवई जीपचा हट्ट धरतो आणि त्याला ती गुपचूपपणें मिळते.

त्या अरुंद गांवांतून आमची गाडी चालली होती. दुमजली घर एखादें दुसरें होतें. पण एकमजली घरें प्रौढ स्त्री दिसावी त्याप्रमाणें ठसठशीत, तोंड स्वच्छ केलेली अशीं दिसत होतीं. दाराजवळ मुलें-मुलीं उंम्बा असलेल्या पाहिल्या आणि "दुल्हा आयो रे" म्हणजे वर आला हें गाणें सारखें ऐकूं येत होतें. जणुं कांहीं परगांवाहून लग्नासाठीं आलेल्या दुल्हाचें स्वागत होतें, त्याचीं "वरात" गांवांत प्रवेश करत होती. पण थोडें पंजाबी येत असल्यानें मी पत्नीला म्हणालो कीं, तुला आतां दुल्हन बनलें पाहिजे. वयांत कमी जास्त करतां येत नसलें तरी रुपांत लावलेल्या लेबलाप्रमाणें बदल केले पाहिजे.

ठिकठिकाणीं झेंडूचे हार पडत होते. उत्तर हिंदुस्तानांत आणि विशेषत: "झेंडूची फुलें" मुबलक, म्हणजे वस्तुस्थितींत, काव्यांत नव्हे. आपल्याकडे झेंडूचीं फुलें म्हणजे घोड्यांना अहेर करण्यासाठींच असतात. शंकराला धत्तुरा व घोड्यांना झेंडू अशी आमची महाराष्ट्रीय परंपरा आहे. बेलावर शंकराला खूष करायचें व तुळशीचें पान देऊन त्रैलोक्याचा राजा विष्णूला गौरवावयाचें ही आमची व्यापारी—नव्हे ही आमची महाराष्ट्राची खास संस्कृति आहे. ह्याप्रमाणें माळा घेत घेत चोहों बाजूंच्या गर्दीतून सारथी संपूर्णसिंग आधुनिक रथ—अश्वरहित पण चार चक्राचा चालवीत होता.

आणि अशाच एका मोठया दरवाजाच्या घराजवळ गाडी आली आणि त्याठिकाणीं मला खालीं उतरण्याची विनंती करण्यांत आली. तें घर गांवचा राव म्हणजे पटवाऱ्याचें होतें. "राव करील तें गांव करूं शकणार नाहीं" हा मराठी अनुभव मला होता. आणि हुकूम करणारा मी केलेला हुकूम पाळता झालों. ऊंबऱ्याच्या बाहेर पांच दहा स्त्रिया व पुरुष जमले होते. गांवचा पटवारी पुढें आला व त्यानें नम्रतेनें खालीं उतरण्यास सांगितलें. मी उतरलों.

सामान्यपणें सर्वांना सारखा न्याय द्यावा या मताचा मी कोणा एकाकडे जेवावयास अगर पानसुपारीस जाणें हे कटाक्षानें टाळत असें. दौऱ्यावर गोव्याचा आचारी फ्रॅन्सिस व सारा सरंजाम घेऊन जात असें, आणि सार्वजनिक चहापार्टी फक्त घेई. त्यामुळें खालीं उतरण्यासहि मन संकोच करत होतें. तथापि, त्या साठीं उलटलेल्या पटवाऱ्यानें माझी वृद्ध आई तुम्हांला पाहूं इच्छिते तरी कृपा करून आपण उतरा व पांचें पावलें चाला असें सांगितलें. वृद्ध व अपंग माणसांच्या बाबतींत मी थोडा भावनावश असतो, आणि त्यांच्या बाबतींत अनुशासनशील मन व निश्चयी विवेकसुद्धां कमीजास्त होतो आणि कोणी कारण विचारलें तर मला तें सांगतां येणार नाहीं. आणि माझी वृद्ध माता हे शब्द ऐकतांच पायांनी तावडतोब मनाचे भाव ओळखून गतीक्षम झाले.

मी अर्ध्या मिनिटाचे आंत वृद्ध स्त्रीच्या जवळ गेलों. डोळे उत्तम असून दृष्टि मंदावलेली दिसत होती, हात गोरेपान होते पण वार्धक्यानें सुरकुतीच्या लाटांनीं तो सुंदर प्रदेश काबीज केला होता, मुखावर तशीच स्थिती होती पण एकंदर चेहरा पहातांच "आकृति विशेषेशु आदरा: पदंकरोति" असेंच झालें.

मी तिला लवून नमस्कार केला. आणि सहज विचारलें, कीं, "आई तुझे वय किती," तिनें सांगितलें कीं, "मोट्टा दुष्काळ पडला होता, त्यावेळीं माझ्या ओटींत (गोदमे) उलाल होते. (तीन मुलें होती) माझ्या मनाने क्षणांत कालगणाना करून १८९६ सालच्या दुष्काळांत ती तीन मुलांची आई होती असें मत निर्णयात्मक तऱ्हेनें माझ्या निदर्शनास

आणलें म्हणजे त्यावेळीं ती निदान बावीस–पंचवीस वर्षांची होती व चालू सौल १९५९ चे होतें. म्हणजे ती ऐंशी उलटलेली व नव्वदच्या जवळ असणारी होती. आणि तिनें सांगितलें कीं सहा मुलांपैकीं एक पटवारी आहे, दोन माजी सैनिक आहेत, खाविंद सरकारच्या खिदमतीत एक मारला गेला, तसेंच तीन पुत्र बादशाहा सलामतच्या कामांत खर्ची पडले. सारा साठ वर्षांचा इतिहास डोळ्यापुढें आला.

द. आफ्रिकेच्या युद्धांत, पहिल्या व दुसऱ्या महायुद्धांत पंजाबांतील लाखों लोकांनी इंग्रजांसाठीं प्राणार्पण केलें होतें, हा इतिहास मला ज्ञात होता. सुना, नाती, नातवंडे पतवंडे वटवृक्षाला पारंब्या फुटाव्या त्याप्रमाणें मी क्षणांत मनांत उभें केलें. गेल्या महायुद्धानंतर पंजाबमध्यें सहा लाखावर माजी सैनिक आहेत व मुख्यत्वेंकरून ते गांवामध्यें राहून शेतीचा व्यवसाय करत असतात, आणि लष्करी बाणा अंगी आल्यानें भारताबाहेरील जग पहिल्यानें त्यांची दृष्टि विशाल झालेली असते, आजच्या पंजाबच्या भाग्योदयाची इमारत ह्या सद्गुणांवर आधारलेली आहे.

• ह्याप्रमाणें दोन-चार मिनिटें मी तिच्याशी बोललों व नंतर त्या वृद्ध मातेनें दोन ताटें मला वाटते सुनेच्या हातून घेतली. त्या मध्यमवयीन सुना पंजाबच्या सौंदर्याला शालीनतेची जोड दिलेल्या, अशा दिसत होत्या. पंजाबमध्यें आतां पडदा नाहीं. ती दोन ताटें जेव्हां मी पाहिलीं तेव्हां त्यांत असें दिसून आले कीं, एकांत रेशमी वस्त्र व मिठाई होती व दुसऱ्यांत खादीचे काळसर असे वस्त्र होतें. मग ती वृद्ध माता मला म्हणाली, "मी अजून ह्या वयांत सुद्धां थोडा थोडा चरखा चालवून सूत काढते. व मी काढलेल्या सुतांतून हें वस्त्र विणून तुम्ही येणार म्हणून तुम्हांला देण्यासाठीं मी तयार केलें आहे."



"माझा हा मुलगा मोठ्या पटवारीपणाच्या तोऱ्यानें म्हणाला, तूं हें काय घाणेरडे कापड लाटसाहेबांना देतेस. त्यानें बाजारांतून हें रेशमी कापड आणलें व तें मी द्यावें असें त्यानें सांगितलें आहे"

"माझी इच्छा माझ्या हातचें विणलेलें कापड तुम्ही घ्यावें. माझ्या हातचा स्वैपांक अजून माझ्या मुलाला आवडतो. व ह्या वस्त्राच्या बाबतींत मात्र तो माझ्याशीं वेड्यासारखा भांडत आहे."

माझ्यापुढें पेचप्रसंग निर्माण झाला. दुसऱ्या ताटांतील वस्त्र रेशमी होतें पण त्याला औपचारिकतेचा वास येत होता. तें निःसंशय आकर्षक होतें. पण त्याच्यामागचें मन निष्काम नव्हतें. माझ्या मनः प्रवृत्तीला विन्मुख असे ते होते. पांच वर्षांच्या मंत्रीपदाच्या आयुष्यांत साडेतीन–चार वर्षांच्या राज्यपाल पदाच्या आयुष्यांत नजर घेण्याचे प्रसंग आले; पण असा पेचप्रसंग कधीच निर्माण झाला नाहीं. मंत्र्यांनीं काय नजराणा घ्यावा ? काय आहेर घ्यावे ? ह्याला आम्ही निदान सुरुवातीच्या प्रहरांत संकेत ठरविले होते. सरकारी नोकरांना दहा रु. किंमतीपेक्षां अधिक घेण्यास मनाई होती. मंत्र्याचा धनिकांशीं संबंध नसावा, कोठल्याही कंपनीचे चालक अगर भागीदार असूं नये असा संकेत होता. तो अनेकांनी पाळला होता त्यांत मी पण होतों.

आतां मुळाच्याच काय, पुतण्याचें लग्नांत सुद्धां संबंध नसणाऱ्या व्यक्ति विशेषतः व्यापारक्षेत्रांतील व्यक्ति बोलविल्या जातात. ते रिक्त हस्तें येत नाहींत; पण जातांना रिक्त हातानें जातात. थोड्या वेळांत संपूर्ण सभ्यतेनें मोठी संपत्ति मिळविण्याचा हा एक मार्ग सध्यांचे लोकशाहीत प्रस्थापित झाला आहे. निवडणुकीचे निमित्तानें पक्षच काय पण मंत्री, आमदार, खासदार हे मंत्री, अनेकांपासून पैसे घेतात आणि त्याचा हिशोब नसतो. कारण लोकशाही राज्यांत हिशोब मागण्याचा हक्क असला तरी न देण्याची प्रथा आहे. आणि तें कार्य राजकारणाच्या क्षेत्रांत इमानें इतबारें सर्वजण करत असतात.

राज्यपाल असतांनासुद्धां अनेक वेळां सकाम नजराणे परत केले होते. लग्नाच्या निमित्ताने एका महाराजाकडे गेलो असतां दोन–अडीचशे रु. किंमतीचे ट्रे त्याने मला दिले, ते नाकारणें असभ्यतेचे दिसले असते म्हणून ते स्वीकारले. पण लग्नाचें निमित्तानें १०० रु. चा चेक त्या राजकुमारीला दिला. व ह्या बाबतींत त्यावेळचे गृहमंत्री कै. पंत यांना लिहिलें. त्यांनीं सांगितलें कीं, तुम्ही केलें तें योग्य केलें, तथापि यथासमय योग्य ते नियम करूं. अजून ते झाले नाहीं. पण त्या दिवशींसारखा पेचप्रसंग कधीं आला नव्हता.

त्या दिवशींच्या त्या रेशमी अहेरांत दात्यांची अनासक्ति नव्हती व अंततोगताः ते कार्य निष्काम पण नव्हते. पण त्याचबरोबर तें न स्वीकारणें पंजाबी रीतीरिवाजाप्रमाणें असभ्यतेचे ठरलें असतें व कदाचित् मी ते नाकारले तर त्याचा अर्थ मी देणाराला तुच्छ मानतों असा झाला असता, याच्या उलट ती मलिन खादी निर्हेतुक होती. तिच्या भोंवती निष्कामतेचें वलय होतें, दात्यामध्यें अकृत्रिम विनय होता कृत्य भावनेने ओथंबलेले होते. निवड उघड होती, पण परिस्थितीनें अवघडलेली होती व क्षणभर असें वाटलें कीं, त्या वृद्धेचे वस्त्र स्वीकारलें तर घरांत गृहकलह माजेल व कदाचित् आजपर्यंत न झालेला सासू–सुनांचा संग्राम घडून येईल.

एक वेळ असे वाटले कीं, त्या वृद्ध स्त्रीलाच विचारावें कीं, "तूंच ह्या दोहोंतील कोणतें घेऊं तें सांग ?" ह्याचा अर्थ मनानें झटकन् केला कीं, माझी जबाबदारी मी टाळत आहे व माझ्यावरील पेंचप्रसंग मी त्या वृद्धेवर प्रक्षेपित करीत आहे. मंत्र्याच्या चुका सनदी नोकरांवर












अनुक्रमणिका

टाकण्याची प्रथा मला परिचित होती. पण त्या परिस्थितींत मी मंत्री नव्हतो व ती वृद्धा सनदी नोकर नव्हती. त्या क्षणांत साऱ्या समस्यांना मार्गदर्शन करणारा महाभारताचा ग्रंथ आठवला, पण मार्गदर्शन मिळेना. नाकारण्यांत व स्वीकारण्यांत दुःख न उत्पन्न करतां सुख घ्यावयाचें होतें, कौशल्याचे काम होतें. आणि विचार करायला वेळ नव्हता. दूरवरच्या सभेंतील फोनोग्राफरची गाणी ऐकत होतो. "परदेशी सैया मत रुक जा" हे आवाज कानावर येत होते. पाय तयार होते, मन आदेश द्यायला तयार होतें. पण हुकुमाचा शब्द आठवत नव्हता.

मनुष्य ज्याप्रमाणें काय म्हणतात बुवा असे करतो व विसरलें म्हणतां म्हणतां एकदम आठवतें. त्याप्रमाणें माझें झालें. मानसशास्त्र असे सांगतें कीं, परिस्थितीच मार्ग सुचवते व पेंचप्रसंगच त्यांतून सुटकेचा मार्ग दाखवतो. त्या वृद्ध मातेकडे पाहिले, तिच्या प्रौढ सुनांकडे पाहिले व तिच्याचजवळ बिलगून असलेल्या १०–१२ वर्षांच्या पतवंडाकडे पाहिलें व लागलीच मनाचा निर्णय झाला. सुनेच्या ताटांतील रेशमी कपड्याचा आहेर घेऊन तो कपडा मोठ्या चातुर्यानें त्या नातवंडाच्या अंगावर घातला व त्याला म्हणालो, "मुन्ना, मी तुला दिला आहे." आणि मग प्रसन्न मनानें मी त्या वृद्ध स्त्रीला म्हणालो, "माते मुझे ये खादीका वस्त्र दे" तिच्या दृष्टीला जवळच घडल्यानें व मी जे बोललों तें तिनें ऐकल्यानें तिला धन्यता वाटली आणि तिने आपल्या हाताने वस्त्र मला दिले, डोक्यावरून हात फिरवला व मला "जुग जुग जीयो" असा अशीर्वाद दिला.

तिला नमस्कार करून मी गाडींत आलों. पत्नीनें त्या काळ्या खादीकडे पाहिलें. मी खादीकडे व पत्नीच्या मुखाकडे पाहिले. व दोन्हींत फारसा फरक नाहीं, हा भाग दर्शविला व तिला तो समजतांच तिच्या मुखावरील अविर्भाव पाहून मला खराच आनंद झाला. डेरा-बाबा नानकाच्या गुरुद्वारांतील त्यांत गुप्त मंजुषेंत ठेवलेलें इमामानें गुरु नानकांना दिलेलें वस्त्र पाहिलें व दोन्हीं घटनांची एक चमक मनरूपी आकाशांत उज्वलीत होऊन गेली.

चंदीगडला परतल्यावर धोब्याला ते वस्त्र धुण्यास सांगितले. तो मनांत हंसला. दोन्ही वेळां धुवूनही रंग जाईना म्हणून तक्रार करूं लागला. मी त्याला सांगितलें कीं, तू हें वस्त्र स्वच्छ केलेंच पाहिजे. याचा अर्थ त्याला समजला. त्यानें तें वस्त्र शुभ्र करून आणून दिलें. विद्यमान् सार्वजनिक जीवन शुद्ध करण्याइतकेंच तें कठीण काम होतें पण त्यानें तें केलें. तथापि माझ्या मनांतल्या वृद्ध स्त्रीनें इतक्या प्रेमानें दिलेला नजराणा, निर्मळ श्रद्धेनें दिलेला आहेर, आशिर्वाद दिलेलें वस्त्र मी घेतलें ह्यांत कुठें तरी चुकलें असें क्षणभर वाटूं लागतें. मग मी रु. २५ ची मनिऑर्डर त्या जिल्ह्याच्या अधिकाऱ्याकडे धाडून त्या वृद्ध-स्त्रीनें गांवांतील शाळेंतील मुलांमुलींना मिठाई वाटावी असे कळविलें आणि मग तें खादीचें वस्त्र पूर्ण शुक्लेंदुप्रमाणें मला शुभ्र वाटलें आणि त्याचा कोट अजूनहि मी मधून मधून घालतो. ज्यावेळीं मन विषण्ण असेल, चिंताग्रस्त असेल, त्यावेळीं तें घालतो, घरांत टीका होते, बाहेर उपहासाचा विषय होतो, पण अंतःकरणांत एक अवर्णनीय आनंद होत असतो. पुन्हां जर असा प्रसंग आला तर मी पुन्हां "हेचि वस्त्र मज देगे माते" असें म्हणेन.

●●●

खोकल्यापासून आराम मिळण्यासाठीं

# वॉटरबरीज् कम्पाउण्ड

लाल लेबल

घ्या








हट्टी खोकल्यानें शरीर अशक्त होतें आणि अंगची रोगप्रतिकारशक्ति देखील कमी होते. वॉटरबरीज् कम्पाउण्ड घेतल्यास त्याच्या त्रिविध गुणधर्मांमुळें आराम पडतो, शक्तीचा ऱ्हास भरून निघतो आणि अंगची रोगप्रतिकारशक्ति वाढते. त्यामधील क्रिओसोट व गायकॉल या क्रियाशील घटकांमुळें खोकल्यापासून आराम मिळतो; लोह व इतर पौष्टिक घटक, सातूचें सत्त्व व प्लीहेचा अर्क यांमुळें भूक वाढते, अंगांत जोम व उत्साह निर्माण होतो आणि शरिराची रोगप्रतिकारशक्ति वाढून आजार पुनः बळावण्याची शक्यता कमी होते.

बाराहि महिने अंगीं रोगप्रतिकारशक्ति कायम राहण्यासाठीं लाल लेबलचें वॉटरबरीज कम्पाउण्ड नियमितपणें घेत जा.



वॉटरबरीज् कम्पाउण्डमधील क्रिओसोट व गायकॉल हीं द्रव्यें कफाचा नाश करतात आणि श्वसनमार्गातील रोग-जंतूंचादि प्रतिकार करतात. त्यामुळें फुप्फुसें साफ राहतात आणि खोकला, सर्दी-पडसें, श्वास चोंदण्याचा त्रास नि श्वसनसंस्थेतील अन्य उपद्रव नाहीसे होण्यास मदत होऊन ते पुनः होण्यात पायबंद बसतो.

## वॉटरबरीज् कम्पाउण्ड

**खोकला, सर्दी-पडसें, श्वास चोंदण्याचा त्रास व श्वसनसंस्थेतील अन्य उपद्रव यांविरुद्ध शरिराची प्रतिकारशक्ति वाढवितें**

वॉर्नर-हिंदुस्थान लिमिटेड, मुंबई

— समुद्राला कोणीतरी सतत ओढीत असतं मंजू ! कधीं इकडे तर कधीं तिकडे ! जीवा-जीवांची ही ओढ सनातन आहे.

वाळूवर बसूं या का जरा ? मनांतल्या लाटा पायांना घरीं जाऊं देत नाहींत.

— तुझ्या उधाणाला इथें समुद्राची साथ आहे म्हणून !!




—मा. कृ. पारधी

रा गावलीस ?

—हो.....हंसतां काय ?

—बरं वाटलं तूं रागावलीस म्हणून.

—माझ्या रागाची एवढीच किंमत ?

—ही किंमत तुला एवढीच वाटली ? स्त्री रागावली कीं अधिक सुंदर दिसते म्हणतात.

—स्त्री म्हणजे नाचणारी बाहुली वाटते का तुम्हांला ? केवळ तुमच्या रंजनासाठीं नाचणारी ?

—बाहुली बिहुली नाहीं म्हणत मी. पण स्त्री पुरुषाचं रंजन आहे असं खरंच मला वाटतं. पण रंजन म्हणजे खेळणं नव्हे बरं.- स्त्री ही रागिणी मानतों मी. जीवनांत जें जें रंजक आहे त्याची धात्री. त्याखेरीज तिची दुसरी भूमिका मला दिसत नाहीं. आणि ती फार महान भूमिका वाटते मला. जीवनांत पुरुषाचं स्थान हें जर तूं नीट पाहिलंस तर माझं म्हणणं पटेल तुला.

—शब्द मोठे वापरल्यानं सार बदलत नाहीं. खेळणं काय न् रागिणी काय ! दोन्हीं एकच. माणूस सुधारत चाललाय् म्हणतात. पण स्त्री ही आपल्या विलासाची वस्तु ही पुरुषाची दृष्टि मात्र बदलली नाहीं.

—मला नाहीं तसं वाटत. दोन्हीं एकच नाहींत. फरक आहे. फार मोठा फरक आहे. मला दिसतो. दुसऱ्या पुरुषांचं मत ठाऊक नाहीं. माझं सांगतों. विलासाची वस्तु म्हणजे काय, हें मला वाटतं, मला कळतं. ही बघ. या हातांतल्या वाळूच्या गोळ्यासारखी धरतांच निसटत जाणारी वस्तु आहे ती. पण रागिणीचं रूप माझ्या कल्पनेंत मावत नाहीं, मंजू ! आणि तें कधींच संपतांना दिसत नाहीं. नित्य आणि नवं ! सनातन आणि अपार !

पण ती रागिणी रागावली तरी, ती अधिक सुंदर दिसते एवढीच तिची तुमच्याजवळ किंमत ! म्हणजे एकूण एकच कीं नाहीं ? नांव रागिणी, भाव वस्तूचाच.

—अंऽहं. भावहि कळला नाहीं तुला. सर्वच बायका आपल्याला सुंदर समजतात म्हणे. पण त्या तशा नसतात हें तुला कबूल असेलच. निदान स्वत:खेरीज जगांतली कोणतीहि स्त्री सुंदर नाहीं या न्यायानं तरी ! स्त्रियांविषयींचा हा प्रवाद जितका खरा असेल तितकंच तुझं म्हणणं खरं आहे. समजलं ना मी काय म्हणतों तें ? म्हणजे असं कीं, स्त्री जर स्वत:ला सौंदर्याखेरीज कांहीं वेगळं मूल्य लावीत नाहीं तर पुरुषानं तिला तेवढाच, बाह्य सौंदर्यापुरताच भाव द्यावा हें स्वाभाविकच नाहीं का ? मग तुम्हां स्त्रियांना 'पुरुषानं आम्हांला विलासाची वस्तु बनवली' अशी तक्रार करायला जागा कुठें उरते ?

—कोणीं सांगितलं तुम्हांला हें ? स्त्रियांना सौंदर्याखेरीज स्वत:ची किंमत वाटत नाहीं, हेंहि पुरुषांनींच उठवलेलं वालंट आहे. पुरुषच स्त्रीची वेगळी किंमत मानायला तयार नाहीं.

—चिडूं नकोस अशी. शक्य आहे, तसंहि असेल पण मला वाटतं, हा प्रवाद उठवण्यांत स्त्रियांचा हात पुरुषांपेक्षां कमी नसावा. विचार करून पहा. पण तो प्रवाद खरा असो, खोटा असो. मी तें केवळ थट्टेनं बोललों. मला वेगळंच म्हणायचं होतं. तें असं कीं, सर्वच स्त्रिया सुंदर नसतात हें तुला कबूल असेलच. तरीहि प्रत्येक स्त्री तिच्या पुरुषाला सुंदर दिसते. खरंच दिसते का ? तें सौंदर्य त्या पुरुषाच्या प्रेमाच्या भावनेमुळं त्याच्या दृष्टीला तिच्या ठिकाणीं दिसतं. म्हणजे प्रेमानं सौंदर्य येतं. हें अर्थातच बाह्य रूपाचं सौंदर्य नव्हे. खरं ना ? तसंच, प्रेयसी रागावली म्हणजे प्रियकराला सुंदर दिसते ती कां ? रागांत तिच्या रूपाचं सौंदर्य वाढतं असं नव्हे. तें येणार कोठून नव्हतंच तर ? पण, त्या रागाचं मूळ आपल्या विषयींच्या प्रेमांत आहे हें त्याला कळतं. त्या रागाम








अनुक्रमणिका



त्या प्रेमाची त्याला तीव्र जाणीव होते. आणि प्रमामुळ स्त्री सुंदर दिसते म्हणूनच रागाच्या वेळीं तें प्रेमाचं सौंदर्य त्याला उत्कटतेनं जाणवतं. तसं नसेल तर, रागांत स्त्री सुंदर दिसते हें म्हणणं खोटं तरी आहे किंवा मतलबी पुरुषाची मूर्ख स्त्रीला बनवण्याची लुच्चेगिरी तरी आहे. पटतं ना ?

–पुरे झाला वाद.

–कां ? वादाची तर फार खुमखुमी असते तुला.

–कंटाळा आलाय् आतां वादाचा. वाटतं, देवानं माणसाला बुद्धि दिली नसती तर बरं झालं असतं. व्यर्थ आहे. सारा बुद्धीचा दिमाख. कांहीं सुटत नाहीं बुद्धिवादानं. विचारानं गोंधळ माजतो.

–अरे, अरे ! असं काय बोलतेस ? स्वतःला बुद्धिवादी म्हणवणाऱ्या एका विदुषीनं असं बोलावं ?.... अग, निदान आपल्या प्रेमाला स्मरून तरी असं बोलू नकोस. या वादांतूनच तर हें प्रेम उपजलं.

–वादांतून उपजलं म्हणूनच असं वादग्रस्त राहिलंय्. वीट आलाय् आतां मला त्याचा.

–प्रेमाचा ?

हो, प्रेमाचा. वादाचा. स्वतःचाहि.

–अग, पण तूंच तर वाद उकरून काढलास. मी फक्त एवढंच म्हटलं होतं की तूं रागावलीस म्हणून मला बरं वाटलं.

–मीच वाद उकरला ! तेंच चुकलं माझं. नेहमींच चुकत आलं माझं. मी वाद घालीत बसलें. प्रेमाचं कोडंहि वादानं उकलण्याचा अट्टाहास केला. सगळंच बुद्धिवादानं कळतं असं समजून चाललें. आणि तुम्हीहि माझ्याबरोबर फक्त वाद घालीत बसलांत.

–काय करायला हवं होतं मी ?

–तुम्ही तुमच्या जागीं स्थिर उभं रहायचं होतं. माझ्याबरोबर वाहवायचं नव्हतं. म्हणजे कदाचित मी कुठें वाहवतेंय हें मला कळलं असतं. तुम्ही कुठे आहांत हें मला दिसलं असतं. तुम्ही कुठें आहांत हें मला कधींच दिसलं नाहीं, हेमंत. त्यामुळं मला स्वतःचं भान आलं तेव्हां मी गोंधळून गेलें. मी भलतीकडे वाहवलेली दिसलें. किनारा कुठें आहे, किनाऱ्यावर कसं जायचं, हें अजून दिसत नाहीं.

–फार गूढ बोलते आहेस मंजू तूं आज. तूं मेटाफिजिक्सची प्राध्यापिका आहेस हें आजच्या इतकं कधींच पटलं नव्हतं मला.

–चुलींत घाला ती मेटाफिजिक्सची प्राध्यापिका.

–बरोबर. बाई ती बाईच. शेवटीं ती चुलीवर जायचीच. पण

ती मेटाफिजिक्सची आधुनिक प्राध्यापिका असो की पुरातन काळची ब्रह्मवादिनी गार्गी असो. आतां चुलीवरून तूं मुलावर येशील अशी मला भीति वाटते.

—इतका पाचकळ विनोद शोभत नाहीं तुमच्या तोंडीं, हेमंत. आणि माफ करा, आज मी तुमची थट्टा रुचण्याच्याहि मन:स्थितींत नाहीं.

—आज तुझं लक्षण कांहीं तरी वेगळंच आहे हें केव्हांच लक्षांत आलंय् माझ्या. नेहमींची संध्याकाळची वेळ आणि ती वर्दळीची बाग सोडून तूं आज भर रात्रीं मला इथें समुद्रावरच्या एका कोपऱ्यांत फिरायला आणलंस तेव्हांच मी ओळखलं तें. मग मला वाटलं, तूं आतां मुकी होशील. आणि मनांत चरकलों. पण मग तूं नेहमीसारखी वाद घालूं लागलीस तेव्हा मला बरं वाटलं. पण माझी भीति खरी ठरण्याचीं लक्षणं पुन्हा दिसूं लागलीं आहेत.

—तुमची भीति ?

—हो. एकांतांत स्त्री मुकी झाली कीं मला भीति वाटते.

—हेमंत !.......

—बघ, तूं मुकी झालीस...... बोल मंजू ! कांहीं तरी बोल. अशी उगी राहूं नकोस.

—.............काय बोलूं ?.........

—कांहींहि बोल. तोंडास येईल तें. चार शिव्या दे. रागावून अद्वातद्वा बोल मला. मनास येईल तो वाद घाल. या गप बसण्यानं तूं माझ्यापासून दूर जाशील अशी भीति वाटतेय् मला आज.

—आज तुम्हीहि विचित्र बोलतांहांत. असं बोलत नाहीं तुम्हीं कधीं.

—नाहीं बोलत. तें बोलायला प्रसंग येऊं नये असें नेहमीं वाटत असतं मला. आज तुझं विचित्र बोलणं ऐकून असं, नको तें, बोलावं लागतंय् मला.

—आज मी प्रसंग आणला ! काय करूं मी तरी !

—बोल. स्पष्ट बोल. सगळं बोलून टाक. कदाचित् बोलल्यानंच सावरतां येईल. इतरांपेक्षां वेगळी वाटत आली आहेस तूं मला.

—कदाचित् मी इतरांसारखीच असेन. म्हणून तर बोलतां येत नाहीं.

—तसंहि असेल. पण मला वाटतं, तुला बोलतां येईल, बोललेलं समजेल.

—काय बोलूं ?.....न बोलतांच तुम्हांला समजलंय् सारं.

—हो, समजलंय्. पण तें गप राहून नासवूं नकोस. भावना माणसाला मुग्ध करते. बोल विचार करावयाला लावतो. भावनेचा आवेग बोलल्यानं सावरतां येतो. मग भावना वाकडं वळण घेत नाहीं.

—घेतलं तर त्यांत तुमचं काय नुकसान आहे ?

—जें आजवर जपलं तें नासवायला नाहीं, मंजू !

—मी तुमच्यापासून दूर जाईन एवढीच भीति ना ? माझ्या दूर जाण्याला इतकं भितां तुम्ही ?

—दुसरं भिण्यासारखं माझ्या आयुष्यांत कांहीं नाहीं.

—पण तुमच्या आयुष्यांत मुकी होणारी स्त्री मी कांहीं पहिलीच दिसत नाहीं ?

—नसेशील. मग ?

—ज्याच्या आयुष्यांत अनेक स्त्रिया आल्या गेल्या त्याला एकीची एवढी किंमत वाटण्याचं कारण नाहीं.

—पण वाटत असली तर ?
—कां ? तिच्यांत काय विशेष आहे ?
—नसेलहि. असावं असं वाटतं. पण नसलं म्हणून कांहीं विघडत नाहीं.
—मी मागितल्यावरहि माझी स्तुति देत नाहीं तुम्ही मला ?
—स्तुति खोटी असते. तुझ्याशीं खोटं वागण्याची माझी इच्छा नाहीं.
—असं काय विशेष वाटतं तुम्हांला माझ्यावद्दल ?
—विशेष वाटतं कीं नाहीं कोण जाणं. पण कोणाशींच खोटं वागलों नाहीं मी.
—मुक्या झालेल्या सर्वच स्त्रियांशीं खरं वागलां तुम्ही ?
—असं वाटतं मला.
—सर्वांवर प्रेम केलं तुम्ही ?
—या प्रश्नाचं उत्तर मला देतां येणार नाहीं.
—कां ? मी त्यांच्याशीं माझी तुलना करीन अशी भीति वाटते ?
— नाहीं. तुझ्या शब्दांवद्दल माझ्या जवळ निर्णय नाहीं म्हणून. मी प्रेम केलं कीं काय, हेंच मला सांगतां येणार नाहीं. कारण प्रेम कशाला म्हणायचं हें मला अजून सांगतां येत नाहीं. आणि त्यांच्या विषयीं जें वाटलं, तुझ्याविषयीं जें वाटतं तें कोणत्याहि एकाच विशिष्ट भावनेचं वनलेलं नव्हतं, जें वाटलं तें सर्वांच्या बाबतींत सारखं होतं असं तरी कसं म्हणूं ? निश्चित दिसतं तें एवढंच कीं माझ्याच ठिकाणीं कांहीं आर्तता आहे. तिची पूर्तता नक्की कशांत आहे हें मला ठाऊक नाहीं. पण स्त्रीच्या सहवासांत मी सुखावलों आहे.
—हेमंत.......
—बोल ना
—कांहीं निष्पन्न होत नाहीं यांतून. भलतीकडेच चाललं आहे हें.
—तुला कुठे जायचं आहे ?
—तुमच्याकडे.
—मी तुझ्याजवळच आहे मंजू.
—मी कुठे आहे ? तुमच्याजवळ ?
—तूं मानलंस तर ?
—कसं मानूं मी हेमंत ? तुम्ही फक्त मी कुठें आहे हें दाखवतां. तुम्ही स्वतःला दिसूंच देत नाहीं मला.
—आपण नेहमी आपल्यालाच बघतों मंजू. दुसरं माणूस आपल्याला दिसतच • नाहीं. दिसण्याची गरजहि नाहीं. आपण आपल्यालाच नीट बघितलं म्हणजे झालं.
—स्वतःलाच बघतां बघतां इतकं दिसायला लागलंय् अलिकडे कीं त्याचींच भीति वाटूं लागलीय् मला आतां.
—कायं दिसूं लागलंय् हें मी विचारीत नाहीं. पण आपली दृष्टि साफ असेल तर भिण्यासारखं कांहीं दिसण्याचं कारण नाहीं.
—माझी दृष्टि साफ आहे की मळलेली, हें कसं ठरवूं मी ?
—तुला जर ठरवतां येत नसेल तर दुसरा कोणीहि तुझ्याकरितां तें ठरवूं शकत नाहीं.
तुम्ही सुध्दां ?
ोणीच. माझ्यासारखा फक्त प्रेमाच्या नात्यानं मदत करूं शकेल.

–पण ती तरी करायची कुठे इच्छा आहे तुम्हांला ? तुम्ही तर मला कांहीं विचारायलाहि तयार नाहीं. जशी आपली ओळख सुध्दां नाहीं.

–ओळख म्हटलं तर आहे. पण किती अल्प ! हा समोर समुद्र दिसतो ना ? आपल्या दृष्टीच्या फेकींत दिसतो त्याहून किती तरी मोठा आहे तो, नाहीं का ? आणि आपल्याला त्याचा फक्त पृष्ठभाग दिसतो. आंत काय काय आहे हें कुठे पाहिलं आहे आपण ? तें एक त्या समुद्रालाच ठाऊक. पाणबुड्या तळाशीं गेला तरी त्याचं समुद्राविषयींच ज्ञान फक्त त्या बुडीच्या क्षेत्रापुरतं, बुडीच्या वेळेपुरतं.

–कशाला एवढी मोठी उपमा देतां मला ?

–उपमा नव्हे. दृष्टांत देतोंय. माणसाचं अंतरंग असं अमर्याद आहे. खरं म्हणजे, समुद्राहून मोठं. कितीहि झालं तरी समुद्र जड–निदान आपण तसा मानतो. त्याच्यांत बदल होऊन होऊन किती होणार ? पण माणूस सजीव, संस्कारी. त्याचं अंतरंग क्षणाक्षणाला बदलणारं; नित्य नव्या संस्कारांतून नवा आशय भरून घेणारें. तें कसं जाणायचं ? ज्या क्षणीं मला तुझी कांहीं ओळख झाली त्या क्षणानंतर तुझ्यांत जो बदल झाला असेल त्याची ओळख कशी व्हायची मला ? आणि तसं पाहिलं तर, इथल्या इथे तूं बदलते आहेस. आपण इथें येऊन बसलों तेव्हां तूं जी होतीस ती तूं आतां या क्षणीं नाहींस. आपल्या, वाटल्यास माझ्या म्हण, बोलण्यानं इथल्या इथे बदलवलंय तुला. तुला जें बोलावसं वाटत होतं तें मागे सरलं, वेगळंच बोलणं तुझ्या तोंडीं आलं. खरं ना ?

–माणसाचं मन इतकं क्षणोक्षणीं बदलूं लागलं तर माणसाला माणूस म्हणून ओळखणं कठीण जाईल, हेमंत. पण वाद घालीत नाहीं मी. सांगितलं ना, मला वीट आलाय् वादाचा. कांही साधत नाहीं या वादानं. समजा या वादांत मी जिंकलें तरी काय आलं माझ्या हातीं ? जें कांहीं माझ्या मनांत खळबळतं आहे तें कांहीं शांत झालं नाहीं. केवळ बौद्धिक विजयानं जीवाचं समाधान होण्याच्या अवस्थेंत राहिलों नाहीं मीं, हेमंत ! कां वादांत ओढतां मला ?

–वादांतून फक्त बौद्धिक आनंद मिळतो हें खरं नाहीं. वादहि दोन प्रकारचे असतात. केवळ बौद्धिक कसरतीसाठीं घातलेल्या वादांतून, बौद्धिकच कां होईना, पण आनंद तरी निर्माण होतो कीं नाहीं याची शंका आहे मला. आणखी एक वाद असतो शुद्ध वाद–वदण्याच्या क्रियेचा–दोन जीवांमधील व्यक्त भाषणाचा–संवादाचा–परस्परांच्या व्यक्तित्वाचीं स्पंदनं बोलांतून परस्परांना पोचवणारा. संवाद हाच खरा वाद.

–कुठें आहे तो संवाद ? त्याच्यासाठींच जीव व्याकुळ झालाय् माझा, हेमंत. आजवर झाला तो नुसता वाद होता. आजवर हा संवाद कां नाहीं सुचला तुम्हांला ? कां फक्त वाद घालीत बसलांत ?

–संवादाखेरीज वाद मला येत नाहीं, मंजू. निरनिराळ्या विषयांवर विचारांची देवाण–घेवाण केली मी तुझ्याशीं. पण केवळ विचारांचीं कोंवडीं झुंजवण्यासाठीं कधींच बोललों नाहीं मी. आणि त्या बौद्धिक देवाण-घेवाणींतूनच तुझ्या-माझ्यांत केवढा मोठा संवाद झाला, हें अजून कसं लक्षांत येत नाहीं तुझ्या ? आधीं नुसतेच ओळखीचे होतों. पण आज माझ्यासाठीं तूं अस्वस्थ होण्याइतकी आपण एकमेकांकडे ओढलों आहोंत, हें मान्य आहे ना तुला ? तुझ्याच म्हणण्याप्रमाणं, बौद्धिक वादांखेरीज आपण कांहींच बोललों नाहीं. मग हें त्या वादांतूनच झालं ना ? हा संवादच नव्हे का ?.... आपल्या मनांची घडणच अशी आहे मंजू, कीं वादांतूनच आपलीं हृदयं खुलतात. भावनांच्या मुकेपणांतून फक्त संकोच येईल, संशय शिरेल. शिरलाच ना ?

–म्हणूनच कां फक्त वादांत साथ केलीत माझी ? माझ्याशीं बोलण्यासारखं दुसरं कांहींच नव्हतं तुमच्याजवळ ?

–तो समुद्र बघ. काय आहे हा समुद्र म्हणजे ? नुसतं पाणी. वळण लागेल तिकडे वाहतं. जो रंग त्याला देशील तोच तें घेतं. तुझ्याबरोबर मी वादाचं वळण घेतलं. तूं दिलेस त्या रंगांत रंगलों. काय चूक झाली माझी ?








–पण समुद्र म्हणजे नुसतं पाणी नव्हे, हेमंत. समुद्र पाण्याहून कांहीं अधिक आहे. पाण्याहून अधिक तुमच्याजवळ कांहींच नाहीं ?

–आहे ना ! पण पाण्यावेगळं समुद्राचं समुद्रपण तुला सांगतां येईल का ? जें सांगशील तें शेवटीं त्या पाण्यालाच लागूं. तें वेगळेंपण नदीपासून, तळ्यापासून. पाण्यापासून नव्हे. आणि तरीहि समुद्र म्हणजे नुसतं पाणी नव्हे हेंहि खरंच—

–एक विचारूं का ? तुम्हांला राग येणार नाहीं ना ?

–संवादांत रागाला अवकाश नसतो, मंजू.

–............माझ्यावरोवर वादाचा रंग घेतलांत.....आणखी कोणा-बरोबर कोणता रंग घेतलांत ?.....

–काय करायचं आहे तुला दुसऱ्यावरोबरचे रंग पाहून ? मी लप-वतों असं समजूं नकोस. पण तपशीलांत मला तथ्य वाटत नाहीं. मूळ सत्य सांगितलंय मी तुला—हें पाणी आहे; तें लागेल तें वळण आणि मिळेल तो रंग घेतं.

–पण पाणी असून जें पाण्याहून वेगळं आहे त्याचं काय ? तें वेगळें-पण कधींच उमटलं नाहीं ?

–उमटलं ना ! म्हणून तर आज आहे तसा राहिलो आहें नाहीं तर कुठल्या तरी वळणांत नि रंगांत केव्हांच नामशेष नसतो कां झालो ?

–माझं काय स्थान आहे तुमच्या आयुष्यांत ?

–तूं ठरवशील तें.

–मला कांहींच ठरवतां येत नाहीं. तुम्हांलाच माझ्यासाठीं ठरवावं लागेल.

–मला कांहींच ठरवायचं नाहीं.

–असं संदिग्ध बोलून मला आणखी गोंधळांत पाडूं नका, हेमंत. अलिकडे मनाचा छळ फार सोसतेय् मी. तो असह्य झाला म्हणू-नच निकाल लावून घ्यायला आलेय् आज. स्पष्ट सांगा, मला तुमच्या आयुष्यांत कांहीं स्थान आहे का ?

–आहे मंजू, फ़ार मोठं स्थान आहे. भीति एवढीच वाटते कीं तूंच तें पत्करणार नाहींस.

–कां ?

–मी कसं सांगूं तुला तें आवडेल कीं नाहीं ? मला जें तुझ्याविषयीं वाटतं तें तुला माझ्याविषयीं वाटेल असं मी कसं मानूं ?

–हेमंत ! प्रेम कसं व्यक्त करतात तें मला कळत नाहीं. प्रेमाचीं वर्णनं कथा-कादंबऱ्यांतून वाचलीं. पण तसं वागणं मला कधींच जमलं नाहीं. प्रियकराकडे तिरकं पाहणं, लाजणं, नाजुक हंसणं, असल्या गोष्टी मला ठाउक नाहींत. अलिकडे त्या कळूं लागल्या तेव्हां त्यांची कल्पना करून पाहिली. पण वाटलं, कांहींतरीच दिसेल आपलं रूप तसं करतांना. जेव्हां तसं करण्याचं वय होतं तेव्हां मी तत्त्व-ज्ञानाच्या धुंदींत इतकी होते कीं, कोणाहि तरुणाशीं तसं कांहीं वागण्याची कधीं इच्छाच झाली नाहीं. ज्यांना तसं वागतांना ऐकलं–पाहिलं त्या तेव्हां मूर्ख रिकामटेकड्या वाटल्या. प्रेम ही तारुण्यांतील शारीरिक वासनेनं मनावर आरोपित केलेली अेक थिल्लर भावना आहे, असंच आजवर मानीत आले. तिचा—आपला कांहीं संबंध नाहीं, असं वाटलं. जेव्हां मन तुमच्याकडे ओढूं लागलं तेव्हां हेंच स्वतःला बजावीत मनाला दड-पण्याचा मी यत्न केला. आंतून कोणी तरी मला म्हणूं लागलं, 'तूं मूर्ख आहेस. प्रेम म्हणजे काय हें आतां तरी ओळख.' खरंच, मला आजहि कळत नाहीं—मला हें काय होतंय्, कां होतंय् ? ही वासना आहे कीं, आणखी कांहीं आहे ? सारा बुद्धिवाद पांगळा पडतो इथे. घोकलेला सारा वेदांत मुका बसतो; वाटतं, त्याचा न् याचा कांहीं संबंध नाहीं. एकच कळतं—तुमच्याविना मला यापुढें जगतां येणार नाहीं. माझं सारं कांहीं तुमचं आहे....काय आहे हें, हेमंत ? मी चुकत तर नाहीं ना ?

–तुझं बरोबर आहे, मंजू. चुकींतून वाट काढीत तूं बरोबर वाटेवर आलीस. मला बरोबर वाट ठाऊक असून मी नेहमीं आडवाटेवरच राहिलो.

–असं म्हणूं नका. तुम्ही आडवाटेवर राहिलांत तर मलाहि वाट दिसायची नाहीं. आजवर मला चकवीत आलांत. आणखी चकवूं नका.

–मी कधीं कोणाला चकवलं नाहीं, मंजू. तुला कसा चकवीन ?

–तुमच्या मनाचा मला कधींच थांग लागूं दिला नाहींत.

–मी कधींच कांहीं लपवून ठेवलं नाहीं.

–तरीहि तुम्ही मला अगम्यच राहिलांत. मी तळमळत राहिले. तुम्हांला कांहीं स्वतःची भावना असेल असं मला कधींच दिसलं नाहीं. आपण एकमेकांवर प्रेम करूं लागलों आहोंत असं कित्येकदा थट्टेनं म्हणालांत. माझं मन आशाळलं. त्या थट्टेला सत्याचं रूप देऊं लागलं. पण थट्टेंतलं सत्य तुम्ही मला कधींच दिसूं दिलं नाहींत. माझीच मला लाज वाटली. थट्टेला इतकं खरं मानल्या-बद्दल स्वतःलाच मी ताडलं. कधीं वाटलं, पुरुष असाच असतो—निर्लेप ? मायाच त्याला आपल्यांत गोंवते. ती विकारी. तो अचल. पण मायेंत गुंतल्यावर पुरुषाला विकार होतो. तुम्हांला तर कांहींच विकार दिसत नाहीं. तत्त्वज्ञान चुकलं ? कीं मीच माया नव्हे ? पुरुषाला आपल्याकडे ओढून घेणारं माया तत्त्वच माझ्यांत नाहीं का ? मी स्त्री तरी आहे का ? स्त्रीत्व गमावून बसलेली स्त्री ! पुरुषाला आवडण्यासारखं कांहींहि जवळ नस-लेली नीरस स्त्री ! मी मुळांतच अशी आहे कां ? कीं माझ्या भलत्या धुंदींत मी माझं स्त्रीत्व गमावून बसलें ? सांगा ना, हेमंत ! कुठें आहे मी ? कशी आहे मी ? काय चुकतंय् माझं ?

–बोल, मंजू, बोलत रहा. विचारण्याची घाई करूं नकोस. अजून पुष्कळ बोलायचं आहे तुला. सारं सांठलेलं बोलून टाक.

( पान १७६ वर पहा )






उच्चतम कलेचा थोर वारसा








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





"त्यागानें भोगाचं सुख घ्यायचं असा एक मंत्र आहे ना ? पण आपल्या आनंदासाठीं आपल्या भोगाचा मुळीं त्यागच--हाहि एक अहंकारच ! यहीं तो होता हैं ! झारींतलं पाणी कुणाला प्यायला म्हणून द्यावं आणि त्यानें नुसते हात धुवून झारी रिकामी करावी. जाऊं दे. आजचं आज संपवूं ! उद्याचं नवं उद्यां."



अंगाचा लचका तोडला कीं, मरणप्राय वेदना होतात. भळभळ वाहणाऱ्या रक्ताकडे बघवत नाहीं.

कांहीं दिवसांनीं शरीराची जखम भरून निघते. घाव कधीं राहतो, कधीं रहातहि नाहीं. वर्ष-दोन वर्षांनीं आठवण झाली तर वेदना जाणवत नाहीं.

मनाचा लचका तोडला गेला तर...?

कधीं कुणी दुखरें खुपरेसें बोलून जातें; कधीं मोत्यासारख्या शब्दांनीं मधुमधुर अशा गुदगुल्या होतात; शब्दाचा वेध घ्यावा तर ते गवसत नाहींत; आस वाळगली तरी यश येत नाहीं. वर्षा-दोन वर्षांनीं ते आठवावे; मनाची हुळहुळ जाणवते, एक पोकळी निर्माण होते !

आपल्या जागीं निमूट बसावे, कुठून एखादी लकेर यावी, शोधूं जातां बंद व्हावी!

कसली लकेर अन् कसलें काय !

पूर्वी कसें अगदीं सोपे होतें. जानेवारीच्या थंडीचा कडाका वर्णन करायचा तर नुसते – 'थंडी मी म्हणत होती' – असें लिहिलें कीं काम भागायचे. पण आजकालची थंडी?. डिसेंबर असो कीं जानेवारी, या थंड्यांना आतांशा काय झाले कांहीं कळत नाहीं, पण त्या 'मी – मी' म्हणत येतच नाहींत उलट 'तूं – तूं' म्हणत येतात अन् स्वतःची तल्खली भागवायला उलट आपल्यालाच बोलावतात.

परंतु जो जानेवारी मला आठवतो त्या वेळची थंडी खरोखरच मी म्हणत होती. तिच्याकडे बघवत नव्हते, हात मिळविता येत नव्हता. विस्तवाला तर ती मांजराच्या पिलासारखी खेळवायची. एकट्या दुकट्याला ती मुळीं दादच देत नसे.

पहांटे पांच वाजेपर्यंत कशीतरी कळ काढली. शेवटीं उठून बाहेर पडलों. अंगांत लांडा सदरा, अर्धी चड्डी, आंखूड मोजे, कॅनव्हासचे बूट असा तिला सामोरा गेलों. टिच्चून पेलाभर गार पाणी पिऊन उरलेले तिच्या अंगावर फेंकलें. खेळाच्या मैदानावर धूम ठोकली. दहा-पंधरा मिनिटांच्या रपेटींत अवसान चढलें.



—वामन चोरघडे

अंधार थोडा थोडा दिसूं लागला होता. हिरवळ आणि कोरडी जमीन यांतला फरक कळूं लागला होता.

कॉलेज इमारतीच्या मागें असलेलें तें मैदान. उजव्या बाजूला-वसति-गृह; मोकळी बाजू तारेच्या भरभक्कम कुंपणानें बंद केलेली. पांखरें आंत येऊं शकत; विंचू सापांना आडकाठी नव्हती. पण माणूस नि जनावर आपलें अंग ओरबाडून घेतल्या-शिवाय शिरूं शकत नसे. येवढी नाकेबंदी कां हे आमच्या तेव्हांच्या प्रिन्सिपॉलला देखील ठाऊक नसल्यामुळें कांटेरी तारा थोड्या सैल झाल्या होत्या. रात्रीं नवाच्या पलिकडे मुली तर राहो, वसति-गृहाच्या मुलांनाहि बाहेर जायला मज्जाव होता. समोरच्या बाजूला भिंतींत पक्के केलेले भरभक्कम लोखंडी फाटक नवाला धाड्कन् बंद व्हायचें. तिथें एक मला दांडगा भैया आपल्या कुत्र्याशीं बोलत बसला असायचा. कुत्रा झोपला तर भैया जागा अन् भैया झोपला तर कुत्रा. आख्खी रात्र कॉलेजची इमारत सुस्कारे सोडायची. मुलांचें होस्टेल, कांहीं झोपलेले, कांहीं जागे. कांहीं लग्न झालेले अनुभवी उपाशी विद्यार्थी, तर कांहीं तरणे भुकेले अनुभव नसलेले ! मुलींच्या होस्टेलची छोटी बंगली गलबला न करतां पांघरूण घेऊन गुडुप झोपलेली. पांघरूणांत जी हालचाल होईल तेवढीच!

आतां पंधरा-वीस मिनिटांत जग जागें होईल; चांचपडूं लागेल; आळसावून जांभया देईल. कांहीं बाहेर पडतील; कांहींना पांघरूण बरें वाटेल.

अजून एक रपेट मारावी, म्हणजे दिवसभर हुडहुडी नको. पांखरानें सूर टिपून पाण्यावर झेंप घ्यावी....

तारेच्या पलिकडे तिकडे अस्पष्ट पांढुरके कांहीतरी हलतेय्! कसली तरी खजवज! दिसत नसलें तरी भास नव्हता.

श्वास भरून तिकडे जातांच—

ओळख पटायला उशीर लागला नाहीं. परिचित व्यक्ति होती. बघण्यासारखी म्हणून लक्षांत राहिलेली. धडपडत होती आंत शिरा-यला: एकटी नव्हे, सायकलसहित. हिलाच आंत शिरायची पंचाईत, सायकल कशी येणार? बघूंया, निवांत बघतां येतें तोंवर! आपल्या-कडे लक्ष नाहीं तोंवर! अशा ऊन ऊन थंडींत असले कांहींतरी बघायला बरें वाटतें. स्वप्न असेल तरीहि सुंदर आहे. वस्तुस्थिति असेल तर त्याहून सुंदर! पेढ्यासारखा रंग आहे, झुळझुळीत साडी विस्कटली आहे, धडपडीचा शीण स्पष्ट आहे. कपाळावरचा त्रास केसांनीं झांकला आहे. कानांतले लोलक चिडले आहेत्. सायकल उभी पेलण्याची शक्ति नाहीं, पण उचलण्याची धडपड चालू आहे.

"मदद की जरूरत हो तो..."

"आप की हाजिरी ने पहिलेही मदद हो चुकी है। अब इसके बाद..."

"मी हजर नाहीं असं समजायला हरकत नाहीं."

"मग मी देखील इथं नाहीं असं समजायला

"मुळींच हरकत नाहीं. शब्द माझा. आतां मदत करूं शकतों मी?"

"नाहीं, गरज नाहीं."

"तें तर दिसतंच आहे. पण एव्हांना समोरचं फाटक उघडलं असेल कीं!"

"या असल्या फाजील चौकशीनं..."

"असं होय! मग चौकशी करीत नाहीं. बघूं जरा सायकल.."

"नाहीं."

"सायकलला कांहीं अब्रू नसते. तिला उचलायला....चला, उगीच वेळ होतोय्. आणखी कुणी आलं तर कपडेहि फाटतील अन् कारण सांगता यायचं नाहीं."

"तरी नाहीं. मदत एवढीशी करतात, अपेक्षा येवढाल्या!"

"चूक आहे."

"कां?"

"मी म्हणतों म्हणून. असल्या थंडींत याहून अधिक बोलणं नको."

वर लोंवकळून तिची सायकल आंत घेतली. आधार मिळून तीहि आंत आली, इजा न होतां, ओरखडा न लागतां!

चेहरा नरमला होता. पूर्वेच्या तिरिपीनें थोडा उजळला होता. तारवटलेले डोळे सौम्यपणें हंसत होते; खालीं बघून कांहीं बोलत होते.

"कुणाला कळायचं नाहीं ना?"

"मलाच कळलेलं नाहीं तर कुणाला कळेल कसं?"

"बोलतां येतं तर!"

"बोलवितां असला तर बोलतां येतं, नाहीं तर......"

"नाहीं तर काय?"

"बोलतां आलं तरी बोलावसं वाटत नाहीं. आज नाहीं, उद्यां नाहीं........"

"हाय री!"

"काय?"

"तकदीर जो फूटी है मेरी! नहीं तो कुछ जवाब दे सकती थी। देना मी चाहती हूँ, लेकिन अभी नहीं, फिर कभी! अबकी सिर्फ भरोसा......"

आतां नाहीं, कधींतरी!

बेला निघून गेली, सरळ मुलींच्या होस्टेलकडे; लॉनच्या पलीकडे!







अनुक्रमणिका

त्या लॉनवर आम्ही जायचे नाहीं असा संकेत होता. तिथें ती पोचली असेल; कांहीं घडले असेल किंवा नसेलहि!

आतां नाहीं, पुनः कधींतरी!

हेंच तें! असेंच कांहींतरी घडून जातें. कां? कशासाठीं घडतें?... कुणीं कुणावर मरवंसा टाकून जाते. तें ओझें—सह्य असलें, हवे-हवेसें असलें तरी अखेर ओझेंच ! उद्देश नाहीं, आशा नाहीं! अंत नाहीं!

बेला मजवर मरवंसा टाकून निघून गेली. मी तिच्यावर मरवंस टाकावा, पण ती म्हणाली आतां नाहीं, पुनः कधींतरी!

दिवस उजाडला; स्वच्छ, ओला, गुदगुल्या करणारा, दूधवाल्याच्या हाकाऱ्यालाहि सुरावट जोडणारा. कळत नव्हतें, कळलें नव्हतें; तरी देखील—!

दुपारीं वर्ग भरला. समोरच्या बांकावर बेला बसली होती; संथ, शांत, निमूट! हाल नाहीं, चाल नाहीं, निमूळत्या बोटांनीं पेन्सिल धरलेली. गोरे गोरे हात; लालसर जिवणी; जणुं रात्रभरा सुस्नावून झोंप झाली होती तिची!

वर्ग सुटल्यावर तीनदां निमित्त साधून तिच्यासमोरून गेलों. तिनें ओळख दिली नाहीं. आजच सकाळीं तिनें विश्वास ठेवला मजवर, पण आतां त्याचा मागमूस नाहीं. ओळख दिली न दिली तरी वाच्यता होणार नाहीं.

....म्हणूनहि असेल कदाचित् पण सायंकाळ कांट्यासारखी बोचत होती; नाकातोंडांत धूर गेल्यागत वाटत होतें. फाटकावरच्या भैयाचा कुत्रा अंगाचें मुटकुळें करून बसला होता. निदान त्यानें तरी भुंकावें म्हणून एक दगड त्याच्याकडे भिरकावला. बिचारें तें कुत्रें क्यॅंऽव् करून नजरेआड झालें. आपल्याकडेहि असाच दगड कुणी भिरकावला तरी चालेल! पण नुसतेंच 'कधींतरी'.



संपाचा आदेश मिळाल्यावर आम्ही पोरी सुद्धां बाहेर पडलों आणि तुम्ही ... बांगड्या भरा ... घ्या

बेला स्वतःहून बोलणार नाहीं इतकें कळण्यापुरती जाण होती. आपण मुद्दाम बोलूं नये इतकी लाज उरली होती. 'जाऊं दे, मरेना कां ती!' असें म्हणून वेगळे होण्याइतकें मन पक्कें नव्हतें. अन् स्वतः मरण्याचा धीर नव्हता.

जानेवारी संपत होता. थंडी मी म्हणत होतीच.

'बेला! बेला निगम! बेला म्हणजे मोगरीचें फूल, एकेरी, दुहेरी चौथरी! थंडीला वांकुल्या दावीत मोगरी फुलते अन् पहिल्या पावसाला आपलेपण सुपूर्द करून निरोप घेते. बेलाला माझा मरवंसा होता. मला? पण त्याची तिला तमा नव्हती. गुपिताला आडोसा हवा. आडोश्याची वास्तपुस्त कशाला?

एक अवस उलटल्यावर बेला उन्हाला हात दाखवीत माझ्या खोलीवर आली. बाहेर सपाता वाजल्या. आंत असलेली सहाध्यायी मंडळी स्तब्ध झाली. बोलण्याचें काम त्या सर्वांनीं आपल्या डोळ्यावर सोपविलें. त्यांचे डोळे मला नाहीं नाहीं ते विचारूं लागले. व्हरांडा गजबजूं लागला.

"नमस्ते"

"आइये! बडी कृपा...."

"जरा कुछ काम था!"

"हाँ हाँ, तो आइये ना!"

"नहीं, ऐसा ही थोडा...."

घामानें भिजून चिंब झालों. ही असे तोंवर या क्षणीं कदाचित् जगतां येईल. ही गेल्यावर पुढच्या क्षणीं हे सारे जमलेले मला कांहीं जगूं देणार नाहींत.

"तो मैं बाहर....."

"हाँ, आप...."

खोलीसमोर बाग होती. फणसाचें एक झाड होतें. तिथें तिच्या मागें मी गेलों. सगळे बघत होते. त्यांच्या देखत न सांगतां येण्याजोगें 'मोगरीच्या फुलाचें' माझ्याशीं काम? बारीक किंवा मोठे डोळे केल्यावांचून तें दिसणार कसें?

"बहुत तरस गये ना?"

"नाहीं, असंच कांहीं नाहीं...."

"जानती हूँ! कई बार, कई बहाने लेकर, सामनेसे निकल गये। मैंने पहिचान तलक नहीं जतलाई।"

"लेकिन क्यों?"

"सभी बातों के माने नहीं होते, पूछे भी नहीं जाते। तुम भी पूछने लगे तो मेरा क्या होगा?"

"माने तो नहीं पूंछता, पण मीच तेवढं विचारूं नये..."

"पूंछने को बहुत कुछ था तब तो पूंछी नहीं...उस दिन मुसीबत में रात बिताकर रोती बिलखती चुपकेसे चोरकी तरह मैं आयी! बंधन फांदकर गयी थी और वैसी ही आना चाहती थी। उस दिन चाहते तो डरा भी सकते थे, चाहते तो बाँध भी सकते थे। वही डर मुझको था...."

"अब तो डर नहीं?"




"नहीं। मेरी नजर में तुम बहुत कुछ अपने हो गये हो। सुनना चाहोगे उस दिन की बात?"

"नाहीं. त्यावेळीं तुझ्याकडे बघितल्यानंतर ती मोठी सुखाची असिल असं वाटत नाहीं. जाऊं दे ते. आतां कशाला बोलावलंस?"

"तुम बड़े अच्छे हो। कुछ सुनोगे नहीं। भगवान तुम्हें..."

"भगवान की बात छोड़ो। कुछ अपनी..."

"अपनी बात। हँसी आती है। फिर भी कहूँगी। वैसे ही माथा मेरा कभी ठिकाने नहीं रहता। आज तो और भी...तुम मेरे साथ चलो।"

"एकदम हुकमे हुकुम? पण कुठें?"

"मेरे कमरे में।"

"बाप रे!"

"बापरे नहीं। तुम्हें चलना होगा।"

"?"

"जानती हूँ, उस लॉन के भीतर पैर रखने की इजाजत नहीं। वैही मैं किसी एक जनी को समझाना चाहती हूँ!"

"कुणाला?"

"उस जल मुंही रेणू को। प्रिफेक्ट जो है। रोब जमाती है। नई नई शादी हुई है, मटक मटक कर चलती है। अपने शोहर को बुला घंटों बाते करती रहती है। शोहर भी तो मर्द है ना? उसको किसने इजाजत दी? मैंने कहा – 'बहन', तो तपाक से कह गई कि तुम्हारी शादी नहीं हुई, तुम्हारा कोई अपना होगा तब देखूंगी। मैं मानती हूँ कि शोहर भी कोई चीज होती है। बाहर जाकर रेणू कुछ भी करे, मैं मना नहीं करूँगी। लेकिन होस्टेल में नहीं। इसीलिये मैंने उस दिन रेणूसे कहा था कि आइंदा तुमने अपने घग्गड को बुलाया तो मैं भी किसी को ले आऊंगी और कैसे मना करती देखूंगी। आज फिर रेणू उसे ले आयी है। इसीलिये तुम मेरे साथ चलो मेरे कमरे में। तंग नहीं करूंगी। सिर्फ जरा बैठके वापस लौट आना।"

"बेला, तुझं ठीक आहे पण मी उद्यां...?"

"मर्द भी डरपोंक होते हैं? तुम तो पुरुष हो। मैं एक मामूली लड़की होने पर भी। खैर, अब आने का काम नहीं। उधर देखो।"

बेलानें दाखविलें तिकडे पाहिलें तो रेणुका आपल्या पतीबरोबर हंसत खिदळत बाहेर फाटकाकडे जात होती. दैव अनुकूल होतें. माझा काळ आला होता, पण वेळ आली नव्हती.

बापरे! ही बेला म्हणजे! – बरे तर बरे त्या दिवशीं तिच्या सायकललाच हात लावला; अंगाला लावला असता तर नक्कीच भाजला असता. तिला मजकडून भरोसा हवा होता. तिच्या मनाच्या लहरीसाठीं मित्र हवा होता. रेणूच्या बाणीवर तिला माझ्याशीं हंसत खिदळत बोलायचे होते. या सगळ्या गलबल्यांत मी कुठें होतों कुणास ठाऊक!

त्यानंतर कधीं भेटली तर बेला ओळख द्यायची. वसंताच्या मध्यावर बहरलेल्या आम्रमंजरीसारखी दिसत होती. वर्गांत बसली तरी आपल्याच तारेंत असायची. स्वतःशींच हंसायची, कधीं गंभीर

व्हायची. संध्याकाळच्या आकाशासारखा पळा पळाला तिचा चेहरा, रंग बदलायचा.

एक दिवस सहज तिनें विचारलें कीं आतांशा पहाटे मी ग्राऊंडवर दिसत नाहीं. त्यामुळें रात्रीं जागरण होऊन देखील माझी झोप लौकर उघडूं लागली. एखादे पुस्तक घेऊन कॉलेजच्या बागेंत निवांत बसावेसें वाटूं लागले.

सळसळ ऐकूं आली. पदरव जाणवला.

"मला वाटलें, मी एकटीच येतें इथं अभ्यासाला."

"हें मला माहित नव्हतं."

"खोटं."

"अगदीं शपथ!"

"इतक्या छोटया गोष्टीसाठीं शपथ नाहीं घेऊं माणसानं. एकदम इरेस काय पडायचं! ठाऊक असेल, नसेलहि. या जन्मीं ठाऊक असेल तेवढंच खरं, असं थोडंच आहे!'

"तुझं बोलणं कळवून घ्यायचं म्हणजे....!"

"कळवून घ्यावंच लागत नाहीं. तुला कळतं तें! आतां आजचंच बघ. मी आलें ती तूं भेटशील म्हणूनच! तुला गातां येतं ना?"

"मला? मी?"

"त्यांत काय आहे? मला ठाऊक आहे. तुला गायला येतंय्."

"नाहीं ग! कध्धीं गायलों नाहीं. गायचा विचार सुद्धां आला नाहीं माझ्या मनांत."

"मग आज गाऊन बघ. येईल तुला. मी सांगते तें म्हण!"

"त्यापेक्षां तूंच म्हण कीं!"

"नाहीं. मीच गायचं अन् मीच ऐकायचं! आज मला नुसतंच ऐकायचं आहे. कुणीहि गायलं तरी चालेल. हीं झाडं गातात म्हणे. आज कां नाहीं गात कुणास ठाऊक! मला ऐकायचं आहे रे!"

"काय?"

"सैगलचं तें गाणं, लखनऊच्या शेवटच्या बादशहानं–वाजिद-अली शहानं रचलेलं–बाबुल मोरा नैहर छूटो ही जाय–!"

अखेर तीच गायली, आंसवें गाळीत गायली. झाडांनीं गायलं नाहीं, ऐकलं?"

"मी? सुंदर? मग झालं!"

"तुझ्याबद्दल तूं काय मत देणार? कोई हमसे पूंछे!"



"तसं नाहीं. मी माझी परीक्षा घेतली अन् नापास झालें. सुंदर असतें तर हें बकुळीचं झाड....!"

"नाहीं, त्याहून तूं..."

"ऐक तर! एकदां नव्हे अनेकदां मद्याची चूळ मी त्यावर टाकली, पण त्याला बहर नाहीं आला."

"मद्य? अन् तूं?"

"मग त्यांत नवल कसलं? मला काय पितां येत नाहीं?"

"बेला, मी ठरवलं आहे कीं तुला कधीं कांहीं जिज्ञासेनं विचारूं नये, तूं सांगशील तेवढंच ऐकायचं. सांगायचं नसेल तर नको सांगूं पण आज सकाळीं ही भैरवी!"

"फार चांगली आहे. सुरांना कसली वेळ अवेळ? त्यांना फक्त मन हवं असतं. विचारत नाहींस म्हणून तुला सांगायला आलें, तूं इथं भेटला नसतास तर मी तुझ्या खोलीवर आलें असतें. त्या दिवशीं मी पहांटें आलें तेव्हां इतरांना वाटलं असेल, तुलाहि वाटलं असेल कीं मी रात्रीं कुठें तरी गेलें असेन, चोरून परत यावं असं कांहीं तरी केलं असेन! मला ठाऊक आहे. माझ्यावरून कुणा मायेच्या माणसानं मीठमिरच्या ओंवाळून टाकल्या तर खेंस सुटा-यची नाहीं. मला चोरून लपून यावं लागलं ते मी केवळ रात्रभर बाहेर होतें म्हणून. संध्याकाळीं गेलें होतें. रात्र कशी गेली कळलं नाहीं. मीनाला समाजावितां पुरेवाट झाली माझी अन् श्यामपुढें अक्षरशः लोटांगण घालावं लागलं मला...

"तुला श्यामची अन् मीनाची माहिती नाहीं. श्याम फार चांगला मुलगा आहे, मीना माझ्या एका मैत्रिणीची मुलगी. श्यामची तिची ओळख झाली. शेवंतीला पाणी घालावं तशी मी ती फुलविली. मीनाला आई नाहीं. आई गेल्यावर मीना माझ्या कुशींत ओक्साबोक्सी रडली होती. श्याम म्हणाला–'बेला, मी तुझ्या शब्दाबाहेर नाहीं, तूं सांगशील तें ऐकेन, म्हणशील तें करीन.' मीनाला श्याम आवडला म्हणून मांझा श्याम मी तिला द्यायला तयार झालें. माझ्या शब्दाबाहेर तो जाणार नव्हता......"

"तुझ्या शब्दाबाहेर कुणीं जाणार नाहीं, बेला!"

ती थांबली. धरणीला कांहींतरी विचारूं लागली. कुठेंतरी कांहीं दिसतंय् अशी मिरमिर बघूं लागली.

"बेला, तूं कांहींतरी सांगत होतीस."

"हो, सांगत होतें नाहीं कां? काय बरं?–हं, मी सांगत होतें, हें माणसाचं मन, या मनाचा भरंवसा देतां येत नाहीं, कुणीं देऊं नये, अन् कुणीं कुणावर त्यासाठीं रागावूं नये. श्याम माझ्या शब्दाबाहेर गेला....."

"मला नाहीं वाटत. मी माझ्यावरून सांगतों."

"बिचारा तूं! तसा खरंच सरळ आहेस अगदीं, कुणीहि बळी द्यावं इतका! पण तूं घाबरूं नकोस. देवानं जरी मागितलं तरी मी द्यायची नाहीं. भरंवसा देते."

"श्यामचं काय झालं?"

"सांगितलं ना? तो गेला शब्दाबाहेर...."

"कारण?"









अनुक्रमणिका



## उतार

व्यथा सोसायची तुझी
 किती वेगळी ग रीत.

जिथे रुजलीसे व्यथा
 रुजवीसी वेल तेथ.

वेल आलीसे बहरा
 पानोपानी फूल फूल

तुझ्या जीवनी भरला
 रंग-गंधाचा दर्वळ

जिथे टाकसी पाऊल
 तिथे सांडतात फुले

ओठाडोळ्यांतून तुझ्या
 घोसफुलांचा उमले.

अशी आरास फुलांची
 मघे धूंद तूं नागीण

एका विषाला उतार
 दुजे जहर पिऊन

—इंदिरा

"कारण मी! एक गुंता असला तर सांगता येईल! मैं कुछ कम नहीं हूँ। कोई मन में, कोई आँखों में बंध जाता है—किसी को मैं बांध लेती हूँ। कसम मेरी, मैं चाहती नहीं फिरमी कोई बंध जाता है। श्याम का ऐसा ही हुआ। वह कहने लगा...." बेलाऽऽ.. मर गई बेला! कम्बख्त, मुझ में फँस गया। भिखारी की भाँति मिन्नतें करने लगा...."

"चुकला नाहीं तो..."

"जानती हूँ। शायद तुम भी ऐसा ही करोगे। किंतु जैसे श्याम को रोका...! मेरा मन दिया था मैंने मीना को। उसका मन-भाया मैं देना चाहती थी..."

"उस दिन रात भर समझाया श्याम को। कल फिर गई थी। दोनों को बाँध आई। हँसते खेलते मीनाने श्याम को मन में भर लिया।..."

"और नैहर तुम्हांरा छूट गया...! बेला, तुझं हसणं, रडणं सगळंच...."

"डरो नहीं। तुम्हें भय करने नहीं दूँगी। आँधी तुम को नहीं, मुझे सतायेगी। तुम रहोगे मेरे अपने, मुसीबतों से दूर...! अच्छा बाबा, चलूँगी।"

बेला निगम निघून गेली. मी राहिलों. तिच्या मनांत मीना होती. श्यामच्या मनांत बेला होती. श्याम मीनाला मिळाला कारण तो बेलाचा होता. जें तिचें होतें तें दुसऱ्याला द्यायला तिची ती मुखत्यार होती. मीनाचें भले झाले. बेलाचें?

"तुम डरो नहीं"...याहून अधिक भयप्रद माझ्या लेखीं दुसरें कांहीं नव्हतें!

भीत असतांनाच वर्षें गेलीं; एक दोन नव्हे, चांगली दहा वर्षें गेलीं. मिऊं नकोस असें तिनें सांगितल्यामुळें तिच्याबद्दल विचारपूस करायचेंहि भय वाटत होतें. आपला आपल्यावर तावा नसला म्हणजे दुसऱ्याबद्दल कांहीं विचारतां येत नाहीं.

आपण आपल्याबद्दलचं कांहीं नक्की सांगूं शकत नाहीं तर सूर्यचंद्राबद्दल काय भरवंसा देणार? तरी ते दोघे आपापल्या ठरलेल्या वेळीं उगवतच राहिले. जीर्णाला जगवीत होते, शीर्णाला तगवीत होते. जुनें जात होतें, नवें येत होतें. कांहीं रंग फिकट, कांहीं गडद. कधीं ऊन, कधीं पाऊस. कधीं सोसाटा, कधीं कडकडाट; कधीं शिळाण कधीं चांदणें... दहा वर्षांत काय घडूं शकत नाहीं? सगळें घडूं शकतें. सुख जातें, वेदनाहि जातात. दगड देखील झिजतात तडकतात, नदीचें कालचें पाणी वाहून जातें, आजचें पाणी नवें येतें. उद्या पुन: नवें! वाहून गेलेल्याची वाफ होते, वर जाते, पुन: जुन्या पाण्याचें नवें पाणी होऊन येतें!

प्रशिक्षण संपलें, संसार उभा झाला माझा. अधिकाराची खुर्ची सुखावूं लागली. चार माणसें आपल्या आश्वासनावर विसावतात. बरें वाटूं लागलें. आणि एक दिवस वाफेचें पुन: पाणी होऊन...!

बेला अचानक माझ्या ऑफिसांत आली. ऊनवाऱ्यानें जो काय बदल झाला असेल तेवढाच. गेल्या दहा वर्षांतली सगळीं अक्षरें...!

"बैठने के लिये क्या इजाजत लेनी पडेगी?"

"कां बरं?"

"अब आप बॉस जो हैं।"

या दोन शब्दांनीं वस्तुस्थिति आठवली. बेला एका दूरच्या मुलींच्या शाळेंत हेड मिस्ट्रेस झाली होती. कांहीं दिवसांपूर्वी त्या शाळेची एक केस मजकडे आली होती.

"बहुत दिन हुये। शायद आप भूल भी गये होंगे!"

"विसरलों नाहीं. गेल्याच आठवड्यांत आठवण झाली होती तुझी. हें शाळेचं काय करून बसलीस तूं? अन् हें निस्तरणें म्हणजे—"

"मैं क्या जानूं? आपके ऑफिस से बुलावा आया, हाजिर हो गई!"

"ते खरं पण शाळा एकाएकी बंद कां केलीस?"

"मग काय, मरायचं तिथं?"

"पण नुसता एक उंदीर पडला..."

"प्लेगचा होता तो!"

"कशावरून?"

"मी सांगते म्हणून!"

तिचा आव तर असा होता कीं साधा मेलेला उंदीरहि तिच्या शब्दानें प्लेगचा झाला असता."

"अग, पण डॉक्टरला दाखवायचं?"

"डॉक्टर येईल तर ना? सगळे कांहीं बेला निगम नव्हत."

"तुझ्यासारखी तूंच आहेस."

"हे अधिकारी या नात्यानं, कीं...."

"बोलतों हेंच पुष्कळ. खरं म्हणजे लोटांगणच घालायला हवं!"

लहान मूल तोल जाऊन पडल्यानंतर मोठ्यांना येते तसें ती हंसली.







"काय घडलं ते सगळं मला हवं आहे. कांहीं मार्ग तरी काढतां येईल."

"कांहीं घडलं नाहीं. शाळेंत एक दिवस एक उंदीर पडला; आपल्या जागीं गरगर फिरला अन् मेला. मुली गोळा झाल्या, म्हणाल्या, 'बाई, प्लेगचा उंदीर आहे.' थोरा मोठ्यांच्या मुली. शाळेंत कांहीं घडलं तर पंचाईत. मी तावडतोब नोटिस लावली. शाळा बंद केली. रिपोर्ट सादर केला. किल्ली पाकिटांत बंद करून पोलिस स्टेशनवर दिली अन् मी गांव सोडलं. ऑफिसकडून बोलावणं आलं तर इथं हजर झालें. आतां जसा हुकूम होईल तसं करतें."

"हुकूम कसला कपाळाचा देणार! तुला हुकूम देणारा अजून जन्मालाच आला नाहीं. जाऊं दे. उद्यां बघूं काय करायचं ते. तूं आतां घरीं चल."

"कुणाच्या?"

"माझ्या. आहेस तवर घरींच मुक्काम कर."

"मला वाटलंच तुझं लग्न झालेलं असेल म्हणून."

"कां वाटलं ?"

"कां म्हणजे? सगळ्यांचींच होतात लग्न !"

"तुझं झालं?"

"मला लग्न करूं देतील तेव्हांना ? आपण एखादी वस्तू घडवावी अन् ती चांगली म्हणून दुसऱ्यानं उचलून न्यावी. ऑफिसमधून बाहेर पडूं या. इथं बॉसचं वातावरण आहे."

"चल, गाडी काढतों, पांच मिनिटांत निघूं."

"छान! गाडी कधीं घेतलीस रे? सुंदर आहे."

"गेल्या वर्षी. तूं बैस स्टिअरिंगवर. मी तुझ्या शेजारीं बसून वाट दाखवतों."



गेले महिनाभर तुमचे मिस्टर माझ्या मागं मागं करताहेत तेव्हां आज तुमचें हें सौभाग्य परत घ्या.

"वाट दाखवणं फार महत्त्वाचं असतं, नाहीं कां रे ?"

"हो ! वाट दाखवतां येते तशीच लावता पण येते."

"वा ! बोलणं विसरलास नाहीं एकूण ! माझी मामी छान असली पाहिजे !"

"बरेच दिवसांनी बोललों. मामीला सर्टिफिकेट तूं देणार ? अरे, हें काय? अग, डाव्या बाजूला वळायचं तर तूं आपली सरळ..."

"सरळच जावं माणसानं! अन् समोरच्या बागेंत जाऊन थोडी शुद्ध हवा खावी; ताजंतवानं होऊन घरीं जावं! तूं तुझ्या वाटेला, मी माझ्या. आज नाहीं येत तुझ्याकडे. हात रिकामे आहेत. उद्यां सकाळीं मात्र नक्की येतें. खूप बोलायचं आहे तुझ्याशीं. रहायलाच येईन उद्यां."

"आजचं उद्यांवर..."

"छे, तसं नाहीं. आजचं आजच संपतं, उद्याचं उद्यां येतं. माणूस असंच फसतं खुळचासारखं. जाऊं दे. मीच खुळी आहे! गाडी मात्र छान ठेवलीस तूं. अगदीं हात मोकळा करावासा वाटतो. माझी गाडी मी देऊन टाकली मीनाला."

"कां?"

"तिला फार आवडली होती म्हणून. कां? तुला बरं वाटलं नाहीं?"

"माझा काय संबंध यांत?"

"संबंध कां नाहीं? सगळे मला खुळीबावरी म्हणतात. तूं काय म्हणतोस तें ऐकायचं आहे! कई बार मैं खुदही मेरे लिये एक पहेली बन जाती हूँ। श्याम मेरा था, मीना को माया। देना पड़ा। गाडी छान होती. तिला आवडली; देऊन टाकली. कुणाला वाटतं माझे डोळे सुंदर आहेत, ओंठ लावावे...हिऱ्याची आंगठी असते ना? कुणीं चांगली म्हटलं तर आनंद होतो. आपल्या साडीची घडी दुसरीनं आवडीनं मोडली...."

"इथवर कांहीं क्षती नाहीं. नीति नियम इथवर आड येत नाहींत. पण माझ्यासारखी खुळी...हिऱ्याची आंगठीच देऊन टाकते.."

"अर्धवटांचं असंच असतं मला वाटतं! शिकलें, अनुभव घेतला तोहि अर्धवटच. त्यागानं भोगाचं सुख घ्यायचं असा एक मंत्र आहे ना? पण आपल्या आनंदासाठीं आपल्या भोगाचा मुळीं त्यागच. ...हाहि एक अहंकारच! यहीं तो होता है...

"झारींतलं गार पाणी कुणाला प्यायला म्हणून द्यावं अन् त्यानं नुसते हात धुवून झारी रिकामी करावी....जाऊं दे! आजचं आज संपवूं! उद्यांचं नवं उद्यां. दुःख करायला तरी आपण आपलं म्हणून राहायला हवं कीं नाहीं रे? ...."

"असा गंभीर होऊं नकोस बाबा! ही बघ बाग आली. बसूं थोडा वेळ तिथं, मागें बसत असूं तसं! आज मी गाणं म्हणतें अन् तूं ऐकायचं....."

अंगना तो परबत भयो...

आजचें आज अन् उद्यांचें उद्यां–असें बेला म्हणाली खरी पण सारा वेळ कालचेंच तेवढें आठवत राहिली! ●●●

खरं म्हणजे जुगाराची मला आवड नाहीं. पण वसुधा कानिटकरवर खर्च केलेला पैसा वसूल करण्यासाठीं मी रमी खेळायला लागलों. रमींत खोट आल्यावर ती भरून काढायला म्हणून रेसच्या हिरवळीवर धांवलों. घोडे धांवले. त्यांनीं पैसा मिळवून दिला—कुणाकुणाला? आतां तुम्हीं विचाराल वसुधा कानिटकरवर पैसा खर्चच कां केला मी?



—रमेश मंत्री

माणसानें रेसला जावें कीं जाऊं नये, याबद्दल मतभेद होऊं शकतील. पण माणसानें बायकोला बनवावें कीं बनवूं नये याबद्दल मात्र मतभेद होण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. अवश्य बनवावें—शक्य असेल तर. म्हणजे बायकोला बनविण्यांत फक्त शक्याशक्यतेचाच विचार होऊं शकेल. आणि बहुतेकांच्या बाबतींत हें शक्य होत नाहीं. कारण बायका आजकाल हुशार होत चालल्या आहेत, हा सारा शिक्षणाचा परिणाम! दुसरें काय?

खरें म्हणजे मी प्रथम रेसला जात नसे. जुगाराची मला आवड नाहीं. पण मी रेसला जाऊं लागलों, तो केवळ रमीमधलें नुकसान भरून काढण्यासाठीं. आणि मी रमी खेळूं लागलों तो केवळ वसुधा कानिटकरवर मी खर्च करीत असलेल्या पैशाची भरपाई करण्यासाठीं. मी तिच्यासाठीं कां खर्च करूं लागलों, असें तुम्ही विचाराल, तर निश्चित सांगणें कठीण आहे. पण एखाद्या सुंदर, नखरेल, फॅशनेबल लाडिक तरुणीसाठीं माणूस पैसा कां खर्च करतो? तें तुम्हाला माहितच असेल—आणि नसेल तर ही कथा वाचण्याचें श्रम घेऊं नका. जवळपास रेल्वेचें टाईमटेबल किंवा अंकगणिताचें पुस्तक असल्यास वाचा.

वसुधा कानिटकर ही आपली गोंडस विशी-पंचविशींतली उत्साही मुलगी. 'इंग्रजी सिनेमांत म्हणे लव्ह सीन्स फार असतात, खरं कां हो?' किंवा 'इंग्रजी सिनेमांत खरोखरचीं चुंबनं दाखवतात म्हणे?' असं लाडिक स्वरांत तुम्हांला कुणी विचारलं, तर तुम्ही तसं विचारणाऱ्या व्यक्तीला—ती व्यक्ति म्हणजे जोगळेकर मास्तर किंवा तुमचे वडील नसतील तर—'आपण प्रत्यक्षच सिनेमाला जाऊन पाहूंया' असं म्हणाल कीं नाहीं? ठीक, तुम्ही तिला घेऊन सिनेमाला गेलांत. मग चांगल्याशा हॉटेलांत तिला जेवण दिलें पाहिजे. दिलें. तेवढ्यानें भागतें थोडेंच? कधींतरी नायलॉनची साडी हवी असते. तीहि दिली. ती लाडे लाडे बोलते, प्रेमाच्या नजरेनें तुमच्याकडे पाहते, कधीं कधीं अंगाला हात लावून देते. पण हें सारें काय फुकाफुकी होतें? त्यासाठीं रोकड काढावी लागते. आणि रिझर्व्ह बँकेंत तुमची ओळख नसेल, तर तुम्हांला स्वतःच्या पगारांतूनच हा पैसा उभारावा लागतो.

प्रेम आणि अर्थशास्त्र यांचें कायमचें शत्रुत्व आहे. त्यामुळें वसुधाचा खर्च आणि माझें बँक बुक यांचेंहि वैर वाढत चाललें. ही तूट भरून काढण्यासाठीं रमी तरी खेळून पहा असें ऑफिसमधल्या आनंद प्रभूनें सुचवलें. मलाहि तें पटलें. रमींत पैसा मिळवणें फारच सोपें. नुसते पत्ते जमवायचे नि पैसा ओढायचा. पहिल्या वेळीं रमी खेळायला गेलों, कीं, दोन तासांत शे-दोनशें रुपये मिळवायचें ठरवलें. हो. आपल्याला जास्त पैसा नको. वसुधावर खर्च केला, तेवढा परत मिळाला तरी चालेल.

शनिवारीं रात्रीं आनंदच्या घरीं रमीचा डाव बसला. त्यानें आपल्या कलत्राला माहेरीं पाठवलें होतें. रमी खेळायला जातांना घरीं बायकोला काय सांगायचें असतें हें मला माहित नव्हतें. म्हणाला, "अरे, रात्रीं नाटकाला जाणार आहे म्हणून सांग. आणि त्याच वेळीं सांगून ठेव, कीं शेवटची गाडी चुकली, तर मित्राकडेच झोपेन म्हणून. सकाळीं सहाला घरीं जायचं काय?"

"हो. कळलं सारं. अगदीं बरोबर जमवतों." मी आत्मविश्वासानें सांगितलें.

घरीं आलों. पढवलेला साक्षीदार कोर्टांत सांगतो, त्याप्रमाणें बायकोला सांगितलें. पण विरुद्ध पक्षाचा वकील काय प्रश्न विचारील याची कल्पना नसलेल्या साक्षीदाराची गडबड उडते, तशीच माझी झाली. मी राहतो माहिमला आणि नाटक होतें गिरगांवांत. साहजिकच बायको म्हणाली, "कुठल्या नाटकाला जाणार?"

"संशय कल्लोळ", मी सांगितलें. खरें म्हणजे कुठलीं नाटकं कुठं चालू आहेत याची चौकशी मी केलीच नव्हती.

"कुणा कुणाचीं कामं आहेत?"

"कामं.. कामं.. हां, भामिनीचं काम ती आपली सौंदर्यसम्राज्ञी पूर्णिमा करणार आहे" मी आठवण करीत सांगितलें.

"अय्या! अहो भामिनी आहे ती मानापमानांत नाहीं का? ती मेली संशय कल्लोळांत कशी आली? बाकी आज-














कालच्या नाटकांचं कांहीं सांगतां येत नाहीं. वाटेल तें पात्र वाटेल तिथं जातं. पण या सौंदर्यसम्राज्ञीचें नांवसुद्धां कधीं ऐकलं नव्हतं." माझी वायको आश्चर्यानें म्हणाली.

"अग मी तरी कुठं ऐकलं होतं? हल्लीं मराठी नाट्यसृष्टींत आणि चित्रपट-सृष्टींत साधारण पाऊणशें सौंदर्यसम्राज्ञी आहेत, त्यापैकींच एखादी असेल झालं."

"नाटक संपल्यावर कुणाच्या घरीं झोंपणार आहांत?"

"अं.. अग त्या ह्याच्या–आनंद प्रभूच्या"

"असं? अहो, पण प्रभू तर बांद्र्याला राहतात मग तुम्हांला माहीमला घरीं यायला काय झालं?"

आतां मात्र काय उत्तर द्यावं तें मला सुचेना. पण क्षणभर विचार करून मी म्हटलें, "अग हल्लींच त्यानं घर बदललंय्. ठाकुरद्वारला राहतो तो."

यावर तिला अधिक प्रश्न सुचले नाहींत. म्हणून म्हणा किंवा प्रश्न विचारून कांहीं उपयोग होईलसें दिसलें नाहीं म्हणून म्हणा, पण तिनें मूक नसली तरी फणफणती संमति दिली खरी.

मात्र रमींत खोऱ्यानें पैसा ओढण्याची माझी योजना तितकीशी यशस्वी झाली नाहीं. सरकारी योजनेप्रमाणें तीहि 'अन-पेक्षित परिस्थितीमुळें' आणि अपरिहार्य कारणामुळें अयशस्वी झाली. पण माझ्या योजनेच्या अपयशाचें खापर लोकसंख्येच्या वाढीवर मला फोडतां आलें नाहीं. अखेर पत्ते हा दैवाचा खेळ असल्यामुळें आणि त्या दिवशींचा शनिवार हा माझा घातवार असल्यामुळें मला रमींत चांगलीच ठोकर वसली. आनंद प्रभूच्या सल्ल्यावरचा माझा विश्वास आतां उडूं लागला होता.

पण अंधारांतहि प्रकाश दिसतो असें म्हणतात. काळ्या मेघांनांहि रुपेरी कडा असते असें म्हणतात. तसें वरेंच कांहीं वाहीं म्हणतात. खरेंखोटें देव जाणे. पण माझ्या त्या निराशेच्या क्षणीं मला वसंत सावर्डेकरानें धीर दिला, हें मात्र खरें. तो मला म्हणाला, "अरे तूं मुळींच चिंता करूं नकोस. तुझा पैसा निढळाच्या घामाचा आहे."

"हो तर."

"मग तो असा फुका फुकी कसा जाईल? मी सांगतो तुला."

"सांग."

"आपण हा गेलेला पैसा परत मिळ-वायचाच."

"हो" त्यानें 'आपण' हा शब्द वापरल्यानें मला अधिकच धीर येऊं लागला.

"आपण काय करूं," वसंत सांगूं लागला, "रेसला जाऊं."

"काय ?" हें प्रकरण मला नवीनच होतें.

"अरे असा मोठ्यानें ओरडूं नको. कुणाला कळतां कामां नये. आपण घोड्यांच्या शर्यतीला जाऊं. आणि तुझा गेलेला सगळा पैसा परत मिळवून आणूं."

मला ही कल्पना एकदम पसंत पडली. म्हणजे तसा रेसचा नाद वाईट हें मलाहि समजत होतें. पण काय आहे, कीं माझा गेलेला पैसा मला परत मिळणं भागच होतं. महिन्यामरांत चांगला चारशेंचा खड्डा

# स्वप्नामधल्या माझ्या सखी

स्वप्नामधल्या माझ्या सखी
कोणतें तुझें गांव?
कसें तुझें रंगरूप?
काय तुझें नांव?

कशी तुझी रीतभात?
कोणती तुझी वाणी?
कसें तुझ्या देशामधलें
आभाळ, जमीन, पाणी?

तेथें देखील आहेत असे
जडावलेले वारे?
सहज खुडतां येतील असे
हातालगत तारे?

लव्हाळाच्या मुळांतून
झिरपतांना पाणी—
त्यांत पावलें बुडवून तूंही
गुणगुणतेस गाणीं?

सुगंधित झुळका चार
केसामध्यें खोवून
तूंही बसतेस ऊन कोवळें
अंगावर घेऊन?

काजळकाळ्या ढगावर
अचल लावून दृष्टी
तूंही कधीं आंतल्याआंत
खूप होतेस कष्टी?

कुठें तरी खचित खचित
आहे सारें खास,
कुठें तरी आहेस तूंही,
नाहीं नुसता भास.

निद्राजड डोळ्यांमध्यें
तंद्रा भरते जेव्हां
दूरामधून तुझे सूर
कानीं येतात तेव्हां!

स्वप्नामधून यावा तसा
तुझा आठव येतो
दूरदूरच्या जन्मांमधलें
नातें जोडून जातो!

—शान्ता ज. शेळके

पडला. तो मरायचा, तर मला घोड्या-सारख्या उमद्या आणि विश्वासू जनावराची मदत घेणें भागच होतें. आतांपर्यंतच्या अनेक युद्धांत घोड्यांनीं माणसांना बचावलें आहेच कीं नाहीं ? मग मलाहि यावेळीं अश्व कां नाहीं उपयोगी पडणार ?

वसंतानें सांगितलेल्या रेसचा अर्थदायी मार्ग अगदींच सोपा होता. रेस म्हणजे काय असतें माहीत आहे कां तुम्हांला ? आठ दहा घोडे एका रिंगणांत पळतात. पहिला, दुसरा आणि तिसरा येणाऱ्यांना बक्षिसें मिळतात. पहिल्या घोड्याचें तिकीट तुम्ही घेतलेंत, तर दहा रुपयाला तीसचाळीस रुपये मिळतात. दुसऱ्या घोड्याचें तिकीट घेतलेंत तर पंचवीस रुपये तरी मिळतात. आणि तिसरा नंबर पटकावलेल्या घोड्याचें तिकीट घेतलेंत, तर निदान पंधरा सोळा रुपयांना तरी मरण नाहीं. वसंताकडून ही माहिती मला मिळाली, तेव्हां अर्थातच मला आनंद झाला. मी त्याला म्हणालों, "अरे आपण काय करूं, कीं पहिल्या नंबराला येणाऱ्या घोड्याचें तिकीट काढूं. काय? म्हणजे आपले पैसे लवकरांत लवकर वसूल होतील. आणि दहा रुपयाला पंधरा घेण्यापेक्षां चाळीस घेतलेले चांगलें, होय कीं नाहीं ?"

एकंदरींत माझें गणित चांगलें आहे हें यावरून वसंताला पटलेंच. तो म्हणाला, "बरोबर आहे. त्यांत अडचण एवढीच आहे, कीं पहिला नंबर कोण येईल याची इतकी खात्री देतां येत नाहीं."

"मग असं करूं, कीं आपण रेसचा निकाल होईपर्यंत थांबूं. निकाल लागल्या बरोबर आपण पहिल्या नंबरच्या घोड्यावर शेंदोनशें रुपये लादूं म्हणजे झालं. दहाचे चाळीस म्हणजे शंभराचे... चारशें. बरोबर?"

"असं बघ, तूं रविवारीं रेसकोर्सवर ये. म्हणजे मग तुला सगळं कांहीं बरोबर समजेल." मला पटवून देण्यांत अप्रत्यक्ष शरणांगति पत्करीत वसंतानें सांगितलें. तो म्हणाला, "तूं असं कर, रेसकोर्सच्या जवळ तिकिट काढायचं कंपाऊंड आहे. पहिली रेस दोनला सुरू होते, तर तूं रविवारीं दुपारीं एक वाजतां त्या कंपाऊंड-जवळ ये. येतांना दोनशें रुपये घेऊन ये म्हणजे झालं."

माझा बँक अकौंट जरा खालावलाच होता, पण एवीतेवी मला चौपट पैसे मिळ-णारच होते. त्यामुळें मी मोठ्या आत्म-विश्वासानें पैसे घेऊन येतों म्हणून सांगितलें. कारण रमीमध्यें काय होतं, कीं, तुमचं नशीब नसलें, तर योग्य ते पत्ते येत नाहींत. पण रेसमध्यें नशिबाचा फारसा भाग नाहीं. पत्ते आले नाहींत तरी चालते. फक्त पहिल्या नंबरच्या घोड्याचं तिकीट काढा-यलाच काय तो क्यू असेल. पण त्या क्यू-मध्यें उभा राहून तिकीट काढलं, कीं चौपट पैशाची निश्चिती झालीच.

रविवारीं सकाळपासूनच माझी गडबड सुरू झाली. आज ऑफिसच्या नोकरवर्गाचं गॅदरिंग आहे अशी अफवा मी आधींपासूनच घरांत उठवली होती. "या गॅदरिंगला बाय-कांना नेतां येतं कां हो ?" अशी एक सूचक पृच्छा सौ. नें केली होती. पण मी त्यावर म्हटलं होतं, "अग मलतंच. गॅदरिंगला कोणी बायका मुलं नेतो काय ? तूं काळजी करूं नकोस. मी रात्रीं आठपर्यंत घरीं येतोंच." रेस सहा साडेसहा पर्यंत संपते या माझ्या ज्ञानावर मी ही घरीं परतण्याची जबाबदारी घेतली होती.

महालक्ष्मी स्टेशनवर पाऊण वाजतां उतरलों. एरवी या स्टेशनवर फारसें कोणी चढत उतरत नसतें. पण त्या दिवशीं मात्र तेथें जवळ जवळ सबंध गाडी खालीं झाली. फारशी चौकशी न करतां 'महाजन' ज्या मार्गानें गेले, त्याच मार्गानें गेलों. वाटेत 'कोल, 'मोती', 'टर्फ' अशा आरोळ्या ऐकूं येत होत्या. त्या दिवशीं रेसमध्यें कोणते घोडे धांवणार आहेत, त्यांचीं नांवें आणि संभाव्य विजयी घोड्यांच्या त्या याद्या होत्या असें कळलें. मीहि एक पुस्तक घेतलें. बाकी आमची व्यवस्था रेसच्या मार्गावर तरी चांगली झाली आहे असें म्हटलें पाहिजे. कारण या चोपड्यां-बरोबरच त्यांवर खुणा करण्यासाठीं पेन्सिलहि विकल्या जात होत्या. मीहि एक चोपडी आणि पेन्सिल विकत घेतली आणि पहिल्या एन्क्लोजरच्या तिकीट कचेरीजवळ उभा राहिलों. चोपडी वाचीत असतांना, माझ्या










अनुक्रमणिका

अनुक्रमणिका








लक्षांत आलें कीं खरें म्हणजे रेस खेळणें अगदींच सोपें असतें. कोणत्या रेसमध्यें कोणता घोडा येणार हें पुस्तकांत आधींच लिहिलेलें असतें. त्याच्यावर पैसा लावायचा आणि दुप्पट - तिप्पट पैसा घ्यायचा.

एक वाजून दहा मिनिटें झाली, तरी वसंताचा पत्ता नव्हता. आतां मात्र मला जरा चिंता वाटूं लागली. पण नंतर चौकशी करतांना कुणी तरी सांगितलें, कीं महालक्ष्मी रेस कोर्सला दोन दारें आहेत. दोन्हींवर पहिल्या आणि दुसऱ्या एन्क्लोजरचीं तिकीट-विक्री होते. आणि या दोन दरवाज्यांत चांगलें दीड दोन फर्लांगाचें अंतर आहे. आतां हा घोटाळा कसा सोडवावा याचा मी विचार करीत होतों, तोंच एक पन्नाशीचा इसम माझ्याजवळ आला. त्याच्या अंगावरचे कपडे मळकट होते, तो अगदीं साधारण परिस्थितींतला होता, हें उघड होतें. मला अगदीं विश्वासांत घेतल्यासारखें करून हलक्या आवाजांत तो म्हणाला, "साहेब, ट्रिबल पूल खात्रीची टिप देतो."

तो काय म्हणतो आहे हें मला नक्की समजेना. पण रेस हा त्याच्या बोलण्याचा स्थूल विषय असावा असें मीं ताडलें. मी म्हटलें, "काय ?"

लगेच त्यानें पोस्टाच्या पाकिटाच्या आकाराचें एक बंद पाकीट माझ्या पुढें केलें आणि म्हणाला, "तीन रेसीसमध्यें नक्की येणारे घोडे यांत दिले आहेत."

मी पाकीट हातांत घेऊन फोडूं लागलों तेव्हां चटकन् माझ्या हातांतून हिसकावून घेत तो म्हणाला, "वा : राव ! अहो शुअर विनर काय फुकट मिळतात ? ट्रिबलला आज तीनशेंवर भाव जाईल."

"म्हणजे ?" मला अजून त्याची भाषा कळत नव्हती.

"म्हणजे असं, कीं तुम्ही या पाकिटां-तल्या घोड्यावर पांच रुपये लावलेत तर त्याचे तीनशें रुपये मिळणार."

"नक्की ?" मी हिशेब करीत विचारलें. कारण या दरानें मला साठपट पैसे मिळणार होते. दोनशें रुपयाचे किती बरं ? या गुणा-काराला कागद पेन्सिल हवी होती.

"नक्की म्हणजे राव काय ? दहा वर्षें मीं टिप्स विकतोंय्. माझी पाकिटं घेणारे लक्षा-वधी रुपये कमवून गेले, पंधरा रुपये काढा."

नाहीं तरी मी केव्हां ना केव्हां लक्षाधीश व्हायचं ठरवलंच होतं. तेव्हां ही आयती आलेली संधि मला वांया घालवायची नव्हती. मी पंधरा रुपये दिले आणि लक्षाधीश होण्याची ती गुरुकिल्ली विकत घेतली. कोटचाधीश होण्यासाठीं बहुधा तीस-चाळीस रुपयांचें पाकीट विकत घेत असतील. असाहि अंदाज मी त्याच वेळीं केला. मी तें पाकीट फोडण्यापूर्वींच माझा उद्धारकर्ता कोठेतरी पसार झाला. पाकिटांतल्या कागदावर पुढील अगम्य आंकडे होते : २×३

५×१

७×७

याचा अर्थ काय तो मला कळला नाहीं. एखाद्या अपरिचित लिपींत आलेल्या संदेशाचें कोडें उलगडण्याचा व्यर्थ प्रयत्न करीत बसावे तसें मला वाटूं लागले. इतक्यांत वसंत धापा टाकीत आला. तो मला म्हणाला, "अरे मी त्या दरवाजाजवळ वाट पाहतों आहे, आणि तूं इकडे थांबला आहेस होय ? बरं तर आतां चटकन् आंत जाऊं."

आम्ही सहा सहा रुपयांचीं तिकिटें काढलीं. आतां गर्दी खूपच वाढली होती. बहुतेक पुरुष होते, पण कांहीं स्त्रियाहि होत्या. त्यांत कांहींजण तरी फॅशनेबल किंवा अति फॅशनेबलच होत्या. सारें वातावरण मोठें उत्साही, धांदलीचें होतें. जवळ जवळ प्रत्येकाच्या हातांत शाळेंतल्या क्रमिक पुस्तकासारख्या रेसच्या पुस्तिका होत्या. त्यांत डोकावून जो तो आपल्या मित्रांशीं चर्चा करीत होता. आज अमकाच घोडा येणार, तमका मागेंच रहाणार, अमुक जॉकी आज फॉर्मांत आहे, तमुक जॉकी मागच्या रविवारीं मागें पडला अशी भाषा सारखी ऐकूं येत होती. जातां जातां मी वसंताला म्हटलें, "अरे आपल्याला आतां कांहींच काळजी करायला नको. हा कागद बघ आणि यांतली परिभाषा समजून सांग. त्या घोड्यांवर पैसे लावले कीं पांच रुपयाला तीनशें नक्की येणार आहेत."

माझ्या हातांतला कागद घेऊन वसंत म्हणाला, "तुला कुणींतरी बनवलं वाटतं. या कागदाचा अर्थ असा, कीं ट्रिबल पूलसाठीं दोन नंबरच्या रेसमध्यें तिसरा घोडा येणार, पांच नंबरच्या रेसमध्यें पहिला घोडा विन येणार आणि सात नंबरच्या रेसमध्यें सातवा घोडा पहिला येणार. पण हा एक अंदाज आहे- असे अनेक अंदाज असतात."

म्हणजे मघाशीं मला सोपें वाटलेलें प्रकरण एकंदरींत तेवढें सोपें नव्हतें तर ! आम्ही

महालक्ष्मीच्या पहिल्या वर्गाच्या विस्तीर्ण पटांगणांत गेलों. तेथें झाडांच्या छायेखालीं अनेक वर्तुळें करून लोक गटागटांनीं चर्चा करीत होते. समोर एक मोठा फलक होता. त्यावर पहिल्या रेसमधील घोड्यांचे आंकडे होते. त्या घोड्यांवर विन आणि प्लेसमध्यें किती तिकिटें खपलीं हे दाखविणारे आंकडे एकसारखे बदलत होते, वाढत होते. त्या धांवत्या आंकड्यांची मला गंमत वाटली. त्याच्या जवळच एका झाडाखालीं निरनिराळ्या आंकड्यांचे आणखी कांहीं फलक होते. कोणत्या नंबरच्या घोड्यावर किती प्रमाणांत तिकिटें खपलीं आहेत, याचे ते निदर्शक होते. त्याला 'ऑड्स' म्हणतात, असें मला वसंतानें सांगितलें. या फलकांजवळच जॉकींचीं नांवें मोठ्या अक्षरांत लिहिलेले फलक होते आणि ते जॉकी कोणत्या घोड्यावर स्वार होणार आहेत, त्या घोड्याचें क्रमांकहि दिले होते.

त्या विस्तीर्ण मैदानांत 'बुकीं'चाहि एक विभाग होता. बुकी म्हणजे खाजगी पैजा घेणारा. टर्फ क्लबच्या परवानगीनेंच बुकींचा हा धंदा चालतो. असे वीस पंचवीस बुकी होते. त्यांच्या स्टॉलवर पहिल्या रेसच्या घोड्यांचीं नांवें व क्रमांक होते. प्रत्येक स्टॉलभोंवतीं लोकांची चिक्कार गर्दी होती. हातांत शंभरापासून पांचपांचशें रुपयांपर्यंत नोटांचीं पुडकीं घेऊन तेथें घोड्यावर पैसे लावीत असतात. तें दृश्य मला फारच विलोभनीय वाटलें. हे सारे पैसा गोळा करून बुकी लोक पळून कसे जात नाहींत याचें मात्र समाधानकारक उत्तर मला कोणाकडून मिळालें नाहीं. कारण तो प्रश्न विचारण्याचें धाडसच मी केलें नाहीं. या बुकी केंद्राजवळच एका बाजूला टर्फ क्लबच्या सभासदांचा विभाग होता आणि दुसऱ्या बाजूला प्रचंड स्टेडियम होतें. दहापंधरा हजार लोकांची बसण्याची तिथें सोय होती. पण तिथें लोक फारच थोडा वेळ बसत असत. बहुधा ते उभें राहात किंवा रेस अगदीं संपत आली कीं, आरडाओरडा करीत नाचत असत.

पहिल्या रेसमध्यें कोणत्या घोड्यावर पैसे लावायचे याची मी आणि वसंत चर्चा करूं लागलों. मी म्हटलें, "अरे, हा शिपशेप घोडा आहे ना, तोच नक्की येईल बघ."

"कशावरून ?"

"कारण या रेसबुकांत चक्क लिहिलं आहेना, कीं तोच पहिला येणार म्हणून."

"पण त्या टिपखालचा मजकूर वाच ना" वसंत म्हणाला, "त्यांत 'टाईम्स'नं म्हटलं आहे कीं 'मन्सूर ई झम्मा' येणार म्हणून. इंडियन एक्स्प्रेस म्हणतो 'टोन व्हिजे' येणार तर फ्री प्रेसची टिप आहे. "मानसाव" जिकणार. आतां सांग या चार वेगळ्या रचनांतून तूं कोणता घोडा निवडणार ?"

मी पुनः बारकाईनें रेस कार्ड पाहूं लागलों. हा बरीक खराच प्रश्न होता. कारण पांच जणांनीं पांच घोडे दिले होते. शेजारींच उभा असलेला इसम तेवढ्यांत म्हणाला, "आज फ्ल्यूक येणार बघा– अल दिला"

"फ्ल्यूक म्हणजे काय ?" मी वसंताला विचारलें.












अनुक्रमणिका



# साहित्य सोनियाच्या खाणी

## आमचीं आगामी प्रकाशनें



पु. ल. देशपांडे
- १ एका कोळियाने
- २ गणगोत

रणजित देसाई
- ३ कातळ
- ४ तानसेन

वि. स. खांडेकर
- ५ उःशाप

रॉय किणीकर
- ६ ये ग ये ग विठाबाई !

अनंत काणेकर
- ७ खडक कोरतात आकाश

पु. शि. रेगे
- ८ अवलोकिता

स. मा. गर्गे
- ९ स्वप्न आणि सत्य

नरहर कुरुंदकर
- १० रूपवेध

सुधा नरवणे
- ११ मरालिका

म. र. शिरवाडकर
- १२ हरणाची करणी

लवकरच प्रसिद्ध होत आहे.

## शास्त्रीय मराठी व्याकरण

(नवी आवृत्ति)

ग्लेझ कागद, पृष्ठें १२०० ते १५००



लेखक

**प्रि. मोरो केशव दामले एम्. ए.**

(कै. दामले यांचें चरित्र, फोटो, परिशिष्ट आणि व्याकरणविषयक विस्तृत प्रस्तावना.)



संपादक

**कृष्ण श्रीनिवास अर्जुनवाडकर**

आगाऊ पांच रुपये पाठवून मागणी केल्यास फक्त ३३ % सूट मिळेल.

टे. नं. २९३९

: प्रकाशक :

**देशमुख आणि कंपनी**

७३९ बुधवार, पुणें २.




प्रसन्न! उत्साहपूर्ण! निरामय! लाइफबॉयनें स्नान केल्यानें हा आनंद आपल्याला लाभतो! लाइफबॉयनें मळघाणींतील जंतू धुवून जातात आणि त्यामुळें कसें स्वच्छ, प्रसन्न, निरामय वाटूं लागतें! शिवाय लाइफबॉय आतां नव्या दर्शनीय वेष्टनांत मिळूं लागला आहे. त्याची नवी वडीहि कशी सहज हातांत राहण्याजोगी—जणूं आपल्यासाठींच खास बनविलेली! लाइफबॉय साबण आजच खरेदी करा!

हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन

L. 47-140 MA.



अनुक्रमणिका








"फ्ल्यूक म्हणजे अगदीं अनपेक्षित; सहसा न येणारा घोडा."

"पण या रेस बुकांत फ्ल्यूक म्हणून हिमालय हा घोडा येईल असंहि लिहिलंय्. आतां सगळयांचंच ऐकायचं, तर आठ घोडयांपैकीं आठहि घोडयावर पैसे लावले पाहिजेत. मी सांगूं तुला ? अरे रेसमध्यें नक्की पैसे मिळवायचा मार्ग मला सांपडला." मी 'युरेका' म्हणून ओरडतंच सांगितलें.

"काय ?"

"आपण काय करूं, कीं प्रत्येक घोडयावर वीस वीस रुपये लावूं. मग कोणताहि घोडा आला, तरी आपल्याला पैसे मिळतीलच. नाहीं का ?"

"शहाणा आहेस. अरे, समज आपण आठहि घोडयावर वीस वीस रुपये लावले. तर एकच घोडा जिंकेल. आणि त्या घोडया-वर आपल्याला वीस रुपयांचे फार तर चाळीस किंवा पन्नास मिळतील. मग हा कसा हिशेब पडला सांग कीं. एकशें साठ रुपये लावायचे नि चाळीस रुपये घ्यायचे ! म्हणजे हम-खास लाखाचे बारा हजार करायची तुझी ही सूचना आहे !"

म्हणजे एकंदरींत रेसमध्यें पैसे मिळवणें मला वाटलें होतें तितकें सोपें नव्हतें. मात्र, रेसमध्यें पैसे घालवणें फारसें कठीण नसावें असें माझ्या साहजिकच लक्षांत आलें. तरी पण बऱ्याच चर्चेनंतर आम्ही मन्सूर ई झम्मा आणि शिपशेप या दोन घोडयांवर दोघांचे मिळून साठ रुपये लावले. विनवर लावले, कारण प्लेसमध्यें चांगला भाव पडत नाहीं असं ऐकलं होतं. विन आणि प्लेसची ही काय भानगड आहे हेंहि मला माहीत नव्हतें. पण वसंतानें सांगितलें कीं विनवर पैसे लावले, तर तो घोडा पहिला आला तरच पैसे मिळतात. पण प्लेसवर पैसे लावले तर तो घोडा पहिल्या दोनमध्यें आला तरी पैसे मिळतील. इतकेच नव्हे, तर ज्या रेस-मध्यें धांवणाऱ्या घोडयांची संख्या आठ किंवा त्याहून अधिक असते, त्या रेसमध्यें पहिले तीन घोडे प्लेसच्या बक्षिसासाठीं पात्र ठरतात. एकंदरींत, जरा धीरानें खेळणाऱ्या सावध पंटरसाठीं प्लेसचा खेळ बरा. पण त्यांत 'किक्' नाहीं, थरथर म्हणजे थ्रिल नाहीं. कारण प्लेसमध्यें दहा रुपयांचे अकरा नाहींतर बारा–तेरा येणार. पण विनमध्यें दुपटीपासून पांच दहापटींपर्यंतहि पैसा येऊं शकतो. तेव्हां मी हिशेब केला, कीं आमच्या साठीचे निदान दीडदोनशें तरी व्हावेत.

"कसे होतील ?" वसंतानें विचारलें.

आतां आली का आमच्या गणिताची चांचणी ? मी म्हटलं, "अरे साठ त्रिक एकशें ऐशीं नाहीं का होत ?"

"तो म्हणाला, "गणित बरोबर आहे रे. तसे साठाला दहानं गुणलं तर सहाशेंसुद्धां मिळतील. पण ते आपल्या पैशाला लागू पडत नाहीं. कसं तें पहा. आपण दोघांनीं तीस तीस रुपये दोन घोडयांवर लावले. पण त्यापैकीं पहिला नंबर एकच येणार, नाहीं का ? त्याला समज दुप्पट भाव मिळाला. तर तीस दुणे साठ झाले. म्हणजे कुठल्याहि परिस्थितींत एका घोडयावरचे पैसे जाणारच, होय कीं नाहीं ? दहाला तीसचा भाव लागला, तर एकंदर मिळून तीस रुपये फायदा होईल."

हा जुगारी हिशेब आतां कोठे माझ्या डोक्यांत शिरूं लागला. पण मी उत्साहानें म्हटलें, "बरं बुवा, तीस तर तीस. पुढच्या रेसमध्यें जास्त मिळवूं." जणूं कांहीं किती पैसे मिळवायचे ते आमच्याच हातांत होतें !"

रेस सुटायला पांच मिनिटें असल्याची घंटा झाली, तेव्हां तिकीट कचेऱ्यांकडून धांवतच आम्ही त्या प्रचंड स्टेडियमकडे गेलों. तिथें हजारों लोक रेस सुटण्याची उत्सुकतेनें वाट पाहात होते. दूरवर हिरवे तांबडे ठिपके दिसत होते, तेच घोडेस्वार असल्याचें वसंतानें मला सांगितलें. इतक्यांत घंटा झाली आणि रेस सुटल्याचें मायक्रो-फोनवर सांगण्यांत आलें. त्यावरोबरच धांवतें वर्णनहि ऐकूं आलें. 'मन्सूर इ झम्मा सर्वांत पुढें आहे. त्याच्या मागोमाग शिप-शेप. तिसरा क्रमांक अलादिला. वळणावर शिपशेप आणखी मागें पडला. मानसाव पुढें सरकला.' हां हां घोडे अगदी जवळ येऊं लागले. स्टेडियममधले लोक आपापल्या घोडयाला उत्तेजन देण्याकरतां मोठमोठयानें ओरडूं लागले– 'कम्, ऑन शिपशेप' 'बक अप् माय लेडी' एखाद्या रणांगणांवर लढ-तांना वीरांनीं कानठळ्या बसविणाऱ्या गर्जना कराव्यात, तसे ते आवाज उठत होते. कित्येक जण भान विसरून उंच उडया मारून आपल्या घोडयाचा पुकार करीत होते. आम्हीहि आमच्या घोडयांना ओरडून आमच्या पैशाची निश्चिति करून घेण्याचा प्रयत्न करीत होतों. आमच्या घोडयांचे क्रमांक तीन आणि पांच असे होते. आमच्या

' जोडेदान '




" बचेंगे तो और भी लडेंगे "

पुढून घोडे धांवले, तेव्हां दोन्हीहि घोडे पहिल्या तीन क्रमांकांत होते आणि दोन नंबरचा घोडा पहिला होता. पण अखेरच्या शंभर यार्डांत काय गोंधळ झाला कुणास ठाऊक. सात नंबरचा घोडा मागून जो भरधांव निघाला, तो सर्वांना मागें टाकून अखेर पहिला आला आणि रेस जिंकून गेला. बहुतेकांचे अंदाज चुकले होते. मघांचा उत्साह आणि आरडाओरडा एकदम ओसरला आणि हळहळ ऐकूं येऊं लागली. वसंताचा चेहरा खर्रकन् उतरला. माझाहि तसाच कांहींसा झाला असावा असा अंदाज आहे. आमचे सबंध साठ रुपये चक्क पाण्यांत बुडाले होते.

थोड्याच वेळांत डिव्हिडंड म्हणजे कोणत्या घोड्यावर किती पैसे मिळाले याचे आंकडे बोर्डावर लागले. सूर्योदय हा घोडा अनपेक्षितपणें पहिला आला होता आणि त्यानें दहा रुपयाला पंचावन्न रुपये असा दणकून भाव दिला होता. आमचा मन्सूर इ झम्मा प्लेसमध्यें दुसरा होता, त्यानें साडेबाराचा भाव दिला होता. तो पाहून मी वसंताला म्हटलें, "अरेरे आपण मन्सूरवर प्लेसमध्यें साठ रुपये लावले असते, तर निदान पंधरा रुपये फायदा मिळाला असता."

तो कडवट चेहऱ्यानें म्हणाला, "मग सूर्योदयवर लावले असते तर तीन साडेतीनशें मिळाले असते. अरे बाबा, अमुक केलं असतं तर तमुक झालं असतं या म्हणण्याचा रेसमध्यें कांहीं उपयोग नाहीं. आतां हें बघ ना, फोरकास्ट पूलमध्यें या रेसला पांच रुपयांना दोनशें तीस रुपये लागले !"

हा प्रकार मला नवाच होता. मग मला त्यानें सांगितलें, कीं एखाद्या रेसमध्यें पहिला घोडा कोणता येणार आणि दुसरा कोणता येणार हें आपण अचूक सांगून पांच रुपयांचें तिकीट घेतलें, तर त्याला फोरकास्ट म्हणतात. या फोरकास्टमध्यें चिक्कार पैसा मिळतो. आतां मात्र नवीच आशा निर्माण झाली. मी म्हटलें, "अरे म्हणतोस काय ? फोरकास्टमध्यें पन्नासपट पैसा मिळतो ? मग पुढच्या रेसला आपण फोरकास्टमध्यें शंभर रुपये लावूं.चल. शंभर गुणिले पन्नास–पांचशें."

"नव्हे, पांच हजार."

"अबब. पांच हजार ? मग दोनशें लावूं ना. म्हणजे दहा हजार मिळतील."

"असा नुसता बोलक्या शंखासारखा आंकडे मांडीत बसूं नको. चल दुसऱ्या रेसमध्यें कांहीं लक् आहे कां पाहूं." असं म्हणून वसंतानें मला ओढीतच तिकीट ऑफिसजवळ नेलें. आम्ही फोरकास्टवर ४×३ अशीं पांचाचीं पांच तिकिटें घेतलीं. चार गुणिले तीन म्हणजे चार नंबरचा घोडा पहिला आणि तीन नंबरचा दुसरा येणार हा आमचा अंदाज. त्याशिवाय आम्ही वीस रुपये अतिसुंदर या घोड्यावर लावले–प्लेसमध्यें. म्हटलं, कमी मिळाले तर निश्चित मिळावेत. आमचा फोरकास्टचा अंदाज चुकला आणि ते पंचवीस रुपये गेले. पण प्लेसमध्यें आमचा घोडा दुसरा आला. तर पडला दहाला अकरा रुपये. म्हणजे एकंदर तेवीस रुपये नुकसान ! तिसऱ्या रेसमध्यें आम्हांला चाळीस रुपयांना अठ्ठेचाळीस मिळून आठ रुपयांचा फायदा झाला, तेव्हां रेसचें तंत्र आपल्याला आतां समजूं लागलें असें मला वाटायला लागले, आणि त्या आत्मविश्वासावर मी ओशियाना या घोड्यावर










"फ्ल्यूक म्हणजे अगदीं अनपेक्षित, सहसा न येणारा घोडा."

"पण या रेस बुकांत फ्ल्यूक म्हणून हिमालय हा घोडा येईल असंहि लिहिलंय्. आतां सगळघांचंच ऐकायचं, तर आठ घोडयांपैकीं आठहि घोडयावर पैसे लावले पाहिजेत. मी सांगूं तुला ? अरे रेसमध्यें नक्की पैसे मिळवायचा मार्ग मला सांपडला." मी 'युरेका' म्हणून ओरडतच सांगितलें.

"काय ?"

"आपण काय करूं, कीं प्रत्येक घोडयावर वीस वीस रुपये लावूं. मग कोणताहि घोडा आला, तरी आपल्याला पैसे मिळतीलच. नाहीं का ?"

"शहाणा आहेस. अरे, समज आपण आठहि घोडयावर वीस वीस रुपये लावले. तर एकच घोडा जिंकेल. आणि त्या घोडयावर आपल्याला वीस रुपयांचे फार तर चाळीस किंवा पन्नास मिळतील. मग हा कसा हिशेब पडला सांग कीं. एकशें साठ रुपये लावायचे नि चाळीस रुपये घ्यायचे ! म्हणजे हमखास लाखाचे बारा हजार करायची तुझी ही सूचना आहे !"

• म्हणजे एकंदरींत रेसमध्यें पैसे मिळवणें मला वाटलें होतें तितकें सोपें नव्हतें. मात्र, रेसमध्यें पैसे घालवणें फारसें कठीण नसावें असें माझ्या साहजिकच लक्षांत आलें. तरी पण बऱ्याच चर्चेनंतर आम्ही मन्सूर ई झम्मा आणि शिपशेप या दोन घोडयांवर दोघांचे मिळून साठ रुपये लावले. विनवर लावले, कारण प्लेसमध्यें चांगला भाव पडत नाहीं असं ऐकलं होतं. विन आणि प्लेसची ही काय भानगड आहे हेंहि मला माहीत नव्हतें. पण वसंतानें सांगितलें कीं विनवर पैसे लावले, तर तो घोडा पहिला आला तरच पैसे मिळतात. पण प्लेसवर पैसे लावले तर तो घोडा पहिल्या दोनमध्यें आला तरी पैसे मिळतील. इतकेच नव्हे, तर ज्या रेसमध्यें धांवणाऱ्या घोडयांची संख्या आठ किंवा त्याहून अधिक असते, त्या रेसमध्यें पहिले तीन घोडे प्लेसच्या बक्षिसासाठीं पात्र ठरतात. एकंदरींत, जरा धीरानें खेळणाऱ्या सावध पंटरसाठीं प्लेसचा खेळ बरा. पण त्यांत 'किक्' नाहीं, थरथर म्हणजे थ्रिल नाहीं. कारण प्लेसमध्यें दहा रुपयांचे अकरा नाहींतर बारा–तेरा येणार. पण विनमध्यें दुपटीपासून पांच दहापटीपर्यंतहि पैसा येऊं शकतो. तेव्हां मी हिशेब केला, कीं आमच्या साठीचे निदान दीडदोनशें तरी व्हावेत.

"कसे होतील ?" वसंतानें विचारलें.

आतां आली का आमच्या गणिताची चांचणी ? मी म्हटलं, "अरे साठ त्रिक एकशें ऐंशीं नाहीं का होत ?"

"तो म्हणाला, "गणित बरोबर आहे रे. तसे साठाला दहानं गुणलं तर सहाशेंसुद्धां मिळतील. पण ते आपल्या पैशाला लागूं पडत नाहीं. कसं तें पहा. आपण दोघांनीं तीस तीस रुपये दोन घोडयांवर लावले. पण त्यापैकीं पहिला नंबर एकच येणार, नाहीं का ? त्याला समज दुप्पट भाव मिळाला. तर तीस दुणे साठ झाले.म्हणजे कुठल्याहि परिस्थितींत एका घोडयावरचे पैसे जाणारच, होय कीं नाहीं ? दहाला तीसचा भाव लागला, तर एकंदर मिळून तीस रुपये फायदा होईल."

हा जुगारी हिशेब आतां कोठे माझ्या डोक्यांत शिरूं लागला. पण मी उत्साहानें म्हटलें, "बरं बुवा, तीस तर तीस. पुढच्या रेसमध्यें जास्त मिळवूं." जणूं कांहीं किती पैसे मिळवायचे ते आमच्याच हातांत होतें!"

रेस सुटायला पांच मिनिटें असल्याची घंटा झाली, तेव्हां तिकीट कचेऱ्यांकडून धांवतच आम्हीं त्या प्रचंड स्टेडियमकडे गेलों. तिथें हजारों लोक रेस सुटण्याची उत्सुकतेनें वाट पाहात होते. दूरवर हिरवे तांबडे ठिपके दिसत होते, तेच घोडेस्वार असल्याचें वसंतानें मला सांगितलें. इतक्यांत घंटा झाली आणि रेस सुटल्याचें मायक्रोफोनवर सांगण्यांत आलें. त्याबरोबरच धांवतें वर्णनहि ऐकूं आलें. 'मन्सूर इ झम्मा सर्वांत पुढें आहे. त्याच्या मागोमाग शिपशेप. तिसरा क्रमांक अलां दिला. वळणावर शिपशेप आणखी मागें पडला. मानसाब पुढें सरकला.' हां हां घोडे अगदी जवळ येऊं लागले. स्टेडियममधले लोक आपापल्या घोडयाला उत्तेजन देण्याकरतां मोठमोठयानें ओरडूं लागले– 'कम, ऑन शिपशेप' 'बक अप् माय लेडी' एखाद्या रणांगणांवर लढतांना वीरांनीं कानठळ्या बसविणाऱ्या गर्जना कराव्यात, तसे ते आवाज उठत होते. कित्येक जण भान विसरून उंच उडया मारून आपल्या घोडयाचा पुकार करीत होते. आम्हीहि आमच्या घोडयांना ओरडून आमच्या पैशाची निश्चिति करून घेण्याचा प्रयत्न करीत होतों. आमच्या घोडयांचे क्रमांक तीन आणि पांच असे होते. आमच्या

'जोडेदान'




" बचेंगे तो और भी लडेंगे "

पुढून घोडे धांवले, तेव्हां दोन्हीहि घोडे पहिल्या तीन क्रमांकांत होते आणि दोन नंबरचा घोडा पहिला होता. पण अखेरच्या शंभर यार्डांत काय गोंधळ झाला कुणास ठाऊक. सात नंबरचा घोडा मागून जो भरधांव निघाला, तो सर्वांना मागें टाकून अखेर पहिला आला आणि रेस जिंकून गेला. बहुतेकांचे अंदाज चुकले होते. मघांचा उत्साह आणि आरडाओरडा एकदम ओसरला आणि हळहळ ऐकूं येऊं लागली. वसंताचा चेहरा खर्रकन् उतरला. माझाहि तसाच कांहींसा झाला असावा असा अंदाज आहे. आमचे सबंध साठ रुपये चक्क पाण्यांत बुडाले होते.

थोड्याच वेळांत डिव्हिडंड म्हणजे कोणत्या घोड्यावर किती पैसे मिळाले याचे आंकडे बोर्डावर लागले. सूर्योदय हा घोडा अनपेक्षितपणें पहिला आला होता आणि त्यानें दहा रुपयाला पंचावन्न रुपये असा दणकून भाव दिला होता. आमचा मन्सूर इ झम्मा प्लेसमध्यें दुसरा होता, त्यानें साडेबाराचा भाव दिला होता. तो पाहून मी वसंताला म्हटलें, "अरेरे आपण मन्सूरवर प्लेसमध्यें साठ रुपये लावले असते, तर निदान पंधरा रुपये फायदा मिळाला असता."

तो कडवट चेहऱ्यानें म्हणाला, "मग सूर्योदयवर लावले असते तर तीन साडेतीनशें मिळाले असते. अरे बाबा, अमुक केलं असतं तर तमुक झालं असतं या म्हणण्याचा रेसमध्यें कांहीं उपयोग नाहीं. आतां हें बघ ना, फोरकास्ट पूलमध्यें या रेसला पांच रुपयांना दोनशें तीस रुपये लागले !"

हा प्रकार मला नवाच होता. मग मला त्यानें सांगितलें, कीं एखाद्या रेसमध्यें पहिला घोडा कोणता येणार आणि दुसरा कोणता येणार हें आपण अचूक सांगून पांच रुपयांचें तिकीट घेतलें, तर त्याला फोरकास्ट म्हणतात. या फोरकास्टमध्यें चिक्कार पैसा मिळतो. आतां मात्र नवीच आशा निर्माण झाली. मी म्हटलें, "अरे म्हणतोस काय ? फोरकास्टमध्यें पन्नासपट पैसा मिळतो ? मग पुढच्या रेसला आपण फोरकास्टमध्यें शंभर रुपये लावूं चल. शंभर गुणिले पन्नास–पांचशें."

"नव्हे, पांच हजार."

"अबब. पांच हजार ? मग दोनशें लावूं ना. म्हणजे दहा हजार मिळतील."

"असा नुसता बोलक्या शंखासारखा आंकडे मांडीत बसूं नको. चल दुसऱ्या रेसमध्यें कांहीं लक् आहे कां पाहूं." असं म्हणून वसंतानें मला ओढीतच तिकीट ऑफिसजवळ नेलें. आम्ही फोरकास्टवर ४×३ अशीं पांचाचीं पांच तिकिटें घेतलीं. चार गुणिले तीन म्हणजे चार नंबरचा घोडा पहिला आणि तीन नंबरचा दुसरा येणार हा आमचा अंदाज. त्याशिवाय आम्ही वीस रुपये अतिसुंदर या घोड्यावर लावले– प्लेसमध्यें. म्हटलं, कमी मिळाले तर निश्चित मिळावेत. आमचा फोरकास्टचा अंदाज चुकला आणि ते पंचवीस रुपये गेले. पण प्लेसमध्यें आमचा घोडा दुसरा आला. तर पडला दहाला अकरा रुपये. म्हणजे एकंदर तेवीस रुपये नुकसान ! तिसऱ्या रेसमध्यें आम्हांला चाळीस रुपयांना अठ्ठेचाळीस मिळून आठ रुपयांचा फायदा झाला, तेव्हां रेसचें तंत्र आपल्याला आतां समजूं लागलें असें मला वाटायला लागले, आणि त्या आत्मविश्वासावर मी ओशियाना या घोड्यावर













## मी प्रसवतों माझ्यांतला ईश्वर

माझ्यांतुन उठून आज अवघा काळोख पाषाणला
ओसाडींत इथें भुई परिसते संदीग्धशा चाहुली...
माझें श्रेय अशांत अंध भटके सारी व्यथा झोंकुनी
आहे दाहत देह धुंद तम जें अंगारलेलें तळीं

कोठें कोण असे मला बिलगुनी वैराण वाटेवरी?
मी जाणें अविराम क्रंदत उरीं घायाळलें पांखरूं
त्याचे सूर निगूढ खिन्न जपतां आभाळली आर्तता;
दाटे ध्वांत दिशांत फक्त; भवतीं आकारतें शील्पसें

आपोआप हताश हात जुळंती; तेजाळले लोचन
माझें दुःख विशाल; मी प्रसवतों माझ्यांतला ईश्वर

—शंकर रामाणी

एकदम पन्नास रुपये लावले. तो घोडा इतका मागें राहिला, कीं तो त्याच रेसमधला होता कीं, मागच्या रेसमधला चुकून हिरवळ खात राहिला होता असें वाटायला लागलें. एकंदर त्या एका दिवसाच्या सात रेसीसमध्यें माझे अडीचशें आणि वसंताचे दोनशें रुपये गेले, तेव्हां मात्र रेस काय किंवा सट्टा काय, पण जुगार हा एकंदरीत वाईटच असें प्राब्लेम विचार माझ्या मनांत येऊं लागले.

—आणि तरीहि मी आणखीं एकदां रेसला गेलोंच ! याचें एकमेव कारण म्हणजे माझी वायको. त्यादिवशीं संध्याकाळीं मी दमून घरीं आलों आणि म्हणालों, "आज ऑफिसमध्यें रविवारींच कामाला बोलावलं होतं. भयंकर काम होतं. वघ. डोकं वर करायला वेळ मिळाला नाहीं."

"आं ? अहो आज काम कुठलं ?" तिनं आश्चर्यानं विचारलं. "तुम्ही आज ऑफिसच्या गॅदरिंगला जातों म्हणून सांगितलं होतंत !"

झारंच मुसळ केरांत ! सकाळीं घरांतून निघतांना मी वायकोला काय सांगितलं होतं हें माझ्या तरी कुठं लक्षांत होतं ? खरोखर, बायकोला मारलेल्या थापा नंतर ज्या नवऱ्यांच्या लक्षांत रहात असतील, ते धन्य होत!

आतां या पेंचप्रसंगांतून वाट कशी काढायची हें मला सुचेना. तरी पण मी उसनें अवसान आणून म्हणालों, "होय गं. आज तसं पाहिलं तर गॅदरिंग होतंच. पण आमचा तो मद्रासी मूर्तीसाहेब कसा आहे तुला माहितच आहे. मी चांगला गॅदरिंगचा प्रोग्रॅम पाहात बसलों होतों. तिथं मध्येंच माझ्याकडे आला आणि म्हणाला, 'न्यूयॉर्कची केबल आली आहे. अर्जंट काम आहे चला. काय करणार ? उठलों गॅदरिंग सोडून. गेलों ऑफिसांत त्याच्याबरोबर आणि बसलों कामाला.'"

मला वाटलें होतें एवढ्यावर निभावेल पण कसंच काय नि कसंचं काय. माझ्या नवखेपणामुळें रेसच्या घोड्यांचीं तिकिटें खिशांतच राहिलीं होतीं आणि मीहि अनवधानानं तिला खिशांतलं सिगरेटचं पाकीट द्यायला सांगितलं. पाकिटाबरोबर घोड्यांच्या शर्यतीच्या तिकिटांचा जुडगा बाहेर काढीत ती म्हणाली, "हें हो काय ?"

"आं ? हां हां ते होय रेसचीं तिकिटं आहेत." मी बोलून गेलों. ऐन वेळीं थाप सुचतेय् असं नाहीं.

"म्हणजे तुम्ही रेसला गेलां होतां ?" तिनं आश्चर्यानें विचारलं.

"होय. म्हणजे काय झालं, कीं मूर्तीसाहेबानं न्यूयॉर्कला पाठवायचं काम माझ्याकडून करून घेतलं नि मग मला म्हणाला, "मिस्टर मुळे आपण आतां रेसला जाऊं या. अग रेस म्हणजे सरकारमान्य आहे. त्यांत बेकायदा कांहीं नाहीं."

"तसं नव्हे हो, पण तुम्ही रेसला गेलांत कीं, नक्की पैसे घालवून येणार" ती हंसत हंसत म्हणाली.

"घालवून ? अग तुला माहीत नाहीं. आज तीनशें रुपये मिळवून आलों आहे मी." चेहरा शक्य तेवढा आनंदी ठेवण्याचा प्रयत्न करीत मी म्हणालों. मला नकळत माझा पाय अधिकाधिक खोलांत रुतत होता.

"मग कुठें आहेत ते पैसे ? एवढे तीनशें रुपये मिळाले, तर त्यांतल्या पन्नास रुपयांचं मला पातळ घेतलं पाहिजे." सौ. नें आपला न्याय्य हक्क प्रस्थापित केला.

"पातळाचं काय, घेऊं ग. पण आज काय झालं, कीं रेसहून येतांना आपला वसंत सावर्डेकर भेटला. त्याला ते पैसे उसने दिले आहेत. येतील चार दिवसांत परत." मी सांगितलें.

मग ती लाडीकपणें माझ्याजवळ उभी राहात म्हणाली, "तुम्ही कीं नाहीं गडे—"

ही 'गडे' वगैरे पुस्तकांतली मंडळी आली, कीं आतां कांहींतरी प्रकरण अंगाशीं चिकटणार हें मी लग्नानंतर थोड्याच दिवसांत शिकलों आहे.

"मला किनई, एकदां रेस बघायची आहे. दाखवाल ?" तिनें लाडिवाळपणें विचारलें.

एकाच दिवसांच्या रेसच्या अनुभवानंतर मी पुन: त्या बाजूला न वळण्याची प्रतिज्ञा केली होती. पण एका तासांतच तिला तडा जाईल असें मला वाटलें नव्हतें. रेसमध्यें मी फार नशिबवान् असल्याचेंहि आतांच तिच्या अनुभवास आलें होतें. मग पुन: एकदां रेसला जाऊन आणखी तीनशें रुपयांचा फायदा कां काढूं नये ? या तिच्या प्रश्नास माझ्याजवळ समर्पक उत्तर नव्हतें. अर्थातच सौ. ला रेसला न्यायचें मला मान्य करावें लागलें.

मी वसंताबरोबर रेसला गेलों होतों, त्यापेक्षां दुसऱ्या रविवारीं माझी भूमिका वेगळी आणि श्रेष्ठ होती. पहिल्या वेळीं मी नवशिका होतों आणि वसंत गुरु होता तर आतां मी गुरू होतों आणि माझी बायको मला वावरल्याप्रमाणें शंका विचारीत होती. मी तिला टोट म्हणजे काय, डिव्हिडंड म्हणजे काय, फोरकास्ट कशाला म्हणायचें, विन आणि प्लेस कशाशीं खातात, फ्ल्यूक हा काय







प्रकार आहे इत्यादि माहिती देऊन चांगलें पढवून ठेवलें. रेसच्या बुकांत त्या घोडयाची पूर्वीची महिती देतात, आणि वर्तमानपत्रांत अंदाज देतात. हें सारें जमेला घरुन आणि आपली बुद्धिमत्ता लढवून कोणता घोडा येईल हें ठरवायचें आणि त्यावर पैसे लावायचें असें मी तिला शिकविलें. पहिल्या रेसमध्यें मी कौंट कॅस्वल हा घोडा येईल असें मोठ्या आत्मविश्वासानें सांगितलें. सौ. म्हणाली, "छः हो. मृगलोचने हाच घोडा जिकेल त्याच्यावर लावा पेसे."

"कशावरून म्हणतेस तूं ?"

"कशावरून म्हणजे ? मला हें नांव आवडतं म्हणून."

"शाहाणीच आहेस. तुला रेसमधला ढ सुद्धां येत नाहीं. अग जशा गोड नांवाच्या मुली सुंदर असतातच असं नाहीं, त्याच प्रमाणच कानाला मधुर लागणाऱ्या नावाचे घोडे जिंकतातच असं नव्हे" अस म्हणून मी कौंट कॅस्वलवर तीस रुपय लावले.

योगायोग असा, कीं सौ. नें निवडलेला मृगलोचन घोडाच पहिला आला. ती म्हणाली, "बघा, मी सांगतलं नव्हतं ?"

तीस रुपये डोळ्यासमोर गेल्यामुळं मी आधींच नव्हेंस झालों होतों. मी तिच्यावर ओरडून म्हणालों, "उगीच एक घोडा फ्ल्यूक आला म्हणून बढाई मारू नको. तुला रेसमधलं काय कळतय् ? आतां या दुसऱ्या रेसमध्यें बघ मी माझे गेलेले तीस रुपये भरून काढतों. अग, मागच्या रविवारीं असंच झालं. पहिल्या रेसमध्यें पैसे हरलों. मूर्तीसाहेब म्हणाला, "पहिली रेस जिकणं अशुभ असतं. आतां यापुढं तुला नक्की पैसा मिळणार.आणि अगदी बरोबर तस्संच झालं."

मी आणि सौ. हातांतलीं रेसबुकं चाळूं लागलों. बारलॉय् हा घोडा सर्वांनीं दिला होता. म्हटलं, हा नक्की येणार. त्याच्यावर पन्नास रुपये लावावे म्हणून निघालों, तों आमच्या बाईसाहेबांनीं तोंड उघडलं, "अहो हा चार नंबरचा घोडा आहे ना, तोच येईल."

"कशावरून ?"

"अहो त्या जॉकीचा ड्रेस जांभळा आणि हिरवा आहे. मला हें कॉंबिनेशन फार आवडतं. तुम्ही त्याचं तिकीट घेऊन तर पाहा."

आतां मात्र मला खदखदून हंसूं आलं. मी म्हटलं, "अग मॅचिंग रंग पाहायला हें काय पातळांचं आणि ब्लाऊजच्या कपड्यांचं दुकान आहे ? या पन्नास रुपयांचे शंभर दीडशें रुपये करून देणारा एकच घोडा आहे. त्याचं नांव बारलॉय्."

झालं, मी मोठ्या निग्रहानं पैसे लावले आणि हा पराक्रमी घोडा पांचवा आला ! सौ. नें सांगितलेला चार नंबरचा घोडा—ज्याच्या जॉकीचे कपडे जांभळे निळे होते तो मात्र अगदीं बिनचूकपणें पहिला आला होता. आतां मला माझ्या अंदाजांची चिंता वाटूं लागली. पण वरकरणी तसें दाखवतां येत नव्हतें. मी ओढून ताणून चंद्रबळ आणीत म्हटले, "कुछ फिकीर नहीं. तिसऱ्या रेसमध्यें भरून काढूं." असं म्हणून मी रेसकार्डची चाळवाचाळव करूं लागलों. पण माझा निर्णय जाहीर होण्यापूर्वींच सौ. नें आपला निर्णय जाहीर केला, "तिसऱ्या नंबरचा घोडा येईल. कारण ही तिसरी रेस आहे."

"अग हें शास्त्र इतकं सोपं असतं, तर हा एवढा खटाटोप करायचं कांहींच कारण नव्हतं. पहिल्या रेसमध्यें पहिला, दुसरीमध्यें दुसरा, असे विजेत्यांचे क्रमांक ठरून गेले असते" मी उपहासानें म्हणालों.

"बघा तुम्ही" ती आत्मविश्वासानें म्हणाली.

"रेस म्हणजे काय बटाट्याची भाजी आहे ?" असें म्हणून मी तिचा सल्ला धुडकावून दिला आणि टाईम्स व एक्स्प्रेसनें पाठिंबा दिलेल्या नेटिव्ह नान्सर या घोड्यावर चाळीस रुपये लावले.

त्या रेसमध्यें तिसऱ्या क्रमांकाचा घनश्याम हा घोडा पहिला आला आणि आतां मला माझ्या बायकोबद्दल जरा आदर आणि वचक वाटूं लागला ! पण आपला हेका सोडून लगेच तिचा सल्ला स्वीकारणेंहि मला कमीपणाचें वाटूं लागलें. पांच हा आंकडा तिला शुभ आहे अशी तिची भावना होती, म्हणून तोच घोडा जिंकेल असा तिने केलेला अंदाज मी मानला नाहीं म्हणून आणखी तीस रुपये हरलों. एका जॉकीचें गांव कोल्हापूर होतें आणि त्या गांवीं माझ्या बायकोची एक मावशी राहात होती. एवढ्या

पुराव्यावर तिनें आपल्या अजब तर्कशास्त्रास अनुसरून अशी खात्री दिली होती, कीं त्याच जॉकीचा घोडा येणार. मी तिला मावशीसकट मूर्खांत काढलें. पण तिचाच शब्द खरा ठरला आणि मला आणखी चाळीस रुपयांची खोट बसली. तिला इंटरला मेघदूत हें क्रमिक पुस्तक लावलें होतें आणि त्यांत तिला चांगले मार्क पडले होते या कारणावरून 'मेघदूत' हा घोडा विजयी होईल असें सौ. नें केलेलें भविष्य मी मानलें नाहीं म्हणून माझा बुडत्याचा पाय अधिकच खोलांत गला होता.

आतां शेवटची रेस सुरूं होण्यास पंधरा मिनिटेंच राहिलीं होतीं. आतापर्यंत माझे तीन साडेतीनशें रुपये गेले होते. बँकेंत चेक बुक देण्यासाठीं किमान आवश्यक असलेली रक्कम ठेवून बाकीची सारी मी काढली होती. आतां कांहींहि करून शेवटच्या रेसमध्यें गडगंज पैसा मिळवलाच पाहिजे. हें मला पटलें. विशेषतः बायकोसमोर स्वतःच्या पदरीं मूर्खपणा घेऊन घरचे पैसे रेसकोर्सवर उधळांत जाणें मला फारच लज्जास्पद वाटलें होतें. आतां या अडचणींतून बाहेर पडण्याचा एकच मार्ग होता. तो म्हणजे सर्व तज्ज्ञांचा सल्ला बाजूला ठेवायचा आणि माझ्या अज्ञ बायकोचा मूर्खपणाच्या सबळ पुराव्यावर आधारलेला सल्ला घ्यायचा. मी मोठ्या आशेनें तिला विचारलें, "या रेसमध्यें कोणता घोडा येईल असं वाटतंय् तुला ?"

"ग्वाल्हेर लॅस. अगदी नक्की" तिनें निश्चित स्वरानें सांगितलें.

या वेळीं मात्र कशावरून ? असा बावळट प्रश्न मी केला नाहीं. कशामुळें कां असेना, पण घोडा यावा एवढीच प्रार्थना मी परमेश्वराजवळ करीत होतों. तरीपण आपण हे अचूक अंदाज कसे करतों हें जगजाहीर व्हावें म्हणून सौ. म्हणाली, "अहो, ग्वाल्हेरचीं स्टीलचीं भांडीं खूप टिकतात ना, म्हणून हाच घोडा येणार."

तिला प्रतिप्रश्न विचारण्याच्या मनःस्थितींत मी नव्हतों. खिशांत अजून एकशें वीस रुपये होते. खरें म्हणजे त्यांतले शंभर रुपये परत न्यायचे आणि वीसच शेवटच्या रेसला लावायचें असें मी ठरवलें होतें. पण आतां ही अगदीं नक्की टीप मिळाली होती. तेव्हां मी सारेच्या सारे पैसे लावायचे ठरवलेच. पण कोणाकडून उसनवार मिळाले, तर आणखी शें दोनशें सुद्धां लावून घरीं जातांना हजार दोन हजारांची पुंजी घेऊन जायची असं सुद्धां ठरवलं. रेस सुरूं व्हायला आतां दहाच मिनिटें राहिली होतीं. सौ. ला एका झाडाखालीं उभी करून मी गर्दीत घुसलों. मोठ्या प्रयासानें तीन चार मित्र भेटले. कुणाकडून पन्नास, कुणाकडून पाऊणशें असे करतां करतां अडीचशें रुपये उभारले. त्या सर्वांनीं बहुधा आपापल्या बायकांचे अंदाज ऐकल्यामुळं आणि त्याप्रमाणें पैसे लावल्यामुळें लेकांनीं चांगलाच पैसा मिळवला होता. त्या सर्वांना मी दबलेल्या आवाजांत सांगितलें, "ग्वाल्हेर लॅस – नक्की येणार."

> **तुमच्या (वि)श्वासावर देशाचा प्राण अवलंबून आहे. तेथें तन, मन, धन वहायचें आहे !**

आयुष्यांत सर्वांत मोठा जुगार खेळायचा म्हणून मी त्या घोड्यावर म्हणजे घोडीवर खिशांतले सबंध म्हणजे तीनशें साठ रुपये विनला लावले. निदान बाराशें रुपये परत येतील अशी खात्री होती.

रेस सुटली. सर्व वृत्तपत्रांनीं प्रिन्स प्रदीप नक्की येणार म्हटलें होतें. त्या घोड्यावर चिक्कार तिकिटें खपलीं होतीं याचाच अर्थ असा, कीं तो घोडा पराभूत झाल्यावर ग्वाल्हेर लॅसला चांगलाच भाव येणार होता. रेस वळणावर आली, तेव्हां आमची घोडी पहिल्या क्रमांकावर होती. मला माझ्या बायकोबद्दल भलताच आदर वाटूं लागला होता. आम्ही ग्वाल्हेर लॅसचा जयजयकार केला. पण शेवटच्या अर्ध्या मिनिटांत साऱ्या रेसची उलटा पालट झाली. प्रिन्स प्रदीप तिसऱ्या स्थानापासून वायुवेगानें पुढें दौडला आणि त्यानें पहिला क्रमांक पटकावला ! त्याच्या मागोमाग शाहेनशाह आणि तिसरा क्रमांक आला आमचा ग्वाल्हेर लॅस !

गाडीच्या चाकाएवढे डोळे करून मी बायकोकडे पाहिलें. तिला खाऊं कीं गिळूं असें मला झालें होतें. आतापर्यंतच्या प्रत्येक रेसला बिनचूक अंदाज केला तिनं, तो मी मानला नाहीं. आतां मी तिचं ऐकायला नि अंदाज चुकायला एकच गांठ पडली. मी ओरडून म्हटलें, "अग काय हें ? नवऱ्याचे पैसे असे बुडवायचें ? त्यापेक्षां तुला दहा पातळं घेतलीं असतीं."

अर्थातच त्या रेसमध्यें तीनशें साठ रुपये गेले नसते, तरी मी बायकोला एकदम दहा पातळें घेतली नसतीं हें तिलाहि माहीत होतें. आणि मलाहि माहीत होतें. पण बायको जर कशांत चुकली, तर असें बोलणें खपून जातें हा माझा अनुभव जमेस धरून मी हें औदार्याचें 'जर तर' चें दृश्य उभें करीत होतों. पण सौ. मोठ्या धीराची. ती जीभ लांब करीत म्हणाली, "अय्या ! अहो कांचेची भांडी टिकाऊ असतात, ती ओगल्यांची. ग्वाल्हेरची नाहींत. मी आतां नक्की सांगूं का ? ओगले नांवाचा घोडा असला, तर त्याच्यावर पैसे लावा."

मी संतापानें म्हटलें, "ओगले नांवाचा घोडा नाहीं. पण नवरा नांवाचा गाढव मात्र आहे."

"मग त्याच्यावर लावा पैसे" तिनें माझ्या बोलण्यांतली खोंच लक्षांत न घेतां भोळसटपणानें सांगितलें. माझं चुतुर बोलणं डोक्यावरून गेलं, कीं मला अधिकच राग येतो. मी आवाज उंचावीत म्हटलं, "या पुढं रेस बंद. बस्स् आजपासून मी रेस सोडली."

हातांतली वांया गेलेलीं तिकिटं मी फाडून टाकलीं. आतां रेस कोर्सवरील गर्दी ओसरत होती. ज्यांना शेवटच्या रेसमध्यें धनलाभ झाला, तेवढेच लोक पैसे घेण्याच्या खिडक्यांजवळ रांगा लावून होते. बाकीचे लोक विस्तीर्ण पसरलेल्या मुंबईंत मुंग्यांसारखे दूर दूर जात होते. त्या दिवशींच्या अनुभवावरून मी ठरवलें आहे, कीं रेसचा नाद हा एकंदरींत वाईटच. श्रमानें मिळविलेला पैसा वांया घालविणाऱ्या या जुगारावर सरकार बंदी घालील काय ? – निदान, रेसला जाणाऱ्यांनीं आपल्या बायकांना बरोबर नेऊं नये अशी बंदी तरी सरकार घालील काय ? ●●●












शुभ्र

# डेटने कपडे स्वच्छ नि पांढरेशुभ्र निघतात

पांढरेशुभ्र डेटच्च तुमचे कपडे स्वच्छ नि पांढरे-लखलखीत करू शकेल. ही किमया आधुनिक डेटच सहजपणें करूं जाणे। अन् तीहि कपड्यांच्या तंतूंना एवढासासुद्धां अपाय न करतां. कपडे सफेद असोत कीं रंगीत असोत, सुती असोत कीं नायलॉनचे असोत, हातमागाचे असोत कीं रेयॉनचे असोत—ते स्वच्छ, सहज नि उजळ निघण्यासाठीं आधुनिक पांढरेशुभ्र डेटच वापरा.

अर्धी बादली पाण्यांत दोन ते तीन चमचे भरपूर होतात.

स्वस्तिक ऑईल मिल्स लि., मुंबई.

अनुक्रमणिका












—वि. वा. पत्की

डाव्या काखेंत छत्री आणि उजव्या हातांत वह्यांनीं भरलेली प्लॅस्टिकची जड पिशवी सांवरीत गर्दीतनं वाट काढतांना श्रीमतीला पुरेवाट होत होती. तिचा जीव कंटाळून जात होता. अगोदरच साऱ्या दिवसभर मुलांच्यापुढें केलेल्या वडवडीनं तिचा जीव आंबून गेला होता, थकून गेला होता. अंगांत कसला तो उत्साह उरलाच नव्हता, पायांत चालण्याएवढीहि शक्ति उरली नव्हती, पण बस-स्टॉपपर्यंत चालत जाण्यावांचून गत्यंतर नव्हतं हेंहि तिला माहित होतं. घरावद्दलची सारी ओढ आतां आटली होती, आपल्या वाटे-कडे आतां कुणाचे डोळे लागन राहिलेले नाहींत हें तिला चांगलं माहित झालं होतं, तरीहि घराच्या दिशेनं तिचीं पावलं वळत होती. नेहमींच्या संवयीनं. अखेर घराचाच आधार घ्यायला हव या जाणीवेनं....तिच्या घशाला कोरड पडल्यासारखीं होत होती पण कोपऱ्यावरच्या हॉटेलांत जाऊन एखादं थंडगार पेय प्यावं अ तिला वाटत नव्हतं. 'थकला-भागला जीव कसा तरी एकदां घराच्या उंबरठ्यावर नेऊन आदळावा आणि 'मला पेलाभर पाणी दे ग, लक्ष्मी! म्हणून मोलकरणीला सांगावं आणि तिनं तें आणून दिलं, कीं कृतज्ञतेच्या भावनेनं तो पेला तोंडाला लावावा, ताजं-तवान व्हावं आणि खोटंच हंसूं तोंडावर आणीत रिकामा झालेला पेला खालीं ठेवावा हा तिचा आतां नित्याचाच क्रम झाला होता.

अलीकडे तिच्या सासूबाई वारल्यापासून तर असं सारखं होउ लागलं होतं. 'दमली असशील. आधीं चहा घे आणि मग लाग स्वयंपाकाला' असं म्हणायला आतां सासूबाई नव्हत्या. त्या अ म्हणाल्या कीं साऱ्या दिवसाचा शीण क्षणांत कसा नाहींसा हो असे याचा अनुभव आज नऊ वर्षं तिनं घेतला होता. सामान्यतः मिळवत्या सुनेला असा आपुलकीचा ओलावा लाभत नसतो. आणि तिच्या जिण्याला वैराण वाळवंटाची अवकळा कशी येते हें ती आपल्या बरोबरीच्या शाळेंतल्या शिक्षकिणींच्या जीवनक्रमावरून पाहात होती, पण आपल्या वांट्याला मात्र सासूचं प्रेम, ममता आणि आपुलकी यावी यानं तिचं मन हरखलं होतं. पण देवाला तें सुखहि पाहवलं नव्हतं आणि घरांतली ही स्नेहज्योत एकाएकीं मालवली होती....त्या दिवसापासून सारं घर तिला खसं खायला

**तिचं स्वप्न साकार होणार होतं. ती आई होणार होती. नशिबानें तिचें गाऱ्हाणें ऐकलें होतें. तिच्या सासूचीं व्रतें फळणार होतीं आणि घरापासून दूर दूर पळणारा तिचा नवरा परत घराकडे परतला होता—**

**—आघातांतून नवें जीवन साकारत होतें !**

● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ●

उठल्यासारखं वाटूं लागलं होतं. तिच्या मनांतली घराची ओढ नाहींशी झाली होती.

कुणाच्या ओढीनं घराकडे धांव घ्यायची असा विचार तिच्या मनांत सारखा येऊं लागला होता. असं पूर्वी होत नव्हतं हें तिला माहित होतं. किंबहुना ती शाळेतनं दमून-भागून घरीं यायच्या अगोदर श्री घरीं आलेला असायचा. तिची वाट पाहात थांबलेला असायचा हें अगदीं ठरलेलं. त्याला तशी वाट पाहात बसलेला पाहिला कीं त्याची थट्टा करायची लहर सुद्धां तिला कधीं कधीं यायची. 'आतां सारंच बदललंय् म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. पूर्वी पत्नी पतीची वाट पाहात बसायची, तो आला कीं हंसून त्याचं स्वागत करायची, चहाचा कप आणि खाद्य पदार्थाची बशी त्याच्या पुढं धरायची तर आतां पतीच पत्नी नोकरीवरून कधीं परत येते याची वाट पाहात बसतो आणि कधीं कधीं तयार चहा-सुद्धां मिळतो माझ्यासारख्या लाडक्या—' तिचं वाक्य मग श्री कधीं पुरं करूंच देत नसे. तो तिच्या शक्य तेवढा निकट जात आणि तिची हनुवटी उंच करीत म्हणायचा, 'मग बिघडलं कुठं त्यांत ? आमची कचेरी साडेचारला बंद होते आणि म्हणून येतो मी लगेच घरीं. पण कधीं कधीं तूं फार वाट पहायला लावतेस मात्र!' त्यानं असं म्हटलं कीं आपल्या वांट्याला संसारांतलं केवढं- अपूर्व सुख आलं आहे असं वाटून तिचं मन हर्षभरित व्हायचं आणि मग ती जोडीनं कुठेंतरी दूरवर फिरायला जायचीं तीं पाखरं चिवचिवावीं तशीं मधुर चिवचिव करीत...

वर्षानुवर्षे हें असं चाललं होतं. मिळवत्या, नोकरी करणाऱ्या स्त्रीचाहि संसार सुखासमाधानाचा असूं शकतो याचा हेवाहि अनेकांना वाटूं लागला होता...मात्र या सुखांत जें वैगुण्य होतं त्याची जाणीव सभोंवतालच्या लोकांना कधीं होत नव्हती.

त्यांच्या लग्नाला दहा वर्षं झालीं तरी घरांत पाळणा हालला नव्हता...सुरुवाती-सुरुवातीला या उणेपणाचें दुःख श्रीमतीला कधीं झालं नव्हतं. शेजारपाजारच्या स्त्रियांचीं डोहाळजेवणं, गर्भारपणं, बाळंतपणं, त्यांच्या मुलांचीं बारशीं पाहिलीं कीं हें सुख कधीं तरी आपल्याहि वांट्याला येणार आहे या कल्पनेंत तिला आनंद वाटायचा, शेजारणींचीं लहान, कोंवळीं मुलं तीं सावधपणानें हातांत घ्यायचीं, पण स्वतःच्या बाबतींत मृगजळासारखं हें सुख दूर दूर सरकत आहे असं तिच्या लक्षांत येऊं लागलं तसा आपल्या सुखांतला हा उणेपणा तिला बोचूं लागला. सासूबाई त्यासाठीं कांहीं व्रत-वैकल्यं करूं लागल्या कीं वरकरणीं तीं त्याबद्दल नापसंती दाखवायची, पण मनोमन मात्र तिलाहि वाटायचं, ''सासूबाईंच्या इच्छेला तरी फळ येउं दे..''

वर्षामागून वर्षं लोटलीं तरी हें नवं दुःख तिच्या मनाला बोचूं लागलं. आपली सासू मात्र हताश न होतां नवीं नवीं व्रतं शोधून काढीत होत्या याचं एकीकडे तिला हंसूं येत होतं तर दुसऱ्या बाजूनं तिच्या मनाची उतावीळी वाढत होती. 'अग होतात कुणाकुणाला उशीरा मुलं! श्री नाहीं झाला मला तिसाव्या वर्षी?' असं त्या म्हणत तेव्हां तिला वाटे, उगीचच याबद्दल खंत करीत बसण्यांत कसला आला आहे शहाणपणा? माणसासारखाच निसर्गहि लहरी असतो. त्याची लहर एकादे दिवशीं लागेल आणि...

पण आतां दहा वर्षं झालीं तरी त्याची लहर लागली नव्हती. नातवंडांचं सुख आपल्या नशिबांतच नाहीं असं म्हणतां म्हणतां सासूबाईंची प्राणज्योत एके दिवशीं विझली होती. त्या दिवसापासून तिच्या जीवनांत एक नवी पोकळी निर्माण झाली होती. तिच्या जीवनाला एक नवा भकासपणा आला होता. पण घराची ओढ अजून संपली नव्हती—घराचं माळरान अजून झालं नव्हतं...वाळत चाललेल्या जीवनवेलीवर अचानक एक दिवस कळी उमलेल ही आशा अजून गेली नव्हती...

पण अखेर तीहि आशा आटूं लागल्यासारखं तिला अलीकडे वाटूं लागलं होतं. कशांतच तिचं मन रमेनासं झालं होतं. शाळेंत नाहीं...घरांत नाहीं...कुठेंच नाहीं. आपल्या जिण्याला कांहीं अर्थच उरला नाहीं अशी काजळी तिच्या जीवन ज्योतीवर धरूं लागली आणि आपलं जिणं काळवंडूं लागलं, जगण्यासारखं कांहीं उरलं नाहीं या निराशेनं तिला घेरलं...अपत्यहीनतेचा जो कलंक आपल्या जीवनाला लागला तो कांहीं केल्या पुसून काढतां येऊं नये हें दुःख तिला दिवसानुदिवस असह्य वाटूं लागलं. पण अखेर तिनं मनाशीं येवढाच विवेक केला कीं दैवाच्या या क्रूर आघाताचं दुःख मुकाटयानं सोसण्यावांचून गत्यंतर नाहीं. माणसाच्या आयुष्यांत कांहीं गोष्टी अशा असतात कीं त्यांच्यावर त्याची सत्ता चालत नाहीं. आपलं दुबळेपण त्याला मान्य करावं लागतं, पराभव पत्करावा लागतो. आपली अपत्यहीनता हीसुद्धां अशा गोष्टींपैकींच आहे...

पण कधीं कधीं ती विसरूं पाहाणाऱ्या या दुःखावरची खपली नकळत निघत असे, तिला असह्य वेदना होत, बरी झाल्यासारखी वाटणारी जखम भळभळ वाहूं लागे. हिंगण्याच्या संस्थेच्या मदतीसाठीं 'भाऊबीज' मागायला एकदां एक भगिनी आल्या होत्या आणि श्रीमतीनं दहा रुपयांची नोट त्यांच्या हातावर ठेवली तेव्हां प्रसन्न मनानं त्या गेल्या तेव्हां श्रीमतीला केवढा आनंद झाला होता. दानाचा आनंद अपूर्व असतो हें तिला कुणी सांगावं लागलं नव्हतं. पण त्या भगिनी शेजारच्या घरांत गेल्या आणि शेजारच्या दुर्गाबाईंनीं तिच्या हातावर एक रुपया ठेवला तेव्हां 'तुमच्या शेजाऱ्यांनीं किती दिले ते तरी पहा' असं म्हणून त्यानीं पावतीबुक त्यांच्यापुढें धरलं तसं दुर्गाबाई म्हणाल्या, हो त्या, ''देतील तर काय? ना पोर ना बाळ!...'' दुर्गाबाईंचे हे शब्द तिच्या कानावर आले तेव्हां आपल्या दुःखावर दिलेल्या या डागण्या तिला सहन झाल्या नाहींत

आणि डोळ्यांत आलेलीं आसवं तिनं टिपलीं ती श्रीच्या लक्षांत येऊं नयेत अशा सावधगिरीनं. . . .आपल्या पाठीमागं माणसं आणि विशेषत: शेजार-पाजारच्या संसारी, प्रौढ स्त्रिया—काय बोलतात याची तिला कल्पना नव्हती असं नव्हे, पण या बोलण्याकडे दुर्लक्ष करायला हवं येवढाच विचार दर वेळीं तिनं केला होता आणि आपल्या यातना ती विसरली होती. कुणाचंहि गोजिरवाणं, हंसरं मूल दिसलं कीं त्याला जवळ घ्यावं, त्याचे मुके घ्यावे, त्याला कुरवाळावं अशी जी नैसर्गिक इच्छा तिच्या मनांत असे तिला ती आवरून धरी. आपल्या इच्छेचं असं प्रदर्शन केलेलं सभोंवतालच्या स्त्रियांना कसं आवडत नसे आणि आपला तिरस्कारच त्या कसा करतात या जाणीवेचे चटके तिला अनेकदां बसले होते आणि काय समजायचं ती तें समजली होती. . .

पण या दु:खाचे कढहि तिला असह्य झाले ते श्रीचं घरांतलं सारं लक्षच उडत तर नाहीं ना या जाणीवेचं शल्य तिला बोचलं तेव्हां. याचा अर्थ तो पहिल्यासारखा तिच्यावर प्रेम करीत नव्हता, तिच्या हौशी पुरवीत नव्हता, तिला नाटक-सिनेमाला घेऊन जात नव्हता असा नव्हे. तें सारं तो करी, पण आतांशाच तिला वाटूं लागलं होतं, त्याच्या या वागण्यांत पूर्वीचा जिव्हाळा नाहीं, पूर्वीची आपुलकी नाहीं. माणूस संवयीनं ज्या गोष्टी करतो त्या गोष्टींत जसा यांत्रिकपणा असतो तसा तो या गोष्टी करीत असावा असा तिला संशय येऊं लागला होता. त्यांचं लग्न झालं आणि ती पहिल्यासारखीच नोकरी करीत राहिली आणि कधीं कधीं तिला शाळेंतनं यायला उशीर झाला कीं तिची वाट पाहात बसलेला श्री चिडल्यासारखा वागायचा, 'कशासाठीं करतेस ही नोकरी? माझ्या चारशें



" चांगलं घसघशीत पोलकं आणि नऊवारी पातळ तुला श्रावण महिन्यांतलं दान म्हणून आणलंय् पोरी "—

रुपयांत चैनीनं राहातां येईल आपल्याला!' असं त्यानं म्हटलं कीं त्याच्या रागावण्याचा आणि चिडण्याचाहि तिला अभिमान वाटायचा, अंतर्यामीं आनंद व्हायचा. त्याचं हें रागावणं आणि चिडणं हा आपल्यावरील प्रेमाचा पुरावाच आहे या जाणीवेनं तिचं मन अधिकच प्रसन्न व्हायचं आणि ती त्याला म्हणायची, 'म्हणजे मी नोकरी करते, पैसे मिळवून आणते याचा तुलासुद्धां मत्सर वाटतो म्हणायचा! पुरुष मोठे अहंकारी असतात. आपल्या बायकोनं आपणावर अवलंबून राहावं, आपल्या गरजांसाठीं नवऱ्याच्या पुढें तिनं हात पसरावा, त्याची याचना करावी असं त्यांना वाटत असतं. मला वाटलं होतं तूं याला अपवाद असशील. पण माझा अंदाज चुकला. अखेर तूंहि एक पुरुष आहेस हें विसरलें मी. . .' तिच्या या बोलण्याची त्याला अधिकच गंमत वाटायची आणि तो म्हणायचा, 'उगीच वेड पांघरून पेडगांवला जाऊं नकोस. . .मी तुला नोकरी सोडायला कां सांगत असतो, माहित आहे तुला?' तो काय सांगतो तें समजलंच नाहीं असं नाटक करीत ती मुद्दामच म्हणायची 'नाहीं!' 'तुला असं हवं तेव्हां घट्ट धरून ठेवतां यावं म्हणून!', असं म्हणून तो खरोखरच तिला आपल्या जवळ ओढायचा आणि तिनं कितीहि प्रतिकार केला तरी तिला आपल्या मिठींतनं सोडायचा नाहीं. . .

प्रीतीच्या या खेळांत केवढी अवीट गोडी आहे हें तिला कळत का नव्हतं? पण या सुखाला आलेली भरती कधीं संपली आणि ओहोटीची सुरुवात कधीं झाली हें तिच्या लक्षांतहि आलं नाहीं. तो स्वत: एका मोठ्या फर्ममध्यें नोकरी करायचा, पण त्याची त्या काळींहि भरारी फार मोठी होती. 'एक दिवस मी स्वत:चीच फर्म काढलेली दिसेल तुला' असं तो श्रीमतीला म्हणायचा तेव्हां त्याच्या स्वभावांतला सारा करारीपणा आणि महत्त्वाकांक्षा त्याच्या शब्दांतनं कशी ओसंडून जायची. 'तूं काय मनांत आणशील तें करशील मला काय माहित नाहीं, होय?' असं ती म्हणायची तेव्हां तिच्या मनांतला अभिप्राय ओळखून तोहि म्हणायचा, 'तुझे वडील कुठं तयार होते आपल्या लग्नाला? त्यांच्या दृष्टीनं मी तेव्हां एक साधा कारकून होतों ना? पण अखेर त्यांनीं संमति दिलीच कीं नाहीं?' त्याच्या या प्रत्युत्तरावर ती हंसायची ती केवढ्या नाजुकपणानं. ती तशी हंसली कीं पारिजातकाच्या फुलांचा सडा आपल्या अंगावर पडल्यासारखा त्याला वाटायचा आणि त्याचं मन हर्षभरित व्हायचं. पण प्रीतीचा हा वसंत संपला तो तिच्या नकळत. . .तिला कल्पनाहि आली नाहीं अशा तऱ्हेनं. . .

तो हळुहळू अबोल होऊं लागला होता. पूर्वी फिरायला गेल्यावर आपल्या कचेरींतल्या गंमती सांगायचा, कचेरींत नवीन आलेल्या साहेबाच्या भोळेपणाचा धूर्त माणसं कसा फायदा घेतात तें सांगायचा, प्रेमप्रकरणांच्या हकीगती सांगायचा, पण अलीकडे पहावं तर फिरायला जायचंच तो टाळूं लागला होता, त्याला कशांतच गोडी वाटेनाशी झाली होती.

तो असा कां वागतो हें तिला कळेनासं झालं. त्याचं घरांतलं लक्षच उडालं, तशीं नाहीं नाहीं त्या शब्दांची पाखरं श्रीमतीच्या मनांत फडफडलीं. सुरुवाती-सुरुवातीला संध्याकाळीं घरीं परत


अनुक्रमणिका

यायला उशीर झाला तर अपराधी मनानं घरांत तो थोडा वेळ वावरे आणि मग सारं विसरल्यासारखें करी आणि श्रीमतीच्या निकट जात तिला म्हणे, 'मला उशीर झाला कीं तूं अलीकडे रागावतहि नाहींस याचाच मला अलीकडे राग येऊं लागला आहे. माझ्याकडे तुझं लक्षच नाहीं!....

"कुणाचं? माझं?..."

"होय, तुझं, तुझं!...

"म्हणजे हा उलटाच न्याय आहे!...तुझंच घरांत लक्ष नाहीं तेव्हां तुला वाटतं आपणाकडे कुणी लक्ष देत नाहीं!..."

हें बोलणं मग तेवढयावरच राही. वातावरण अधिकच कोंदट, होई. पूर्वीसारखं प्रसन्नतेचं ऊन कधीं घरांत पसरायचंच नाहीं, त्यामुळं साऱ्या संसारावरच उदासीनतेचं सांवट आल्यासारखं झालं. तिचं मन गुदमरूं लागलं. 'याला हवं आहे तरी काय?' हा प्रश्न तिच्या मनाला सारखा दंश करूं लागला. ती बेचैन होऊं लागली... 'असा हा संसाराला विटल्यासारखा वागतो आहे तरी कां?' ती हा प्रश्न स्वतःलाच पुनः पुनः विचारूं लागली...

पुरुष असा कधीं वागतो हें तिला माहित होतं, चांगलं माहित होतं. तिच्या मनांत दुष्ट शंकेची विखारी सुरी घुसली, 'याचं कुणा स्त्रीवर तर मन जडलं नाहीं? त्याच्या कचेरींत नव्या नव्या नखरेल पोरी आल्या आहेत, त्यांच्या पैकीं कुणाचा मोह तर त्याला झालेला नाहीं? त्याचा काय नेम ? माणसाचं मन मोठं चंचल असतं. ऋषि-मुनींना सुद्धां मोहाचे क्षण टाळतां आले नाहींत, मग एखाद्या वेळेस यालाहि मोह टाळतां आला नाहीं तर—'

या शंकेसरशी ती स्वतःशींच दचकली होती. आपल्या मनाला असं स्वैर सोडण्यांत, त्याच्या पावित्र्याचीच शंका घेण्यांत आपल्या हातून केवढी चूक होत आहे या विचारानं तिचं मन शरमिंदं झालं आणि ती स्वतःशींच म्हणाली, 'नाहीं, नाहीं माझा श्री असा नाहीं!' असली शंका आपल्या मनांत आली याची तिची तिलाच मग शरम वाटली. त्यांच्या प्रीतीच्या आणा-भाका झाल्या तेव्हां तो काय म्हणाला होता तें तिला आजहि स्पष्टपणें आठवत होतं—'ज्या क्षणीं एकमेकांपासून कांहीं तरी लपवावंसं वाटूं लागतं त्या क्षणापासूनच संसार उघळायला सुरुवात होते. आपल्या चुकासुद्धां आपण एकमेकांना सांगायला हव्यात. सुखी संसाराचा पाया म्हणजे परस्परांचा विश्वास. तो कधीं गमावतां कामा नये एकमेकांनीं.'

आपल्या मनांतल्या नाना शंका तिनं त्याच्याजवळ कधीं बोलून दाखविल्या नाहींत हें खरं, पण त्याच्या वागण्याचा तिच्या मनावर मोठा विचित्र परिणाम होऊं लागला. आपण एकमेकांपासून दूर दूर जात आहों या शंकेनं तिच्या मनांत घर केलं. आज ऑफिसचं काम आहे, आज साहेबांबरोबर जायचं आहे अशा तिला खऱ्या वाटण्यासारख्या सबबी तो रोज सांगूं लागला. घरीं यायला त्याला रोजच उशीर होऊं लागला. तो असा कधीं वागला नव्हता हें तिला माहित होतं...

पुढें पुढें तर त्याला एक नवंच व्यसन लागलं. तो क्लबांत जाऊं लागला. रमी खेळूं लागला. किती उशीरा घरीं यायचं याला तर कांहीं सीमा राहिलीच नाही. त्याचं हें सारंच वागणं प्रमाणाबाहेर जात आहे हें तिच्या लक्षांत येतांच ती अधिकच गोंधळली. काय करावं हें तिला सूचेना...

तिचं शाळेचं रहाट-गाडगं पहिल्यासारखंच सुरू होतं. तिमाही, सहामाही, वार्षिक परीक्षांचे मोसम येत होते, जात होते. नवे वर्ग, नवीं पुस्तकं, नवीं मुलं यांच्या कोलाहलांत तिला स्वतःच्या अंतःकरणांतल्या दुःखाची किलबिल ऐकूं येत नव्हती. स्वतःचं दुःख ती आतां विसरायला शिकली होती. नव्या नव्या उद्योगांत स्वतःला गुरफटून टाकीत होती. नव्या नव्या गोष्टींत आनंद मानायला शिकत होती. श्रीच्या संगतींत आपल्या अंतःकरणातलं दुःख विसरतां येईल या आशेनं त्याच्या वाटेकडे डोळे लावून बसत होती.

पण त्याचंच घरांत लक्ष नाहीं या नव्या जाणीवेनं तिचं मन हादरलं होतं. किती तरी विचार करून सुद्धां त्याचं कारण तिला शोधून काढतां आलं नव्हतं...

एके दिवशीं ती त्याला म्हणाली,

"तूं मोठा आप्पलपोटा आहेस!...."

श्रीनं तिच्याकडे दृष्टि रोखून पाहिलं, तेव्हां ती हंसली पण तिच्या या हंसण्याचा किंवा तिच्या त्या विचित्र शब्दाचा अर्थच त्याच्या लक्षांत येईना. तिनं आपणाला स्वार्थी म्हणावं असं आपण केलं तरी काय हेंच त्याला समजेना तसं त्याचं मन क्षणभर गोंधळलं आणि तो म्हणाला,

"तूं अलीकडे काय काय बोलायला लागली आहेस!..."










"काय बोलतें?"...

"आणखी काय बोलायला हवं?...परवां रागाच्या भरांत मला व्यसनी म्हटलंस, आतां आप्पलपोटा म्हणतेस, उद्यां–"

"मग काय खोटं म्हणतें?...तूं आहेसच तसा..."

"पूर्वीपासूनच?..."

"नाहीं. पूर्वी तूं असा नव्हतास..."

"असा म्हणजे कसा ?...."

"असा म्हणजे स्वत:पुरताच पाहाणारा–रोज रोज त्या रमीच्या डावांत येवढा रंगून जातोस, कसली शुद्ध राहात नाहीं. मी घरीं एकटी काय करीत असेन याचा विचार कधीं तुझ्या मनांत येत नाहीं म्हणून म्हणतें कीं तूं आतां पूर्वीचा राहिला नाहींस, बदलला आहेस, आप्पलपोटा झाला आहेस–"

"मी कांहींहि केलं तरी आतां तुला तें आवडेनासं झालं आहे.....

"होय, होणारच तसं. पूर्वी कुठेंहि जायचं झालं तरी मला घेतल्याशिवाय तूं कधीं जायचा नाहींस आणि मी येत नाहीं किंवा मला येतां येणार नाहीं असं मी म्हटलं कीं तूं म्हणायचास, मीच जात नाहीं तर मग ! आतां मी काय म्हणतें याची वाटच पाहात नाहींस तूं....सरळ चालायला लागतोस !...."

श्रीमतीचे ते शब्द त्याच्या मनाला बोचले होते. आपल्या हातून न कळत असं घडत तर नाहीं ना या शंकेनं त्याचं मन व्यथित झालं, दु:खी झालं, कष्टी झालं. पण काय करावं हें त्याला कळेना, म्हणून तो तिला म्हणाला,

"मग काय तुला माझ्यावरोबर क्लबमध्यें घेऊन जाऊं ?....

"का, काय हरकत आहे ? मला शिकव रमी खेळायला." श्री हंसला होता.

"शिकवीन. त्याला काय हरकत आहे ? पण तूं रमी खेळायला शिकलीस तरी क्लबांत यावं असं मात्र नाहीं मला वाटत ?..."

त्याच्या या वोलण्याचा श्रीमतीला अर्थच कळला नाहीं आणि रुसव्या स्वरांत ती म्हणाली होती,

"म्हणजे तूं क्लबांत गेलास तरी चालतं आणि मी मात्र तिथं येतां कामा नये ?...

"भलताच कांहीं गैरसमज करून घेऊं नकोस. आतां पूर्वीचे क्लब राहिलेले नाहींत. पूर्वी कांहीं सांस्कृतिक, सामाजिक दर्जा असलेलीं माणसं अशा या मोठमोठ्या क्लबांतून जात, पण गेल्या पांच-दहा वर्षांत हें सारं वदललंय्. आतां फक्त वाटेल त्या मार्गानं ज्यांनीं पैसा मिळविला आहे असे पैसेवाले लोक तिथं येतात आणि त्यांना कांहीं बौद्धिक किंवा सांस्कृतिक दर्जाच नसल्यामुळं हे क्लब म्हणजे व्यसनी, मूर्ख लोकांचे अड्डे झाले आहेत. हवे तेवढे भारी 'स्टेक' लावून खेळतां-खेळतां अचकट विचकट शब्दांच्या पिचकाऱ्या टाकीत हीं माणसं जें वोलत असतात तें सभ्य माणसांनीं ऐकूं सुद्धां नये असं असतं. तिथं येणाऱ्या नखरेल बायकासुद्धां हीं बोलणीं ऐकून फिदी फिदी हंसत असतात तेव्हां तर अगदीं शिसारी येते. वैजयंती शेठसारखी बाई जें बोलून खेंखाळत असते तें ऐकलं कीं वाटतं ही काय सभ्य, सुशिक्षित माणसं ?...."

"मग तूं तरी कशाला जातोस अशा ठिकाणीं ?..."

श्रीमतीनं अगदीं मर्मावरच आघात केल्यासारखं त्याला वाटलं होतं.... तो क्षणभर निरुत्तर झाला होता. खरंच, कां येतो मी अशा ठिकाणीं ? कां मी घालवतो या लोकांत तासन् तास ?....

त्या दिवसांपासून हे विचार त्याच्या मनांत पुन: पुन्हां आले होते, पण रोज संध्याकाळीं ऑफिस सुटलं कीं त्याचे पाय क्लबाच्या दिशेनं वळले होते. तिथं गेल्यावांचून त्याला करमेनासं झालं होतं...श्रीमतीनं त्याला सांगून पाहिलं होतं, पण आपल्या सांगण्याचा कांहीं एक उपयोग होत नाहीं हें पाहून तिनं त्याला सांगायचंच सोडून दिलं होतं. प्रत्येकानं आपल्या मार्गानंच अखेर जायचं असतं या विचाराला ती आली होती. ती आपल्या मार्गानं जात होती, श्री आपल्या...

महिने न् महिने असं चाललं होतं

अलीकडे कधीं कधीं तर तिला अगदीं थकून गेल्यासारखं होई. पायांत त्राण उरत नसे कीं मनांत उभारी. कसल्याहि गोष्टीबद्दल तिला उत्साहच उरला नव्हता. ती शाळेंत जात होती, मुलांच्या हंसण्या-खिदळण्यांत सहभागी होत होती, पण तिच्या मनाच्या पांकळ्या कधीं उमलत नव्हत्या. हें सारं करायचं तरी कुणासाठीं या विचाराची कृष्णछाया तिच्या मनावर पसरूं लागली होती हा विचार तिच्या मनांत पुन: पुन्हां येऊं लागला तसं तिला वाटूं लागलं, श्रीलासुद्धां असंच वाटत असेल ? होय, तसंच असावं. त्यालाहि आतां कशांतच गोडी वाटत नसल्यासारखा तो वागत असतो तो अशा विचारांमुळंच तर नसेल ?...

तिला कांहीं कळेनासं होई...

वास्तविक तिच्या या भरल्या संसारांत कसली कमतरता नव्हती, कसला उणेपणा नव्हता. चांगलं घरदार होतं, पैसा होता, प्रतिष्ठा होती, पण कसल्यातरी अतृप्तीनं तिचं मन अहोरात्र पोखरलं जात होतं. आपणाला मूल नाहीं, आपण वांझ आहों या दु:खाच्या भाराखालीं तिचं जिणं पिचत होतं आणि हें दु:खहि असं होतं कीं तें कुणाला दिसत नव्हतं. कदाचित् यामुळंच त्याच्या वेदना तिला असह्य वाटत होत्या, पण त्या सोसायलाच हव्यात हा विवेक तिनं आपल्या मनाला शिकविला होता...

पण गेल्या कांहीं दिवसांत तिच्या मनांत पुन्हां चलबिचल झाली होती. तिला कसली तरी शंका येऊं लागली होती, पण त्याची वाच्यता श्रीच्याजवळ करण्याचा धीर तिला होत नव्हता. दीड-दोन वर्षांपूर्वी असंच एकदां झालं होतं; पण श्री मोठ्या कौतुकानं, तिची थट्टामस्करी करीत आणि स्वत:हि मनांतल्या मनांत हर्षभरित होऊन आपल्या नेहमींच्या डॉक्टरकडे तिला घेऊन गेला होता, आपल्या मनांतली शंका त्याना सांगतां येईल तेवढ्या स्पष्टपणें त्यांना सांगितली होती आणि 'तुमच्या पत्नीच्या ऐवजीं तुम्हीच लाजतां आहां कीं !' असं ते म्हणाले तेव्हां श्री खरोखरच लाजला होता. आजपर्यंत जें घडलं नाहीं, जें घडावं म्हणून आपल्या आईनं सारे नवस-सायास केले, व्रतवैकल्यं केलीं, तें अखेर घडलं होतं या विचारानं त्याचं मन गुदमरलं होतं, पण हें सारं पाहायला आज आपली आई नाहीं या विचारानं त्याच्या अंत:करणांत कालवाकालव झाली होती... मात्र अखेर डॉक्टरानीं जें सांगितलं होतं तें ऐकून त्यालाच काय पण

अनुक्रमणिका






## अमुची नाटकशाळा

नवें नियोजन, नवी निर्मिती सहकाऱ्यांच्या संगें
लेखन, दर्शन, अभिनय नाटचें पूरक अंगउपांगें
नवें रक्त तें हवें नेहमीं, सोनें जुनेच झाले
संस्कारानें करूं तयांना आम्ही सोनेवाले.

कलेस कुठली वयमर्यादा, अकलेची हो वाढ
टिचभर आयुष्यांत पुरेसा अनुभव त्यांना गाढ
कलाजीवना वाहियलें तें जुळले अकलावंत
तंत्र मंत्र त्या अवगत नाटक 'बसवाया' साद्यंत

चित्रनाटच रंगवी अनुभवी आंग्ल पुस्त सत्य
दिवे लावणे तसे विन्नविणें नेपथ्यांतिल पथ्य
क्रियानिपुण होतील छात्र ते सर्वांगानें पात्र
रंगमंचकीं नवे रक्त गाजवील पहिली रात्र

वाचाळाही आवडेल हा रंगभूमिचा चाळा
जो तो म्हणेल अभिमानें ही अमुची नाटकशाळा

—कोंडबा

..............................................

श्रीमतीला धक्का बसला होता... 'आपणाला मूल व्हावं असं स्त्रीला सारखं वाटत असलं कीं असे मास तिला कधीं कधीं होतात, गर्भार-पणाचीं सारीं लक्षणं तिला खरीं वाटूं लागतात. पण अखेर तो मासच असतो' डॉक्टरांच्या या उद्गारांनीं तिचीं सारीं स्वप्नं विरलीं होतीं आणि मग श्रीबरोबर ती घरीं परत आली होती, ती एखादी रुग्णाईत व्यक्ति सावकाश पावलं टाकीत यावी तशी त्याच्या आधारानं...

आणि म्हणूनच गेल्या कांहीं दिवसांत तिला तसंच कांहींतरी चमत्कारिक वाटूं लागलं होतं तरी या गोष्टीची वाच्यता तिनं श्रीजवळ केली नव्हती. ती रोजच्या सारखीच शाळेला जात होती, परत येत होती, श्री. रात्रीं उशीरा परत आला कीं त्याला टाळीत होती..

पण आज शाळेतनं निघतानांच आपल्या पायांतली शक्ति एकदम नाहींशी झाल्यासारखं, घशाला कोरड पडल्यासारखं, जीव कंटाळून गेल्यासारखं तिला वाटूं लागलं तेव्हां नेहमींच्यापेक्षां हीं सारीं लक्षणं निराळीं आहेत हा विचार तिच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं. तिला नीट उभंहि राहातां येईना तशी वह्यांनीं भरलेली हातांतली प्लॅस्टिकची जड पिशवी तिनं जमिनीवर टेकली, टॅक्सीवाल्याला खूण करून तिनं बोलावलं आणि ती टॅक्सींत शिरली. गार वाऱ्याची झुळुक अंगावरून जातांच तिला जरा बरं वाटलं. नेहमीपेक्षां आज आपणाला कांहींतरी निराळं वाटत आहे या जाणीवेनं या परिस्थितींतहि तिचं मन क्षणभर हरखून गेलं...मनावरचा भार क्षणभर कमी झाल्यासारखं तिला वाटलं ...खांद्यावर तरंगणाऱ्या पिसासारखं आपलं शरीर आणि मन हलकं हलकं होत असल्याचा भास तिला क्षणभर झाला...

ती घरीं परत आली ती प्रसन्न मनानं. तिनं प्लॅस्टिकची पिशवी, टेबलावर ठेवली आणि काखेंतली छत्री तशीच खुर्चीवर टाकीत तिची वाट पाहात स्वयंपाक घराच्या दारांत उभ्या असलेल्या लक्ष्मी मोलकरणीकडे तिनं पाहिलं तें हंसऱ्या मुद्रेनं. लक्ष्मीच्या लक्षांत तिचं हें वागणं आलं, कारण रोज घरांत पाऊल टाकतांना ती केवढी त्रासलेली कंटाळलेली असते हें तिला चांगल ठाऊक होतं. तिनं एवढं आनंदांत असावं असं काय घडलं होतं हें लक्ष्मीला माहित नव्हतं, पण तिचं वागणं रोजच्यासारखं नव्हतं हें तिनं ओळखलं आणि म्हणूनच ती म्हणाली,

"चहा टाकूं कीं सरबत करूं ?..."

"कांहीं नको. बैस तूं."

असं म्हणतांना श्रीमती हंसली होती...मंद झुळुकीनं कळी उम-लावी तशी. पण मग काय झालं कुणास ठाऊक ? ती घाईघाईनं बाथरूमच्या दिशेनं धांवली...

आणि लक्ष्मीच्या कानावर आल्या त्या तिच्या ओकाऱ्या... बंद असलेल्या बाथरूमच्या दारामधून आपल्या ओकाऱ्या लक्ष्मीला ऐकूं जाणार आहेत कशाला असं श्रीमतीला वाटलं होतं, पण बाथरूमचं दार लोटून लक्ष्मीच आंत आली तेव्हां येणारी ओकारी तिनं आवरली, पण अखेर ती मुखातनं बाहेर आलीच आणि ती मटकन् खालीं बसली. लक्ष्मीनं पुढें सरून तिच्या पाठीवरून हात फिरविला आणि तिच्या दंडाला धरून तिला उठायला मदत करीत ती म्हणाली,

"तुम्ही आंतल्या खाटेवर पडा पाहूं... मी देतें तुम्हांला चटकन् चहा करून.."

"नको, नको, मला चहा नको..."

"नाहीं पिता आला तर नका पिऊं...."

लक्ष्मीनं तिला खरोखरच खाटेजवळ आणलं होतं आणि तिला अलगद बिछान्यावर झोंपवीत ती म्हणाली होती,

"पडा तुम्ही डोळे मिटून...मी करून आणतें सरबत..."

"कांहीं नको ग, बरं वाटतंय् मला आतां कांहीं होत नाहीं मला."

"आठ बाळंतपणं झालींत माझी, वहिनी ! अशा वेळीं जीव कसा हलका होतो मला काय ठाऊक नाहीं, होय ?..."

लक्ष्मीनं अखेर सारं ओळखलं होतं. ती जाणीव मोठी सुखाची होती... पण या सुखालाहि मोठा विचित्र पदर चिकटलेला होता... निराशेचा... अपेक्षाभंगाचा...पण को कुणास ठाऊक या वेळीं असले कांहीं विचार मनांत यावे असं तिला वाटत नव्हतं... उलट तिला यावेळीं आठवण होत होती ती श्रीची...तिला सारखं वाटत होतं यावेळीं श्री जवळ असायला हवा होता. तो तसा जवळ असता तर आपल्या दोन्ही हातांचा विळखा तिनं त्याच्या मानेभोंवतीं घातला असता आणि आपल्या मुखांतनं आनंदातिशानं शब्द फुटत नसतांनाहि ती अस्फुट शब्दांनीं त्याला म्हणाली असती, ऐक, श्री, ऐक, ही लक्ष्मी काय म्हणतीय् ती...






पण तो येवढयांत येणार नाहीं हें तिला माहित होतं. क्लबांत त्याचा रमीचा डाव या वेळीं रंगला असणार, हास्यविनोदाला, कोटयांना या वेळीं भरती आलेली असणार हें तिला चांगलं माहित होतं. तो कसला येणार आहे येवढयांत, या विचारानं तिचं मन हिरमुसलं होत होतं. तिला सारखं वाटत होतं कोणत्या तरी अद्‌भुत शक्तीनं त्याला या क्षणीं आपल्याकडे ओढून आणतां यावं आणि तो आला कीं लक्ष्मीनं जें ओळखलं होतं तें गोड रहस्य त्याच्या कानांत आपण सांगावं. त्यानं तें न सांगतांहि ओळखलं तर किती छान होईल. पण तो तें कसलं ओळखणार आहे ? तो परत येईल, नेहमींसारखा अबोलपणानं जेवणाच्या टेबलावर जाऊन बसेल, पण तरीहि त्याचे खांदे गदगदां हालवीत मी त्याला म्हणेन, ऐक, नीट ऐक, श्री मी काय सांगतें तें...मी आतां आई होणार आहे... तुझ्या मुलाची आई...कदाचित् तें माझं सांगणं त्याच्या नीटसं लक्षांत यायचंहि नाहीं. कांहीं हरकत नाहीं लक्षांत नाहीं आलं तरी... थोडया वेळानं तरी तें त्याच्या लक्षांत येईल आणि मग मी त्याला म्हणेन, ऐक, श्री, ऐक नीट, मी आतां आई होणार आहे...

आपल्या मुखांतनं बाहेर न पडलेले हे शब्द तिच्या कानांत घुमल्यासारखे तिला वाटले. कसले तरी गोड रोमांच तिच्या अंगावर उठले. आपल्या शरीरांतल्या कणांकणांतून कसलं तरी नवचैतन्य थरारल्यासारखं तिला वाटलं. आपल्या साऱ्या शरीरांतून एका क्षणांत विजेचा प्रवाह वाहत गेल्याचा भास तिला क्षणभर झाला. आणि या अननुभूत भावनेनं आणि तिच्यांतून निर्माण झालेल्या सुखाच्या, आनंदाच्या आणि हर्षाच्या लहरींनीं तिचं सारं शरीर आणि मन व्यापून टाकलं... कांहीं न बोलतां असंच बिछान्यावर पडून राहावं, ज्या अननुभूत सुखाच्या लाटांवर तिचं मन तरंगत होतं तें सुख डोळे मिटून आकंठ प्यावं, त्या सुखानं नवी बेहोषी यावी आणि त्या तृप्तीनं आपलं मन कांठोकांठ भरावं अशी मोठी विचित्र भूक तिला या क्षणीं लागली. ज्या क्षणाची आज इतकीं वर्षं तिनं आपले प्राण डोळयांत आणून वाट पाहिली होती तो क्षण अखेर आला होता या कल्पनेनंच तिचं मन मारावून गेलं होतं आणि त्या सुखानं तिचं मन गुदमरून गेलं होतं...

पण तिला विलक्षण उताविळी झाली होती ती कधीं एकदां श्रीला हें सारं समजतं याची. न सांगतां, न बोलतां त्यानं हें ओळखावं असं तिला वाटत होतंच, पण तें त्यानं ओळखलं नाहीं तर मग ती त्याला सारं कांहीं सांगणार होती. तो आल्याबरोबर. तें कसं सांगायचं या विचारानं तिच्या मनांत मोठा संभ्रम निर्माण झाला होता. जें सांगायचं होतं तें सांगतांना तिला शब्द सुचणार नव्हते. शाळेंत अस्खलित शब्दांत बोलणाऱ्या 'बाई' अशी तिची कीर्ति होती, तरी आपलं हृगद्‌त आतां शब्दांच्या साहाय्यानं तिला कदाचित् सांगतां येणार नव्हतं. ती अडखळणार होती... सुरुवात कशी करावी हें तिला सुचणार नव्हतं. पण कांहींहि करून ती आपलं मनोगत त्याला सांगणार होती. तें कधीं एकदां सांगेन या विचारानं तिचं मन अधीर झालं होतं... पण श्री परत यायला अजून चांगले दोन-अडीच तास तरी होते हें तिला माहित होतं, कारण नऊ वाजायच्या आंत तो कधीं घरीं येतच नसे... रोजचाच क्रम होता हा....

पण कधीं एकदां श्रीला हें सारं सांगेन असं उतावीळ झालेलं तिचं मन कांहीं केल्या स्वस्थ राहीना. जणुं आजपर्यंतच्या तिच्या काळवंडलेल्या जीवनांत उषःकालचा पहिला मंगलप्रकाश आला होता, कोंदटलेल्या जीवनांत मधुर चिवचिव तिला ऐकूं येऊं लागली होती आणि हें सारं श्रीला शक्य तेवढया लवकर कळावं हा एकच ध्यास तिच्या मनाला लागला होता. तिला एकदां वाटलं, फोन करावा आणि श्रीला घरीं बोलावून घ्यावं, पण फोन करतांना त्याला सांगायचं तरी काय आणि कसं या विचारानं तिचं तिलाच हंसूं आलं तशी तिनं आपल्या उतावळया मनाची समजूत घातली आणि ती स्वतःशींच म्हणाली, थोडा धीर धरायला हवाच...

ती स्वतःच्या मनाची अशी समजूत घालीत होती तोंच दारावरची घंटा खर्रर्रदिशीं वाजली. शेजारच्या दुर्गाबाई अशा भलत्याच वेळीं कांहीं तरी मागण्यासाठीं हातांत भांडं घेऊन दारांत उभ्या असणार हें ओळखून श्रीमतीनं लक्ष्मीला सांगितलं,

"उघड ग दार बघ कोण आलंय् तें...

लक्ष्मीनं दार उघडलं, आणि ती चटकन् बाजूला झाली. हंमत. पण बुटांचे आवाज ऐकूं आले तसं कोण आलं तें श्रीमतीला सांगावंच लागलं नाहीं !

श्री आला होता हें श्रीमतीनं ओळखलं, पण त्याच्या अशा या अवेळीं येण्यानं तिच्या मनाला धक्का बसला होता. उठवत नव्हतं तरी ती उठून बसली आणि घाबऱ्या, भीतियुक्त शब्दांत तिनं विचारलं,

"क्लबातनं आज येवढया लवकर ?..."

"होय. पुन्हां पाऊल टाकणार नाहीं तिथं. अशा ठिकाणीं सभ्य माणसांनीं जाण्यासारखंच नव्हतं हें सांगितलं नव्हतं मी तुला ?..."

हे शब्द उच्चारीत असतांना श्रीला सारखी आठवत होता तो क्लबांत नुकताच घडलेला प्रकार.

रोजच्या सारखाच आज तो क्लबांत जात होता. पावसाचं पाणी

आंत येऊं नये म्हणून व्हरांड्यांना लावलेलीं झडपं ओलांडून तो आंत शिरणार तोंच पलीकडून त्याच्या कानावर शब्द आले होते,

"कोण ? श्री ? तो कसला पुरुष ? त्याच्या घरचाच पाळणा हललेला नाहीं अजून ! लग्नाला दहा वर्षं झालीं तरी !"

अंत:करणाचे लचके तोडणारे हे शब्द कानांवर पडतांच त्याला भोंवळ आल्यासारखं झालं. आपण कुठें आहों हेंच त्याला क्षणभर कळेना, पण तो लगेच सावध झाला, कारण त्या शब्दांच्या पाठोपाठ तो ऐकत असे तें नेहमींच हंसणंहि त्याच्या कानावर आलं होतं– रमीच्या टेबलावर नेहमीं असणाऱ्या नखरेल, चवचाल वैजयंतीचं. आपल्या पौरुषावर झालेला हा आघात सहन न होऊन 'पुन्हां पाऊल टाकायचं नाहीं इथं' असं मनाशीं म्हणत त्या तिरीमिरींतच तो क्लबांत शिरण्याऐवजीं घराकडे निघाला होता..... मनानं खचन.... शरमिंधा होऊन....

त्याच्या मनांतली ही व्यथा श्रीमतीला कळणं शक्य नव्हतं, म्हणूनच ती झोंपली होती तिथं तो आला तसं तिनं पुन: म्हटलं,

"मला वाटलं नव्हतं तूं एवढ्या लवकर येशील असं."

"म्हणजे ? माझी वाट पाहात बसतेस कीं काय रोज ?...

"रोज नाहीं !"...

"मग ?..."

"आजच !.....

"पण असं माझी वाट पाहात बसण्यासारखं आज घडलं तरी काय ?..."

श्रीमती घुटमळली. काय बोलावं हेंच तिला सुचेना, पण तिच्या मुखातनं खुदकन् हंसूं फुटलं आणि ती म्हणाली,

छे: ! तिला सांगतांच येईना !

तिच्या मनाचा तो संभ्रम श्रीच्या लक्षांत आला आणि तिच्या शक्य तेवढं निकट येत तो म्हणाला,

"मला नाहीं सांगायचं ?...."

त्याच्या शब्दांतला असामान्य गोडवा आणि आर्जव तिच्या क्षणांत लक्षांत आलं तसं आपलं तोंड त्याच्या कानाजवळ नेत ती हलक्या आवाजांत अस्फुट शब्दांनीं कांहीं तरी पुटपुटली, तशी त्याची चर्या एका क्षणांत बदलली, हास्यरेषा त्याच्या मुखावर पसरल्या आणि तिचे दोन्ही दंड घट्ट धरीत त्यानं विचारलं,

"खरंच ? मग इतके दिवस कशी नाहीं बोललीस ?

"म्हटलं पक्की खात्री झाल्यावरच बोलावं. मागच्या सारखं नको व्हायला !...."

"वेडी कुठली !....

"पण तूं मात्र येवढ्या लवकर क्लबातनं येशील असं वाटलं नव्हतं..."

"आतां रोजच येणार आहे. ऑफिस सुटल्याबरोबर !..."

"खरंच सांगतोस ? पुन्हां क्लबांत जाणार नाहींस ?

"नाहीं. नाहीं. आतां तुझ्या सहवासांत राहणार. मिळेल तेवढा सारा वेळ."

श्रीच्या मुखातनं बाहेर पडणारे ते शब्द श्रीमतीच्या कानांत शिरले ते तिचं अंत: करण फुलवीत, तिचं मन प्रसन्न करीत. तिचं मन:प्राकार कसल्यातरी अननुभूत आनंदानं अगोदरच उजळलं होतं आणि श्रीच्या या शब्दांनीं तर तिच्या मनावर कसल्या तरी सुगंधाचा शिडकावा झाल्यासारखं तिला वाटलं. तो आनंद तिच्या अंत:करणांत मावेना. आज किती तरी दिवस ती त्याच्या सहवास सुखाला पारखी झाली होती. तें गेलेलं सुख सोन्याच्या पावलांनीं परत येणार आहे अशी ग्वाहि श्रीच्या त्या शब्दांनीं तिच्या मनाला दिली, तसं तिचं मन हर्षभरित झालं आणि त्याच्याकडे लडिवाळपणें पाहात ती किती तरी दिवसांनीं मोकळेपणानं हंसली तसा तिला झालेला आनंद तिच्या नेत्रांतून ओसंडला !....

• • •


अरेरे सारेंच चुकलें!
राष्ट्रद्रोह्यांना हांकला!
राष्ट्रद्रोही मुर्दाबाद!
नेफा आघाडी
चिनी परत गेले
कम्युनिस्ट
चीनवादी कम्युनिस्ट
नेफा वरील आक्रमण
दाई नको आई हवी!
कॉंग्रेस
पोलीस ॲक्शन
पैसा
पैसा
गोवा
महाराष्ट्र



—प्रा. सदानन्द रेगे

*अजून त्याचं शरीर त्याला वेढा घालून बसलं होतं. संवेदना समुद्राच्या पाळण्यांत कणाकणानें वितळत चालल्या होत्या. वरती नक्षत्रांचे पुंजके नि खालीं समुद्राच्या पोटांतलं शेवाळ ! मध्यें गर्द काळ्या पिंजारलेल्या लाटांचे कळप ! सारखे झोके चालूं होते—*

*—झोके चालूंच होते.*

अजून त्याचं शरीर त्याला वेढा घालून बसलं होतं. संवेदना समुद्राच्या पाळण्यांत कणकणानं वितळत चालल्या होत्या. वरती नक्षत्रांचे पुंजके नि खालीं समुद्राच्या पोटांतलं शेवाळ... मध्यें आयाळ पिंजारलेल्या गर्द काळ्या-लाटांचे कळप... सारखे झोके चालू होते. कोण देत होतं हे झोके ? कशासाठीं ? वारा पिसाळला होता. क्षितिज पिसाळलं होतं. आकाश पिसाळलं होतं. समुद्राच्या पोटांतली माती सारखी आक्रोश करीत होती. ये...ये...ये... किती युगं तुझी वाट पहायची ? पाठवूं का तुला शेवाळाचा मेणा ? किती दमला माझा राजा. जा आधीं हातपाय धू. थोडं बदामाचं दूध पी नि मग जा उलुपीच्या शयनमहालांत. आज तिच्या गर्भागारांत कसलासा उत्सव आहे. सारी तयारी आहे. प्रवाळाची शय्या आहे. वाळूचा पांवडा आहे... मग त्याला वाटलं आपली पालखी पुन्हां वर चालली. मोराच्या पिसाऱ्यांतून डोळा गळावा इतकी अलगद... इतकी... अलगद... त्याच्या मेंदूला घेरी यायला लागली होती. मनांत काळोखाचा लोंढाच्या लोंढा घुसला होता. पण अजून आपलं शरीर आपल्याला वेढा घालून बसलं आहे, या जाणीवेचं पीस त्याच्यावर छत्र धरून होतंच. क्षणार्धांत त्याला वाटे आपण समुद्रच आहोंत. मग तो एक झेंप घेऊन नक्षत्रांचे घड खुडायला पाही. मग त्याला वाटे आपण आकाशचे आहोंत. आकाश आहोंत कीं नक्षत्रं आहोंत ? नक्षत्र आहोंत कीं वाळू आहोंत. वाळू आहोंत कीं शिंपली आहोंत ? मग हे मासे कोण ? हें शेवाळ इथं कुणी आणलं ? हे डोंगर इथं कुणी आणून टाकले ? मध्येंच कुठंतरी एखाद्या दीपगृहाचा फुटका डोळा मिचमिच करी. मध्येंच एखादं फाटून फाटून चिंध्या झालेलं शीड फिदीफिदी हंसे. मग त्याचे स्नायू थेंब थेंब वितळूं लागत. वितळत चालल्याचा भास होई. निदान तशी हूल तरी उठे. अजून शरीराचा वेढा तसाच दरोबस्त होता. गडाच्या तटबंदीला मुंगी बाहेर जाऊं शकेल एवढंहि भगदाड कुठं नव्हतं. हा वेढा किती कल्पं असाच बसून राह्यचा ? याच्यांतून कांहींच वाट नाहीं का ? गडावर मिठाची पोतीच असती नुसती तर खांका वर करून तरी मोकळं होतां आलं असतं. पण इथं तर आहेत किती आमिषं ! नाहीं. इथनं काढतां पाय घ्यायचा नाहीं. शेवटपर्यंत किल्ला लढविलाच पाहिजे... शेवटपर्यंत किल्ला लढविलाच पाहिजे... मृत्यो, गर्व कशाला वृथा ऽऽऽ...तमसो मा ज्योतिर्गमय... मृत्योर्माऽऽऽ...

तेवढ्यांत गडाच्या दिंडीदरवाजावर थाप. कोण आलं हे भलत्या वेळीं ? या लोकांना कांहीं काळवेळ आहे कीं नाहीं ?

"कोण आहे ?"

"मी."

"मी कोण ?"

"मी."

"मी म्हणजे कोण ?"
"मी."
"पण कांहीं नांवगांव नाहीं का तुम्हांला ?"
"मी. मी. मी."
"तुमचं नांव काय ?"
"मी."
"तुमच्या वडलांचं ?"
"मी."
"आडनांव ?"
"मी."
"हें कसं शक्य आहे ? गांव कोणतं तुमचं ?"
"मी."
"मीं. मी. मी... डोकं फिरायला आलं नुसतं."
"उघडा ना दरवाजा."
"कशासाठीं ?"
"उघडा आधीं."
"नाहीं उघडणार. गडाला वेढा पडलाय्."
"उघडा म्हणतों ना."
"नाहीं म्हणजे नाहीं."
"तें मला माहीत आहे."
'काय ?"
"नाहीं म्हणजे नाहीं हें."

उघडावा का बुलंद दरवाजा ? कदाचित् शत्रूला शरण यायचं असेल. कदाचित् आपली नियतीच दार ठोठावीत असेल. कदाचित्...

मी.. मी.. मी.. मी.. माझा शत्रू कसा असेल ? मी माझी नियति कशी असेल ? कांहींतरी दगाफटका आहे खास. नाहीं दार उघडायचं. थोडा वेळ गडीगुप्प. तेवढ्यांत कांसवाच्या मनगटावरील घड्याळांत सेकंदाचा गजर झाला नि पुन्हां बुलंद दरवाजा खडखडूं लागला.

लाटा अजून पिसाळलेल्याच होत्या. सारं अस्तित्व झोंकाड्या खात होतं. नसण्याची कोल्हेकुई ग्रहमालांच्या रत्नांतून ऐकूं येत होती. ऐकायला येत होतं कीं नव्हतं ? ऐकायला येतं म्हणजे काय ? अन् ऐकायला येत नाहीं म्हणजे तरी काय ? काय ऐकायला येतं ? अन् ऐकायला येत नाहीं तें काय असतं ? कुठंतरी... अगदीं अनोळख्या ठिकाणीं कुणी तरी तंबोरा लावतो आहे... वा.. वा.. काय षडज् लागलाय्... अन् हा पंचम.. अहा.. आईग... नुसता एक सूर.. नुसती एक तार नि ती छेडणारं नुसतं एक बोट...पण आकाशपाताळ अगदीं ढवळून निघालं... नाहीं... नाहीं... पण ही नुसती फसवणूक आहे. वेढा गडाला फसवूं पहात आहे. हा मोह आहे. सांपळा आहे. चक्रव्यूह आहे. फसवणूक... शुद्ध फसवणूक... तेवढी एकच वस्तु या आटपाट नगरांतें निर्मळ स्वरूपांत मिळते आहे. तेवढी एकच मुलगी.. एकच मुलगी... अजून कुंवार राहिली आहे. अजून तिच्या वागेंतली कळी उमलायची आहे. अजून तिच्या फुलाच्या पाकळ्या उलगडायच्या आहेत. पण तेवढं फूल... एकच फूल.. गडाला वेढा घालून बसलंय्... एकच मुलगी... एकच...

या बुलंद दरवाजापलीकडे तीच उभी असेल का ?
पण ती ती असेल तर ती मी कशी होईल ?
कांहींतरी धोका आहे. जपायला हवं. होशियार.....
पुन्हा दारावर थाप.
"कोण आहे ?"
"सांगितलं ना मी म्हणून ?"
"मी कुणा मीला ओळखीत नाहीं."
"अहो, पण मी इथं असतांना मी आंत कशी असेल ?"
"मी आंतच आहे."
"नाहीं मी बाहेर आहे. दारापलीकडे आहे."
"खरं सांग. काय नांव तुझं ? काय काम आहे ?"
"हें सगळं तुम्ही दार उघडल्यावर सांगायचं आहे."
"अन् मी दार कधींच.. कधींच नाहीं उघडलं तर ?"
"तर मी दार उघडेपर्यंत इथंच राहीन."
"पण मी कधींच.. कधींच.. दार उघडणार नाहीं."
"मग मी पण कधींच... कधींच... इथनं हलणार नाहीं."
"नको हलूंस."
"नका दार उघडूं."
"पण मी कधींच... कधींच..."
"कधींच दार उघडणार नाहीं, असंच ना ?"
"हो, असंच."
"म्हणजे कधींतरी उघडणारच."
"नाहीं. कालत्रयी नाहीं."
"पहा..."
"काय पहा ?"
"कधींतरी दार उघडल्याशिवाय, **मी कधींच दार उघडणार** नाहीं याला कांहीं अर्थ आहे का ?"
"तूं कांहींहि म्हण, पण मी दार उघडणार नाहीं."
"राहिलं तर. राहत्यें इथं बसून."

राहत्यें.. मी राहत्यें.. म्हणजे ?... ती.. ती.. ती.. एकच मुलगी तर नाहीं ही ? तिच्या वागेंतली कळी अजून उमलायची आहे... जिच्या फुलाच्या पाकळ्या अजून उलगडायच्या आहेत... जी अस्तित्वाच्या प्रारंभापासून अजून कुंवार आहे...

त्याचं अंग घामानं नुसतं थबथबून गेलं. तो घाम समुद्राच्या पाण्याचाच होता अन् समुद्रांतच विलीन होत होता.

अजून तो झोपाळा थांबला नव्हता. अजून डोकं धूमकेतूंना लागत होतं. अजून पायांना शेषाची फडा लागत होती. मध्यें फक्त होता दीपग्रहाचा तो मिचमिच फुटका डोळा...फुटका डोळा...काळोखानं लबलबलेला... आंधळ्या प्रकाशाचं फूल पडलेला..

मग एक कल्पना त्याच्या मनांत आली. तुटक्या-फुटक्या होडीचीं लांकडं लाटांवरून झुलत यावींत तशी आली. म्हटली तर एकदम. म्हटली तर हळूंहळूं.

गडाच्या तटबंदीवर उभं राहून त्यानं दीपगृहाला साद घातली. दाहि दिशांचा कातळ फोडून ती अस्तित्वाच्या पार सणासणत गेली.




अनुक्रमणिका

पण हें कसं झालं त्याचं त्यालाच समजेना. दीपगृहाला साद घालतांना त्याच्या तोंडांतून आवाजच बाहेर पडला नव्हता. मग आपली साद दीपगृहाला ऐकूं कशी गेली ? आवाज अन् आवाजाचा अभाव या दोन वेगवेगळ्या गोष्टी नाहींत काय ? हीं दोन वेगवेगळीं अस्तित्वं नाहींत काय ? कीं दीपगृहाला साद ऐकूंच गेली नाहीं ? एकूंच गेली नाहीं म्हणावं तर त्यानं ओ कशी दिली ? ओ त्यानंच दिली हें तर नक्की. कितीतरी वेळां दीपगृहाचा आवाज आपण ऐकला आहे. 'पुढें घोका आहे. होशियार. पाण्याखालचा कातळ दगलवाज आहे.' त्याला पुढं विचारच करवेना. त्याचा मेंदू झोंकांड्या खात होता.

त्याची हांक ऐकतांच दीपगृह झोंपेंतून दचकून उठावं तसं उठलं.

"हॅलोऽऽ"

"एक काम होतं तुझ्याशीं."

"बोला ऽऽ"

"तुझा डोळा देतोस का जरा उसना ?"

"दिला असता. मोठ्या आनंदानं दिला असता. पण फुटका आहे तो."

"चालेल, फुटका असला तरी चालेल. समथिंग इज बेटर दॅन अजिबात नथिंग."

"म्हणजे ? तुझे डोळे काय केलेस ?"

"माझे डोळे समुद्रानं नेले आहेत."

"संभाळ रे बाबा. आपलं सर्वस्व एखाद्याला द्यावं, पण डोळे कधीं देऊं नयेत. माणसाचे डोळे गेले कीं आटपलंच कीं सगळें कांहीं. मग जगायचं तरी कशाला ? नाहीं का ?"

"जगायचं तरी कशाला ? खरंच. जगायचं हें कशासाठीं तरी असतं नाहीं का ?"




हें रक्तदान !

"नाहीं तर जगण्याला अर्थ काय राहिला ?"

"हो, तेंहि खरंच. बरं, देतोस का जरा तुझा डोळा."

"देतों, पण काम झाल्याबरोबर परत दिला पाहिजेस. सामाजिक कर्तव्यं आहेत ना एकेक अंगावर ?"

"नक्कीच"

मग दीपगृहानं दिलेला फुटका डोळा त्यानं आपल्या रिकाम्या खोबणींत बसविला नि बुलंद दरवाजाचा अडसर बाजूला करून त्यानं दरवाजा किलकिला केला. त्याबरोबर एक काळाकभिन्न मासा त्या फटींतून आंत शिरला. एवढा अक्राळविक्राळ मासा त्यानं बाप-जन्मीं पाहिला नव्हता. त्याची शेपटी पाताळाची जमीन फोडून अस्तित्वाच्या पलीकडे गेली होती नि त्याचं डोकं साऱ्या षड्ज-पंचमांना भेदून ओंकाराच्या देवळांतील घंटा वाजवीत होतं.

हा घंटा वाजल्याचा आवाज कीं बांगड्यांची किणकिण ?

त्यानं छातींत वारा भरून घेतला नि भीतीचं कोळीष्टक किंचित् बाजूला केल्याचा बहाणा करून कांपऱ्या आवाजांत गर्जना केली (याहि खेपेला त्याच्या तोंडांतून शब्द बाहेर पडले नव्हते.),

"कोण तूं ?"

हें हें हें हें हि हि हि हि....आकाशाच्या पलीकडून.. पलीकडून.... कुठली तरी चेटकीण फिदीफिदी हंसत होती.

"मी विचारतोंय्, कोण तूं ?"

पुन्हां एक अनोळखी किंकाळी.

"बोल, कोण तूं ?"

"कोण, मी ?"

"हो... हो.. तूं.... कोण तूं ?"

"मी...मी...मी."

"मी मी मी मी काय लावलंयस् मघापासनं ?"

"मग काय करूं ?"

"नांव सांग तुझं."

"मी... मी..."

"वात्रटपणा पुरे झाला. काय काम आहे तुझं इथं ?"

"मला तुमचं नांव हवं आहे."

"तें कसं काय शक्य आहे ? अन् कशासाठीं ?"

"तें न दिल्याशिवायच तुम्ही देऊं शकतां ?"

"मला कांहीं कळत नाहीं. माझ्या मेंदूला चक्कर आली आहे."

"तें तर दिसतंच आहे."

"खामोश, बोल कशासाठीं आली आहेस तूं इथं ? तूं शत्रूपक्षा-कडली दिसते आहेस."

"यंदा तुम्हांला कर्तव्य आहे ?"

"माणसाचं कर्तव्य त्याच्याबरोबर सांवलीसारखं असतं."

"छान...छान आहे वाक्य हें. कुठल्या पुस्तकांतलं ?"

"शट् अप्..."

"म्हणजे तुम्हांला यंदा कर्तव्य आहे तर ?"

"या प्रश्नाचं उत्तर मी दिलं आहे."

"मग मलाहि यंदा कर्तव्य आहे."




"असेल, माझा काय संबंध त्याच्याशीं ?"

"तुम्हांला कर्तव्य आहे अन् मलाहि आहे म्हणजे..."

"माझ्या मनाला मोंवळ येत चालली आहे."

"म्हणजे आपण दोघांनीं यंदा लग्न करायचं. आमचे डॅडी कित्ती मागें लागले आहेत माझ्या. त्यांनीं खूप स्थळंहि आणलीं होतीं. पण मी त्यांना स्पष्ट सांगून टाकलं कीं, आय वुईल चूज माय पार्टनर म्हणून."

"पण माझा काय संबंध या सगळ्याशीं ?"

"मी तुमची निवड केली आहे, माझा जीवनसाथी म्हणून."

"अग पण..."

"आतां पणबिण कांहीं नाहीं हं, डार्लिंग. यंदा उरकून टाकायचं आपण."

"अग पण..."

समुद्राची एक लाट आवर्तन घेते न घेते तोंच तिनं त्याला आपल्या अक्राळविक्राळ मिठींत घेतलं नि ती त्याचीं पटापट चुंबनं घेऊं लागली. पहिल्या प्रथम उत्तर ध्रुवावरचा वारा त्याच्या रक्तांतून सळसळत गेला. त्याच्या अंगांगावर नक्षत्रं मोहरून आलीं. मग तिनं हळूंच आपल्या पोलक्याचीं बटनं उघडलीं नि त्याचे चिमुकले हात आपल्या बुलंद वक्षांवर ओढून घेतले.

क्षणभर त्या फुटक्या बुबळाला कांहींच दिसेना. पण मग सगळीकडे काळोखच काळोख झाला अन् त्याच्या रिकाम्या खोवणीला चक्क दिसूं लागलं.

म्हणजे हा मासा वगैरे सगळं खोटंच तर ? पण मासा असला म्हणून बिघडलं काय ? माश्याच्या मुलीचं नि माणसाच्या मुलाचं मीलन का होऊं नये ? मासा आणि माणूस...हीं दोन वेगवेगळीं अस्तित्वं थोडींच आहेत ? अन् अस्तित्व, अस्तित्व म्हणजे तरी काय ? माशाची मुलगी आहे. माणसाचा मुलगा आहे. दोघेहि आहेत. असण्याला जें लागतं तें सगळं त्यांच्यापाशीं आहे. पण ही माश्याची मुलगी नाहींच मुळीं. ती माणसाचीच आहे. समुद्राच्या पोटांतील आगीवर घुमट होऊन रहाणारे ते तिचे स्तन....स्तन असावेत तर असे असावेत...असावं तर असं असावं... या स्तनांतील आग जो धारण करूं शकला तोच अस्तित्व पावला. त्यानंच परमेश्वराच्या शेंडीला गांठ मारली...

त्याचं डोकं पुन्हां आकाशाच्या छताला आपटलं तेव्हां त्याला जाग आली तेव्हां सगळं विश्वच स्तनाकार झाल्यासारखं त्याला वाटलं. कोण असावी ती मुलगी ? खरंच ती मासा होती कीं माश्याचं रूप घेऊन आलेली कुणी मायाविनी होती ? खरी ती कोण होती ? ती आली तेव्हां तिला कल्ले होते. खवलं होतीं. मग माझे हात कुणाच्या स्तनांवर होते ? अन् ती एकाएकी अशी नाहींशी कशी झाली ? कुठं गेली ?

त्याच्या रिकाम्या खोवणींतून अश्रूंचे कारंजे उडाले नि सारीं नमोमंडळं ओलीचिंब झालीं.

जो...जो...रे...झोंपाळा...

जो...जो...रे...झोंपाळा...












तीट लावूंऽऽ तान्ह्या बाळा...

जो...जो...रे...झोंपाळा.

कधीं थांबायचा हा झोंपाळा ? कधीं संपायच्या या अनंताच्या वाऱ्या ? कधीं विरायचा हा चौऱ्याऐंशींचा फेरा ? निर्वाण.. निर्वाण... निर्वाणच जर अखेर खरं असेल तर कशाला फुलारला आहे हा गारुडाचा अजब पिसारा ? मासा...मुलगी..एकच मुलगी.. कळी फुलायची असलेली.. फूल उलगडायचं असलेली...कुंवार... अन् कुंवारपणानंतर कुंवारपण कुठं जातं ? खरंच का तें कुठं जातं...कुठं जातं... कशासाठीं जातं ? त्याला जायचंच असतं तर तें येतं तरी कशाला ? गारुडानं अखेर गारुडांतच विलीन व्हायचं तर मंवतीं ही लाटांची गर्दी कशासाठीं ? शरीराचा वेढा कशाला हा या प्राणांभोंवतीं ? लाटांच्या पिसाळलेल्या पाळण्यांत तो निमूट पडून राहिला होता. त्याच्या मेंदूला घेरी आली होती. आकाश एका प्रचंड प्रश्नचिन्हाची कमान बनलं होतं अन् त्या कमानीखालीं समुद्राचं टिंब... ती कमान अजब होती. एकहि पांखरूं तिच्या आश्रयाला आलेलं नव्हतं, तिथं ध्वनि नव्हता, प्रतिध्वनि नव्हता....तें एक नुसतंच प्रश्नचिन्ह होतं.

तेवढ्यांत पुन्हां दारावर थाप वाजली.

"कोण आहे ?"

"मी."

"मी मुळींच दार उघडणार नाहीं."

"उघडूं नका. थोडं किलकिलं करा. महत्त्वाची बातमी आहे."

महत्त्वाची बातमी...ते टचटचीत, टपोरे स्तन...त्याच्याखालची ती ब्रह्मांडाचं भस्म करणारी...हवीहवीशी वाटणारी ती आग...आग. महत्त्वाची बातमी.

अडसर काढून त्यानं दार किलकिलं केलं तों कांसव. त्याच्या परम मित्रांपैकीं एक.

"शरीराचा वेढा ढिला होत चाललाय्."

"कशावरून ?"

"तटबंदीवरून पहा."

खरंच, शरीराचा वेढा ढिला पडत चालला होता.

मग कांसवाला कांहींतरी चिरीमिरी द्यायची म्हणून त्यानं 'कांसव नि ससा'ची गोष्ट त्याला सांगितली. कांसवाला ती गोष्ट फार आवडत असे. ती गोष्ट एका घड्याळजीला सांगून आपल्या-सारखंच स्लो बट् स्टेडी चालणारं घड्याळ मिळविलं होतं. या घड्या-ळांत दर सेकंदाला गजर होई. त्यामुळं गोष्टींतल्या कांसवासारखं तें कांसव कधींच झोंपत नसे.

शरीराच्या वेढ्यावर त्याची सक्त नजर होती.

'संभाळून रहा रे बाबा' असं सांगून कांसव निघून गेलं. त्यानं गडाचा दरवाजा नीट लावून घेतला. नि तो आपल्या शयनमहालांत आला. कसलं तरी गाणं तो विमनस्कपणें मनांतल्या मनांत गुणगुणत होता. त्या गाण्याला सूर नव्हते कीं शब्द नव्हते. अन् तरीहि तें गाणं होतं. तें त्याचं फार आवडतं गाणं होतं. एकलेपणाच्या अशा अनेक क्षणीं या गाण्यानं त्याला सोबत केली होती. पण असा एकलेपणा नि अशी सोबत तो आजच प्रथम अनुभवीत होता.

तो पलंगावर कलंडण्याच्या विचारांत होता, तेवढ्यांत समोरच्या टेबलावर एक ॲक्वेरियम होतं त्याच्यांतला एक छोटासा मासा रडूं लागला. माश्यांना भूक लागली असेल म्हणून त्यानं कांहीं पापकिडे त्यांना खाऊं घातले. पण तो लहानगा मासा कांहीं रडायचा थांबेना.

"आतां काय झालं तुला रडायला ?"

"ऊं ऊं ऊं ऊं..मी नॉंई जॉंऽऽ"

"नाईं जॉं तर नॉंई जॉं...पण रडतोस कशाला ? बाहेर वेढा पडलाय् माहीत आहे ना ?"

"मला या पाण्यांत रहायचा कंटाळा आलाय्.

"कुठल्या पाण्यांत ? समुद्राच्या कीं ॲक्वेरियमच्या ?"

"दोन्ही."

"पण मासा म्हटला कीं त्यानं पाण्यांतच रहायला हवं."

"कां म्हणून ?"

"नाहीं तर मरून जाशील तूं."

"कां म्हणून ?"

"परमेश्वरानं तुझ्या शरीराची रचनाच तशी केलीय्."

"मग तूं कसा पाण्यांत रहातोस ? तूं कुठं मासा आहेस ?"

"कोण म्हणतो मी मासा नाहीं ?"

"मी म्हणतों."

"पुरावा काय ?"

"पुरावा कसला ? नाहीं म्हणजे नाहींस. ?"

"हा पहा कसा मी पोहतों माश्यासारखा."

"सगळेच पोहणारे कांही माशे नसतात. तुला कल्ले कुठं आहेत?"

"सगळ्याच माश्यांना कांहीं कल्ले नसतात."

खवलं कुठायत् ?"

"अन् खरंच त्याला कल्ले नव्हते. खवलं नव्हतीं. हा काय चम-त्कारिक प्रकार आहे ?

"बोल आतां. आतां कां बोलत नाहींस ?"

"मला तुझ्याशीं वाद घालायचा नाहीं."

"मग काढ तर मला बाहेर. मला अगदीं कंटाळा आलाय्."

"शेवटी त्यानं त्या छोट्या माश्याला अक्वेरियमबाहेर काढलं त्याबरोबर तो पाहता पहातां आकाशाएवढा मोठा झाला नि खदां-खदां हंसूं लागला.

"कसा फसला गडी ?"

कोण आहेस तूं ?"

"मी. मी तुझा सासरा."

"मला सासराच नाहीं मुळीं. ?"

नसला तर होईल."

"तूं कसा काय माझा सासरा होणार ?"

"तूं माझ्या मुलीशीं लग्न करणार आहेस ना ?"

कोण म्हणतों ?"

"मला कळलंय् सारं. मघां तीच आली होती ना तुला भेटायला. पण याद राख.."




कसली ?"

" हें प्रकरण वाढतां कामा नये."

" कसलं प्रकरण ?"

" तुझं नि माझ्या मुलीचं."

" तो प्रश्न तिचा नि माझा आहे."

" अन् माझाहि आहे. मी तिचा बाप आहे."

" त्याच्याशीं मला काय करायचंय् ?"

" पण तुमचं लग्न कसं काय व्हायचं ?"

" वैदिक पद्धतीनं."

" तसं नव्हे. तूं माणूस नि ती......

" माझा असल्या अंधश्रध्दांवर विश्वास नाहीं."

क्षणभर त्याला तिचा तो थंडगार विळखा आठवला. एक अनामिक भीतीची लाट त्याच्या पाठीच्या कण्यावरून सळसळत गेली. पण त्या लाटेपाठोपाठच दोन गच्च स्तन वहात आले. त्यांच्या घुमटाखालीं आगीच्या माश्यांचा कळपच्या कळप होता. तो त्याला मुसंडी मारून काळोखांत दिसेनासा झाला. त्याच्या मेंदूला अधिकाधिक घेरी येत चालली होती: मनाची एकेक खपली गळून पडत असल्यासारखं त्याला वाटूं लागलं होतं.

खरंच मी माणूस.. मी माणूस.. अन् ती.. ती.. मासा.. ती मत्स्यगंधा... कसं व्हायचं ? कसं व्हायचं ? असा एकटा मी तरी किती दिवस राहूं. माझं घर कधीं थाटूं ? माझ्या मुलाबाळांना अंगा खांद्यावर कधीं घेऊं ? म्हातारपणीं माझं कोण पाहील ? मी मासा व्हायला तयार आहे, पण मला ती हवी आहे. तिचा थंडगार विळखा हवा आहे. तिचे स्तन हवे आहेत. त्यांच्या आधारानं दडून राहिलेल्या आगीनं मला जळून खाक व्हायचं आहे.

" हं, मग काय ठरलं तुझं ?"

" काय ठरायचं ?"

" माझ्या मुलीला विसरून जा."

" तो माझा प्रश्न आहे."

" असेल, पण मुलगी माझी आहे."

" माझं तुमच्या मुलीवर मुळींसुध्दां प्रेम नाहीं."

" हेंच हवंय् मला."

" माझं प्रेम आहे तें तिच्या स्तनांवर."

" हेंहि मी चालूं देणार नाहीं."

" हें मलतंच झालं बुवा."

कां ?"

" अहो, कारण ती मुलगी तुझी आहे. तिचे स्तन नाहींत कांहीं."

" तें कांहीं नाहीं. हें लग्न मी होऊं देणार नाहीं."

" ठीक आहे, तुझं काय करायचं तें कर. माझं मी पाहीन."

" काय वाटेल तें झालं तरी हें लग्न होतां नये."

हें लग्न होतां नये..हें लग्न होतां नये.. प्रतिध्वनींवर प्रतिध्वनी आपटत होते. आकाशाला थरकांप सुटला होता. आसपासचे डोंगर तर केव्हांच वितळूनहि गेले होते. काळोखाच्या पोटांत एक अनोळखी तंबोरा तेवढा वाजत होता. एक तार. एक बोट...त्या बोटानं तार छेडली नि आकाशाच्या स्तन-घुमटाखालून षड्जाचा आवाज आला: "गुंईऽऽऽहे गाफील प्राण्या, सावध रहा.....तुझ्या सांवलीला जप. तो काळा मासा तिच्या पाठीवर आहे."

सांवलीला जप ? सांवलीला कशासाठीं जपायचं ? माणसाची सांवली दुसरीकडे कुठं जाणार आहे ?

त्याला कांहींच कळत नव्हतं. त्याच्या मेंदूवर विस्मयाचा जाडजूड लेप चढत चालला होता. मन...मन.. कुठलं मन ? कुणाचं मन ?.. मन म्हणजे काय असतं ?

सांवलीला जप... सांवलीला जप.. षड्ज असं खोटं कांहीं सांगणार नाहीं. षड्ज कधींच खोटं बोलत नाहीं.

गाफील सांवलीला जप...

माझं मरण तर माझ्या सांवलींत नसेल ?

त्या रात्रीं त्याचा कधीं डोळा लागला कुणास ठाऊक. पण मध्यरात्रीं जेव्हां तो कांसवाच्या घड्याळाचा अलार्म ऐकून जागा झाला तेव्हां भंवतालच्या काळोखांत त्याला आपली सांवली कुठंच दिसेना. तो भीतीनं घामाघूम झाला. झोंपाळ्यावरून खाली येतांना पोटांत खळगा उभा रहातो तसं कांहींसं त्याला वाटलं.

झाला..अखेर दगाफटका झालाच.

तो वेड्यासारखा धांवत धांवत गडाच्या बुरुजावर आला तेव्हां तो काळा मासा तटवंदीवरून भराभर उतरत असलेला त्याला दिसला. त्या माश्याच्या तोंडांत त्याची सांवली होती. पालीच्या तुटलेल्या शेपटीसारखी ती तडफडत होती.












मग एकदम झोंपाळयाची दोरी तुटली.

शरीर हलकं हलकं झालं. कुणीतरी त्याला एक प्रचंड धोंडा बांधून ठेवला होता. तोहि एकदम पिसासारखा थरथर जाऊं लागला.

आतां तो विनसांवलीचा माणूस झाला होता. एकदम त्याला शेंपूट तुटलेल्या कोल्ह्याची आठवण झाली, पण हंसायचं मनांत येऊनहि तो हंसला नाहीं. न जाणो, आपण या क्षणीं हंसलों तर घोटाळा व्हायचा. आपलं हंसणंहि तो काळा मासा पळवून न्यायचा. पण आपलं मरण तरी कशांत आहे? आपल्या सांवलींत कीं आपल्या हंसण्यांत?

पहातां पहातां सकाळ झाली. सोनचांफ्यासारखं पिवळं धमक ऊन सगळीकडे पडलं होतं. आकाश कृष्णासारखं निळंमोर पसरलं होतं. समुद्र कौलावरच्या मांजरासारखा उताना पडून राहिला होता. दीपगृहानं नवा डोळा बसवून घेतला होता.

तसाच तो उठला नि प्रसन्न मनानं बुरुजावर आला. खालून कांसवाची शीळ ऐकूं आली.

"हॅलो ऽऽ"

"हॅलो...शरीराचा वेढा उठला. दार उघड आतां."

त्यानं दार उघडलं.. खरं म्हणजे दार उघडायची त्याला गरजच पडली नाहीं. बुलंद दरवाजांतून तो आरपार बाहेर पडूं शकला.

"कां? कधींच दरवाजा उघडणार नव्हतास ना?"

त्याला आवाज ओळखीचा वाटला. त्या आवाजाला दोन बुलंद स्तन होते नि त्या स्तनांखालीं हवीहवीशी वाटणारी आग होती.

तो गडाच्या पायथ्याशीं आला तेव्हां कांसव त्याची वाट बघत तिथंच उभं होतं. त्याच्या मनगटावरील घड्याळांत सेकंदाचा गजर झाला.

"चल, ती तुझी वाट पहातें आहे."

कोण?"

ती..."

"ती कोण?"

"ती.. ती.. मी..

कशासाठीं?"

"यंदा तुला कर्तव्य आहे ना?"

"पण हें लग्न कसं काय व्हायचं. तिचा बाप तर विरुध्द आहे?"

"लग्न तिच्याशीं कां तिच्या बापाशीं?"

"पण..पण..ती मत्स्यकन्या नि मी माणूस."

"कोण माणूस?..तूं?..तूं माणूस?"

कांसव खदखदां हंसूं लागलं. पण या खेपेला आकाश कांहीं थरथरलं नाहीं.

"तूं माणूस आहेस तर तुझी सांवली कुठं आहे."

तो अगदीं गांगरून गेला होता. त्यानं आपला देह गळून गेलेल्या हातांनीं चांचपून पाहिला.

अरेच्च्या! आपल्याला हे कल्ले कसे फुटले? हीं खवलं कुणीं लावली? कुणी लावली? कुणी लावली?

गुंहूं ऽऽऽ सोनचाफ्यांच्या रानावरून षड्ज घमघमत आला खरंच, त्याला कल्ले फुटले होते.., त्याच्या खवलावरून सूर्याच्या पागोळ्या ठिबकत होत्या.

आतां त्याच्या सांवलीची गरज त्याला उरली नव्हती. सगळ्या सांवल्यांना डावं घालून तो अस्तित्वाच्या नाक्यापाशीं आला होता.

आतां त्याला कल्ले फुटले होते. खवलं उगवली होतीं.

उंई ऽऽऽ वा ऽऽ काय छान झुलताहेत हे कल्ले?..

घुर्रर्र.. ही अशी लपेट घ्यायची कीं चालला पाण्याच्या वर.. खाली जायचंय्? हात्तिच्या..हें पहा...एक..दोन...तीन..

मत्स्यगंधेला त्याला लिट्ल मरमेडेची गोष्ट सांगायची होती. पण कांहीं केल्या त्याला ती आठवेचना. तो मेंदू–तें मन..तो स्मृतांचा गंज....

तेवढ्यांत कांसवाच्या मनगटावरील घड्याळांत एक विलक्षण गजर झाला नि षड्जाच्या लाटेखालीं तो भिजून चिंब झाला.

खाली जातां जातां कसलं तरी एक भलंमोठं धूड वर जातांना त्याला दिसलं. माणसाचं शरीर असंच हिडीस असतं का? असंच बीभत्स असतं का?

पण माणसाचं शरीर वर जातांना माश्याच्या शरीरासारखं कां दिसतं? शरीर..माणसाचं..माश्याचं..हीं दोन शरिरं.. कीं एकच..? एकच..एकच...पण थोडा फरक असतो. माणसाची सांवली जमिनीवर पडते नि काळा मासा तिला घेऊन तटबंदी पार करून जातो....एवढाच.

तसाच तो कल्ले हलवित निघाला. तोंडानं शीळ घालीत. लफ्फेदार लपेटी घेत.

आतां अस्तित्वालाहि त्याच्यासारखेच कल्ले फुटले होते नि त्याच्यासारख्याच त्याच्या खवलांवर सूर्याच्या पागोळ्या ठिबकत होत्या. हेंच..हेंच..एक अस्तित्व ज्याला सांवली नसते.

सांवली असते ती फक्त माणसाला......

●●●

*मोटारच्या अपघातांत माणसं वांचणं हा सुद्धां एक दैवयोगच ! पण त्यासाठीं यमाचा नियम कसा बदलणार ? कुणाला तरी ठरल्याप्रमाणें घेऊन जाणं हें तर त्याचं नित्य कर्तव्य—*

*पण कधीं कधीं 'नियम' नि 'यम' सुद्धां असे पेंचांत सांपडतात —*



[दर्शनी पडदा उघडतो तेव्हां कव्हरवर पुढील प्रवेश होतो. कव्हरच्या मागें एकांकिकेचें स्थळ आहे.

कव्हरवर दोन काळेकभिन्न यमदूत येतात. प्रत्येकाच्या हातांत फांसाची दोरी आहे. दोघे येऊन दोन बाजूला थांबतात. एका बाजूनें यम येतो. तोही काळा आहे. डोक्यावर शिरोभूषण, दंडावर बाहू-भूषणें आणि हातांत रेशमी दोरीचा फांस आहे.]

**यम** : हाच ना आपला मार्ग ?

**यमदूत** होय महाराज.

**यम** : समय उचित आहे ?

**यमदूत** : होय महाराज.

**यम** स्थळ ?

**यमदूत**: जवळच आहे.

**यम** निमित्त ? यांत्रिक अपघातच ना ?

**यमदूत** : होय महाराज. मोटर म्हणून जे वाहन आहे त्याचा अपघात होणार आहे.

**यम** यादी आहे ?

**यमदूत** : आहे महाराज !

**यम** : चला, हुशारीत रहा...

**यमदूत**: होय महाराज

[अंधार होतो. यम व यमदूत अंधारांत नाहींसे होतात. कांहीं क्षण जातात न जातात तोंच मोटारीचे कर्कश ब्रेक लागल्याचा आवाज येतो. त्या मागोमाग मोटर झाडावर आदळल्याचा प्रचंड आवाज होतो. लोकांच्या किंकाळ्या ऐकूं येतात. एकदम स्तब्धता जाणवते. लोक मोठमोठ्यानें कण्हत असल्याचे कानीं येतें. वातावरण गंभीर होते.

हळुहळू कव्हरचा पडदा उघडतो. रंगमंचावर अजूनही अंधार आहे. लोकांचें कण्हणें चालूच आहे. असेंच कांहीं क्षण जातात. हळुहळू मागील बाजूनें प्रकाश येतो. एक मोडलेलें झाड आणि एका बाजूला कलंडलेली मोटर दिसते. प्रकाश वाढतो. प्रकाशाचा एक झोत मोडलेल्या झाडावर आणि कलंडलेल्या मोटारीवर पडतो नंतर रंगमंचावर प्रकाश येतो.

रंगमंचाच्या मध्यभागीं एका मोठ्या झाडाचा बुंधा आहे. आजु बाजूला गवत व हिरवळ आहे. पुढूनच रस्ता गेला आहे. झाडाच्या जवळच फर्लांगाचा एक दगड दिसत आहे.

मोटारीच्या अपघातात सांपडलेले जीव झाडाच्या बुंध्याशी बसले आहेत, कलंडले आहेत, पसरले आहेत. कुणीं पाय, कुणी डोकें, कुणीं मान, कुणीं पाठ धरून बसले आहेत.

मध्यभागीं विठ्ठलराव ताठे हे वडे वकील आहेत. वय पन्नाशीच्या आसपास. त्यांच्या एका बाजूला खाशेराव खुंटे हे त्यांच्याच वयाचे स्थानिक पुढारी मान धरून बसले आहेत. त्यांच्या जवळच पंडित कोरडे हे पोलिस इन्स्पेक्टर ३५ वर्षांचे दुखावलेला पाय दाबीत


बसले आहेत. खाशेराव खुंटयांच्या जवळच सगुणा कोल्हापूरकरीण विस्कटलेला नखरा सांवरीत आणि इतरांचें लक्ष आपल्याकडे वेधीत पोजमध्यें कलंडली आहे. दुसऱ्या बाजूला कोपऱ्यांत बुजरेपणानें पावकर मास्तर (वय वर्षे ५५) आणि त्यांची तरुण मुलगी त्रिवेणी (२०–२१ वर्षांची) बसले आहेत. त्रिवेणी मास्तरांना कुठें कांहीं लागले आहे काय ते पहात असते. डॉ. लाटकर हेही याच अपघातां-तील प्रवासी आहेत. ते कुणाला तरी तपासत आहेत. कितपत लागले हें पाहण्यासाठीं. ]

**सगुणा** : आई गऽऽऽऽ ! डाक्टरसाब लइच कळा मारत्यात हो पायातनं...

**खुंटे** : हां डॉक्टर, सगुणेचा पाय ठीक असला तर सगळं ठीक म्हणायचं – आमचं काय, मान ताठच्या ताठ राहिली तरी चालेल... मानेवर आमचं पोट नाहीं अवलंबून .. काय सगुणा ?

**सगुणा** : व्हय ना.... म्हणुन तर मगाधरनं डॉक्टरास्नी पाय बगा म्हणुन सांगते....

**डॉक्टर** : सगळं कांहीं बघतो मी. जरा दमानं घ्या. उगांच गडबड आणि आरडाओरडा करूं नका. मी तसं सर्वांना तपासलं आहे. कुणालाही गंभीर स्वरूपाची दुखापत झालेली नाहीं. आतां एवढा मोठा अपघात झाल्यावर थोडासा धक्का हा बसायचाच. थोडसं खरचटणं, मुरगाळणं चालायचंच...

**विठ्ठल** : पण डॉक्टर पाठींत फारच दुखतंय् हो....

**खुंटे** : माझ्या मानेचा मणका मोडला असावा बहुधा ...

**डॉक्टर** : मणकाच नव्हे तर सबंध कणा मोडला तरी इथं कांहींएक करतां येणार नाहीं. हणमू..... (हणमू ड्रायव्हर लंगडत येतो) फार नाहीं ना लागलं तुला ?

**हणमू** : नाहीं...जरा गुडघ्याला मार बसला आहे.

**डॉक्टर** : जरा पलीकडल्या गांवांत जाऊन ये... तिथनं पाणी आण.. एखादी बैलगाडी मिळते का पहा...

**हणमू** : बैलगाडी ह्या वेळेला नाहीं मिळायची—

**डॉक्टर** : तूं इथं शहाणपणा शिकवूं नकोस. . .आधींच हा एवढा अपघात करून ठेवलास—

**हणमू** : मालक, मी काय मुद्दाम केला अपघात! ती साली कोंबडी आडवी आली म्हणून तिला चुकवायला गाडी जरा डावीकडं खेंचली—

**विठ्ठल** : अरे पण दीड दमडीची कोंबडी आणि सात आठ लोकांचे प्राण सारखेच कां रे?

**खुंटे** : अरे कोंबडी काय मरायलाच जन्माला येते. सुरीखालीं नाहींतर मोटारीखालीं—

**हणमू** : साहेब आजपर्यंत मुंगीसुद्धां मारली नाहीं आपण गाडीखालीं...

**डॉक्टर** : समजली तुझी हुशारी. तूं जा आधीं. . .आतां कांहींही बोलूं नकोस आणि सांगूंही नकोस. . .(हणमू लंगडत निघून जातो)

# शुभमंगळ यमकिंकळा


—वसंत सबनीस

**त्रिवेणी** : (मास्तरांना) दादा. . .बरं वाटतंय् ना तुम्हांला आतां?

**मास्तर** : हो बाळ. . .आतां पुष्कळच बरं वाटतंय्. . .कुणालाच फारसं लागलं नाहीं ही देवाचीच कृपा म्हणायची. . . .(विठ्ठलरावांना) वकीलसाहेब.

**त्रिवेणी** : काय पाहिजे तुम्हांला ?

**मास्तर** : कांहीं नको. मला मालतीची काळजी वाटते. पोरगी वाटेकडं डोळे लावून बसली असेल... आजाऱ्याची निराशा होऊं नये कधीं....मी विचारतों वकीलसाहेबांना...वकीलसाहेब.... कांहीं सोय होईल कां हो पुढं जायची ?

**विठ्ठल** : मास्तर अहो सर्वांनाच जायचं आहे पुढं. उगाच घाई करण्यांत काय अर्थ आहे ?

**मास्तर** : तसं नव्हे... माझी मोठी मुलगी मालती फार फार आजारी आहे हो... म्हणूनं तर तुम्हांला गळ घातली कीं, तुम्ही जाताच

आहांत शहराकडं तर मला आणि माझ्या मुलीलाही घेऊन चला म्हणून... तुमचे उपकार म्हणून तुमच्या गाडींतून इथपर्यंत आलों...पण मुलीची चिंता वाटते हो...म्हणून विचारलं...

**खुंटे** आम्हांला काय हौस आहे इथं बसायची ? तुम्हाला जसं मुलीकडं घाईनं जायचं आहे तसा आम्हांलाही सगुणाबाईचा कार्यक्रम पाहण्याची घाई आहे.

**सगुणा** : उगा हरबऱ्याच्या झाडावर चढवूं नगा मला बरं कां खाशेराव...

**पंडित** नाहीं हं बाई...आम्हीसुद्धां खाशेरावांच्या बाजूचे आहोंत.

**सगुणा** : पर पाय तर घड पायजेल ना नाचाया ?

**खुंटे** : डॉक्टर, बाकी सगळं राहूं दे सगुणेचा पाय बघा आधीं....

**मास्तर** : (विठ्ठलरावास)...वकीलसाहेब, इथं बैलगाडी मिळेल कां हो?

**विठ्ठल** : मास्तर... मी काय गाडीवान आहे कां माझी स्वतःची बैलगाडी आहे ? अहो सर्वांचाच खोळंबा झाला आहे.

**त्रिवेणी** : दादा... तुम्ही जरा स्वस्थ बसा...तुम्हीच ताईला परवां लिहलंत कीं देवावर मरवसा टाक...आपणही तेंच करूं या...

**खुंटे** : बाकी कांहीं म्हणा वकीलसाहेब, घोडक्यावर निभावलं...नाहीं तर सगुणाचा नाच कांहीं या जन्मीं बघायला मिळाला नसता.

**पंडित** : थँक गॉड, अहो आणखी दहा वीस फूट पुढं गेल्यांवर हा अपघात झाला असता तर आपली हाडं सुद्धां हाताला लागली नसती. तो पाहिलात तिथं केवढा मोठा खड्डा आहे तो ?

**विठ्ठल** : म्हणजे हणमूनं दहा फूट अलीकडं अपघात करून सुद्धां आपल्यावर उपकारच केले म्हणायचे ?

**मास्तर** : खरोखर त्रिवेणी आज परमेश्वरानं फार फार मोठे उपकार केले आहेत... त्यानं आणखी थोडी दया दाखवून मालतीची भेट घडवावी एवढीच इच्छा आहे पोरी.....




"परवांच 'श्रमदान' विषयावर हे व्याख्यान द्यायला गेले होते तेव्हां म्हटलं घरीं जरा प्रात्यक्षिक करा—"

**त्रिवेणी** : दादा...तुम्ही असं बोलूं लागलांत कीं, माझाही धीर खचतो. जरा धीरानं घ्या...कांहींतरी मार्ग सांपडेल आपल्याला...

**विठ्ठल** ही पाठ काय करते कुणास ठाऊक ? उद्यां तारीख आहे माझी कोर्टांत...

**खुंटे** अहो कोर्टाची तारीख पुढं ढकलतां येईल...पण सगुणेच्या गाण्याचा योग हुकला असता तर पुन्हां आला नसता लौकर. तुम्ही, मी, डॉक्टर आणि पंडितराव असे एकत्र असल्याक कार्यक्रमाला असा रंग चढेल म्हणता – अहो म्हणून तर तिला मी मुद्दाम बोलावून आणली.

**सगुणा** : सांगलीची सुपारी सोडली न्हवं का मी यासाठीं. खाशेरावंचा शबुद म्हंजी हुकूमच हाय....

**पंडित** : पणं खाशेरावच तुमच्या हुकुमांत असतात—

**सगुणा** : या बया ! माजा वं कसला आलाय हुकूम...तुमी तालेवार मानंसं... तुमची शेवा करायला मिळाली...लई झालं...

**विठ्ठल** : तरी पण उद्यांची तारीख महत्त्वाची आहे हो....

**सगुणा** : त्या मास्तरसाहेबाना पोरीची तशी वकीलसाहेबाना तारखंची काळजी लागली कां काय ? तुमास्नी जास्त काइ सांगत न्हा पर लई वकिलांनीं तारखा चुकविल्या माजं गानं ऐकन्यापायीं

**पंडित** : आणि वकीलसाहेब, अहो आज खुद्द यमाची तारीख होती ती सुद्धां आपण चुकवली. तिथं कोर्टाच्या तारखेचं का घेऊन बसलांत ?

**खुंटे** हां, हे बाकी खरं. अहो त्या कामराज योजनेसारखी यमाची योजना या रस्त्याला लागूं झाली असती तर ताडकन् सात आठ जागा खाली झाल्या असत्या ना एकदम !

**डॉक्टर** अरे आमचा जन्म गेला यमाला ढुलकावण्या देतां देतां आणि त्याच्या तारखा चुकवतां चुकवतां...

**विठ्ठल** अपघातांतून बचावलात म्हणून सुचताहेत ह्या कल्पना. प्रत्यक्ष यमाचं दर्शन झालं असतं म्हणजे डोळे पांढरे व्हायची वेळ आली असती.

**मास्तर** अहो, कशाला बोलतां असल्या गोष्टी तिन्ही सांजेच्या वेळीं

**त्रिवेणी** तुम्ही बोलूं नका दादा.....

**मास्तर** : अगं नको कसा...शुभं करोति कल्याणम् म्हणायच्या वेळीं वगैरे विषय हवेतच कशाला ? कांहीं नडलं आहे त्यावांचून

**त्रिवेणी** आपण चूप बसलेलं बरं......

**खुंटे** : यमाला सुद्धां चूपचाप परत जावं लागेलं असेल—

**पंडित** अहो, आपलं मरण म्हणजे यमाची चैन आणि आपलं जगणं म्हणजे यमाला अपघात (मास्तर व त्रिवेणी वगळून सर्वजण हंसतात.)

**डॉक्टर** : वा ! पंडितराव...मला वाटलं होतं पोलीस म्हणजे अगदी खरजेच्या मलमाच्या जाहिरातीसारखा रुक्ष मनुष्य...पण नाहीं तुमचं हें वाक्य ऐकून खुद्द यम सुद्धां खूष झाला असता बरं कां

**पंडित** : पण यमाला एवढी विनोद बुद्धी तरी आहे का ?

**विठ्ठल** : फारच गहन प्रश्न आहे हा ! यमाशिवाय कोण उत्तर देणार याचं ?



## सांज येते

सांज येते लडिवाळ पोर...
पायांतील पैंजणं नाचवीत, वाजवीत

डोळ्यांत दाटतात गोधुळीची वादळं
पापण्या होतात जडशीळ...
गर्भवतीची मंदमंद चरणचाल...

सांज म्हणते झिपऱ्या सांवरून
"कुणी ग! तुला टाकलन् भारून...?"

रात्र येते...काळ्या बुरख्यांतील जरिनाबीबी
दार ठोठावते...आंत डोकावते...
तिच्या बुरख्याच्या सोनेरी टिकल्या.
तडतडतात माझ्या मनांत...

जरा थबकून उभी असते दारांत
म्हणते – "ह्या ग! कसल्या ठिणग्या उरांत?"

हळूं हळूं झोंप येते
डोळ्यांवर थरथरणारी बोटं फिरवून जाते
माझी चंदेरी केसांची आजी....

थरथरत्या बोटांची अजब जादुगिरी
अलगद उमलते स्वप्न नगरी
स्वप्नांत नेहमीच कुणितरी येतं...
हळवा स्पर्श करून जातं.

जे एरव्ही कधीही येणार नसतं
अभिमंत्रित शब्द बोलणार नसतं...

झोंप सुद्धां आजीसारखीच वटारते डोळे...
म्हणते, "आतां पुरे झाले तुझे चाळे....
झोंपेत फक्त झोंप घ्यावी.
दिवसा हवी तर स्वप्नं पहावीं....

—निर्मला देशपांडे

---

**पंडित** : तो कशाला येतोय् इथं धडपडायला....आज तरी त्याला इथं कांहीं एक काम नाहीं.

(या वाक्याबरोबर यम आणि यमदूत, झाडाच्या बुंध्यामागून पुढें येतात.)

**यम** : (येतां येतां) आज इथंच काम आहे माझं (सर्व जण नवागताकडे पाहतात आणि जागच्या जागीं सांवरून बसतात. सगुणा खुंटे यांच्या अंगावर रेलते. खुंटे तिला सांवरतात. मास्तर आणि त्रिवेणी एका कोपऱ्यांत उभे राहतात) (यमदूतास)...इथंच ना?

**यमदूत** (आजुबाजूला..इकडे तिकडे पहातो) महाराज...क्षमा करावी...

**यम** : काय झालं ?

**यमदूत** : वर्णन आहे ते अशाच जागेचं आहे. असाच रस्ता. असंच झाड.. पण.....

**यम** : पण काय ?

**यमदूत** : पण महाराज...दिग्पालांचा दिशा दाखवण्यांत कांहीं तरी घोटाळा झाला आहे.

**यम** : कसला घोटाळा ?

**यमदूत** महाराज, आपण दक्षिण ध्रुवापासून चार सहस्र योजनांवर आहोंत...आपली जागा उत्तर ध्रुवापासून चार सहस्र योजनांवर आहे....

**यम** अस्सं !...

**यमदूत** : चूक दिग्पालांची आहे महाराज...सेवकाची नाहीं....

**यम** (क्षणभर विचार करतो) ठीक आहे. अधिक बोलूं नका. दूर उभे रहा.

(यमदूत दूर जाऊन उभे राहतात. यम पुढें येतो.)

**विठ्ठल** : कोण आहांत तुम्ही ?

**यम** : माझं नांव यम....

**मास्तर** : यम...यम म्हणजे...(त्रिवेणी मास्तरांच्या तोंडावर हात ठेवते)

**विठ्ठल** : आडनांव ?

**यम** : आडनांव नाहीं.

**खुंटे** : तुम्हांला यायला आडवाट तेवढी दिसली.....

(यम असा येईल यावर कुणाचाच विश्वास नसल्यानें सर्वजण ही थट्टाच समजतात.)

**विठ्ठल** : आडनांव नाहीं असं कसं होईल ?

**यम** : आडनांव माणसाला असतात...देवांना नसतात.

**खुंटे** अरे वा ! म्हणजे तुम्ही देव आहांत तर ! वकीलासाहेब, हे देव असतील तर यांचं म्हणणं बरोबर आहे. अहो रामाला कुठं आडनांव होतं ? कृष्णाचं तरी कुणाला माहीत आहे ? विष्णूचं आडनांव ऐकलंय् कुणीं ?

**पंडित** यांचं नांव यम असो वा नसो...पण हा आला मात्र एकदम यमासारखा हें मान्य केलंच पाहिजे आपल्याला.

**विठ्ठल** : वरं गांव तरी असेल ना ?

**यम** नाहीं.

**खुंटे** : अहो ! वकीलसाहेब पलीकडच्या गांवांत आज असेल सावित्रीचं नाटक...

**पंडित** : असेल....तसंही असेल. नाहींतर इतका हुबेहूब यमासारखा कसा दिसला असता हा ! काय दोस्त, आम्ही यावं का नाटकाला ?

**विठ्ठल** : आतां खेड्यांतूनही चांगली नाटकं करतात बरं !

**यम** : मी खरा यम आहे....

**खुंटे** : असूं दे ... असूं दे... तूं कांहीं चिंता करूं नकोस. अरे, आम्ही तरी खरा यम कुठं पाहिला आहे ? तो तुझ्यासारखा दिसतो का माझ्यासारखा दिसतो हें कुणाला माहीत आहे ?

**पंडित** : वटसावित्रीला बायका चित्र आणतात ना त्याचं घरांत...पण तो रेड्यावर बसलेला असतो...खांद्यावर गदा असते...

**खुंटे** : गदा नसली म्हणून काय झालं ? तुम्ही पोलीस इन्स्पेक्टर आहांत म्हणून काय सगुणेच्या गाण्याला जातांनाही पिस्तूल बरोबर नेतां का ? तसंच गदेचंही आहे.

**विठ्ठल** : पण रेडा तरी नको का ?

**डॉक्टर** : रेडा गेला असेल पाणी प्यायला—नाहींतर चरायला—



अनुक्रमणिका

**सगुणा** : खाशेराव, लईच काळां हाय न्हवं ह्यो...मला तर म्याच वाटतंया बाई...

**खुंटे** तूं घावरूं नकोस. आम्ही आहोंत ना इथं...असले पुष्कळ यम बघितलेत आम्ही...विरोधी पार्टीचे लोक आम्हांलासुद्धां कांहीं वेळां यमासारखे वाटतात...म्हणून घावरतो कां काय आम्ही ?

**यम** : पुन्हां सांगतो. मी यमच आहे.

**पंडित** यम आहेस तर रेडा दाखव ! आमच्या मराठी माषेंत एक म्हण आहे—बाप दाखव नाहींतर श्राद्ध कर !

**डॉक्टर** : बाबा रे ! आम्ही सध्यां आमच्या फिकीरींत आहोंत...तुझ्या सोंगाचं कौतुक करायला वेळ नाहीं आम्हांला...शिमग्याची सोंगं गांवांत फिरवायची गांवाबाहेर नाहीं...जा आतां.

**विठ्ठल** : आणि कां रे ? तुम्हांला दुसरी चांगली सोंगं नव्हती घ्यायला?

**डॉक्टर** पंडितराव...तुम्हीच व्हा पुढं.....

**पंडित** : ए...चला चालायला लागा मुकाट्यानं...तुम्हांला माहीत नसेल. मी पोलिस इन्स्पेक्टर आहे....

**यम** : मी यम आहे.

**सगुणा** : खाशेराव, मला म्या वाटतंया....

**खुंटे** पंडितराव, पोलीशी हिसका दाखवा तुमचा...कोण असतील कुणास ठाऊक ? अपघात झाला आहे. जातां जातां कांहीं हाताला लागलं तर तेवढंच...

**पंडित** नेम नाहीं त्याचा. देवादिकांची सोंगं घेऊन खेडुतांना अडवतात हे लोक बऱ्याच वेळां...ए...पुन्हां एकदां सांगतो कीं, मुकाट्यानं चालायला लागा. नाहींतर एकेकाला गचांडी द्यावी लागेल मला...

**मास्तर** (भीत भीत)...पण खात्री करून घेतलेली बरी...न जाणो खरोखरच यमराज असले तर...

**विठ्ठल** : मास्तर तुम्हांलाच आता वेड लागलं असं म्हटलं पाहिजे. अहो, तुमच्यासारख्या सुशिक्षितांनीं यमावर विश्वास ठेवावा म्हणजे आश्चर्य आहे.असं बोलून तुम्ही त्याला शेफारून मात्र ठेवाल. तेव्हां तुम्ही जरा गप्प बसा आणि नुसतं बघा काय काय होतंय् तें.....

**सगुणा** : खाशेराव, ह्ये कसलं पोलिस इनिस्पेक्टर...एवढी रस्त्यावरली मानसं घालेवितां येत न्हाइत...

**पंडित** ए दांडग्यानो...आता मात्र खरोखर धक्के द्यावे लागतील मला...

(यमावर व यमदूतावर याचा कांहींही परिणाम होत नाहीं.)

**यम** (पहिल्या इतक्याच शांतपणें) जरा यादी वाच...

**यमदूत** : (यादी वाचूं लागतो.) इथलीही यादी आणली आहे, महाराज.

**यम** : वाच ती...

**यमदूत** : खाशेराव हैवती खुंटे...वय ४९ वर्षें सात महिने तीन दिवस..

**खुंटे** : (आश्चर्यानें ). आं !!

**यम** निमित्त ?

**यमदूत** : हृदयविकाराचा झटका...

**खुंटे** : बाप रे !...(विठ्ठलराव व सगुणास )...माझ्या छातींतून जोराची कळ येते आहे...आई ग ssss...छे: छे: सहन नाहीं होत... (सर्व जण खाशेरावकडे धांवतात. डॉक्टर नाडी तपासतात. कुणीं वारा घालतात. खाशेराव सगुणेच्या मांडीवर डोकें टेकतात. सर्व जण गंभीर होतात.)

**यम** : पुढचं नांव ?

**यमदूत** : डॉक्टर श्रीधर लाटकर...वय एकावन्न वर्षें...दोन महिने...सात दिवस...

**डॉक्टर** : कुणीं सांगितली तुम्हांला एवढी बिनचूक माहिती ?

**यम** : निमित्त ?

**यमदूत** चक्कर येणें...

**डॉक्टर** : (एकदम)...थांबा...मला चक्कर येते आहे...मला कससंच होतं आहे... वकीलसाहेब...खाशेराव...(खालीं पडतात.)

**सगुणा** (रडूं लागते) फौजदार साब...मला म्या वाटतंया...

**मास्तर** : (गंभीरपणें) कैलासराणा शिव चंद्र मौळी
फणींद्र माथा मुकुटीं झळाळी
कारुण्यसिंधू भवभीति हारी
तुजवीण शंभो मज कोण तारी ।।

[एक क्षण भर सर्वत्र अंधार होतो. पुन्हा प्रकाश येतो. परिस्थिती आहे तशीच आहे. खाशेराव हळूंहळूं उठतात. डॉक्टरही उठून बसतात. दोघेंही यमापुढें लोटांगण घालतात.]

**खुंटे** : महाराज...दया करा चूक झाली... नकळत अवज्ञा झाली... अपराधी आहे....

**सगुणा** : खाशेराव... खाशेराव

**खुंटे** : सगुणे हे सोंग नाहीं... हे साक्षात् यमराज आहेत...ओळख पटली मला.....




घात झाला मॅनेजरसाहेब...अफझलखान मरावयास आज तयार नाहीं.

TOM & BAY/KOEL/E-3/64






# For high load carrying capacity




THIN-WALLED

# BEARINGS & BUSHES



Thin Walled Bi-metal Bearings represent a major step in ensuring smooth and trouble-free running of the engine.

Kirloskars in collaboration with Glacier Metal Co. Ltd. of England manufacture quality Thin Walled Bearings that guarantee perfect engine performance.

Quality plus features;– High load carrying capacity, Extremely long life, Compatibility with conventional crankshaft materials, High resistance to corrosion.



**KIRLOSKAR OIL ENGINES, LIMITED**
ELPHINSTONE ROAD, POONA-3 (INDIA)

**डॉक्टर** महाराज...अपराध पोटांत घ्या...करुणा धरा...कींव करा... • शरणागतास अभय द्या...

**विठ्ठल** डॉक्टर... तुम्ही सुद्धां ?

**डॉक्टर** : होय वकीलसाहेब...हे यमराजच आहेत...आपण चुकलों. त्यांना ओळखलं नाहीं

(मास्तर आणि त्रिवेणी हात जोडून उमे आहेत)

**यम** : हा:ऽऽ हा:ऽऽ हा: ऽऽऽ (हंसतो)

**डॉक्टर** नका...असे हंसूं नका...हंसण्याची सुद्धां भीति वाटते...

**यम** : हंसूं नको तर काय करूं ? तुम्हा मानवांचा साध्या सरळ गोष्टीवरसुद्धां विश्वास बसत नाहीं. माझी ओळख त्या मानानं लौकर पटली म्हणायची ! नाहींतर बहुतेकांना माझी ओळख पटते तेव्हां फार फार उशीर झालेला असतो.

**विठ्ठल** : आम्ही तर्कशुद्ध विचार करतों...

**यम** : मूर्ख आहांत तुम्ही. तुम्हांला तुमच्या बुद्धीची घमेंड आहे. माझा पराभव केल्याचा आनंद तुम्ही थोडयाच वेळापूर्वी व्यक्त केलांत...पण वेडयांनो, अजूनपर्यंत माझा कुणींही पराभव करूं शकलेलं नाहीं. जगाचा नव्हे, विश्वाचा स्वामी होण्याची महत्त्वाकांक्षा धरणारा बलाढयांतला बलाढय पुरुषसुद्धां माझ्यापुढं हतबल ठरतो. तिथं धन्वंतरी असल्याची बढाई मारणारा हा देह मला अनेकदां हुलकावण्या दिल्याच्या गोष्टी करीत होता. आत्तां त्याचं नुसतं नांव उच्चारल्याबरोबर त्याचे डोळे पांढरे झाले...

**डॉक्टर** : चूक झाली महाराज.....

**यम** : मूर्खांनो ! तुम्ही श्वापदं, रोग, कीटक यांच्यावर विजय मिळविलात म्हणून गर्व वाळगतां. पण मरणाला परतविण्याचं सामर्थ्य एकाही मानवांत नाहीं. तुम्ही आकाशाची हद्द ओलांडलीत किंवा पाताळाचा तळ शोधलांत तरी स्मशानाची सीमा तुम्ही ओलांडूं शकत नाहीं. सरडयाला कुंपणापर्यंत आणि मानवाला स्मशानापर्यंतच धांव घेतां येते...हा पोलीस इन्स्पेक्टर असल्याचा अहंकार धरणारा क्षुद्र जीव मला दमदाटी करीत होता... अरे ! गांडुळानं आपण साप आहोंत असं एखाद्या क्षुद्र आळीला सांगावं... मुंगसाला नव्हे !

**विठ्ठल** : आमच्या हातून अक्षम्य अपराध घडला आहे. पण आपण उदार मनानें क्षमा करावी.

**मास्तर** : महाराज, आम्ही पामर भ्याड आहोंत. प्रपंचाच्या काळजीनं भित्रे झालों आहोंत... आमच्यावर दया करावी...

**यम** म्हणजे मी काय करावं अशी आपली अपेक्षा आहे...

**पंडित** मार्गस्थ व्हावं...आशीर्वाद द्यावा....

**यम** :मार्गस्थ होऊं ? अशक्य आहे... मी यम असलों तरी मलाही नियम आहेत. आम्ही सहसा जातीनं कुठं जात नाहीं. पण गेलोंच तर रिक्त हस्तानं परतत नाहीं.

**खुंटे** याचा अर्थ—

**यम** याचा अर्थ उघड आहे. आम्हीं रिक्त हस्तानं परत गेलों तर आमची अप्रतिष्ठा होईल...

**विठ्ठल** : महाराज माफी असावी...पण केवळ प्रतिष्ठेसाठीं एखाद्याचा प्राण नेणं म्हणजे....

**यम** : आमचा नित्याचा खेळ आहे ! तुम्ही क्षुद्र मानवसुद्धां खोटया प्रतिष्ठेसाठीं युद्ध करतां आणि त्यांत लाखो जीव बळी देतां—

**विठ्ठल** : पण आम्ही अपघातांतूनसुद्धां बचावलों आहोंत—

**यम** : त्यांत आपलं कर्तृत्व मुळींच नाहीं. आम्ही आलों होतों पण समय आला नव्हता... आमच्या दप्तरीं थोडी चूक झाली म्हणून तुम्ही वांचलांत.

**खुंटे** पण कांहींतरी तडजोड....

**यम** : तडजोड ? मृत्यूशीं तडजोड ? अशक्य – केवळ अशक्य !

**पंडित** : महाराज...जरा परिस्थितीचा विचार करा...

**विठ्ठल** : न्यायाधीशाची चूक कधींही होतां कामा नये.....

**यम** : बस्स ! मला वाटतं जेवढया स्पष्टपणानं सांगतां येईल तेवढया स्पष्टपणानं आम्ही आपल्याला सांगितलं आहे. तुमची तयारी असो किंवा नसो एक प्राण मला नेलाच पाहिजे. तुमच्यापैकीं कुणीं आपणहून यायला तयार असेल तर हा प्रश्न लौकर सुटेल....आहे कुणीं तयार ? (सर्व जण अस्वस्थ. चुळबूळ.)

**मास्तर** : महाराज, माझी मोठी मुलगी अतिशय आजारी आहे. तिला भेटण्यासाठीं मी निघालो आहे. ती माझ्या वाटेकडं डोळे लावून बसली आहे. माझं तिच्यावर फार फार प्रेम आहे....मी कसा तयार होऊं तुमच्याबरोबर यायला ?

**विठ्ठल** :जगांत गरीबांना न्याय मिळावा म्हणून आसुरी प्रवृत्तीशीं झगडण्यांत माझा उभा जन्म गेला. त्या दीनांची सेवा अपुरी राहील....शिवाय माझ्या महत्त्वाच्या अशा आठ तारखा पुढल्या दोन महिन्यांत आहेत.

**डॉक्टर** : रोज माझ्याकडे पन्नास पाऊणशे रोगी येतात. त्यांचा मीच एकमेव आधार आहे. त्यांचा विश्वासघात केल्यासारखं होईल.... मानवतेची सेवा ही ईशसेवेहून थोर मानली जाते... तेव्हां...

**पंडित** महाराज, मी काय सांगणार ? परित्राणाय साधूनाम् विनाशायच दुष्कृताम् हे प्रत्यक्ष भगवंताचंच कार्य मी करीत आहे. हे भगवत्कार्य अर्धवट टाकून मी कसा येऊं ?

**खुंटे** : महाराज, मी जनतेचा पुढारी आहे. लोकशाहींतील राजा आहे. जनसेवा हेंच माझे ब्रीद आहे.. मी गेलो तर गरीबांना वाली राहणार नाहीं, निराधारांना आधार मिळणार नाहीं, निराश्रितांचा आश्रय तुटेल, जनता विधवेप्रमाणें असहाय्य होईल, घरोघर दुःखाचा डोंब उसळेल...फार अनर्थ माजेल.

**सगुणा** : आन् माजं बी लई नुकसान हुईल. खाशेराव म्हंजी माकर हाय माजी म्हाराज...

**खुंटे** : जरा गप बैस कीं सगुणे...

**त्रिवेणी** : महाराज, दादांच्या संसाराचा भार मी हलका करते. आईला आतां होत नाहीं. भावंडं लहान आहेत. घर माझ्यावर आहे.

**यम** बाळ, तुझा कांहींही संबंध नाहीं यात. तूं निश्चिंत रहा...(इतर सर्वांना) याचा मतितार्थ इतकाच कीं तुम्हीं कुणींही तयार नाहीं.

**विठ्ठल :** महाराज, क्षमा करा. पण पकड वॉरंट असल्याशिवाय संशयितालाहि पकडतां येत नाहीं.

**यम** (मोठ्यानं हंसून) आपली वकिली भाषा आम्ही समजूं शकतों.

**विठ्ठल :** वकिली भाषा म्हणून नाहीं...पण आपल्यासारख्या महापुरुषाच्या हातून अन्याय होऊं नये म्हणून...

**यम :** मृत्यु कधींही अन्याय करीत नाहीं. तुमची कांहीं वेळां तशी समजूत होते—

**विठ्ठल :** पण महाराज, आपण कुणाचे प्राण नेणार ? आपलाही कांहीं कायदा असेलच कीं—

**यम :** अर्थात्...आमच्या हातून जसा अन्याय होत नाहीं तसं नियमबाह्य वर्तनही होत नाहीं. कुणाचे प्राण हरण करावयाचे असा प्रश्न जेव्हां निर्माण होतो तेव्हां जो अधिक पुण्यवान असेल तो जीव नेण्याची आमची प्रथा आहे. त्या प्रथेला अनुसरून...

**खुंटे :** म्हणजे ज्यांची पापं अधिक असतील त्यांना भीति नाहीं... असंच ना ? मग आपल्याला घोर नाहीं.

**यम :** आपण सर्वजण इतके पापी असाल असें वाटत नाहीं. फार प्रतिष्ठित मानव दिसता तुम्ही.

**विठ्ठल :** महाराज, प्रतिष्ठेचा आणि पापांचा काय संबंध ? पाप हे व्यक्तिगत असतं प्रतिष्ठा सार्वजनिक असते... आणि महाराज, तसं म्हणाल तर रोजच्या जीवनांत आम्ही पापपुण्याचा विचारही करीत नाहीं.

**यम :** पण आतां करावा लागेल. . . .

**मास्तर :** महाराज, मी एक साधा शाळा मास्तर आहे. माझ्या हातून पापं झालीच नाहींत असं मी कसं म्हणूं ?

**खुंटे** मास्तर तुमची पापं नंतर सांगा...पापांच्या बाबतीतही आमचा मान पहिला आहे.

**विठ्ठल :** महाराज...मी तर अत्यंत पापी आहे.

**खुंटे :** आणि आम्ही काय कमी पापं केलीं आहेत ?

**पंडित :** अहो तुमचीं पापं फक्त राजकीयच असतील...

**खुंटे :** आम्ही पुढारी झालों म्हणून काय फक्त राजकीय पापंच केलीं पाहिजेत असं थोडंच आहे ?

**डॉक्टर :** माझी खात्री आहे कीं, डॉक्टर इतकी पापं कुणीच करीत नसेल जगांत...

**विठ्ठल :** काय असतील ती पापं सांगा... आज पापांची पुण्याईच तारणार आहे आपल्याला. महाराज, मी सांगतों. खोट्या साक्षी तयार करण्यापासून तों दरोडे घालणाऱ्या गुन्हेगारांच्या धंद्यांत भागीदारी करण्यापर्यंत माझ्या पापांची मजल गेली आहे.

**पंडित :** काय म्हणतां वकील साहेब ? म्हणजे नरशा बेरडाचं तें प्रकरण...

**विठ्ठल** होय... म्हणून तर तुम्हांला एवढी गळ घालून त्याच्यावरचा खटला काढून घ्यायला लावला...

**मास्तर :** वकीलसाहेब, तुमच्या सारख्या सज्जन माणसाच्या हातून असं घडणंच शक्य नाहीं.

**विठ्ठल :** मास्तर....तुम्हांला काय वाटतं तें इथं नको आहे, मी खरं तें सांगतो आहे. तुम्ही मधें मध्यें बोलूं नका...तर महाराज, या दरोड्यांत खुंटेसाहेबांचाही वांटा—

**खुंटे** हां हां... वकीलसाहेब, तुम्ही फक्त तुमच्या पापाबद्दल बोला. दुसऱ्याच्या पापांत ढवळाढवळ करण्याचा तुम्हांला कांहीं अधिकार नाहीं.

**विठ्ठल :** महाराज, हरणगांवच्या गंगाराम तेल्याच्या विधवेला फसव… तिच्या नवऱ्याचें मृत्युपत्र खोटं ठरवलं....

**खुंटे :** वकीलसाहेब, हा नीचपणा तुम्ही करायला नको होता...तरी… तुम्हांला सांगत होतो...माझे संबंध लक्षांत घेऊन तरी...

**डॉक्टर :** तुमचा काय संबंध खाशेराव यांत ?

**खुंटे :** माझा मृत्युपत्राशीं संबंध नाहीं पण विधवेशीं आहे.

**सगुणा :** खाशेराव, मी तवा इचारलं तवा कानांवर हात ठिवलेंत तुमी.

**विठ्ठल :** या गोष्टी नंतर बोलतां येतील आपल्याला. तर महाराज..

**यम :** संपली सांगून तुमचीं पापं ?.

**विठ्ठल :** एवढ्यानं काय होतंय् महाराज ? माझी बायको अतिशय सुं… असूनही माझी चार ठिकाणीं अंगवस्त्रं आहेत...

**खुंटे :** महाराज, हे कांहीं पापांत येत नाहीं. तसं म्हटलं तर मग मा… पापं कितीतरी पटीनं वाढतील...अनेक बायकांशीं संबंध अ… हे देवांनीं सुद्धां केलं... वकीलसाहेब ही असली फुसकी पा… सांगण्यांत वेळ घालवूं नका...

**विठ्ठल :** महाराज, या चार अंगवस्त्रांच्या मागण्या पुऱ्या करण्यासा… घरांतले दागिने चोरून विकावे लागले....

**मास्तर :** छः छे : वकीलसाहेब...काय सांगतां आहांत काय तुम्ही ! दुसऱ्या कुणीं सांगितलं असतं तर तिळभरही विश्वास ठेव… नसता मी....

**त्रिवेणी :** दादा, तुम्हांला काय करायचं आहे बोलून ? तुम्ही ग… बसा बघूं...

**मास्तर :** पोरी गप्प बसवत नाहीं... हे धक्के सहन होत नाहींत

**विठ्ठल :** महाराज, एका खुनाच्या पापानेंही माझे हात बरबटलेले आहे…

**खुंटे :** हां... हां... वकीलसाहेब, खुनाचं पाप माझं आहे. तें तुमच्या ना… वर मी खपवूं देणार नाहीं. तुमचा त्याच्याशीं तसा कांहीं प्रत्यक्ष संबंध नाहीं...

**विठ्ठल** नाहीं कसा ? मीच तर तुम्हांला पुरावा नष्ट क… करायचा तें सांगितलं.

**खुंटे :** ते सांगितलं असेल म्हणून काय खुनाचं सगळं पाप तुम्ही घ… की काय ?

**सगुणा :** कुनाच्या वं खुनाचं सांगत्यात वकीलसाब...

**विठ्ठल** रामा हरीच्या –

**सगुणा** रामा हरीच्या व्हय – मला वाटलं त्या सातप्पा पाटला… खुनाबद्दल म्हनताया कां काय ? लई तरास दिला त्येनं म…

**डॉक्टर :** माझाही त्यांत हिस्सा आहे. मी मृत्युचं खोटं सर्टिफिकेट दि… होतं....

**पंडित :** आणि मी रिपोर्ट केला तो ?

**खुंटे :** महाराज, हे खुनाचं पाप वकीलसाहेबांच्या नांवावर धरूं न…

**यम :** मग ?

अनुक्रमणिका



## जून

जून आला ग जून आला
ओढे नाले भरून भरून
लाल पाउस गर्जत आला
...जून आला ग जून आला!

जाभळें ऊन भिजत आलें
सावळा रंग फिरत आला
रोमांचाचा थवाच थवा.
सरीबरोबर झरूं लागला...

हिरवा वारा गुंगत आला
युगायुगांनी भेट झाली...
उराउराची गांठ पडतां
कितीक वर्षे गळून गेली!

झाडावरच्या मोरांनी ग
पिसें पसरून सय काढली.
पिवळी पानें गळतां गळतां
जुने कांहीं सांगुन गेली!

खेळ तुझा आवरून घे
झालों जियून तियली हांक.
जाणें होतो तियें जातों...
तुझें कवाड झांकून टाक!

...जून आला ग...
जून आला ग...

—प्रा. अं. दि. माडगूळकर

---

खुंटे : मी सांगतो काय झालं ते? मी निवडणुकीचं तिकीट मिळवण्याच्या खटपटीत होतो.

यम : मग त्याचा काय संबंध?

खुंटे : मी एका स्त्रीला फसवून तिची इस्टेट लुबाडली होती. आमच्या गल्लींत राहणारा रामा हरी हा त्या स्त्रीचा लांबचा नातलग होता. त्याला ही सगळी मानगड माहीत होती.

यम : बरं, मग?

खुंटे : मला निवडणुकीचं तिकीट मिळूं नये म्हणून त्यानं या भानगडीचा उपयोग करण्याचं ठरवलं. त्यानं अनकांना पत्रं लिहिली. मला तिकीट मिळूं नये म्हणून माझी बदनामी केली....

यम : म्हणून तूं काय केलंस?

खुंटे माझी सबंध करियर निवडणुकीवर अवलंबून होती. अशा वेळीं रामा हरीला माझ्या मार्गांतून कायमचा दूर केल्याशिवाय मला दुसरा मार्गच नव्हता.

यम : मग काय केलंस?

खुंटे : मी त्याला समझोता करण्यासाठीं शेतावर बोलावलं. रात्री कोंबडीचं जेवण घातलं आणि परत जातांना त्याचा सफाईनं गळा दाबून....

यम : आणि मग?

खुंटे : डॉक्टरना बोलावून आणलं — हा अपघातानं मेला हे सिद्ध करण्यासाठीं काय काय करावं लागेल हें विचारलं...

यम ह्या डॉक्टरनं तें सांगितलं?

खुंटे : हो, रामा हरीचा मुडदा शेतापासून लांबच्या रस्त्यावर झाडाखालीं ठेवला. रातोरात गड्यांना पिटाळून एक साप अर्धमेला मारून आणला. तो रामा हरीच्या पायाला गुंडाळून ठेवला. त्याचं तोंड रामा हरीनं चेचलं असावं असं दिसेल असा तो ठेवला... रातोरात वकीलसाहेबांना बोलावून घेतलं. पुरावा नाहींसा करण्यासाठीं काय काय करायला पाहिजे तें विचारलं...

यम : मग, पुढं?

खुंटे : सकाळीं मीच माणूस पाठवून त्याला बोंब मारीत गांवांत यायला सांगितलं... मी पुढारीपणानं सगळ्या गोष्टी केल्या. डॉक्टरना नेलं. साप चावून मेल्याचं सर्टिफिकेट घेतलं. रामा हरीची बायको आणि मेव्हणा परगांवीं होते. ते परत यायच्या आंत त्याची मर्तिक पण उरकून टाकली. त्याचा एक पुतण्या होता गांवांत. त्याच्या हातून क्रियाकर्मांतर केलं.

मास्तर : अरेरे! फार दयाळू माणूस होता रामा हरी म्हणजे.... संकटाच्या वेळीं देवासारखा धावून येत असे.

विठ्ठल : मास्तर, ही काय रामा हरीच्या दुखवटयाची सभा आहे? तुम्हांला मधें मधें बोलूं नका म्हणून सांगितलं तरी तुम्ही गप्प बसत नाहीं....त्रिवेणी, तुझ्या बापाला सांग जरा नीट....

खुंटे : पुढं रामा हरीच्या मेव्हण्यानं पोलीसांत तक्रार नोंदवली.

पंडित : मीच चौकशी केली... खाशेरावांनीं मला बढती देण्याचं आश्वासन दिलं आणि रोख पांचशें रुपये दिले... मी तक्रार खोटी असल्याचें आणि रामा हरी हा सर्पदंशानेंच मयत झाल्याची आपली खात्री पटल्याचें रिपोर्टांत लिहिलें.

यम : अस्सं! म्हणजे रामा हरी हा एकूण चार साप चावून मेला!

डॉक्टर माझ्या पापाबद्दल सांगायचं म्हणजे महाराज, मी किती लोकांचे तळतळाट घेतले आहेत हेंच सांगायला पाहिजे. पाण्याचीं इंजेक्शनें देऊन कैक लोकांना मी सहज फसवलं आहे. पूर्णपणें फी वसूल झाल्याशिवाय एकदांही मृत्युचं सर्टिफिकेट दिलेलं नाहीं. मी ज्या हॉस्पिटलमध्यें काम करीत होतो तेथील नर्सना —

यम आलं लक्षांत. तें सोडून पुढं बोला —

डॉक्टर : ऑपरेशनचं कारण सांगून रात्र रात्र भलतीकडं राहिलों आहे.

यम : पुढं. ...

पंडित : मी सांगतो महाराज, मी पोलीस खात्यांत आहे.

यम : निम्म्याहून अधिक पापं कळलीं मला. पुढं बोला—

पंडित : मी पांच मुलींना फसवलं. दोघींनी आत्महत्या केली. ह्या

पांच मुली लग्नाच्या आधींच्या— एक भ्रूणहत्या केली. निरपराध लोकांचा छळ केला.

**यम :** मद्य वगैरे ?

**खुंटे :** महाराज, देवांच्या दृष्टीनंहि मद्य निषिद्ध आहे काय ?

**पंडित:** खाशेराव मधें मध्यें बोलूं नका.. महाराज, मी पापी असलो तरी मला प्रपंच आहे. त्यासाठीं पैसा मिळवणं आवश्यक होतं. लांच घेणं भाग होतं. लांच घेण्याचं पाप केलं पण मर्यादा सुटली नाहीं. पांचशेंच्या वर कधीं पैसा घेतला नाहीं.

**यम :** ठीक आहे...

**पंडित :** महाराज, अजून आहेत पापं माझी—

**यम :** असूं दे... मला कल्पना आली आतां. सर्वच्या सर्व पापं सांगण्याची गरज नाहीं.

**पंडित :** महाराज, असा अन्याय करूं नका—

**यम :** चूप ! बाई तुम्ही ?

**सगुणा :** या बया ! मी काय सांगणार ? मी ह्येच्यावानी पापं केलीं न्हाइत. एक पाप, म्हंजी मी येकडाव लगीन केलं, दुसरं म्हंजी सातप्पा पाटलाला मारन्यापायी तीनसं रुपय दिलं.

**यम :** तुझा या लोकांशीं असलेला संबंध ?

**सगुणा :** त्यांत माजं काय पाप हाय ? आसलच तर त्येंचं. माजा धंदा हाय. धंदा कुटं पाप, असतुंया व्हय ? आतां तुमी मला गान्याला बोलिवलंत आन् काइ कमीजास्त केलंत तर त्ये पाप माजं झालं कां?

**यम :** बरं, पुढं बोल.

**सगुणा :** आतां न्हाइ म्हनायला बाबी विजापूरकरीण माजं गिराइक फितवाया लागली तवां तिला पानाच्या इडयातनं शेंदूर खायला घातला अन् तिचा धंदा बशिवला—

**मास्तर :** बाई किती जणांचे संसार उधळलेत तुम्ही ?

**सगुणा** मी कशाला जाऊं संवसार उधळाया लोकच येत्यात माज्याकडं त्येला मी काय करूं ?

**यम :** मास्तर तुम्ही ?

**मास्तर :** महाराज, मीही पापं केली आहेत. रघु पानसे नांवाच्या विद्यार्थ्यावर राग होता म्हणून त्याला मी मुद्दाम नापास केला. हंबीरराव कदमांचा पोरगा नापास झाला होता तरी पास केला. नाहींतर नोकरी जाणार होती माझी.

**खुंटे :** ही काय पापं म्हणायची कां पापांची थट्टा ? मग छड्या माराल्याचं बी सांगून टाका पापांत.

**मास्तर :** खाशेराव, तुम्ही मोठी माणसं. पापंही तुम्हाला सोजेशीच पाहिजेत. माझ्यासारख्या गरीब मास्तरला तुमच्या सारखी मोठी पापं परडवणार नाहींत. आमची लहान असली तरी ती पापंच आहेत... महाराज, मी दोन तीन वेळां आजारीपणाचे खोटे अर्ज पाठवून रजा घेतली होती.

**पंडित :** महाराज, माझी कांहीं पापं सांगायाची राहिली आहेत—

**यम :** मला ऐकायचीं नाहींत आतां.

**विठ्ठल :** पण आपला निर्णय सांगितला नाहींत आपण—

**खुंटे :** त्यांनीं कशाला सांगायला पाहिजे ? एकजणही पुण्यवान नाहीं. आपली पापंच एवढी आहेत कीं, खुद्द पापाला मुद्दां आपण पुण्यवान असल्याचा साक्षात्कार होईल...

**यम :** खरं आहे... मलासुद्धां कल्पना नव्हती—

**विठ्ठल :** पण आपल्याकडं नोंद असते ना ?

**यम :** असते. पण ती आम्ही नंतर पाहतों —

**पंडित** ती आधीच पाहून आला असतात म्हणजे हेलपाटा तरी वांचला असता.

**विठ्ठल** मग महाराज, आपल्या नियमाप्रमाणं आमच्यापैकीं कुणालाही नेतां येणार नाहीं तुम्हांला.

**यम :** ते काहींसं खरं असलं तरी एक जीव मला नेलाच पाहिजे.

**विठ्ठल** माफ करा महाराज, पण हा विश्वासघात होईल... आमच्यासारख्या पापी माणसांनीं दिलेला शब्द फिरवला तर त्यांत कांहींच वावगं नाहीं. पण आपण शब्द फिरवलांत तर मानवाला फार वाईट उदाहरण घालून दिल्यासारखं होईल.

**खुंटे :** बरोबर आहे. सर्वांत पुण्यवान माणसाला नेण्याची आपली बोली आहे. इथं पुण्यवान माणूस सांपडलेला नाहीं तेव्हां आतां तुम्ही कुणालाच नेऊं शकत नाहीं.

**पंडित :** आपल्याला आपली जबानी फिरवतां येणार नाहीं.

**यम** मग मी काय करावं ! तसाच परत जाऊं ! कादापिही शक्य नाहीं असं कधींहीं झालं नाहीं. एक सावित्रीचा अपवाद सोडला तर या पृथ्वीच्या जन्मापासून हा यम रिक्त हस्तानं परत गेला नाहीं.

**खुंटे :** सावित्री फार पुण्यवान होती म्हणून आपल्याला परत जावं लागलं. इथं परिस्थिति उलट आहे. तेव्हां तुमच्या आयुष्यांत असाही एखादा प्रसंग असायला हरकत नाहीं.



साधी धूणी ठोकतां येत नाहींत आणि म्हणे ऑफिसच्या टीमचे कॅप्टन

**यम** : तुमच्या पापांमुळं तुम्ही वांचलांत असं मी कुणाला सांगायला लागलो तर सर्वजण हंसतील मला – पाप सहीसलामत सुटतं असा त्याचा अर्थ होईल. पापाचा अधिक प्रसार होईल....

**विठ्ठल** तसं तुम्हाला अवघड वाटत असेल तर आमच्या वायकांची पुण्याई थोर म्हणून आम्हांला सोडावं लागलं असं सांगा तुम्ही... काय खाशेराव ?

**खुंटे** : तुम्ही काय सांगता हें आम्हीं थोडंच पहायला येणार आहोंत? मी सांगूं का महाराज, तुमच्यासारखे आम्हां पुढाऱ्यांवरहि अनेकदां प्रसंग येतात. जरा मुत्सद्देगिरी दाखवायची. दोन चार थापा मारायच्या. निभावून जातो प्रसंग – आमच्या इथं विरोधी पक्ष तरी आहेत. तुमच्याकडं तेही नाहीं.

**पंडित** : शिवाय तुमचा रिपोर्ट फायनल असतो. त्यावर तुम्हांला कोण एक्सप्लनेशन विचारणार आहे ?

**यम** : मला कौतुक वाटतं तुमचं....मला सल्ला देण्यापर्यंत तुमची मजल गेली अं ? वडबड बंद करा आधी. तुम्ही पापी आहांत म्हणून कांहीं अमरपट्टा मिळाला नाहीं तुम्हांला. उलट तुमच्यांतला एक–जीव नेण्यांत पृथ्वीचा पापांचा भार तरी कमी होईल.

**विठ्ठल** म्हणजे ?

**यम** म्हणजे काय ते मला माहीत आहे. दूतानो इथून एक जीव नेण्याची तयारी करा....

**खुंटे** : पण...पण...पण....महाराज

**यम** : चूप वसा सर्वजण —

**सगुणा** : या बया ! खाशेराव ह्यो एकला माणूस तुमा सर्वांस्नी भारी हाय व्हंय ?

**खुंटे** : तूं गप्प वैस जरा. वडवडूं नकोस उगाच.

**सगुणा** : चांगलं सांगाया जावं तर कडूच लागतंया तुमास्नी....माजं काय जातया–मी वघते गप मुड्द्यावाणी –

**विठ्ठल** : माफ करा महाराज... पण एक पर्याय सुचवतो. तुमचंही काम होईल... आमचीही चिंता मिळेल... बोलूं कां ?

**यम** : काय ?

**विठ्ठल** : आमच्यावरोवर हे पावकर मास्तर आले आहेत. त्यांची मोठी मुलगी आजारी आहे गेले सहा महिने...ती आज ना उद्यां—

**त्रिवेणी** (त्वेषाने पुढे येते) खवरदार पुढचे शब्द तोंडांतून काढाल तर. (यमाकडे वळून) महाराज, मी लहान आहे. अजाण आहे. मी आतापर्यंत वोललें नाहीं. पण आतां वोलल्याशिवाय गत्यंतर नाहीं. महाराज, यांनीं आम्हांला आपल्या मोटारींत जागा दिली त्याचे उपकार मी विसरणार नाहीं. हे वकीलसाहेब, हे खाशेराव, हे पंडितराव, डॉक्टर ही सगळी वडील माणसं आहेत. पण सर्वजण पशुकोटींतील आहेत. महाराज, यांच्या-बद्दल माझ्या कोवळ्या मनांत फार फार आदर होता. ही थोर मंडळी आहेत असं आम्ही लहानपणापासून ऐकत आलो.. पण...पण...महाराज मला कांहींच कळेनासं झालं आहे. यांची ही भयानक पापं ऐकून मला गुदमरल्यासारखं झालं आहे. वरून दिसणारं जग किती फसवं आहे. खरं जग फार वेगळं आहे. इतकी अनंत पापं करून ही माणसं निर्भय-पणानं कशी जगूं शकतात हेंच मला कळत नाहीं. फसवणं, खून करणं, पैसे खाणं हे इतकं सहजसुलभ झालं आहे? त्यांचीं पापं त्यांच्याबरोबर म्हणून मी गप्प वसले असते. पण महाराज, ह्या वकीलसाहेबांनीं आतां जी निर्लेप निर्लज्जपणाची सूचना केली त्यानं माझा संताप अनावर झाला म्हणून हा लहान तोंडी मोठा घांस घेते आहे. स्वतःला आणखी पापं करायला आयुष्य मिळावं म्हणून या नराधमानं माझ्या आजारी बहिणीचे प्राण नेण्याची आपल्याला सूचना करावी? तिनं काय असा अपराध केला आहे? तिची तीन कच्चीबच्चीं उद्यां निराधार झाली तर यांचं काय नुकसान होणार आहे? तिचा संसार मोडून टाकण्याचा यांना काय अधिकार आहे? महाराज, तसं होणार असेल तर मी आपले पाय धरून सांगते कीं, माझे प्राण हरण करा... त्या तीन मुलांच्या आईला नेऊं नका.. त्यांना निराधार करूं नका. ..मी तयार आहे यायला...दादा तुम्ही मुळीच वाईट वाटून घेऊं नका....यांच्या पापाची ही शिक्षा असेल तर ताईसाठीं मी ती स्वीकारायला तयार आहे. महाराज, कृपा करा पण ह्या वकीलसाहेबांची सूचना मनावर घेऊं नका...माझ्या असेल नसेल त्या पुण्याईची शपथ आहे तुम्हांला....

**मास्तर** : शांत हो बाळ...शांत हो...(तिच्याजवळ जातात)

**यम** : मुली, तूं चिंता करूं नकोस. यम ज्या जागीं जातो त्याच ठिकाणचा प्राण नेतो. मला या अपघातांतलाच जीव नेला पाहिजे. तूं मुळींच चिंता करूं नकोस.

**मास्तर** : क्षमा करा महाराज. तिला हें असलं ऐकायची पहायची संवय नाहीं. त्यामुळं ती इतकी प्रक्षुब्ध झाली आहे. अजून लहान आहे. जग पाहिलं नाहीं तिनं......

**यम** : तिला जवळ घ्या तुमच्या...(इतराकडे वळून)...तुमचं झालं सगळयांचं सांगून...आणि मी सांगितलेलंही आपण ऐकलंच असेल. मला या अपघातांतलाच जीव नेला पाहिजे. ..

**सगुणा** : खाशेराव, तुमी जाऊं नगा. माजं गातं रंगायचं न्हाइ तुमच्या विगर. ..वकील लई हैती गांवांत.....

**विठ्ठल** : खाशेराव, तुमच्या सगुणाबाईला आवरा. दीड दमडीची बाई आणि वकीलांची उठाठेव करते......

**खुंटे** : वकीलसाहेब, तोंड सांभाळून बोला.

**डॉक्टर** : खाशेराव..खाशेराव.....जरा सबुरीनं घ्या.....

**खुंटे** : कुणाला दीड दमडीची म्हणतात ? अरे तुमच्यासारखे पन्नास वकील तिनं दाराशीं उभे केले आहेत आजवर....

**पंडित** : अहो पण ही वेळ आहे कां भांडायची ?

**सगुणा** : फौजदारसाहेब बसा गुमान. तकडं जाऊन...तुमच्यावानी दारोदार फिरणारं लई फौजदार बघितल्यात मी...

**डॉक्टर** : बाई...जरा गप बसा ना इथं?

**सगुणा** : अरं वा रं डाक्टर? सुइ टोचाया आली म्हंजी काय समदी अक्कल आली कां काय तुमास्नी? अं ?






कॉलेजांत जायचं म्हणजे कसं तरतरीत दिसायला हवं...

# टिनोपालनें शुभ्र कपडे शुभ्रतम होतात— त्यामुळें तरतरीतपणांत भर पडते.



मुलगी मोठी चुणचुणीत दिसते. कॉलेजचें ते एक भूषण आहे अभ्यासहि ती अगदीं मन लावून करते. दररोजचा तिचा पोषाख कसा पांढरा पांढराशुभ्र असतो — अगदीं शुभ्रतम. हें सारें श्रेय टिनोपालचें.




कपडे शेवटीं पाण्यांतून खळखळून काढतांना त्यांत थोडेंसें टिनोपाल घालून पहा तुमचे सफेद कपडे कसे लख्ख उजळून निघतात ते. शर्ट, विजारी, साड्या, फ्राक्स, चादरी, सगळं कांहीं अन् एवढ्या सगळ्याला खर्च किती ? प्रत्येक कपड्याला एक पैशाहून कमीच.

टिनोपाल वापरायला लागा — तुमचे शुभ्र कपडे अधिक उजळ होऊंद्यात. साक्षेपी लोक टिनोपालची निवड कटाक्षानें करीत असतात, हें लक्षांत असूं द्या. टिनोपाल म्हणजे कपडे शुभ्र करणारं एक आधुनिक साधन. तें शास्त्रशुद्ध आहे तसेंच सर्व प्रकारच्या कपड्यांसाठीं तें बिनधोकहि आहे.

सुहृद गायगी लि., पो. ओ. बॉक्स ९६५, मुंबई–१ बी.आर




टिनोपाल हा जे. आर. गायगी. एस. ए. बाल, स्वित्झर्लंड यांचा रजिस्टर्ड ट्रेड मार्क आहे.

Shilpi SGT 122 MAB

अनुक्रमणिका

**विठ्ठल :** (यमास) महाराज, आपण आपला हट्ट सोडायला तयार नाहीं. आपण म्हणालांत कीं सर्वात पुण्यवान मनुष्याचे प्राण नेले पाहिजेत म्हणून आम्ही कसे पापी आहोत हें आपल्याला सांगितलं. पण आम्ही एवढंच सांगतों कीं आम्ही पापी असलों तरी निखालस पापी नाहीं. आमच्या नकळत पुण्यही हातून झालं असेल. पाप आणि पुण्य मिळूनच माणूस तयार होतो. पुण्यवान आणि पापी अशी वर्गवारी कोणत्या आधारावर केली आहे तेंच कळत नाहीं.

[तेवढ्यांत मरायला टेकलेली एक कोंबडी हातात घरून एक शेतकरी धांवत येतो. त्याला यम वगैरे प्रकार कांहींही माहीत नाहीं. तो येतो तो थेट यमाच्या पुढ्यांत येऊन थांबतो.]

**शेतकरी :** तुम्हां मोटरवाल्यांचा ख्योळ होतो पर आम्हां गरीबांचा जीव जातो...

**यम :** काय झालं?

**शेतकरी :** काय झालं म्हणुन वर इचारताय व्हय आनकी? मोटर चालवतांना काय झोकून चालवितां कां काय?

**यम :** कसली मोटार? कुणाची मोटार?

**शेतकरी :** याड पांघरून पेडगांवला जायची वरी हिकमत हाय म्हनायची तुमची? ती ततं कलंडल्याली मोटार दिसत न्हाई तुमास्नी? माजी कोंबडी घावली न्हवं कां तिच्याखाली.

**डॉक्टर :** मधे आली असेल कोंबडी तुझी...

**शेतकरी :** वा! सडकच्या कडला असल्याली कोंबडी मधी येती व्हय कधीं? मी तकडं हीरीवर हुतो. पोरगं वरडत आलं ततं म्हनालं बाबा, कोंबडी मारली मोटारवाल्यानं...लगुलग धांवत आलो.

**डॉक्टर :** पण मोटारनंच कशावरनं मारली?

**शेतकरी :** ह्ये बी हाय कां आनकी वर? त्या मोटारच्या टपाखालनं मीच काडली की तिला आत्तां? थोडी घुगघुगी हाय अजून...पर गरीबाची कोंबडी मारून काय मिळालं तुमास्नी?

**विठ्ठल :** बाबा, तुझ्या कोंबडीचे दुप्पट पैसे आम्ही देतो...मग तर तुझी तक्रार नाहीं कांहीं? (यमास) महाराज, आपला प्रश्न सुटला आहे. ही कोंबडी मरायला टेकली आहे. शिवाय हा जीवही अपघातांतलाच आहे. इथलाच आहे. पापपुण्याचाही प्रश्न इथं उपस्थित होत नाहीं.

**यम :** आलं लक्षांत तुम्हांला काय म्हणायचं आहे ते....

**वठ्ठल** माणसाचाच प्राण नेला पाहिजे अशीही आपली अट नव्हती. आणि सर्वभूती एकच आत्मा आहे असं आपल्याच पैकी एका देवानं सांगितलेलं आहे. जीवात्मा इथूनतिथून सारखाच आहे. तो मग मानवी देहांत असो अगर कुक्कुट देहांत असो–

**डॉक्टर :** एक प्राण तुम्हांला न्यायला मिळेल...आमचे प्राण आम्हांला मिळतील. वकीलसाहेबांनीं केलेली सूचना बिनतोड आहे... आतां अधिक ओढून धरण्यांत अर्थ नाहीं. आतां नाहीं म्हणूं नका. कोंबडी तर कोंबडी. प्राण मिळाला–तुमचं काम झालं.

**पंडित :** आम्हां मानवांवरही असा प्रसंग अनेकदां येतो. मी सुद्धां एकदां वाघाची शिकार करायला म्हणून गेलो आणि शेवटीं एक होला घेऊन आलो...तसंच हे समजा आणि ही कोंबडी गोड करून घ्या....

**शेतकरी :** पर माजी कोंबडी...

**विठ्ठल :** अरे, जो जीव जन्माला येतो तो केव्हां ना केव्हां तरी जाणारच असतो. जगांत अमर कोणीही नाहीं. मग त्यांत एवढं वाईट काय वाटून घ्यायचं? मरण कुणाला तरी चुकलं आहे कां? कोंबडी गेली तरी कोंबडीचे पैसे जाणार नाहींत. देऊन टाक तुझी कोंबडी त्यांना–

**शेतकरी :** असं म्हणतां? पर पैसे कोन देनार?

**विठ्ठल :** मी देईन...

**शेतकरी :** मग हरकत न्हाई... (कोंबडी पुढं करतो)

**यम :** (यमदूतास) घेऊन चला ही कोंबडी...तुम्ही पुढं व्हा...मी मागाहून येतो...कोंबडीचे प्राण नेण्यासाठीं यम आला असं कुणाला कळलं तर हंसं होईल माझं...तुम्ही चालायला लागा. (यमदूत शेतकऱ्याकडून कोंबडी घेतात. निघून जातात.)

**शेतकरी :** (यमास) माझं पैसं?

(यम वकीलसाहेबांकडे बोट दाखवतो आणि निघून जातो.)

**विठ्ठल :** आम्ही काय पळून जातो आहोंत कुठं? एवढी मोटार इथं पडली आहे. ती टाकून कसे जाऊं आम्ही? जा. तुझे पैसे पोंचते करून देऊं आम्ही..

**शेतकरी :** काय तुमचा शहरवाल्यांचा भरंवसा न्हाई....

**खुंटे :** अरे जा मुकाट्यानं..देतो म्हणून सांगितल्यावर कळत नाहीं एवढं?

**शेतकरी :** जातो मी...तकडं पल्याडच्याच अंगाला झोपडी हाय माजी...ततंच पाटवा माणूस..(जातो. तेवढ्यांत हणमू ड्रायव्हर परत येतो. डॉक्टरांच्या कानांत कांहीं तरी सांगतो. डॉक्टर विठ्ठलरावांच्या कानाला लागतात. खाशेरावच्याही कानांत सांगतात. पंडितरावही ऐकतो. सर्व जण प्रसन्न दिसतात. उठतात.)

**खुंटे :** ह्या सगळ्या तापाचं देवानं बक्षीसच दिलं म्हणायचं.

**सगुणा :** कुटं जायाचं वं?

**खुंटे :** चल तूं...सगळा बंदोबस्त केलाय म्हणे पाटलानं...अपघात झाला तरी रात्र वांया जायची नाहीं...

**सगुणा :** खाशेराव, तुमचा पायगुनच तसा हाय...

**खुंटे :** तुझ्या पायाचं गुण सगळ्यांना दाखवलं पाहिजेत रात्रीं नाचून. कळलं?

**सगुणा :** कुठं जायचं हो वकीलसाहेब?

**विठ्ठल :** ('ही पीडा आहेच की इथं' अशा भावनेनं) तुम्हीं कुठं जाताय? तुम्हांला कुठंही जायचं नाहीं. थांबा इथंच जरा वेळ. हणमूला पाठवतो मग...

**मास्तर :** ठीक आहे...थांबतो आम्ही इथं....

(सर्वजण जातात. रंगमंचावर फक्त मास्तर आणि त्रिवेणी राहतात.)

**त्रिवेणी** (भावनावेगानें) दादा...दादा...(मिठी मारते. मास्तरांच्या खांद्यावर मान टेकते. रडूं लागते. मास्तर तिला कुरवाळतात. हळुवारपणें थोपटतात)

**मास्तर :** शांत हो पोरी...रडूं नकोस...जग हे असंच आहे. तूं पाहिलं नाहींस तें म्हणून एवढी अस्वस्थ झालीस. अशाच जगांत यापुढं जगायचं आहे तुझ्या माझ्या सारख्यांना – केव्हांतरी तें बदलेल ह्या आशेनं....लोभानं....(पडदा पडतो.)

**[प्रयोगाच्या परवानगीसाठीं सौ. प्रतिभा सबनीस यांची परवानगी आवश्यक आहे. प्रयोगमूल्य रु. १५]** ●●●






ही दीपावली व नूतन वर्ष आमच्या ग्राहकांस व हितचिंतकांस सुख समृद्धीचें जावो

भरपूर कॅल्शीयम युक्त

# बिटको ग्राइप

नेहमीं दिल्यानें
लहान मुलें सशक्त, बांधेसूद
व गुटगुटीत होतात.

# बिटको

## काळी
## टूथ पावडर

नेहमीं वापरल्यानें
दांत मोत्यासारखे स्वच्छ
व चकचकीत होतात.

बिटको केमिकल इन्डस्ट्रीज नासिक-रोड







रसराज शृंगाराची आजच्या कला-साहित्यावरची ही फिर्याद! शृंगाराला हात घालणं हें शिवधनुष्य उचलण्यासारखं अवघड काम! पण जिथें देवदूतही पाऊल टाकायला धजावत नाहींत तिथें × × माणसें धिंगाणा घालतांना दिसतात.
—अशांसाठीं हें झणझणीत नेत्रांजन!






—विद्याधर गोखले

**कां**हीं दिवसांपूर्वीं जयहिंद-कॉलेज-सभागृहांत 'नर आणि मादी' नामक नाटक लागलें होतें. नांवावरून वाटलें होतें, हें प्रणयी कबुतरांचें नाटक असावें. पण अनेकांप्रमाणें माझीहि अपेक्षाभंग झाला.

चालायचेंच. अपेक्षाभंग ही आतां नित्याचीच गोष्ट झाली आहे. मी नाट्य-गृहाबाहेर पडलों. तोंच माझे एक चाहते नि वयस्कर मित्र रंगराव बाजीराव सुखात्मे (वय वर्षें ५० ते ५५) मला भेटले. म्हणाले, "बरे भेटलांत, चला थोडा चहा नि ॲस्प्रो घेऊं या."

"चहा कबूल. पण ॲस्प्रो?"

"डोकं दुखलं हो या वास्तववादी अन् वादविवादी नाटकानं," रंगराव बोलूं लागले, "नांव 'नर आणि मादी' पण शृंगाराचा पत्ता नाहीं! आणि काय ती प्रकाश-योजना! जयप्रकाश-योजनेसारखीच...."

मग नव-नाट्यावर ठराविक पद्धतीची टीका करून, रंगराव त्यांच्या नेहमींच्या सिद्धान्ताकडे वळले—"हल्लींच्या साहित्यावर रसराज शृंगार नाराज झाला आहे!".

रंगराव एका जुन्या ग्रंथालयाचे ग्रंथपाल आहेत. पण नुसत्या बुकांच्या नोंदी करणारे कारकून नाहींत. वाचनाची—विशेषत: प्राचीन वाङ्मयाची—दांडगी हौस. 'अजून यौवनांत मी' अशी वृत्ति. स्वभाव रसिक, रंगेल अन् मनमोकळा. मतें बहुतांशीं सनातनी. पण तरीहि त्यांच्या संगतीप्रमाणेंच, व्याख्यानवजा भाषणांची रंगत मला रुचते.

म्हणूनच चहा घेऊन झाल्यावर आम्ही बोलत बोलत 'मरीन ड्राइव्ह'च्या कट्टयावर येऊन बसलों. रंगरावांच्या रसवंतीला अधिकच खुलावट आणण्यासाठीं मी त्यांना मध्येंच छेडलें.

सागर किनारीं संध्याकाळची हवा खाण्यास आलेल्या एका गुलछबू तांड्याकडे त्यांचें लक्ष वेधून मी म्हटलें—"रंगराव हा पहा रंगीबेरंगी नायलॉनमध्यें नटून थटून चाललेला नागर सौंदर्याचा नौबहार! अन् त्यामागोमाग शीळ घालीत चाललेला तो पहा रोड साइड् रोमिओ! आणि तरी तुम्ही म्हणतां, हल्लीं रसराज नाराज आहे?"...

रंगरावांच्या अभिजात अभिरुचीची वीणा अशी छेडली जातांच प्राचीन शृंगाररसाची रागिणी नेहमींप्रमाणें आवेशांत झंकारली—"होय, या पिढीवर रसराज नाराजच आहे. अहो या पोटिमा-ब्लाऊझवाल्या नायलॉन-परी काय दाखवितां आम्हांला? **जो शमा रोशन करती है सरे बाजार, उस् पर जल्ता नहीं दिल्का परवाना मेरा!**

### युवतींची आक्रमक जवानी!

**आपल्या** अभिजात वाङ्मयांत रेखाटलेल्या त्या रेखीव युवती कोठें आहेत? कुठें आहेत त्या जोबनवंती? कुठें आहे तें वृद्धजनांनाहि इष्काचे अंकुर फोडणारे युवतीजनांचें वर्णन? 'जों जों नववधूच्या अंग-प्रत्यंगांनीं भरदार यौवन धारण केलें, तों तों तिची कंबर, तिचा प्रियकर अन् तिच्या प्रतिस्पर्धिनी बारीक होत गेल्या', असें तें नौजवानीचें आक्रमक वर्णन कुठें आहे? मदिर मस्ती ल्यालेलें, फुलांच्या सुगंधांत धुंद झालेलें अन् काफिर-कामिनीच्या गात्रां-गात्रांत लहरावत शिरलेलें तें मधुगंधी तारुण्य कुठें आहे? ज्यांच्या घाटदार स्तनांना, विशाळ नयनांना, रसाळ मनाला अन् घनवर्तुळ नितंबांना आपल्या पक्षाचे मानून यौवन राजानें बढती (Increment) दिली, त्या राजस बाळा कुठें आहेत आजच्या वाङ्मयांत?






## नव्या नवतीची नजाकत !

**तारुण्या** प्रमाणेंच नाजुकपणाची देखील हालत ठीक नाहीं. थर्मामिटरमधून पाऱ्याची रेघ दिसावी, त्याप्रमाणें तांबूल-रस 'मस्तानी'च्या नितळ कंठांतून खालीं जातांना दिसत असें म्हणतात! पण आतां वाटेल त्या पुरुषाशीं बोलणाऱ्या अन् पुरुषांप्रमाणें बोलणाऱ्या-वागणाऱ्या; ९-३० च्या लोकलमध्यें पुरुषी धक्के खाणाऱ्या, नारींमध्यें ती 'मस्तानी'ची नज़ाकत कशी दिसणार, कुठें दिसणार? जिचें मार्दव दृष्टीस पडतांच मालतीचें फूल, कर्दळीचा कोंभ नि चंद्राची कोर देखील कठोर वाटावी, अशी 'मालती-माधव' नाटकांतील मालती आतां कुठें आढळणार? आणि मग—

**न जक धरत, हरि हिय धरत, नाजुक कमला-बाल ।**
**भजत भार-भय-भीत है, घन-चंदन-वनमाल ।।**

असें वर्णन ज्यांची नाजुकता पाहून कवींना सुचावें अशा पुष्पांगी कशा दृष्टीस पडणार? ज्यांच्या तस्बिरीचें चुंबन – आणि तेंहि स्वप्नांत–घेतलें तरी ज्यांचे नाजुक ओंठ काळे-निळे पडतात, अशा गुलवदनी समाजांत क्वचित कोठें असतीलहि! पण आजच्या साहित्यांत मात्र त्या फारशा दिसत नाहींत.

## गोरी गोरी कुचकोर !

**ज्यांच्या** पायांना मखमली गालिच्यानें देखील चरे पडतात, अशा नाजुक नारी दिसत नाहींत, तशाच उरोजांच्या गुच्छांनीं किंचित् वांकलेल्या लावण्य-लताहि दिसत नाहींत. 'राइस प्लेट'च्या या जमान्यांत जसें आरोग्य घसरलें, तसेंच उरोज वैभवहि ओसरलें! हां दिवाळी-अंकांच्या मुखपृष्ठांवर तें झळाळत आहे खरें. पण तें खरें नव्हे. ती चित्रकारांची करामत! जशी चित्रकारांची करामत, तशीच 'ब्रेसियर्स'ची किमयादेखील खूप नजरेस पडते. उरोजांच्या पुष्ट गोलाईनें 'ब्रेसियर्स'ची शिलाई धन्य होण्याऐवजीं, त्या अणकुचीदार कंचुक्यांनींच कुच-दारिद्र्य धन्य होऊन हापूस-पायरीची बढाई मिरविते! अशा या खुरट युगाच्या खुज्या साहित्यांत– 'अरे मन-मुसाफिरा! सावध, सावध. कुच-पर्वतांनीं दुर्गम झालेल्या त्या लावण्य-काननांत संचार करूं नकोस. कारण त्या पर्वतांत मदनरूपी लुटारू दबा धरून बसला आहे' असा कोण कोणाला इशारा देणार? मुखचंद्राच्या शीतल किरणांनीं पुनः पुनः नाहून निघाल्यानेंच कीं काय, पीडित झालेले उरोज, शीत-निवारणार्थ एकमेकांना खेटून बसल्याचें हृदयंगम वर्णन आतां वाङ्मयांत कोठें गवसणार? 'जों जों वक्षस्थळाला उन्नति प्राप्त झाली, तों तों मत्सरग्रस्त नेत्रांना वक्रता येत चालली आणि त्यांच्यांत काजळरूपानें काळेंबेरें डोकावूं लागलें. हें उरोज-उन्नतीचें उठावदार वर्णन आतां वाङ्मयांत कसें उठाव घेणार? आणि चतुर्थीच्या चंद्रकोरीप्रमाणें दिसणारी ती गोरी गोरी कुच-कोर? जलभारानें दाटलेल्या घननील मेघांतून चंद्रकोर डोकवावी, तद्वत् तट्टतटीत निळ्या कंचुकींतून जराशीं डोकावणारी कुच-लेखा? ती आतां साहित्यांत कुठेंच कां दिसत नाहीं? हल्लींच्या युगाची अरसिकता पाहून तर तिनें कंचुकींत तोंड लपविलें नाहीं ना? आमच्या पिढींतील रसिक चकोर ती कुच-कोर पाहून वेडावून गेले होते!

## पतली कमरिया

**पण** आतां जशी ती कुच-कोर वाङ्मयावर रुसली, तशीच 'रुंद छातिवर बुंद गेंद जणुं गुलाब वहरामधिं फिरती' अशी शाहिरी थाटाची जोवन-संपदाहि जवळ जवळ लोप पावली आहे! –आणि जेथें कुच-भारच नाहीं, तेथें त्या भारानें कृश झालेली कटि तरी कोठून आढळणार?

**सनम् ! सुनते हैं, तेरे भी कमर है।**
**कहां है ? किस तरह है ? किधर है? ।।**

असा कमरेसाठीं मरे मरे तों चाललेला शायरी शोध कसा नजरेस पडणार? हाय! ती पतली कमरिया, ती उरोज-भारें कष्टी झालेली बारीक कंबर, ती मृगराजाचा गर्व हरण करणारी 'मुष्टिमेय' कटि, वास्तववादाच्या कटकटीला कंटाळून तर कुठें गायब झाली नाहीं ना? 'सुंदरी! कृशोदरी! मला सोडून जाऊं नकोस. अन् जायचेंच झालें तर हळूं हळूं जा. कारण मी तुझा पदर ओढून धरला आहे. त्यामुळें झटक्यानें झप् झप् निघून गेलीस तर तुझी अत्यंत कृश कंबर मोडून पडेल! अशीं वर्णनें आतां वास्तवतेच्या पिपांत 'माना मुरगाळोनी पडलीं' नाहींत ना?

## सुलोचनेची अजब तीरंदाजी !

**कुठें** आहे ती नज़ाकत? कुठें आहे ती 'अस्ति नास्तीति संदेहः' निर्माण करणारी पातळ कंबर? कुठें आहे तो तारुण्याचा वहर, ज्वानीचा कहर? कुठें आहे ती 'उडुराजमुखी, मृगराज-कटी, गजराज-विराजित-मंदगती'?—

तसेंच, एकाच कटाक्षानें दिलाचे तुकडे तुकडे करून टाकणारी ती कुरंगनयना कुठें आहे? कुठें आहे ती मत्त चकोराक्षी, ती सरोजाक्षी, ती मीनकेतनाची लाडकी मीनाक्षी? ती रसिक नेत्रांची कौमुदी, ती नीमबाज नेत्रांची मदिर-लोचना, ती मानस-भृंगांना मोह पाडणारी पंकज-नयना कुठें गेली? कुठें गेली?

'अजाण सुंदरी! तुझा बाण तर सरळ करून घे. वांकड्या बाणांनीं सावजाची शिकार कशी साधेल? तिरप्या नजरेनें दिलगीर आशिकावर नेम धरूं नकोस!' असा नर्म शृंगारिक उपदेश करण्याची या रुक्ष जमान्यांत गरजच उरली नाहीं...'सुलोचने! कुठें नि कुणापासून ग ही धनुर्विद्या शिकलीस? कमाल आहे. तुझ्या भुवयांचे लहानगें धनुष्य बिनदोरीचें. अन् नाजुक नजरेचे बाणहि वेडे वांकुडे. पण तरीहि आमच्या चंचल चित्ताचें अचपळ सावज तूं कसें बिनचूक टिपतेस? ही तीरंदाजीची तारीफ आतां कुठेंहि ऐकूं येणार नाहीं. कारण, ऐन तारुण्यांतच ज्यांच्यावर चष्मा चढला, त्या नयनांना अशी बहादुरी नि जादुगिरी कशी साधणार? निदान, वाङ्मयांत तरी ती साधलेली दिसत नाहीं! ज्यांच्या डोळ्यांत धवल अमृत, काळें कालकूट नि गुलाबी मद्य एकवटलें आहे, आणि त्यामुळेंच ज्या तरुणांना कधीं जगवितात, कधीं ठार मारतात, अन् कधीं झिंगवितात त्या सारंगलोचनांना पाहूनच कोणी कवि उद्गारला








होता—'असारे दग्ध-संसारे, सारं सारंग-लोचना!'.

पण हाय! आतां साहित्य-संसारांत त्या विदग्ध सारंगलोचना तर नाहींत, परंतु दग्ध असारता मात्र भरपूर आहे!!

## साखर-ओठांचा रस-रंग!

अशा साहित्यांत अजंठाच्या - रंगाप्रमाणे अमर झालेला अधर रंगहि आढळणार नाहीं. आरक्त पोंवळ्यांसारखा अथवा लाल गुलाबाच्या पाकळ्यांसारखा तो रंग पूर्वी ओष्ठ-शलाकांनीं वा तांबूलांनीं दुप्पट प्रभावी होत असे; त्याची माधुरी मधालाहि लाजवीत असे; अमृतानें पैजा जिंकीत असे! म्हणूनच कोणी नीलकंठ कवि त्या अधर-माधुरीवर एक नव्हे, दोन नव्हे, तर १०० श्लोकांचें 'अधरशतक' लिहीत असे. ...पण असे ते स्फूर्तिदायक कोंवळे कोंवळे साखर-ओंठ कुठें आहेत? असे ते 'रति-सर्वस्व' अधर पाहूनच दुष्यंताला भ्रमिष्ट भ्रमरांचा हेवा वाटला होता. आणि तो शकुंतलेला म्हणाला होता—

**पंचबाणें हृदय-भेद केला त्यांसी हें औषध।**
**बिंबाधरामृत सुस्वाद। कुचालिंगन सर्वथा॥**

परंतु, ते रसरशीत ओंठ राहोंत, ठसठशीत ओष्ठवर्णन तरी कुठें आहे? 'ज्यांची नजर तुझ्या 'लवेशिरीं'कडे (ओष्ठ-शर्करेकडे) गेली, त्यांची नजर साखरेकडे जात नाहीं' हा गोड गोड अधर-गौरव कुठें आहे?.. 'प्रियतमेचा जो अधर-राग रसील्या रात्रीं 'प्रियकरानें चाखला, तोच सकाळीं तिच्या सवतींच्या नेत्रांत जाऊन बसला' अशी रंगीन बदली (Transfer) हल्लींच्या साहित्य-राजवटींत कुठें घडत आहे? नख-क्षतें धारण करणारे शूर उरोज जसें हल्लींच्या पुचाट वाङ्मयांत दिसत नाहींत, तसेंच दंतव्रणांनीं घायाळ झालेले विक्रमशाली ओंठहि कुठ दिसत नाहींत!



## ओठ लावी जी जिवाला ओढणी!

तुम्हांला वाटेल कीं अशा त्या बिंबाधरा मोठ्या बेबंद असाव्यात; त्यांच्यांत शालीनता नसावी. पण असें बहुधा घडलेलें नाहीं. अहो, शालीनतेचें प्रतीक म्हणूनच कीं काय त्यांना पदर शिरोधार्य होता! खरें पुसाल, तर 'टॉप' सौंदर्य असलेल्या त्या बांधेसूद लावण्यवतींनाच 'टॉपलेस' पोशाख शोभून दिसला असता. पण नव्या नवतीचा नाजुक नजराणा असा उघड्यावर टाकणें त्या शालिनींना नामंजूर होतें. कारण त्यांना रति-रंगाचें रहस्य ठाऊक होतें. रहस्य हेंच कीं, सौंदर्य-चंद्रिकेचें अस्फुट वा अर्धस्फुट दर्शनच रसिकांच्या दिलाच्या दर्यांत खळबळ माजवितें. डोईवर घेतलेला पदरच, प्रियकराला पदर पसरावयास-भाग पाडतो. मलमली दुपट्टा सौंदर्याची दुप्पट ओढ लावतो, म्हणून तर 'ओढणी' हें नांव त्याला मिळालें आहे!

अशा शालीन रमणीच्या डोईवरचा पदर दूर व्हावा म्हणून चतुर वल्लभ काय विनवणी करतो तें पहा—

'सुंदरी! तुझ्या मुखाला स्पर्श करूं पाहणाऱ्या ह्या लंपट रवि-करांना घुंघट-पट घेऊन दूर ठेवूं नकोस. त्यांना एकदां कळूं तरी दे कीं, कमलिनीच्या मुखापेक्षां तुझ्या माशुक मुखाचा मुलायम स्पर्श अधिक मनमोहक आहे!'

असा तो घुंघट, ओढ लावणारा तो पदर, मर्दाच्याहि दिलाचा खुर्दा उडविणारा तो पर्दा! तो तलम मुलायम पडदा नसला तर?—तर रतिरंग-भूमीवरील इष्काचें रसीलें नाट्य अगदीं नव-नाट्य किंवा न-नाट्य होऊन जाईल!

'अशा नील विरल घुंघटांतून गोऱ्या गोऱ्या गोपीचा चेहरा कसा दिसतो?' या सवालाला हिंदींतील शृंगाररसाच्या सम्राटानें—बिहारीनें—जवाब दिला आहे—

**'छल छबीलो मुख लसत् नीले आँचल चीर।**
**मनो कलानिधि झलमले कालिंदीके नीर॥**

यमुनेच्या निळ्या निळ्या पाण्यांत पौर्णिमेचा चंद्र जसा झगमग करतो, तसाच छबेलीचा छबीला चेहरा नील विरल घुंघटांतून शोभिवंत दिसतो!'

## सर्वांग-सुंदरतेची मदन-पूजा!

अशा सर्वांगसुंदर लावण्यालाच सोन्या-चांदीचीं नि हिरे-माणकांचीं लेणीं शोभतात. त्याची आकर्षकता दुप्पटीनें वाढते. पूर्व दिशेच्या निटिलावर जसें रवि-बिंब शोभावें, तद्वत् भालपट्टावर रेखलेला तो कुंकुम-तिलक! नैन-बाणांना इष्काचें कालकूट माखणारें तें काजळ! तळहातांना कमलदलाची शोभा देणारी ती मेहंदी! तीं कपोल-स्पर्शानें आनंदित होऊन डोलणारी कुंडलें; ती काळ्या भोर केशकलापांत चंद्रकोरीप्रमाणें शोभणारी मोगरीची वेणी; तीं गजराज-गतीला नाद-माधुर्याचा साज चढविणारी नूपुरें; आणि कंकणें कशी? तर—

**गज-शावक-शुंडादंड। तैसे सरळ भुजदंड।**
**तेथ कंकणें रुणझुणतीं धुंद। मनातें चेतवावया॥**

अलंकार असे अंगावर चढले कीं भूषण-भूष्यभाव एकच होऊन ज्ञानेश्वरांनाहि प्रश्न पडतो—इथें कोणी कोणाला अलंकारिलें?

परंतु अशी ती सर्वांगसुंदर नि सालंकृत रमणी आतां कुठें आहे? ऐन्याच्या दिलांत ठसलेलें स्वतःचेंच रूप पाहून 'अगर कुछ हुस्न का दावा हो, तो बाहर आवो' असें आव्हान त्या प्रतिबिंबाला देणारी रूपगर्विता कुठें आहे? 'ज्या गात्रावर प्रथम दृष्टि पडावी, तिथेंच ती खिळून राहावी, अशा प्रकारामुळें जिची सर्वांगसुंदरता कोणालाच पाहतां येऊं नये' अशी ती चारुगात्री कुठें आहे? अन्य कोणत्याहि साधनांशिवाय कामदेवाला तीच राज्याभिषेक करूं शकते. कसा? हा असा—

'जिच्या सरस नि तुकतुकीत मांड्या हेच केळीचे दोन खांब, कृशकटि म्हणजेच जणूं

यज्ञ-वेदी, अशी ती मदनाची मंजिरी साव्या कलशांतून नव्हे, तर लावण्यजलानें कांठोकांठ भरलेल्या सु-वर्ण कुच-कुंभांतून, हृदयासनावर बसलेल्या मदनाला दिनरात्र अभिषेक करिते !

सांगा, असा शृंगार रसाचा अभिषेक, असा तो अनंगाचा अमृतानुभव, हल्लींच्या साहित्यांत नि समाजांत कुठें आहे? कुठें आहे?

## लाजवंती विलासिनी

**या** सौंदर्याला नि शृंगाराच्या दर्याला कुलरीतींची नि घरंदाजपणाची मर्यादा आहे, (म्हणूनच त्याचा प्रभाव अमर्याद आहे!) 'ना माका डर, ना बाप का डर' असा विलंदर शृंगार प्राचीन साहित्यांत सहसा दिसणार नाहीं. तेथें कुलरीति नि प्रियकर प्रीति या दोन खांबांना बांधलेल्या हृदय-हिंदोळचावर मदन झोके घेत असतो! म्हणूनच घरंदाज नायिका, शकुंतलेप्रमाणेंच प्रियकराला विचारते 'मी तप्त जरी मदनशरें विनय सोडुं कां?'....छे, छे, त्या कुल-कामिनीचें मदन-मस्त तारुण्यहि कधीं विनय सोडीत नाहीं. पहा ना त्या आळोखे पिळोखेहि कशा अंग चोरून देतात तें..जणूं कांहीं त्यांना अंगडाई देखील लाजत लाजतच येते !

त्यांची लाज केवळ कांत-सहवासांत नि एकांतांतच ओसरते. पण किती धीरे धीरे, किती क्रमा क्रमानें! एक लाजवंती मुग्धा आपल्या जिवलग मैत्रिणीला सांगते-'अग, एकमेकांकडे पाहून हृदयांत निर्माण झालेली माझी लज्जा प्रथम चेहऱ्यांत प्रकटली. मग गोड गोड गुजगोष्टी सुरूं होतांच ती चेहऱ्यांतून निघाली पण उरोज-प्रांतांत शिरली. पण गडे, त्यांनी गाढ नि गोड आलिंगन दिल्यामुळें माझ्या लज्जेनें कुच-तटहि सोडला. आणि ती निऱ्यांत जाऊन बसली ! माझ्या चतुर पतीनें मग निरीलाच हात घातला तेव्हां ती कुठें गेली अन् काय झालें, तें बाई मला कळलेंच नाहीं !!'

सांग, अशा त्या लाजाळू मुग्धा कुठें गेल्या? 'अंग वेडे, तूं जन्मभर अशीच भोळी भावडी नि लाजाळू मुग्धाच राहणार आहेस काय? भामिनी, जरा मानिनी हो; धीट हो. सरळपणा सोडून दे' असा उपदेश सखीनें केल्यावरहि भयभीत होऊन 'अग हळूं बोल, हळूं बोल. नाहीं तर माझ्या हृदयस्थ प्रियकराला ऐकूं जाईल ना!' असें म्हणणारी ती मुग्धा कुठें गेली?' मुग्ध मैनांचें तें मंजुळ बोलणें आतां कां वरें साहित्याच्या उपवनांत ऐकूं येत नाहीं?

## याद पियाकी आये !

**अशी** मुग्ध मैना ज्या राव्यांसाठीं आतुरतेनं वाट पाहते, ते खरोखरच भाग्यवंत होत. अहो, पण पिया-मिलनासाठीं आतुरतेनं प्रतीक्षा करीत दारांत उभ्या असलेल्या त्या व्याकुळ कुल-कामिनी कुठें गेल्या? दारांच्या बाह्यांवर किंवा खिडकीच्या कठड्यांवर स्तनांचे मंगल कलश टेकून अन् त्यावर आपलें मुखकमल ठेवून प्रियकराच्या स्वागतार्थ उत्कंठित झालेली राधिका कुठें आहे? शुभसूचक डावा हात स्फुरण पावतांच—

'हे वामबाहु ! लवकरच माझा श्रीरंग मला भेटणार अशी गोड सूचना तूं मला दिली आहेस. म्हणून मी तुझी अत्यंत आभारी आहे. तसें झालें तर उजवा हात दूर ठेऊन, तुलाच मी आलिंगन-कार्यासाठीं वापरीन अन् मिठीची मिठाई तुलाच देईन !' असें अभिवचन देणारी, अथवा—

'अरे डाव्या नेत्रा, तूं स्फुरण पावल्यानें माझी प्रियमीलनाची आशा पालवली आहे. मी तुझे उपकार कसे फेडूं ?... तो आला कीं, मी उजवा डोळा मिटून केवळ डाव्या डोळयानेंच त्याच्याकडे पाहीन !' असें आश्वासन देणारी आतुर विरहिणी आतां कुठें आहे ? 'कामातुराणां न भयं न लज्जा' एवढेंच प्राचीन वचन सार्थ करणाऱ्या आजकालच्या चटोर साहित्यांत, ही विरहिणी कुठें आढळेल काय ? अथवा, 'नको दूर देशिं जाऊं सजणा !' अशी गळ घालणाऱ्या प्रेयसीचें घरंदाज चित्रण कुठें पहावयास मिळेल कां ?

## रसिक हो, चतुर किती बायका !

या प्रेयसींमध्यें जशी आतुरता आहे, तशीच चतुरताहि आहेच. पहा, दीराची वाईट नजर आपल्यावर आहे हें जाणून कोणी कुलवधु घराच्या भिंतीवर लक्ष्मणाची कथा रेखाटून युक्तीनें सुचवित आहे– 'अरे देवरा, लक्ष्मण जसा सीतेशीं वागला तसा तूं माझ्याशीं वाग. हावरा होऊं नकोस !' पण अशा चतुरा आतां कोठे आहेत ?

'अंबरगत पयोधरांना रगडून तो मेला दूर पळून जातो ग' हें सत्य चुकून मुखावाटे बाहेर पडलें, तेव्हां सखीनें विचारलें 'कोण ग हा चावट ? तो नंदकिशोर का ?' मोठी पंचाईत आली. पण नायिकेनें चुक सांवरली. ती म्हणाली, 'नव्हे ग.. अंबरांतील पयोधरांना वारा रगडतो !'.... अशा तऱ्हेचीं चतुर उत्तरें देणाऱ्या त्या सुंदरी वाङ्मयाच्या वृंदावनांतून हद्दपार झाल्या आहेत काय ?..

एकदां रासक्रीडेंत कित्येक गोपी नाचून नाचून घामेजल्या तेव्हां त्यांच्या गोऱ्या गोऱ्या ओल्या गालांवर श्रीकृष्णाचें प्रतिबिंब पडलें. तेव्हां बाजूस असलेल्या एका चतुर गवळणीनें नृत्य प्रशंसा करण्याच्या बहाण्यानें त्या नर्तकीच्या कानापाशीं तोंड नेतां नेतां त्या प्रतिबिंबाचें मुके घेऊन आपली चुंबन-पिपासा भागविली. अहो, अशा त्या चतुर गोपी साहित्य-गोकुळ सोडून कुठें निघून गेल्या ?

गोपीच कशाला ? पाणपोईवरची कुंभदासीहि किती हुशार ! पहा, तिच्याकडे तोंड करून ओंजळीनें पाणी पिणारा मुसाफिर हाताची बोटें मुद्दाम विरळ करीत आहे, हें तिच्या पटकन् ध्यानांत आलें. आणि मग तिनेंहि नेत्र-सुखाचा काळ वाढावा म्हणून पाण्याची धार अधिकाधिक बारीक केली !

अशा त्या चातुर्य-चंपक-कलिका सध्यांच्या साहित्य-उद्यानांत फारशा कां फिरकत नाहींत ?

## दे दे माझें चुंबन वापस !

या चतुर नारी जेव्हां रुसून बसत, तेव्हां त्यांची रुष्टता दूर करण्यासाठीं, पुरुषांना सवाई चतुर व्हावेंच लागत असे. त्यांचें वाक् कौशल्य कसोटीवर घासलें जाई. पण आनंदाची गोष्ट ही कीं, ते त्या कसोटीला पुरेपूर उतरत.

पहा पहा चुंबन नाकारणाऱ्या कोण्या मानिनीला तिचा प्रियकर म्हणतो– 'हृदयेश्वरी ! तूं कोवाला हृदयांत स्थान दिलें आहेस. ठीक आहे. जशी तुझी मर्जी ! त्या रागालाच तूं तुझा प्रियकर मान. माझी हरकत नाहीं. पण हें बघ, या पूर्वी मी जीं जीं चुंबनें नि आलिंगनें दिलीं ती मला परत देऊन टाक म्हणजे झालें !'

अगदीं याच धर्तीवर एक उर्दू शायर आपल्या रुष्ट गुलवदनीला म्हणतो–

**ले लो अपना बोसा वापस काहे को तकरार की।**
**क्या कोई जागीर हमने छीन ली सरकार की।।**

पण या चतुर बोलांनीहि काम नाहीं भागले तर ? तर घालीन लोटांगण, वंदीन चरण ! एक प्राचीन प्रेमिक पाया पडून म्हणतो, 'सुंदरी ! खुशाल या बंदा गुलामाला लत्ताप्रहार कर ! तुला कोणीहि दोष देणार नाहीं. कारण अपराधी नोकराला मालकिणीनें लाथांनीं बडवणें लोकरीतीला धरूनच आहे. पण...पण...एकाच विचारानें मी दुःखित आहे. तूं लाथ मारतांच माझ्या शरीरावर स्पर्शसुखानें रोमांचाचे जे कांटे उभे राहतील, ते तुझ्या नाजुक पायांना बोचतील ना !

## रति-युद्धांतील वीर-गौरव !

सांगा मानिनींचा रुसवा काढणारें असें वाक्चातुर्य आतां वाङ्मयाच्या रंगमहालांत कुठें ऐकावयास तरी येते का ? छे, छे, तें शक्यच दिसत नाहीं. कारण हल्लीं रसराज नाराज आहे !

आणि म्हणूनच घरंदाज रति-संगरानंतर होणारा सत्कार-समारंभहि वाङ्मयांत कुठें आढळत नाहीं. सत्कार समारंभ ? होय सत्कार-समारंभ, वीरांचा मान-सन्मान ! पहा–

'मदन-संग्राम आटोपल्यानंतर कोण्या तृप्त सुंदरीनें झुंजार वीरांचा पुढील प्रमाणें सत्कार केला. तिनें विशाल जघनाला रेशमी वस्त्र दिलें; प्रतिपक्षावर कुचभल्लींचा मारा करणाऱ्या पुष्ट स्तनांना रत्नहार दिला; युद्धविराम-कराराची कलमें न ऐकण्याचा निर्धार केल्याबद्दल कानांना कुंडलें बहाल केलीं; दंतव्रणांची पर्वा न करणाऱ्या ओठांना मौनाचा विडा दिला; आलिंगनपटु बाहूंना रुणझुणतीं सुवर्णकंकणें दिलीं.... पण जे केस या युद्धांत 'मागे पडले' होते, त्यांना मात्र घट्ट वेणीच्या बंधनांत ठेवून एक प्रकारें शिक्षाच केली !'

अशा या मदन-संगरानंतर–'आतां पुरे

'अधिक नको' असा जो तृप्त-नकार मुख-कमलांतून बाहेर पडतो त्याचा महिमा शंभर होकाराहून अधिक ! पंडितराज जगन्नाथ म्हणतो– 'शंभर वेद वाचून वा महाभारताचें पारायण करून जी मनःशांति लाभत नाहीं, ती या तृप्त नकारानें लाभते ! त्या वेदान्ती 'नेति नेति' पेक्षां हा नकार शंभरपट सुखावह होय !'

बोला, आहे का असा सतृप्त नकार, असा घरंदाज सफल शृंगार, असा राजस रतिरंग तुमच्या हल्लींच्या साहित्यांत ? शक्यच नाहीं, कारण हल्लींच्या विफलता-वादी विटक्या यंत्रयुगांतील वाङ्मयावर रस-राज नाराज आहे !....

## सुधारस नि बेवडा

**रंगरावांची** रसवंती बहारदार होती. पण त्यांचा आरोप मला अतिरेकी वाटला. म्हणून मी म्हटलें, "रंगराव, हल्लींच्या साहित्या-बाबत वा पिढीबाबत तुमची तक्रार फारशी बरोबर नाहीं. प्राचीन साहित्यांत शृंगाराचा महासागर असेल, तर हल्लींच्या जमान्यांत सरोवर तरी आहेच !"

"अहो प्रश्न विपुलतेचा नाहीं; गुणवत्तेचा आहे. अभिरुचीचा आहे, 'टेस्ट'चा आहे. 'बेअरिंग'चा आहे. प्राचीन वाङ्मयांतील राजस शृंगार हा सुधारसांत अथवा उंची सोमरसांत घोळलेला आहे, तर हल्लींचा हातभट्टीच्या बेवड्यांत ! छे, हीहि उपमा ठीक नाहीं. कारण गेल्या १०–१५ वर्षांतील साहित्यांत खरा शृंगार फारसा आढळतच नाहीं. भासापासून पु. भा. भाव्यांपर्यंत आणि कालिदासापासून कुसुमाग्रजांपर्यंत अखंड वाहणारी राजस शृंगाराची सरिता, हल्लींच्या रुक्ष यंत्रयुगानें जणुं आटवली आहे...."

"हें पहा, उगाच निराधार आरोप करूं नका रंगराव. तुम्ही हल्लीचीं कांहीं मदन-मस्त मासिकें वाचीत नाहीसें दिसतें. तें 'सकलम्'-'विफलम्' मासिक नि त्याच जातीचें उठावदार साहित्य जर तुम्ही वाचलें..."

"उठावदार ?.. वाहवा, परदार-गमनाचा उठाव असलेलें तें उठवळ लिखाण ? शुद्ध छचोर चावटपणा आहे तो."

"पण तो तुमच्या प्राचीन साहित्यांतहि आहेच कीं ! अश्लीलतेची हद्द गांठणारा उत्तान शृंगार संस्कृतांत असला तर चालतो काय ?"

## संयम हवा, अभिरुचि हवी

"**मुळींच** चालत नाहीं. प्राचीन रसिकांना इष्क मंजूर आहे, ग्राम्य एय्याशी मंजूर नाहीं. अश्लीलता, बीभत्सपणा नि अनीतीचा पुरस्कार हीन अभिरुचीला कितीहि गुदगुल्या करो; घरंदाज शृंगाराला निषिद्धच आहे. याबाबत वड्या साहित्यिकांचीहि गय प्राची-नांनी केली नाहीं."

"कशावरून ?"

"अहो, कालिदासासारख्या थोर महा-कवीचें पाऊल 'कुमारसंभवां'त जरा वांकडें पडलें, तर आमच्या 'ध्वन्यालोक'कारानें त्याचाहि मुलाहिजा ठेवला नाहीं. कालिदासानें शंकर-पार्वतीचा जो संभोग-शृंगार वर्णिला त्यांत आकर्षकता आहेच. पण तें 'पित्रोः संभोग–वर्णनम् इव सुतरां असह्यम्' (आई–बापांच्या संभोगवर्णनासारखेंच अत्यंत असह्य आहे) असा अभिप्राय व्यक्त करून, 'तो दोषच आहे' (स दोषः एव) असा स्पष्ट निवाडा प्राचीन रसिकतेनें दिला आहे.

याच प्रमाणें आपल्या मुक्तेश्वराच्या भार-तांत– "**भद्रेत स्वात्योदकाची वृष्टि । धरिजे गुह्यांग-शक्ति-संपुटी । रत्न निपजेल जें कां सृष्टीं । मोलागळें त्रैलोकीं ।।** ही दुष्यन्तानें शकुंतलेला केलेली विनंती. अथवा—

**पयोधर पेंडीचिया आशां ।। विश्वामित्र करोनी म्हैसा । पाठीं धावें रेंकत ऐसा । विनोद दावी आमुतें ।।**

ही इंद्रादि देवांनीं रंभेला केलेली फर्माइश, कवीचें रूपक-कौशल्य दाखवीत असली तरी अश्लील नि ग्राम्यच मानली गेली आहे. पूर्वी सेन्सॉर बोर्डें नव्हती. पण जबाबदार साहि-त्यिकांनीं आपण होऊन संयम पाळावा अशी अपेक्षा होती. आणि ती त्या काळच्या साहि-त्यिकांना रास्तच वाटे. अश्लीलतेचें नि अभद्रतेचें समर्थन करण्याचें पाप प्राचीन साहित्यिकांनीहि केलेलें नाहीं !"

## रसहानि मंजूर नाहीं

"कां बुवा ? आल्हाद देणें हेंच जर साहि-त्याचें मुख्य ध्येय आणि आल्हादक्षमता हेंच

जर व्यवच्छेदक लक्षण, तर 'अश्लील अश्लील' म्हणून उत्तान शृंगार तरी निंदास्पद कां? त्यानें नीतिमत्ता विघडते म्हणून ?" मी विचारलें. तेव्हां रंगराव म्हणाले:—

"नाहीं, हा केवळ नीतीचा प्रश्न नाहीं. कलेच्या दृष्टीनेंहि अश्लीलता वर्ज्य मानावी लागते. कारण अश्लीलतेनें सुसंस्कृत रसिकाची रसलीन वृत्ति ढळते. आस्वाद्यता हेंच रसाचें मुख्य लक्षण. तिला हानि पोहोंचविणारी कोणतीहि गोष्ट प्राचीनांना मंजूर नव्हती."



"म्हणजे तुमचा कटाक्ष केवळ अश्लीलतेवर आहे. अनीतीवर नाहीं, असेंच ना ?"

"नाहीं. आम्हां जुन्या रसिकांना अनीति-पुरस्कारहि मान्य नाहीं. कारण तो समाजघातक तर आहेच; पण कलानंदांतहि व्यत्यय आणणारा आहे. सर्प कितीहि सुंदर असला, त्याची चपळाई कितीहि कलापूर्ण असली, तरी त्याचा विषदंत उपटून फेकणेंच श्रेयस्कर, त्य प्रमाणेंच अनीतीचें उच्चाटन कलेच्या दृष्टीनें देखील जरुरीचें असतें. नाहींतर रसास्वादांत व्यत्यय येतो."

"कांही तरीच काय सांगतां रंगराव ? अहो प्राचीन थोर साहित्यिकांनीं देखील दुर्गुणांचें नि अनीतीचें चित्रण केलें नाहीं काय ?"

### तेव्हां आणि आतां

"नाहीं कोण म्हणतो ? पण त्यांच्यांत नि हल्लींच्या गल्लेभरू संवंग साहित्यिकांत फार मोठा फरक आहे. राजाजींनी एके ठिकाणीं, गल्लेभरू सिनेमांतील दुष्ट-प्रवृत्तीचें चित्रण आणि पुराणांतील दुष्प्रवृत्तींचें चित्रण, यांची जी तुलना केली आहे, ती या संदर्भात उल्लेखनीय आहे. राजाजी म्हणतात—

"Why indeed did the great authors of our epics write about the lapses of Rama in Ramayana and Yudhishtira in Mahabharata? The stories are artistic creations, in which the lapses themselves impress the desired moral.

The modern cinema also projects on the screen much that is bad and immoral. Whatever may be the explanation offered by the protagonists of cinema, evil is presented on the screen in an attractive fashion, that grips people's minds and tempts them into the path of wickedness. Not so in the Puranas. Although they do point out that even great men now and again fell into error and committed wrong, the presentation is such, as to warn the reader and not to allure him into evil ways. This is the striking difference between our epics and modern talkies......"

आलें ना लक्षांत ? म्हणूनच व्यभिचाराच्या गल्लेभरू कथा लिहिणाऱ्यांनीं पुराणांतील ऋषी-मुनींचे दाखले देण्याचें ढोंग करूं नये. अशा ढोंगामुळेंहि खराखुरा रसराज नाराज झाला आहे !

—रंगरावांचें हें प्रवचन कितीतरी वेळ चाललें होतें. त्या प्रवचनांतील एकूण एक मुद्याशीं मी सहमत होतो असेंहि नाहीं. आधुनिक तरुण-तरुणींवर नि वाङ्मयावर ते जादा रुष्ट आहेत, असें मला वाटलें. पण कां कोण जाणें, 'हल्लींच्या पिढीवर' हल्लींच्या साहित्यावर रसराज नाराज आहे' ही त्यांची फिर्याद आजहि माझ्या मनांत घुमत आहे !

●●●



अनुक्रमणिका








दिल्लींत गाजलेली
फॅन्सी-ड्रेस-स्पर्धा
प्रतिशिवाजी
(आतां केवळ नांवाचा
रशियन मदत
अमेरिका मदत
धाडवाले
वेष काळा अन् पैसाही...
बोलकी बाहुली
गाडी चालते म्हणून अपघात होतात
भारतीय रेल्वेची प्रगती
शहेनशहा
कामराज की राम(बोलो)राज


बहुपात्री प्रयोग
नाटककार
प्रभावी वक्ता
काय बिशाद आहे आतां न सांपडेल!
संशोधन
दीपावली कडूनं सप्रेम विशाऽऽळजोड्या
एकच पात्री पण भलतीच 'चढली' आहे
एक पात्री
शृंगार
शृंगार
कखगघङ
कित्ता



जिंकू किंवा मरू



माणूसकीच्या शत्रूसंगे युध्द आमुचें सुरु




लढती सैनिक, लढूं नागरिक






लढतिल महिला




लढतिल बालक



शर्थ लढ्याची करूं




देश आमुचा शिवरायाचा

महाराणी लक्ष्मीबाई झाँसीवाली
रजीस्टर्ड ट्रेडमार्क
महाराणी छाप असली हिंग

झांशीवाल्या, रण राणीचा

शिरतळ हाती धरूं

शस्त्राघाता शस्त्रच उत्तर

भुई न देऊं एक तसूभर

मरूं पुन्हा अवतरूं

मेरे जैसा धीरज वाला....

हानी होवो कितिही भयंकर

खून, दरवडा, दारू बनवणे वगैरे कोणताच आरोप शाबित न झाल्यामुळे.....

पिढ्या पिढ्या हे चाले संगर

राजाला भूक लागली होती. भुकेमुळें राजा अस्वस्थ झाला होता. त्याच्या पुढें ताट आलें—पंचपक्वान्नांनीं भरलेलें! विविध रंगी पदार्थांचें! राजानें सपाटून हात मारला—

—आणि तरीही राजा उपाशीच राहिला.



डॉ. कु. दमयंती सरपटवार, एम्. ए. पीएच्. डी.

पुरातन कालीं विलासपूर नामेंकरून एक नगर होतें. तिथें विश्वसेन नामक एक सम्राट राज्य करीत असे. तो महापराक्रमी, विद्वान व सुलक्षणी होता. त्याच्या औदार्यशील वृत्तीमुळें त्याच्या राज्यांत चौदा विद्या आणि चौसष्ट कला समृद्धीनें वसत होत्या. हा सम्राट रसिक होता असें म्हटले तर ते स्वाभाविकच ठरते कारण चंद्रासारख्या शीतल आणि सुखदायी ग्रहाला किंचित् कलंक जसा शोभून दिसतो तद्वत विश्वसेनाच्या शौर्य औदार्य विद्वत्तेच्या तेजास ह्या रसिकतेच्या कज्जलचिन्हानें विशेष शोभा येते असें दरबारी चारणांचें प्रगट मत सर्वश्रुत होतें. त्याची रसिकवृत्ति सौंदर्यरसिक होती हे त्याच्या तारुण्यास अनुसरूनच होतें. त्याच्या पदरीं विविध सौंदर्यपूर्ण वस्तूंचा संग्रह होता. त्याच्या दरबारीं सौंदर्यपूजक कविवर होते. त्याच्या संगीतशालेंत स्वरसुंदर गायिका होत्या तशीं नामधुर वाद्येंहि होतीं. त्याच्या चित्रशालेंत चारुरंजित कलापूर्ण चित्रांचें वैपुल्य होतें. त्याच्या रंगशालेंत अभिनयचतुर नटनाट्यांचें प्राचुर्य होतें. त्याच्या वृक्षवाटिकेंत रंगगंधविचित्र फळांफुलांचा कलापूर्ण विकास होत होता. आणि त्याच्या अंतःपुरांतही सुभग विलासिनीचा सुखद सहवास सिद्ध होता. अशा चेतोहर वातावरणांत त्याच्या नैसर्गिक सुखासीन लोलुपतेला बहर येणें स्वाभाविकच होतें.

त्याच्या सुशोभित नगरांत असलेल्या पुष्पधन्वा मंदिरांत प्रतिदिनीं सायंकाळीं दर्शनास जाण्याची त्याची प्रथा होती. त्या समयीं नगरांतील तारुण्योत्फुल्ल प्रमदाही आरतीप्रसादासाठीं उपस्थित असत. देवभक्ति आणि देवांगनासंमोहन अशीं दोन्हीं प्रयोजनें साधणारी ही पर्वणी विश्वसेनास उपकारक ठरत असे. एके दिनीं सायंसमयीं अश्वरथासीन सम्राटास मार्गांतल्या प्रासादाच्या देहलीवर उभी असलेली एक सुवृत्त अंगना दिसली. त्याच्या सौंदर्यासक्त वृत्तीला तिचें आकर्षण वाटणें नैसर्गिकच होते. सन्निध वसलेल्या चारणाला त्याची ही बेहोष दृष्टि अभिनव वाटली नाहीं. अश्वरथ दूर जाईपर्यंत विश्वसेनाची दृष्टि त्या शोभनेच्या अंगप्रत्यंगावर खिळलेली पाहून तिच्या प्राप्तीची अपेक्षा करणाऱ्या सम्राटाला चारणानें तिची सर्व माहिती इत्थंभूत सांगितली. आपल्याच सचिवाचा तो प्रासाद असून ती प्रमदा त्याचीच नववधु आहे असें वृत्त ज्ञात होतांच बेचैन सम्राटास किंचित् समाधान झालें. ती नगरवासिनी सामान्य सुवासिनी असती तर तिची प्राप्ति दुर्लभ ठरून कदाचित् तिच्या प्राप्तीचे प्रयत्न कुत्सापात्र झाले असते. उलट ही कुरंगाक्षी त्याच्या सेवकाची पत्नी असल्यामुळें पर्यायानें त्याच्या अधिकारकक्षेंत सामावली जाणे वैध होतें. आपल्या राजमहालांत शय्यांकित झालेल्या विश्वसेनास त्या रात्रीं मनःशांति प्राप्त झाली नाहीं. त्या सचीव पत्नीच्या अव्यवहित साहचर्यासाठीं आतुर झालेल्या त्या सौंदर्यासक्त राजाच्या डोक्यांत अनेक भोगासक्त विचारांचे तांडव सुरू होतें. अखेरीस कामक्लिष्ट विश्वसेनास पहांटे पहांटे इष्ट वासनापूर्तीचा सुलभ मार्ग सुचला आणि त्या आनंदांत त्याला प्रहर द्विप्रहर निद्रा लाभली.

दुसरे दिनीं स्नानसोपस्कार परिपूर्ण झाल्यानंतर नित्यक्रमाप्रमाणें विश्वसेन दरबारकक्षांत उपस्थित झाला. प्रमुख सचीव आज्ञादत्तानें त्यास उत्थापन देऊन राज्यकारभाराच्या प्रचलित समस्यांचें निवेदन केलें. पौर्वद्वीपाच्या राजपुत्राच्या राज्यारोहण समारंभास प्रतिनिधी नियुक्त करण्याच्या आज्ञादत्ताच्या पृच्छेला विश्वसेनानें बृहत्केतुची योजना केल्याचें उत्तर मिळाल्याचें ऐकून आज्ञादत्तास थोडा अचंबा वाटला. ह्या परराष्ट्रसंबंधाच्या महत्वाच्या उत्सवप्रसंगीं एका अननुभवी नवसचीवाची ही योजना अयुक्त होती. तरीपण त्याच्या कार्यक्षम कर्तृत्वाची प्रशंसा सम्राटमुखांतून श्रवण करतांच आज्ञादत्तास ही योजना मान्य झाली. वस्त्रप्रावरणें व जडजवाहिराचा उपहार सिद्ध करून त्याच दिनीं बृहत्केतूस रवाना करण्याची राजाज्ञा मात्र अनावश्यक सत्वरतेची वाटूनही तशी व्यवस्था करण्याचें














आज्ञादत्तानें आश्वासन दिलें. वृहत्केतूस पाचारण करण्यांत येऊन व्यक्तिशः सम्राटांनीं ही सुवार्ता त्यांस कथन केली व ह्या कार्याचें उत्तरदायित्व विशद केलें. वृहत्केतूही आपल्या सौभाग्यानें भारावून गेला आणि ह्यानें सम्राट विश्वसेनास अभिवादन करून एक दोन प्रहरांतच प्रवासास जाण्याचें पत्करलें.

बृहत्केतू प्रवासाला गेला त्याच्या दुसऱ्या दिवशीं विश्वसेन महाराज दरबारी कामकाज संपल्यावर पुन्हां प्रासादांत आले आणि दरबारी पोशाख उतरून आपल्या इच्छित कर्तृत्वाला साजेल असा रंगेल पोशाख चढवून त्यांनीं स्वदेहास चंदनी सुगंधाची चर्चा केली आणि तुरेबाज मंदिल शिरीं चढवून प्रासादाच्या पार्श्वदारानें गुप्तपणें ते बृहत्केतूच्या समीप असलेल्या गृहाकडे निघाले. बृहत्केतूच्या प्रासादाच्या उद्यानांतून पार्श्वदारीं येऊन ते पोहोचले तेव्हां कामज्वराच्या पीडनेनें तप्त झालेली त्यांची देहयष्टि थरथर कांपत होती. आगामी देहशांतीच्या मनोराज्यांत व्यग्र झालेल्या मनांतही काहूर माजलें होतें. सचीवपत्नी आपलें स्वागत करील की आपली निर्भर्त्सना करील ह्याबद्दल दोलाचलित झालेल्या मनःस्थितींत त्यांचीं पावलें दोलायमान होत होतीं. उद्यानाच्या उत्तरेस असलेल्या उपगृहाचें द्वार त्यांना उघडें दिसले व त्यांनीं त्या दिशेला पावलें वळवलीं.

उपगृहाच्या समीप ते पोहोंचतात न पोहोंचतात तोंच केशकलाप विखरून पाठमोरी वसलेली कुणी अर्धवस्त्रा प्रमदा दिसली. विश्वसेनाची चाहूल लागतांच अचानक बावरलेल्या त्या स्त्रीनें वस्त्र कसेंबसें सांवरून पाठीमागें पाहिलें. सम्राट विश्वसेनानें आपल्या लक्ष्यास अशा अर्धावृत्त अवस्थेंत पाहूनही ओळखलें इतका तो चतुर होता. त्या प्रफुल्ल प्रमदेस पाहून तो अधिकच मोहून गेला. ती रमणी मात्र विश्वसेनास पाहून क्षणभर बावरली आणि लज्जासुलभ वृत्तीनें तिनें आपले निकट पडलेलें उत्तरीय उर्ध्व देहाभोंवतीं आवृत्त करून घेऊन ती स्तोकनम्रावस्थेंत उभी राहिली. तिच्या कानीं सम्राटाचा मृगयाछंद आलेला होता आणि आपल्या प्रिय प्रासादाच्या पतिराजाच्या अनुपस्थितींत पार्श्वमार्गानें प्रवेश केलेल्या विश्वसेनास पाहून त्या चाणाक्ष पतिव्रतेच्या हृदयांत भावी अतिप्रसंगाची भीति निर्माण झाली.

कल्पलता नववधु असली तरी एक निस्सीम पतिव्रता होती. बृहत्केतूवर तिचें परम प्रेम होतें आणि विवाहानंतरच्या सुखद संक्रमणावस्थेंतच पतिराजाचा विरह सहन करण्याचा दुर्दैवी प्रसंग तिच्यावर ओढवूनही ती यत्किंचितही विचलित झाली नाहीं. सम्राटाचा तो रंगेल अवतार आणि कामार्त दृष्टि ओळखूनही ती तटस्थ राहिली. प्रसंगावधान अंगीं असल्यामुळें तिनें क्षणांतच स्वतःला सांवरले आणि विश्वसेनास दुरूनच अभिवादन करून त्याच्या अकस्मात् आगमनाचें प्रयोजन विचारलें. विश्वसेनाला तिच्या ह्या अनपेक्षित स्पष्टोच्चाराचें आश्चर्य वाटलें आणि आपल्या आगमनाचें प्रयोजन निर्विमर्शपणें सांगितल्यास ही नववधु वश न होतां कदाचित् तिच्या भयाकुल उत्क्रोशामुळें बेरंग होईल हें जाणून विश्वसेनानें कथन केलें कीं राजप्रासादाच्या प्राकारांत जलाशयाजवळ विश्रांति घेत असतां दूरवर एक मृगशावक दृष्टोत्पत्तीस पडलें. त्याचा मागोवा घेण्यासाठीं तत्काल सिद्ध झालेल्या आपणांस तें शावक प्रस्तुत उद्यानाकडे वळलेलें दिसतांच त्याचा वेध घेण्यासाठीं त्वरेनें त्याच्या पश्चात् आपलीं पावलें इकडे वळलीं. मृगशावक सांपडलें नाहीं ह्याचा विषाद वाटला. पण मृगाक्षीच्या दर्शनानें आपला श्रमपरिहार झाला.

कल्पलतेला ह्या स्तुतीनें आनंद वाटला असता. पण मृगाचा मागोवा घेणाऱ्या मृगाधिपाची मृगाक्षीची मृगया करण्याची महत्वाकांक्षा जाणून त्याच्या ह्या मिथ्या विधानास तिनें बुद्धयाच प्रत्युत्तर केलें नाहीं. आपल्या प्रिय पतीचा प्रभु दुष्टबुद्धि असला तरी राज्याधिपति असल्यामुळें त्याला उत्थापन न देणें अवहेलनापूर्ण ठरेल. म्हणून तिनें विश्वसेनास उपगृहांतील आसनावर बसण्याची विनंती केली आणि त्याच्या शिष्ट स्वागतासाठीं ती अंतर्गृहांत गेली. विश्वसेनानें बुद्धयाच विश्रांतीच्या सबबीखालीं मंचकाचा आश्रय केला. क्षणांतरानें

त्या कामिनीनें सुश्लिष्ट वेषपरिधान करून रौप्यतबकांत जलपानाचें साहित्य आणून मंचकासमीप ठेवलें. तिचा हा आकर्षक नववेष आणि स्वागतसिद्धीची उद्युक्तता पाहून विश्वसेनानें अनुकूल अर्थ मानून विलोभित वाणीनें तो उद्गारला, "हे मानिनी! राजशकटांतून तुझें गतदिनीं जे दर्शन झालें त्यानें मी मोहून गेलों आहे व तुझी अभिलाषा धरून मी अनुकूल समयीं आज उपस्थित झालों आहे. तूं जर मला वश झालीस तर वस्त्रालंकाराच्या उपहारानें मी तुझी संभावना करीन. तरी मजला सक्रिय उपकृत करण्याचें व्रत त्वा अंगिकारलें तर आपण उभयतां सर्वतयां सुखोपभांत अवगाहन करून जीवन कृतकृत्य करूं....."

विश्वसेनाची ही विषाक्त सूचना श्रवण करतांच कल्पलता शहारून गेली पण आलेल्या कटु प्रसंगाला युक्तीनें तोंड देण्याची समयसूचकता योजण्याच्या विचारानें तिनें प्रगट प्रतिकाराऐवजीं प्रच्छन्न परिहाराचा मार्ग स्वीकारला आणि मंद हास्य करून ती म्हणाली, "महाराज, आपण ह्या भूमीचें सम्राट आहां. आपणां तनमनधनाची कमतरता नाहीं. आपल्या अंतःपुरांत सौंदर्य सम्राज्ञीगण आपल्या अष्टौप्रहर सेवेला सिद्ध असतां आपली कृपादृष्टी ह्या अपात्र दासीकडे वळली हे माझें सौभाग्यच आहे-पण आपणांस स्पर्श करण्याचीही अर्हता नसलेल्या माझ्यासारख्या स्त्रीनें ह्यास मान्यता दिली तर त्यामुळें आपली अवहेलना मात्र होईल. यास्तव आपण मला विचार करण्यासाठीं अल्पकाल द्यावा आणि तोपर्यंत आपलें यथाशक्ति स्वागत करण्याची माझी आकांक्षा आपण सुफलित करण्यास मान्यता द्यावी एवढेंच ह्या दासीचें मागणें आहे."

कल्पलतेचें ते नर्ममधुर शब्द कानीं पडतांच विश्वसेन मोहरून गेला. आपली उपेक्षा न करतां आपले संकल्पित हेतु पूर्ण करण्याची अनुकूलता दर्शविणाऱ्या तिच्या भाषणानें विश्वसेनास जणुं आपली इच्छापूर्ति झाल्याचेंच समाधान प्राप्त झालें. भोजनाची सिद्धता करण्याच्या हेतूनें कल्पलता अंतर्गृहांत गेली. जातांना अभ्यागत राजाच्या विनोदनासाठीं तिनें लघुकोष्ठांतून ग्रंथ काढून सम्राटासमीप ठेवला. 'कृतवीर्य नीतिसारकथा' ग्रंथ चाळणाऱ्या राजाचें चित्त त्यांतल्या रंजक कथांनीं रंजित होण्यापेक्षां जारकर्म, चौर्य, मिथ्यावाणी गालिप्रदान आणि कुविचार इत्यादि अनिष्ट आचरणानें नरकप्राप्ती झालेल्या दुष्टात्म्यांच्या अधःपातानें विचलित झालें. क्षणैक त्याला स्वतःच्या अविचाराचा पश्चातापही झाला



## मनांत निरभ्र

मनांत निरभ्र
थवा बगळयांचा
उडणारा शुभ्र

हिरवे कुरण
बागडते आहे
उन्हाचे हरीण

वाऱ्याची लहर
मनांतली जशी
मुक्तशी लकेर

वर निळेपण
तुडंबसे – जशी
तुझी आठवण

—वृंदा लिमये

आणि असहाय कल्पलतेच्या उपभोगाच्या आपल्या मनीषेची त्याला घृणा वाटली.

विश्वसेनाच्या अस्वस्थ अवस्थेंत निश्चय पूर्ण होण्यापूर्वी कल्पलतेनें प्रवेश करून भोजनगृहांत पात्रसिद्धतेची व्यवस्था तयार असल्याचें सांगून हस्तमुखप्रक्षालनाची विनंति केली. विश्वसेनानें ग्रंथ बाजूला सारला व तो मंचकावरून उठून भोजनगृहाकडे वळला. सुशोभित भव्य चौरंगावर छोटयामोठया थालिकांत विविध पदार्थांची रचना केलेली होती. सुशोभित पुष्पगुच्छ आणि सुगंधी ऊदधूपाच्या वातावरणानें विश्वसेनाची बुभुक्षा अधिकच चाळवली होती. कल्पलतेनें विश्वसेनास आसनावर संस्थापित केले व ती पक्षचामरानें वारा घालीत बाजूला उभी राहिली. विविधरंगीं विविधविधरूपी उपाहार साधनांनीं परिपूर्ण असलेल्या चौरंगावरील प्रत्येक पदार्थाची चव घेतांना तो कल्पलतेच्या पाकसिद्धीची प्रशंसा करीत होता. पण त्याला कालांतरानें राहून राहून एक आश्चर्य वाटत होतें कीं, हे पदार्थ आकर्षक अशा रंगांत व आकारांत सिद्ध करण्याचें कौशल्य सहेतुक होते किंवा काय. कारण सर्व पदार्थ प्रत्यक्ष चवीनें एकसारखेच वाटत होते.

अखेर न राहवून विश्वसेनानें कल्पलतेला पृच्छा केली, "हे, सुगात्री, त्वां सिद्ध केलेल्या ह्या अनेकाकारी विविधरंगी पदार्थांच्या वैविध्यानें प्रथमदर्शनीं मी मोहून गेलों, पण त्यांचा स्वाद घेतल्यानंतर त्यांतलें सत्व एकच आहे असें आढळल्यामुळें माझ्या उत्सुक रसिकतेचा किंचित् अपेक्षाभंग झाला एवढेंच नव्हे तर त्यांच्या चवीच्या अभिन्नतेनें ते तिरस्करणीय आणि स्वादहीन वाटूं लागले आहेत. ह्या पाकसिद्धीच्या वैशिष्टयाचें प्रयोजन काय?"

कल्पलतेनें मंद हास्य केलें व ती विश्वसेनाला म्हणाली, "महाराज, आपण सौंदर्यगुणज्ञ आहांत अशी आपली कीर्ति आहे. आपल्या अंतःपुरांत अनेक सौंदर्यसम्राज्ञी आपल्या सेवेस सिद्ध आहेत. यौवन, देहसौष्ठव, रूप, रंग इत्यादिकांच्या ऱ्हस्वदीर्घतेच्या आकर्षणामुळें आपण प्रत्येकीची निवड केली आहे. आपल्या वैशिष्टयपूर्ण बाह्याकर्षणानीं त्यांनीं आपल्यास लोलुप केलें असलें तरी त्यांच्या सहवासानें त्यांच्यांतील मध्यवर्ति सत्वाची अभिन्नता आपणांस परिचित होऊनही आपली क्षुधा अजून प्रज्वलित राहिली, ह्याचें मला आश्चर्य वाटलें. प्रत्यही नवनवीन पुष्पाच्या मधुसेवनाचा स्वाद घेणाऱ्या भ्रमरापेक्षां आपण अधिक विचारवंत आहांत असें जाणून आपणांस ह्या उच्छृंखल वृत्तीपासून परावृत्त करावें व आपला आजचा अधःपात टाळून माझ्यासारख्या असहाय अबलेच्या पावित्र्यविडंबनाचा परिहार व्हावा ह्या हेतूनें मी ही पाकसिद्धीची योजना केली त्याबद्दल आपण ह्या दासीला क्षमा करावी."






कल्पलतेच्या ह्या चतुर कल्पकतेनें विश्वसेनास राग न येतां आपल्या अंध उपभोगवृत्तीचें नग्नस्वरुप ह्या दृष्टांतानें स्पष्ट केल्याबद्दल त्यानें तिचें कौतुकच केलें. तिनें पुढे केलेल्या तबकांतील तांबूलाचा स्वीकार करून विश्वसेन आसनावरून उठला आणि आपला वेष ठीक करून कांहीं न बोलतांच पश्चात्तापदग्ध मुद्रेनें आलेल्या मार्गानें उद्यानांतून त्यानें प्रयाण केलें. तो दूर गेलेला पाहातांच कल्पलतेनें पूजाकक्षांत जाऊन साष्टांग अभिवादन केलें व कुलदैवताचें रक्षण केल्याबद्दल आभार मानले. आणि जणूं कांहीं घडलेंच नाहीं अशा स्थितप्रज्ञ वृत्तीनें तिनें आपल्या दैनंदिन गृहकृत्यास आरंभ केला.

तृतीय दिनीं बृहत्केतू आपल्या प्रवासाहून परतला आणि राजदरबारीं वृत्तांत निवेदन करण्यापूर्वीं श्रमपरिहारासाठीं पुष्पवाटिकेंतल्या त्या उपगृहांतील मंचकावर विश्रांतीसाठी पहुडला. निद्रेनंतर जागृति आल्यावर उपाधानतलाशीं कांहीं खुपत आहे असे वाटून त्यानें संशोधन करतांना त्याला तिथें एक मौल्यवान रत्नजडित आंगठी आढळली. तिच्यावर अविष्कृत असलेली राजमुद्रा पाहतांच त्याचें मन विचाराधीन झालें. आपल्या देशांतराच्या मोहिमेचें प्रयोजन हेतूपूर्वक असावें आणि आपल्या अनुपस्थितींत सम्राटाचा सहवास ह्या मंचकास लाभला असावा ह्या कल्पनेनें तो बेचैन झाला. आपली नववधु कल्पलता सुंदर असूनही सुगुणी होती ह्याची त्याला खात्री होती. मग आपल्या ह्या कौटुंबिक अधिकारक्षेत्रांतल्या ह्या राजमुद्रेचें रहस्य काय?

आपल्या पत्नीशीं तो आल्यानंतर बोलला होता. कुशल पुसल होतें. प्रवासमहोत्सवाची चर्चा केली होती. पण सहभोजन करतांनाही त्या मुग्धकन्येनें सम्राटाच्या किंवा परपुरुषाच्या आक्रमणाबद्दल अवाक्षरही विदित केलें नव्हते हें त्याला स्मरलें. कदाचित् दुर्धर प्रसंगांतील असहाय अवस्थेचें विशदीकरण करणें तिच्या स्त्रीसुलभ वृत्तीला यथायोग्य वाटलें नसेल. तरी पण अप्रिय घटनेचा पश्चाताप तरी तिच्या मुद्रेवर प्रतीत होणें संभाव्य होतें. आणि तशी चिन्हें न आढळतां उलट सस्मित व सोत्साही मुद्रेनें वर्तन करणारी कल्पलता एकतर पापी असली पाहिजे किंवा निर्ढावलेली लोभी स्त्री असावी ह्या विचारानें तो ग्रस्त होऊन गेला.

आणखी कांहीं दिवस गेले. मास लोटले. बृहत्केतूनें कारणपरत्वें आवश्यक संभाषणाशिवाय कल्पलतेशीं सहवास टाळला आणि तो आपल्या कक्षांत एकाकी व्यग्र राहूं लागला. कल्पलतेला आपल्या ह्या पतीच्या उपेक्षावृत्तीचें आश्चर्य वाटलें. तिच्या मनांत बृहत्केतूच्या वर्तनाच्या संभाव्य कारणाची कल्पना येणें शक्यच नव्हतें. सम्राटाच्या प्रयाणानंतर ती उपगृहांत गेलीही नव्हती आणि त्या प्रसंगाची स्मृतीही ती सुखद परिवर्तनानंतर जवळजवळ विसरूनही गेली होती. त्यामुळें पतीच्या ह्या अबोल व अकर्मक वृत्तीनें ती अगदी विव्हल झाली होती. विरंगुळा वाटावा म्हणून त्या नगरांत असलेल्या पितृगृहीं जाऊन तिनें मातेस हें कटुवर्तमान निवेदन केलें. मातेनें अनुकूल प्रसंगीं पित्याच्या कानीं आपल्या जामाताच्या ह्या उपेक्षावृत्तीचें कथन केलें. व राजदरबारीं जाऊन आपल्या गौरवस्थानाच्या अधिकारानें आणि राजस्नेहाच्या बळावर राजातर्फे जामाताला मंत्र देण्याविषयीं प्रवृत्त केलें.

योग्य ती संधि प्राप्त होतांच कल्पलतेचा पिता दरबारीं गेला असतां राजकारण चर्चेनंतर सम्राटानें त्यास कुशल विचारलें. सुदैवानें बृहत्केतूखेरीज इतरेजनांचें तत्स्थानीं अस्तित्व नाहीं हें पाहून त्यानें सम्राटास आपला अभियोग निवेदन केला.

"राजाधिराज! माझ्या अधिकारभूमींत बीजारोपण करून एक लतांकुर उत्पन्न झाला. त्याची योग्य निगा राखून ती लता फलद्याली व प्रफुल्लित होतांच ह्या बृहत्केतूची सर्वथैव पात्रता जाणून मी ती

त्यास अर्पण केली. ह्या गुणग्राही गृहस्थानें किंचित्काल लतेची निगा राखिली आणि फलग्रही वृत्तीनें तिचा उपभोगही घेतला. आणि असें असूनही सांप्रत ह्या पराधीन लतेकडे दुर्लक्ष करण्याची वृत्ति त्याच्यांत निर्माण झाल्यामुळें इष्ट त्या पोषणद्रव्याभावीं माझी ही उपहारित लता आज सुकून चाललेली मला पाहवत नाहीं. आपण ह्या माझ्या जामाताला—आपल्या कार्यकुशल सचीवाला उपदेश करावा अशी माझी नम्र याचना आहे".

हे त्याचे शब्द ऐकतांच बृहत्केतूनें सम्राटास अभिवादन केलें व तो म्हणाला, "महाराज, हे माझे श्वशुर निवेदन करतात ते सत्य आहे. ह्यांनीं मजकडे निगा राखण्यास अर्पण केलेल्या लतेची मी योग्य ती काळजी घेतली. शस्योत्पादक द्रव्य खर्ची घालून तिला हृष्टपुष्ट व फलधारी करण्यासाठीं कष्ट केले आणि पुष्पांचा उपभोग घेण्याच्या रसिकवृत्तींत कुचराईही केली नाहीं असें असतांना एके दिवशीं कार्यपरत्वें मी उद्यानाबाहेर गेलों असतां परत आल्यावर परिसरांत वनराजाच्या पदचिन्हाचें संस्कार मला आढळले. त्यामुळें स्वहितासाठीं आणि आत्मरक्षणासाठीं मी लतेच्या जोपासनेची अभिलाषा त्यजून उद्यानापासून मी दूर राहण्याचा यत्न केला. ह्यांत अस्वाभाविक काय आहे ? असेल तर आपण मला दोषार्ह ठरवून दंडपात्र ठरवा. मी आपला नम्र सेवक आहे."

बृहत्केतूची ही चतुर उपपत्ति ऐकून सम्राट विश्वसेन क्षणभर विचलित झाला. पण व्यवहारचातुर्यानें त्याला प्राप्त परिस्थितीची जाणीव होऊन सचीवगृहांत विसरून पडलेल्या राजमुद्रेची जाणीव झाली. त्याची कल्पना होती कीं, जलविहाराच्या वेळीं ती कधींतरी जलाशयांत हरवली असावी. ह्या राजमुद्रेच्या मंचकावरील अस्तित्वानें झालेला हा विरस लक्षांत आल्यावर विश्वसेनानें दृष्टांताच्या अभिप्रेत अर्थास अनुअनुसरून वक्तव्य केलें.

"प्रिय बृहत्केतू, तुझ्या उद्यानांत वनराजाची पदचिन्हें आढळली असलीं तरी वनराजानें तुझ्या उद्यानांत स्वैरविहार करून लतापुष्पांचा आणि बीजक्षेत्राचा विध्वंस केलेला नाहीं. मला ज्ञात झालेल्या वृत्तांतानुसारच नव्हे तर पुण्य पुरुषांची शपथ घेऊनही मी तुला असें आश्वासन देतों कीं, त्वां निस्संशय आपल्या उद्यानांत विहरावें. लतापुष्पाचा इच्छास्वाद उपभोगावा. वनराजानें अस्पर्शीत राखलेल्या ह्या तुझ्या कर्मभूमीची निगा त्वां योग्य तऱ्हेनें पूर्ववत् घेऊन पुष्पफळांनीं लतेला समृद्ध करणाऱ्या उद्यानपालकाचें कौशल्य उपयोजावें अशी तुला माझी विनंति आहे."

सम्राटाचें हें निश्शंक आश्वासन ऐकून बृहत्केतूची समजूत पटली आणि समाधान वृत्तीनें तो स्वगृहीं परतला. आपल्या उद्यानलतेच्या उपेक्षेचा त्याला पश्चाताप झाला आणि त्या दिवसापासून उपेक्षाकालांतल्या परित्यागाचे प्रत्यर्पण तनमनधनेंकरून साधून अल्पकालांतच उद्यानाला सुफलित केलें. सम्राट विश्वसेनानेंही पुष्पलतेचा गौरव करण्यासाठीं खास दूताकडून तिला सौभाग्यलेणीं व रत्नालंकार पाठवून कर्तव्यच्युतीच्या पापापासून परावृत्त करणाऱ्या त्या साध्वीशीं कृतज्ञता व्यक्त केली. तसेंच बृहत्केतूची गौरवपदीं नियुक्ति करून त्याच्या शिष्ट वर्तनाची व कार्यक्षमतेची अनरूप संभावना केली.

अशा तऱ्हेनें साध्वी पुष्पलता आणि कर्तव्यदक्ष बृहत्केतू ह्यांचा संसार तदनंतर समृद्ध झाला हें सूज्ञांस सांगणें नलगे. ●●●

**नटून सजून फिरायला, सिनेमाला जायच्या तयारीनें ती तयार झाली. पण तो जागचा हललाच नाहीं. वारंवार तिनें सांगूनही तो हलला नाहीं. पण असं कां ?**

—शिरीष पै



# एका संध्याकाळीं

संध्याकाळ कशी सुरेख होती. हवा थंड होती. वातावरण प्रसन्न होतं. कुठं गजबजाट नव्हता. सगळीकडे अचानक शांत झालं होतं. फक्त माड सळसळत होते. तेवढाच काय तो मर्मरध्वनी कानावर पडत होता.

मी त्याला म्हटलं, "चल ना–आपण फिरायला जाऊं या."

तो कांहींच म्हणाला नाहीं.

मी म्हटलं, "किती दिवसांत आपण दोघं मिळून फिरायला गेलोंच नाहीं... मनसोक्त भटकलोंच नाहीं. आज जाऊं या. हवा कशी छान आहे बघ."

तरीही तो कांहींच बोलला नाहीं.

मी पुन्हा म्हटलं, "पूर्वी आपण दोघे मिळून किती भटकायचों नाहीं रे? उन्हांत, पावसांत, वाऱ्यांत, अंधारांत, वेळ कुठलीही असो, कशा कशाला न जुमानतां नुसतेंच भटकलों. नाहीं रे?"

त्यानं नुसताच निःश्वास सोडला आणि तो डाव्या कुशीवरून उजव्या कुशीवर वळला. भिंतीकडे तोंड आणि माझ्याकडे पाठ करून गप्प पडून राहिला. बिछान्यावर पडल्या पडल्या मगापासून एक पुस्तक वाचण्याचा त्याचा आटोकाट प्रयत्न चालला होता. मग तें पुस्तक बिछान्यावर पालथं टाकून त्यानं एक सिगरेट पेटवली होती. तो ती ओढत असा नव्हताच. ती नुसतीच जळून चालली होती. तिचा गरम चटकदार वास मात्र खूप दरवळत होता.

"मग जायचं ना फिरायला आपण?" मी आपला मुद्दा न सोडतां पुन्हां विचारलं. "मी साडी बदलते."

तरीही त्यानं उत्तर दिलं नाहीं.

"कुठची साडी नेसूं? ती परवां घेतलेली 'स्क्रीनप्रिंट' मधली गुलाबी फुलांची नेसूं? इतकी आवडते ती साडी मला! जपानमधल्या चेरी ब्लॉसमच्या झाडाला बहर आला म्हणजे तीं झाडं कशी दिसतात! तूं चित्रांत पाहिलीस का कधीं तीं झाडं? तसा भास होतो मला त्या साडीवरचं प्रिंट पाहिलं कीं. अजून घडी मोडली नाहीं मी त्या साडीची. नेसूं?"

"हुं", तो सिगरेटचा एक दमदार झुरका घेऊन खूपसा धूर हवेंत सोडीत म्हणाला. त्याच्या कपाळावर तीनचार आठ्या उमटल्या. होत्या. एकामागे एक, ओळीनें. घट्ट,

"बरं का, परवां मी एक सुंदरशा वासाची पावडर आणली आहे. ती 'लॅक्मे'ची कांहींतरीच निघाली म्हणून ही 'यार्डले'ची आणली आहे. तुला लावून दाखवतें हं."

त्याच्या दातांत कांहींतरी अडकलं होतं तें त्यानं 'थुक्' करून उडवून टाकलं आणि बिछान्यावर पालथं टाकलेलं पुस्तक उचलून तो तें चाळूं लागला.

'पाच मिनटांतच तयार होते हं मी. मुळीच वेळ लावणार नाहीं, मी खात्रीचं आश्वासन दिलं आणि तयारीला लागलें. भराभर तोंड धुतलं, केस विंचरले, स्नो पावडर लावली, ओठावरून पुसटशी लिप-




अनुक्रमणिका

स्टिक फिरवली, डोळ्यांत नाजुक हातीं काजळ घातलं, कपडे बदलले, सेंट लावलं, पर्स आणि रुमाल हातांत घेतली आणि नाटकांत 'एंट्री' करावी तशी त्याच्यासमोर सज्ज होऊन येत म्हणालें, "चला तयार व्हा. निघायचं ना?"

"नको, एकच शब्द त्यानं उच्चारला. पण अगदीं स्पष्टपणें, खंबीरपणें आणि ठामपणें. माझ्याकडे त्यानं बघितलंसुद्धां नाहीं.

"नकोऽऽ?" मी निराशेनं खंगलेल्या व्याकुळ स्वरांत विचारलं.

त्यावर तो कांहींच उत्तरला नाहीं.

मग माझ्या निराशेचं संतापांत रूपांतर झालं. एका क्षणांत तो संताप साऱ्या शरीरांत पसरला. स्वतःवरचा तावा सुटून तोल जाऊन धाडकन् कुठच्या कुठं पडावं तसं झालं माझं. वागणुकींतली सारी अदब भिरकावून देऊन मी खेकसलें.

"मग हें आधीं सांगता येत नव्हतं का ?

"मी आधीं कबूलच केलं नव्हतं."

इतक्या वेळांत तो आत्ताशी कुठं एक वाक्य बोलला. आणि इतक्या वेळांत आत्ता तो मनापासून बोलला. बोलतांना किंचितसा हंसलाही. ह्या हंसण्याचा अर्थ होता – 'तुला काडीची अक्कल नाहीं ?

मग मी वसकन् त्याच्या अंगावर जात ओरडले, "एवढा वेळ मी इथं नाचानाची करीत होते तेव्हां तुझं लक्ष कुठं होतं?"

"मी माझ्या विचारांत होतों."

"खोटं...खोटं...," माझा आवाज आणखीच उंच गेला होता.

"मगापासून शांत बसून गंमत बघत होतास माझी. मी काय विचारतेय्, काय करतेय् हें सगळं तुला पक्कं माहीत होतं, दिसत होतं. पण एकदाचं माझं मन दुखलं पाहिजे ना ? मी आनंदांत असलेली तुला पाहवतच नाहीं. दुष्ट कुठचा! आधीच सांगून टाकायचंस कीं तयार होऊं नकोस म्हणून.'

"गप्प बस," तो फक्त एवढंच अधिकारवाणीनं आणि हुकूम सोडीत म्हणाला.

मी रागारागानं दुसऱ्या खोलींत जाऊन बसले. जागच्या जागीं फणफणत, धुसफुसत, पुटपुट करीत. जरा वेळ असाच गेला. वाटलं, तो उठेल, माझी समजूत घालील आणि आर्जवी स्वरांत म्हणेल, "रागावलीस ?"

पण तो आला नाहीं. जागचा जरासुद्धां हलला नाहीं. मी हळूच उठून पडद्याच्या फटींतून चोरून त्याच्याकडे पाहिलं, वाटलं कीं तो 'मी येईन' अशा अपेक्षेनं दाराकडे पहात असेल. पण तो शांतपणें मगाच्या जागींच पडला होता. जणुं मी पलीकडच्या खोलींत नव्हतेच. जणुं मी घरांत नव्हतेच. डावा हात कपाळावर पालथा ठेवून तो डोळे मिटून निपचित पडला होता. माझ्या छातींत उगीचच धस्स झालं. मी पडदा सारून चोरट्या चालीनं त्याच्याजवळ गेलें. त्यानं माझ्याकडे एकदांच पाहिलं आणि पुन्हां डोळे मिटून घेतले. बोलला तर नाहींच.

'काय झालं असावं ह्याला?' मी मनाशीं विचार करीत तशीच उभी राहिले. मग एकाएकीं मला उमाळा आल्यासारखं झालं. बिछान्यावर धडकन् अंग टोकीत मी त्याच्या जवळ बसलें.

तो तसाच निश्चल, कुठल्याश्या निश्चयानं तटस्थ होऊन पडला होता.

मग मी त्याच्या जवळ सरकलें.

पुन्हां अधिकच जवळ सरकलें.

त्याचा हात हातांत घेऊन मी त्याला विचारलं,' "काय झालंय् तुला? डोकं दुखतंय् का?"

त्यानं माझ्या हातांतून आपला हात ओढून घेतला आणि नुसतंच 'उंहुं' म्हटलं. मी त्याच्या कपाळावर तळहात दावून धरला. कपाळ कांहीं तसं विशेष गरम नव्हतं. मग मी हातानं त्याचा गळा आणि छाती तपासून पाहिली. छे:! तापबीप कांहींच नव्हतं. मग मला छोडासा राग आला. किंचित् कठोर आवाजांत मी विचारलं,

"तुला काय झालंय्? तूं बोलत कां नाहींस? सांगत कां नाहींस?"

"तूं कां माझ्या मागं लागली आहेस मगापासून? जरा शांत पडूं देशील तर शपथ!"

तो एकदम उसळून ओरडला.

"बरंऽऽ नाहीं बोलत बाबा," मी शहाणपणानं माघार घेतली.

कदाचित् अजूनही तो फिरायला येईल ह्या अपेक्षेनं मी विचारलं,

"मग? नाहीं का जायचं फिरायला?"

"नको. आज मला स्वस्थ पडून रहावंसं वाटतंय", विषण्ण नजरेनं खिडकीबाहेर पहात त्यानं म्हटलं. ह्या क्षणीं तो इथे असून इथं नव्हता. इथून दूर कुठं तरी जाऊन तरंगत राहिला होता. जिथं कुठं होता तिथं अगदी एकटाच होता. त्या एकटेपणांत दुसऱ्या कुणाला प्रवेश नव्हता. मला...मलासुद्धां नव्हता. माझ्या जवळ आणि माझ्या समोर असतांनाही त्याला इतकं एकटं कां व्हावंसं वाटत होतं? त्या क्षणीं त्याच्यावर झडप घालून त्याला आपल्या पंखांखाली झाकून ठेवणाऱ्या त्या काळ्याकुट्ट अजस्र एकटेपणाची मला चीड आली. चीड आली म्हणण्यापेक्षां भीति वाटली असं म्हणणं उचित ठरलं असतं. त्याच्यांत सामावण्याची, आम्हां दोघांचं तें एकरूप झालेलं जग त्या घटकेला उभारण्याची मी मगापासून धडपड चालवली होती, पण तो मात्र जाणून बुजून मला सारखा दूर दूर ठेवत होता. जणुं नाकावर बोट ठेवून मला पुढं सरकण्याची मनाई करीत होता.

'हट्ट आम्हांलाही करता येतो' मी मनांत म्हटलं आणि त्याच्या जवळून उठून पुन्हां दुसऱ्या खोलींत जाऊन बसलें. कपडे न बदलतां तशीच बसून राहिलें. अजूनही आशा वाटत होती कीं कदाचित् तो 'चल' म्हणेल. कुणी सांगावं! त्याची लहर फिरेलही. एखादे वेळी ताडकन् उठून अंगांत सदरा घालीत मला हांक मारून तो म्हणेलही, "चल..चल..." आपणच उशीर केला असूनही आपणच घाई करीत राहील. असं वाटून मी तशी बसून राहिलें. हातांत पर्स आणि रुमाल घेऊन.

तेवढ्यांत पूर्वेच्या बाजूनें वाऱ्याचा मोठा झोत वहात आला आणि दारावरचा पडदा फडफडत उंच उडाला. वारा तसाच वहात राहिला आणि पडदाहि उंच उंच उडत, फडफडत राहिला. मनावरती ताण होता तरीहि मला एकाएकी फार बरं वाटलं. हा अचानक पूर्व दिशेकडून वहात आलेली वारा असाच अंगावर झेपावत रहावा असं वाटलं. मी डोळे मिटून घेतले आणि जें सुख अंगाला विलगत होतं तें तन्मय होऊन अनुभवीत राहिलें.









....खूप खूप वर्षांपूर्वी, अगदी ह्याच हंगाम चालू असतांना, ह्याच वेळीं, ह्याच दिशेनें, ह्याच थाटांत आणि ह्याच दारांतून वारा घरांत घुसला होता तें मला आठवलं. अगदी असंच सारं घडलं होतं. अशीच मी एकटी इथं ह्याच जागेवर बसलें होते... त्याची वाट पहात. कसा अधीरपणें तो धांवत घरीं परत येत होता, मला बघता क्षणींच दिवसभर केलेले सारे कष्ट मागच्या मागे भिरकावून देऊन पुन्हां कसा उत्फुल्ल होत होता ! मला वघितलं कीं त्याचा चेहरा एकदम कसा पालटायचा. शर्यतींत धांवणारा मुलगा इच्छित जागीं सर्वांच्या आधीं येऊन पोचला म्हणजे जसा एकीकडे दम आवरत असतांनाच दुसरीकडे विजयानें फुललेला दिसतो तसा ! माझ्यांत येऊन मिळाल्याचा आनंद त्याच्या चेहऱ्यावर चमकायचा. एका क्षणांत दोघांचं जग एक व्हायचं......

दारांतून आंत घुसलेल्या वाऱ्यानं क्षणार्धांत तो त्याचा जुना चेहरा नजरेसमोर उभा केला. तो चेहरा पुन्हां पाहण्याची इच्छा माझ्या मनांत दाटून आली. मी उठून हळूंच पडद्याच्या फटींतून पाहिलं. तो तसाच पडला होता—गपचूप आणि निपचित. हा एकाकीपणानं झाकळलेला त्याचा चेहरा मला अनोळखी वाटला. हा चेहरा त्याचा नव्हताच मुळी. कुणा परक्या माणसाचा हा चेहरा होता ! हा माणूस माझ्या ओळखीचा नव्हता. ह्या माणसाचं माझ्याशीं कसलंच नातं नव्हतं. हा माणूस इथं का झोपला होता ? ह्याचा माझा काय संबंध होता ? मागचं सारं पुसत पुसत जाऊन सगळं कसं कोरडं, रुक्ष आणि उजाड वाटत होतं. मला एकाएकी खचल्यासारखं वाटूं लागलं. मी भराभरा साडी आणि पोलकं काढलं आणि घरांत नेसायचे कपडेच अंगांत चढवले. दुसरं कांहीं करणं जमतच नव्हतं म्हणून बिछान्यावर त्याच्या पायापाशीं जाऊन बसले. त्यानं दचकून, डोळे उघडून माझ्याकडे पाह्यलं. मी कपडे बदलले तें त्याच्या लक्षांत आलं. तो ओठ दुमडून हंसला. त्या हंसण्याचा अर्थ होता—'आलं म्हणायचं तुझं डोकं ताळ्यावर'. नंतर त्यानं गंमतीदारपणें नाक मुरडलं आणि तो माझ्याकडे उगीचच पहात राहिला.

मला आपलं उगीचच वाटलं कीं त्याला म्हणायचं होतं...कसं ग कळत नाहीं तुला ! एवढी साधी गोष्ट तुझ्या लक्षांत येत नाहीं कशी. कीं नसतें माणसाला एकेकदा कसलीच इच्छा. सारा वेळ तूं तुझाच कसला विचार करतेस? मी कसल्या चिंतेंत असतो, कोणत्या ओझ्याखालीं दडपलेला असतो हें तूं कधीं समजून कां घेत नाहींस? कां समजून घेत नाहींस ?

मग मला माझा सप्पाटून राग आला. किती क्षुद्र आणि स्वार्थी आहे मी ! स्वतःच्याच नादांत जगते. स्वतःच्याच तालांत वावरते. स्वतःच्याच तंत्रानंच इतरांना नाचवूं पहाते. हा आपला स्वतःचाच गुरफटून राहण्याचा स्वभाव आपल्याला पालटला पाहिजे. आपल्या सगळ्या घाणेरड्या संवयी आपण टाकून दिल्या पाहिजेत.

मी शरमून जाऊन याला विचारलं, "रागावलास?"

त्यानं नकारार्थी मान हलवली.

—आणि मग मला खूप आनंद झाला. अगदी खूप! अगदी दुथडी भरून तो आनंद शरीरांतून वाहूं लागला. मी त्याच्या अगदी जवळ सरकून बसलें. त्याचा हात माझ्या हृदयावर दाबून घरीत मी त्याला विचारलें, "माझ्या छातीचे ठोके ऐकूं येतात का रे तुला ?"

"नाहीं बुवा! जिवंत आहेस ना नक्की?" त्यानं चेष्टेखोरी नेत म्हटलं.

मग मी त्याच्या छातीवर हात ठवीत म्हटलं, "तुझी छाती अशी नेहमी जोरानं कां उडते ? जेव्हां पहावं तेव्हां ठोके कसे ठाक् ठाक् करून वाजत असतात. तुझं मन कधीं स्वस्थ नसलं म्हणून असं होतं. कारण नसतांना तूं तुझ्या जीवाला उगीच त्रास करून घेतोस."

आणि मग मी त्याला नाना प्रश्न विचारीत राहिलें—'तुझे केस एवढ्यांतच कसे पिकायला लागले?' 'तुझ्या कानावर दोन नवे तीळ कसे उमटले?' 'तूं हल्लीं मध्येंच असा दम लागल्यासारखा जोरानं श्वास का टाकतोस?' 'तुझी दाढी हल्ली लौकर लौकर कशी वाढते?' इत्यादि इत्यादि.

'हां,' 'हूं,' 'हो,' 'ना', करतां करतां त्यानं मोठयानं जांभई दिली तेव्हां माझ्या लक्षांत आलं की आतां विषय पालटायला पाहिजे. मग मी पवित्रा बदलला. त्याला खूप हंसवायचं असं ठरवून मला माहीत असलेल्या असंख्य गमतीदार गोष्टी आठवून आठवून त्याला सांगत राहिलें. तो थोडासा हंसला पण बराचसा हंसलाच नाहीं.

तेवढ्यांत माझ्या लक्षांत आलं कीं खोलींत चांगलाच अंधार पसरलाय्. उठून दिवा लावायला पाहिजे होता.

"अय्या! माझं लक्ष कुठंय्. तशीच बसलेय् आपली अंधारांत – दिवा न लावतांच."

मी दिवा लावायला उठलें.

"नको लावूस दिवा. अशीच बस...इथं माझ्याजवळ," तो क्षीणपणानं म्हणाला.

"तर..तर...तुला तेवढंच पाहिजे", मी तोऱ्यांत त्याला खोडून काढलं आणि चटकन् दिव्याचं बटन दाबलं. दिवा लागला. खोलींत प्रकाश पडला. दिव्याभोंवती नुकत्याच लावलेल्या मंद जांभळ्या रंगाच्या शेडमुळें दिव्याच्या प्रकाशांत फिकट जांभळा द्रव मिसळून तो प्रकाश ओला आणि थंड झाल्यासारखा भासला. मला फार प्रसन्न वाटलं. खांदे घुसळून मी उगीचच हंसले आणि त्याला म्हणालें, "कसा वेळ गेला समजलंच नाहीं. नाहीं का रे? बरं झालं. नाहीं गोलों फिरायला तर नाहीं, पण किती किती गप्पा केल्या आज आपण, नाहीं का रे?"

• • •





भारावलेल्या धुंद मनःस्थितींत ती उंबरठ्यावर बसून राहिली. घरांत दिवा लावायचें भान तिला राहिलें नाहीं. फुलांचा कुरकुला परसांतच राहिलेला आहे हेंहि ती विसरली. जें घडून गेलें तें स्वप्न कीं सत्य हें तिला कळेना...

कितीतरी वर्षांनीं बायाक्काला मी पाहिली. गांवच्या देवाचा नवस फेडायला ती आली होती. तशी ती दरवर्षीं येते. उत्सवाचे चार दिवस देवळाच्या सभामंडपांत बसून गाते आणि निघून जाते. मला ती यंदाच भेटली. इतक्या वर्षांनीं मी तिला पहात होतों; पण तिच्यांत कोणत्याच तऱ्हेचा फरक पडला नव्हता. कांहीं कांहीं माणसांना तें वरदानच असतें. पन्नाशी ओलांडली तरी त्यांचें तारुण्य ओसरत नाहीं. इतरांसारखेंच बरें-वाईट आयुष्य त्यांनीं भोगलेलें असते; पण त्यांचे केस काळेशार असतात. गाल गुबगुबीत असतात. शरीराचा गव्हाळ रंग तसाच असतो. त्यांचा प्रत्येक अवयव तरुण असतो. मला असल्या माणसांचा मत्सर नाहीं; पण देवाच्या मायेचें कौतुक वाटते.

बायाक्का तितकी तरुण नव्हती; पण तिच्याकडे पाहिल्यानंतर कुणीहि आकृष्ट व्हावें इतक्या तारुण्यांतल्या देखणेपणाच्या खुणा अजून तिच्या कुडींत बऱ्याच दाटीनें बाकी होत्या. वार्धक्य कदाचित् वीतभर अंतर सोडून तिच्या बाजूलाच बसलें असावें; पण तिला शिवायची अजून त्याची ताकद होत नसावी. तिचा सकाम शामल वर्ण अजूनहि विलक्षण छाप पाडणारा होता. गुलाबी रंगाचीं फुलें असलेलें नऊवारी पातळ ती नेसली होती. अंगांत मोरपिशी रंगाची तंग चोळी होती. केंसांचा मानभर आंबाडा. अलंकार म्हणून कानांत फक्त कुडीं होती. हातांत काचेच्या बांगड्यांशिवाय दुसरें कांहींहि नव्हते.

साथीचा साज जुळवितांना माझ्याकडे पाहून ती हंसली. आयुष्यांत भोगलेल्या अनेक विपत्ति विसरून पुन्हां माणसांत येऊन वावरणाऱ्या माणसासारखीच ती हंसली. तंबोऱ्याच्या सुरांत तिनें आपला सूर मिसळला. आणि दरबारी कानड्याचे गंभीर आलाप सुरूं केले. तानपुऱ्याच्या जवारीबरोबर आवाजाची जवारी एकजीव होऊन सुसंवाद करूं लागली. आवाजाची जात मुलायम! दरबारी कानड्याचा ख्याल मंद्र सप्तकांतून उभा राहिला आणि बाईनें जो षड्ज लावला त्या षड्जानें कान भरून गेले. आहा हा! असा नितांत मधुर षड्ज कित्येक वर्षांत ऐकला नव्हता. सगळें उस्तादी गाणें त्या सभामंडपांत भरून राहिले. अप्रतिम.... अप्रतिम गायली बायाक्का!

पण बायाक्काच्या या लखलखीत गुणाचें दर्शन लोकांना होणार नाहीं. तसें ती तें घडविणार नाहीं. त्या गुणाचा तिनें व्यापार केला असता तर आज बायाक्का धनाच्या राशीवर बसली असती; पण तिनें ती भावनाच पुसून टाकलेली आहे. नियतीनें तिच्या

आयुष्यांत जें घडविलें त्याला तिनें करारीपणानें दाद दिली; जें स्वीकारलें त्याची अखंडितपणें जोपासना केली. म्हणूनच तिच्या, निष्ठा मला लाख मोलाच्या वाटतात. गाणें संपवून घरीं जातांना मला ती भेटली आणि निरोप घेतांना तिनें एक दीर्घ सुस्कारा सोडला. त्या सुस्काऱ्यांत दोन तपांतील घडामोडी सामावल्या होत्या. किती विलक्षण आयुष्य जगली होती ती....

मी बायाक्काला वयाच्या सातव्या किंवा आठव्या वर्षी पाहिली होती. त्यांच्या घरांत मी नाचलों वागडलों होतों. त्या वेळीं बायाक्का सोळा सतरा वर्षांची असावी. कुळदेवाला जायचा माझा तो पहिलाच प्रसंग होता. त्या काळीं कुळदेवाला जायचें हा आयुष्यांतला एक मोठा योग समजला जात असे. व्यापारांत तसाच कांहीं फायदा झाला म्हणजे गृहस्थ लोक सहकुटुंब एखादा उत्सव साधून कुळ-देवाच्या दर्शनाला जायचे. आणि कृतार्थ व्हायचे. पुन्हां तसा योग यायला आणखी कांहीं वर्षे जावीं लागत. मात्र तिथें घडणाऱ्या प्रत्येक हालचालीची चर्चा घराघरांत उत्कट आस्थेनें होत राही. जें जें तिथें घडतें तें जणुं प्रत्यक्ष आपल्या दृष्टिसमोर घडतें आहे असेंच सर्वांना वाटे.

वर्षांतून एकदां केव्हांतरी घरांतील वडीलमाणसानें तिथें जाऊन राखणीचा प्रसाद घ्यायचा. किंवा घरांत एखादें मंगल कार्य निघाल्यास त्याच वडील माणसानें आमंत्रणाला म्हणून कुळदेवाला जायचें. तो परत आला, कीं लहानथोरांच्या कपाळाला अंगारा लावायचा एक गंभीर कार्यक्रम असे. आणि तो अंगारा कपाळाला लावला, कीं आतां वर्षभर तरी कोणत्याच संकटाला घाबरण्याचें कारण नाहीं अशी भावना होती.

बायाक्काची आई चंद्राक्का आणि तिचा मुलगा शाणू पाडव्याला आणि कार्तिकी एकादशीला अशीं वर्षांतून दोनदां आमच्याकडे यायचीं. चंद्राक्का आली, कीं कुलदेवता आली अशीं आमचीं जाणती माणसें समजत असत. मग चंद्राक्काची ओटी भरणें, कुलाचाराप्रमाणें तिची सर्व देणगी देणें आणि घरांतील सर्व स्त्रियांनीं तिला देवासारखा मान देऊन तिला न्हाऊ जेऊं घालणें वगैरे कार्यक्रम असे. चंद्राक्कानंतर तो मान तिची थोरली मुलगी इंदिराकडे जायचा; पण चंद्राक्काच्या नात्यांतल्या, मुंबईला शिकून आलेल्या एका मुलानें तिच्याशीं लग्न केलें आणि तो तिला घेऊन मुंबईला गेला. आतां तो मान तिची दुसरी मुलगी बाया हिच्याकडे जाणार होता. मी पहिल्या खेपेस उत्सवाला गेलों तेव्हां देवळाच्या प्राकारांतील अग्रशाळा इतर भजकांच्या बिऱ्हाडांनीं भरून गेल्यामुळें चंद्राक्काच्या घरांतच राहिलो होतों.

एका प्रसंगाची मला घट्ट आठवण आहे. देवाची पालखी पहिल्या पेण्याला उभी राहिली. गण्याभटाचा मुलगा सहदेव आला. त्यानें देवाची आरती केली. देवदंड हातांत घेऊन माझे वडील उभे राहिले. चंद्राक्का देवाला चंवरी ढाळीत उभी राहिली होती. आणि पालखीच्या समोर ओळीनें उभ्या असलेल्या चार नर्तकींच्या मागें हातांची घडी घालून, उजव्या हाताचा पंजा उजव्या गालावर ठेवून, नऊवारी भरजरी शालू नेसलेली, केवड्याच्या पातीची वेणी घातलेली बायाक्का एखाद्या उर्वशीसारखी उभी होती. शाणूनें पखवाजावर थाप मारली तशी बायाक्काच्या गळ्यांतून स्वरांचे मोती ओघळले. चटकन् एक तान निघाली ती षड्जाला बिलगली आणि तिथून तिनें सुरुवात केली "राधे कृष्ण बोल मुख से". पखवाजाची दोन्हीं तोंडें फडफडलीं आणि एक सुरेख मुखडा मारून शाणू समेवर आला. एक म्हातारा गृहस्थ झांजेची हलकेच साथ करीत होता.

एक दोनदां चरण म्हणून झाल्यावर शाणूनें लावलेल्या एका ढंगदार गतीवर बायाक्कासमोर उभ्या राहिलेल्या नर्तकी मागें पुढें हात नाचवित पिसासारख्या तरंगू लागल्या. आठ पेण्यांना बायाक्कानें आठ गाणीं म्हटलीं. आजूबाजूचे खास बायाक्काचें गाणें ऐकायला आलेले लोक तिच्या गाण्याची खूप खूप तारीफ करीत होते. गळ्याची अशी जात आख्या गोव्यांत धुंडून सांपडायची नाहीं असें ते वारंवार म्हणत होते. आणि तत्पूर्वी वाटत होती त्यापेक्षां बायाक्का मला एकदम वेगळीं वाटूं लागली. तिच्याबद्दल मला विलक्षण कांहींसें वाटूं लागलें. सारखें तिला बिलगून राहावें असें वाटूं लागलें.

तिनें मला देवपाणवठ्यावर नेऊन आंघोळ घालावी. इतस्ततः पडलेले माझे कपडे शोधून द्यावे. मला देवळांत घेऊन जावें. खोलींत बांधून ठेवलेल्या शाणूच्या पखवाजावर दोन्हीं हात बडवायला द्यावे..



–गोपाळकृष्ण भोबे

बायाक्कानें माझे अनेक हट्ट पुरवले. आठ दिवस आम्ही चंद्राक्काच्या घरांत राहिलों; पण तसले आठ दिवस पुन्हां आयुष्यांत आलेच नाहींत. कुळदेवाच्या दर्शनाला मी पुन्हां गेलों तो एकटाच. वयाची पंचविशी ओलांडल्यावर. नंतरच्या काळांत अनेक अवस्थांतरें झाली होती. देवळाचे भजक महाजन आणि सेवेकरी यांच्यांत वितुष्ट आलें होतें. बायाक्का पालखीकडे गात नव्हती. नर्तकी नाचत नव्हत्या. पालखीचीं पेणीं टाळ मृदंगाच्या साथींत भजनानें होत होती. देवांचीं उपकरणीं घासणें, देवाच्या मूर्तीजवळील अखंड ज्योति तेवत ठेवणें आणि सभामंडपांतील दिव्यांची निगा राखणें एवढेंच काम बायाक्काकडे राहिलें होतें. माझ्या आठवणीचे ढग एकमेकांत मिसळूं लागले. त्या वेळची परिस्थिति, घडलेल्या घटना, ते दिवस, तीं वर्षे.....एकामागून एक तसबिरी डोळ्यांसमोरून सरकूं लागल्या.

☆ ☆ ☆

गण्याभटाचा मुलगा सहदेव हा आमच्या देवळाचा नित्य कीर्तनी आणि पुजारी. नित्याचें कीर्तन त्यानेंच करावयाचें. पुराणहि त्यानेंच सांगायचें. मुख्य पुजारीहि तोच. सहदेव अंगापिंडानें मजबूत होता. आणि

चार चौघांत उठून दिसण्याइतका गोरा आणि देखणा होता. देवाला गाऱ्हाणें घालायचें असलें, किंवा देवाचा निरोप घ्यायचा असला, कीं कुटुंबवत्सल माणसें सहदेव भटजीला थांबायची. तो नसला तर दुसऱ्याकडून गाऱ्हाणें घालून घेत नसत. आपलीं सर्व देवकृत्यें सहदेवाच्याच हातून व्हावी अशी सर्वांचीच इच्छा असे. आल्या गेल्या भजकाच्या ओठीं जसा देवळांतला देव होता तसाच सहदेवहि होता. सर्व देवकृत्यें आटोपून रात्रीं नऊ वाजतां तो कीर्तनाला उभा राही. आणि नित्य नवें कथानक तो सांगत असे. त्याच्या पूर्वरंगांतील वेदांत सर्वांनाच समजेल असा सुलभ असे. अंगांत भगवी छाटी, कमरेला शेला, डोक्याला पांढरा शुभ्र फेटा आणि गळयांत रुद्राक्षांच्या माळा घालून हातांत चिपळ्या घेऊन तो उभा राहिला, कीं खरोखरीच तो विवेकानंदांसारखा दिसे.

लहानपणीं मिरजेला आपल्या मामाकडे राहून तो चांगल्या गवय्यांकडे सहा सात वर्षें गाणें शिकला होता. कीर्तनांतली गाणीं तो उत्कृष्ट म्हणत असे. त्याचा आवाज मर्दानी पण मधुर होता. पालखीच्या पेण्यांत बायाक्कानें मिराबाईचा अभंग एका चालीवर म्हटला कीं दुसऱ्या दिवशींच्या आपल्या कीर्तनांत तोच अभंग दुसऱ्या एखाद्या सुंदर चालीवर तो इतका गोड गाई, कीं त्याला पखवाजाची साथ करणारा शाणू 'वा ऽ बुवा!' म्हणून शावासकी देत नाना आडवळणांनीं बोल वाजवित राही. सरवळींत खांबाआड कीर्तन ऐकत बसलेली बायाक्का तिरक्या नजरेनें सहदेवाकडे पाहात गालांतल्या गालांत खुदुखुदु हंसत असे. आणि कीर्तनकाराच्या दोन्हीं बाजूला ठेवलेल्या मोठ्या समयांतील वातींच्या ज्योतींची काजळी झाडायचें निमित्त करून समयीजवळ उभी राहून हलक्या आवाजांत सहदेवाला एखादा राग गायची फर्माईश करी. आपल्या गाण्याचें कौतुक करणारी, त्याला दाद देणारी कुणीतरी व्यक्ति आहे, तिच्यासाठीं निदान या नित्यकीर्तनांत गायला हरकत नाहीं या जाणिवेनें सहदेवहि पूर्वरंग आटोपला कीं, आख्यानाच्या आधीं गात राही.

बायाक्का गाणें शिकली नव्हती. तिचें गाण्याचें अंग उपजत होतें. आवाज अतिशय मधुर होता. तिनें नुसतें आ केलें कीं ऐकणारा मंत्रमुग्ध होत असे. आपल्याला गाणें शिकवावें म्हणून सहदेवाला तिनें नाना परीनें विनंति करून पाहिली; पण छे! त्याचा ताठा भलताच होता. तो तिच्या आवाजाची तारीफ करी. गाण्यासंबंधी खूप खूप बोले. तो तसा बोलूं लागला, कीं बायाक्का त्याच्या तोंडाकडे टक लावून बघत राही. सहदेवावद्दलचा प्रीतीचा अंकूर तिच्या हृदयांत कुठेंतरी फुटला होता. पण कशाच रीतीनें ती त्याला जाणीव करून देऊं शकत नव्हती. एके दिवशीं तिनें धीर केलाच. सहदेव तिच्या आवाजाची तारीफ करीत होता. लयकारीवद्दल तोंड फाटेपर्यंत स्तुति करीत होता. तिनें आपले धुंद डोळे त्याच्या नजरेकडे एकटक लावले आणि आर्जवाच्या शब्दांनीं विचारलें—"सहदेव, खरं सांग तूं मला गाणें शिकवायला कां नाकारतोस? मी पापी आहे का?" त्यावर तो म्हणाला—"बाया-मी तुला गाणं शिकवायला लागलों, कीं माझी प्रतिष्ठा रसतळाला जाईल. लोक शंका घेतील. इथला समाज हा असा. त्यांतून मी अविवाहित. फट म्हणतां ब्रह्महत्या व्हायची!"

"अरे पण जिथं पाप नाहीं, तिथं लोक कशाला शंका घेतील? लोकांना शंका येईल असं आपण वागूं नये म्हणजे झालं! आपण आपलं आचरण शुद्ध ठेवूं!"

"वेडी आहेस तूं बाया. आपलं आचरण कितीहि शुद्ध असलं तरी लोकांच्या जिभेला हाड नाहीं. ती वाटेल तशी वळेल. मला तें नको आहे बाया! त्यांतून मी आतां लग्न करणार आहे. परवांच आई म्हणाली — मी आतां म्हातारी झाली रे. तुझे मामा तुझ्या लहानपणीं म्हणत होते—तुझ्या सहदेवाला मी माझी मुलगी देईन आणि नातं कायम ठेवीन! एकदां मिरजेला जाऊन ये आणि लाव एकदांचा सोक्षमोक्ष! तुझ्यावद्दल मला खरंच कांहींतरी वाटतं बाया; पण तें काय आहे तें माझं मलाच कळत नाहीं. मी तुला गाणें शिकवायला लागलों आणि माझा पाय घसरला तर. तुझ्या गळयाइतकंच तुझं लावण्य मला मोह घालतं. मला बेचैन करतं बाया!"

बायाक्का थक्क झाली. आपल्याला त्याच्यावद्दल जें वाटतें त्यापेक्षां अधिकच त्याच्याहि मनाची धांव आहे हें तिला कळून चुकलें. हृदयाच्या एका कोपऱ्यांत कुठेंतरी दडवून ठेवलेल्या त्याच्यावद्दलच्या प्रीतीच्या अंकुराला पालवी फुटून ती बाहेर येऊं पाहूं लागली. जी भावना ती कधींच व्यक्त करणार नव्हती त्या भावनेला त्यानेंच चेतवली होती. तिला वाटलें मोठ्यानें ओरडून त्याला सांगावें 'सहदेवा, अरे मी तुझ्यावर केव्हांची आसक्त झालेली आहे रे! अरे सगळा सगळा मोठेपणा विसर, लोक विसर, ती प्रतिष्ठा विसर आणि सारं सारं विसरून माझ्या कवेंत ये. माझ्या काळजा, मी तुला माझ्यांत दडवून ठेवीन; कुणीं कुणींदेखील तुला पाहूं शकणार नाहीं....' बायाक्काला कांपरें भरलें. ती तशीच थरथरत राहिली. त्याच्याकडे एकटक पाहात ओठांतल्या ओठांत कांहींतरी तुटक तुटक बोलली. सहदेवाला तें कळलें देखील नाहीं. तो पुन्हा म्हणाला—

"बाया, पुढच्याच आठवड्यांत मिरजेला जाणार आणि लग्न करून येणार मी. आतां फार दिवस असंच राहाण्यांत अर्थ नाहीं. प्रपंचांत पडल्याशिवाय ताळयावर येणार नाहीं मी!"

एवढें बोलून तो पूर्वीच्याच तोऱ्यांत निघून गेला. बायाक्काच्या मनांत खिन्नतेची लाट पसरली. तिचें अवसान ढांसळलें. मुकपणानें तो गेल्या वाटेकडे पहात ती घुसमटत राहिली.

पण पंधरवड्यानंतरचीच गोष्ट. तिन्हीं सांजेच्या वेळीं सहदेव तिच्या दारांत उभा राहून "बाया, बाया" अशा जोरजोरानें हांका मारीत होता. मागल्या दारांत रात्रीच्या पुजेसाठीं पारिजातकाच्या कळ्या तोडून कुरकुल्यांत जमा करीत ती उभी होती. घरांत कुणींहि नव्हतें. त्याचा आवाज ऐकून ती धांवत पुढील दारांत आली—

"कोण सहदेव? केव्हां आलास? ये ना, बस तरी!"

"इथं नाहीं बसणार. आंत चल. तुला कांहीं सांगायचंय् मला?"

त्याच्या आवाजांत करडेपणा होता. कुठेंतरी संतापून तो आला होता. काय झालें तें कळायला कांहीं मार्ग नव्हता. ती मुकाट्यानें आंत गेली. तिच्यामागून सहदेवहि आंत आला. तिन्हीं सांजेच्या धूसर काळोखानें घर भरलेलें होतें. "थांब रे, दिवा लावते."

"कांहीं नको दिवा. मला वेळ नाहीं." असें म्हणून माजघरांतील उंबरठ्यापाशीं त्यानें तिला आपल्या बाहुपाशांत घेतली. आणि इतकी गच्च मिठी मारली कीं तिला श्वासहि घेतां येईना. तिच्या तोंडून शब्द






फुटना; कीं प्रतिकारासाठीं धडपडायला अंग मोकळें होईना. ती कावरी-बावरी झाली.

"मी तुझा आहे बाया; आजपासून मी तुझा आहे. आजपासून तूं माझी पत्नी आणि मी तुझा पति. कशाकशाची पर्वा नाहीं मला. मी सर्वस्वीं तुझा आहे बाया. मी तुला गाणं शिकवीन. माझं सर्वस्व देईन. मोठ्ठी करीन!"

आवेगानें बोलतांना त्याला धाप लागली होती. त्याची मिठी थोडीशी सैल झाली तशी तिनें स्वतःला सोडवून घेतलें. ती वरीच भानावर आली. विस्कटलेले केस तिनें सांवरले. एकाएकीं हें काय घडतें आहे याचा तिला बोधच होईना.

"तूं आधीं घरांत बैस पाहूं! काय झालं तें सांग. एकदम असं वेड्या-सारखं काय करतोस? आत्तां आई येईल. तिला कळलं तर काय होईल? तें राहूं दे! पण तूं मिरजेला गेला होतास त्याचं काय झालं?"

"अपमान झाला माझा तिथें. 'भिक्षुकाला मुलगी देऊन काय सुख मिळणार आहे माझ्या मुलीला?' असं मामी म्हणाली. मी त्या घरांत एक क्षण थांबलों नाहीं. तसाच तडक परत फिरलों. मामा मागून खूप समजावीत होते. 'सहदेवा, अरे तिचं काय मनावर घेतोस' असं पाठ-पर्यंत म्हणत होते; पण मला आतां त्यांच्या मुलीशीं लग्नच करायचं नाहीं. मी त्यांना कांहींहि उत्तर केलं नाहीं. स्टेशनवर आलों. आणि आज घरीं आलों. आतां मला कुणाच्याहि मुलीशीं लग्न करायचं नाहीं बाया. मी तुझ्याजवळ राहीन. तुझा म्हणून राहीन. तं माझा स्वीकार करशील ना?"

तिला काय उत्तर द्यावें हें कळेना. जी गोष्ट तिनें आज कित्येक दिवस अंतरंगांत दडवून ठेवली होती, जी मिळावी असें तिला मनोमन वाटत होतें ती अनपेक्षितपणें चालत तिच्या दाराशीं आली होती. त्याला ती लाथाडणार होती का? तिच्या अंतःकरणांत आनंदाचीं कारंजीं फुटलीं. आणि त्याचबरोबर एक भयानक शंकाही तिला जाचूं लागली. सह-देवाचें आणि आपलें मीलन झालें तर समाज काय म्हणेल? त्याची प्रतिष्ठा कशी राहील? या शंकेनें तिला घेरलें. तिनें तसा प्रश्न त्याला केलाहि. त्यावर तो म्हणाला—

"बाया आतां या गोष्टीचा विचारच करायचा नाहीं. माझ्या खाजगी जीवनांत डोकावण्यांची समाजाला काय गरज? समाजाला मी माझी सेवा देतोंच आहे. त्यांत कोणती कसूर होणार नाहीं ती काळजी तुला नको. तूं फक्त मला एवढंच सांग, कीं तूं माझी होशील का? तुझा माझ्यावर विश्वास आहे ना? बोल बाया, मला अखेरचा शब्द हवा आहे."

तिनें मान खालीं घातली. मूकपणानें तिनें आपली संमति त्याला दिली. भरल्या डोळ्यांनी ती त्याच्या आरक्त चेहऱ्याकडे पहात राहिली. त्यानें तिला जवळ घेतली. तिचें तोंड आपल्या हातांनीं वर केलें आणि आवेगानें तिचीं असंख्य चुंबनें घेतलीं. "बाया, आतां हा सहदेव सर्वस्वीं तुझा झाला ग! येतों मी!" असें बोलून तो वेगानें ताडताड पावलें टाकीत निघून गेला. बायाक्का मोहरून गेली. ज्या गोष्टीची केवळ तिनें कल्पना केली होती ती डोळ्यां-समोर घडून गेली होती. घडलेल्या घटनेचा उन्माद तिच्या मस्तकांत

शिरला होता. तिनें डोळे मिटले, आणि त्या सुखाचें स्मरण करीत ती त्या काळोखांत उंबरठ्यावर बसून राहिली. फुलांचा कुरकुला परसांतच राहिला आहे; ती फुलें देवळांत नेऊन द्यायचीं आहेत; घरांत दिवा लावायचा आहे. . .कशाकशाचेंच भान तिला राहिलें नाहीं. जें नुकतेंच घडून गेलें तें स्वप्न कीं सत्य हें तिला कळेना.

☆ ☆ ☆

कांहीं दिवसांनंतर अशीच सकाळची लांकडी घोड्यावर चढून सभामंडपांतल्या कांचेच्या लोंबत्या हंड्या ती पुसत होती. मधला झुंबर पुसतांना तिचें लक्ष गाभाऱ्याकडे गेलें. सहदेव तिथें बेलतुळशी निवडीत बसला होता. तिनें झुंबर हालवून त्याचे लोलक एकमेकांवर आदळून किणकिण आवाज केला. तीन वेळां तिनें झुंबर हालवून त्याचें लक्ष वेधण्याचा प्रयत्न केला. सहदेवानें एकवेळ पाहिलें देखील; पण पुन्हां त्यानें तिकडे लक्ष दिलें नाहीं. वास्तविक त्यावेळीं तिथें कुणीहि नव्हतें. देवळांत एक प्रकारची निरव शांतता होती. त्या शांततेंत वायाक्काचें मन प्रणयानें काठोकाठ भरून आलें. सहदेव आतां तिचा झाला होता. तिचा अवयव नि अवयव त्यानें भोगला होता. तिच्या उन्मत्त अवयवांना त्यामुळें तल्लीनता आली होती. अगदीं निःसंकोचपणें तिनें आपलें आयुष्य त्याच्यांत मिसळून टाकलें होतें. त्या तृप्त नजरेनेंच ती आतां त्याच्यांकडे पहात होती.

तिला त्याचा तो गंभीरपणा बराहि वाटला. तिच्या मनांत आलें एकांत संपला, कीं पुन्हां किती वेगळा आणि गंभीर होतो हा तरुण!. . .गाणें शिकवितांना तर त्याचें नि आपलें कांहीं नातें आहे याचा मागमूसहि राहात नाहीं. त्यावेळीं त्याच्या अंगांत उस्ताद संचारतो. त्यादिवशीं जरा तान चुकली तर मांडीवर केवढ्या मोठ्यानें चापटी मारली यानें. पांचहि बोटें निळा रंग घेऊन उमटलीं मांडीवर. जरा तंबोरा खालीं ठेवला तर 'नालायक आहेस!' म्हणून एकदम उठून चालता झाला. आणि रात्रीं त्या मारलेल्या भागाचीं कितीतरी चुंबनें घेऊन रड रड रडला. काय म्हणावें याच्या या लहरी वृत्तीला!

कीर्तनाच्या वेळीं देखील तसेंच. वेदांत सांगतांना त्याचें पांडित्य ओसंडून वाहतें. त्यावेळीं वाटतें हाच का तो सहदेव, कीं जो रात्रीच्या वेळीं एखाद्या लहान मुलासारखा धिंगामस्ती करतो; कधीं कधीं याच्या पोरकटपणालादेखील सीमा नसते. आणि मग याला थोपटून झोपवावें लागतें. सकाळ झालीं कीं, याच्या अंगांत योगी संचारतो. याच्या नजरेला नजर लावायची सोय नाहीं. . . .

वायाक्का सुखावली. आपल्या प्रियकराच्या अशा वर्तनाबद्दल तिला अभिमान वाटला. तिनें आदरानें त्याच्याकडे डोळे भरून पाहिलें. लांकडी घोडा दोन्हीं हातांनीं ढकलून तिनें बाजूला नेऊन ठेवला. ती गाभाऱ्याच्या दरवाज्याजवळ उभी राहिली. "मी निवडून देऊं का?" तिनें आर्जवानें विचारलें "नको, स्त्रियांचं काम नाहीं तें. उपकरणीं घांसून झालीं का? झालीं असल्यास बाकीचं काम उरक आणि जा तूं!" मान वर न करतांच कुर्यांतच त्यानें आज्ञा केली. एखाद्या वयस्थ माणसासारखं तिला हंसूं आलें आणि तें ओठाबाहेर फुटलेंहि. ती कांही बोलली नाहीं. मनाशीं मात्र तिनें निश्चय केला. याची आतां गंमत केली पाहिजे. रात्रीं तो आला कीं आपणहि असंच तुटकपणें वागायचें, त्याच्याकडे गंभीरपणें बोलायचें. तेवढ्यास तेवढें उत्तर द्यायचें.—'बाया, खरं सांग तूं माझी ना? माझ्या गळ्यावर हात ठेवून सांग!'—असें तो शंभर वेळां विचारतो. आपण त्याला उत्तर द्यायचें—'कोण जाणे मी कुणाची आहे! एवढ्यांतच कसं सांगूं?'—मग तो चिडेल आणि. . .

तऱ्हेतऱ्हेनें त्याला डिवचायचे विचार करीत ती घरीं आली. सुखानें तिचा ऊर तुडुंब भरला होता. तिनें इच्छिलेलें साधलें होतें. तिला कांहीं म्हटल्या कांहीं कमी वाटत नव्हतें; परंतु सायंकाळ उलटायच्या आंतच सारें वातावरण बदललें. देवाच्या सेवेकऱ्यांत आणि देवळाच्या महाजन मंडळींत वहिवाटीच्या हक्कांसंबंधीं चालू असलेल्या खटल्याचा निकाल महाजन मंडळीच्या मनासारखा लागला. सेवेकऱ्यांच्या पुढाऱ्यांत आणि देवस्थान कमिटीच्या मंडळींत कडाक्याचा वाद होऊन सेवेकऱ्यांचे बरेचसे हक्क काढून घेण्यांत आले. या धुमश्चक्रींत चंद्राक्काहि बळी पडली. तिच्या बऱ्याचशा सवलती काढून घेण्यांत आल्या. आणि मामुली कामेंच त्यांच्या वांट्याला राहिलीं. सहदेवानें वायाक्काच्या बाजूनें वकिली केल्यानें त्याला आपल्या पुजारीपणाला मुकावें लागलें; पण नित्यकीर्तन आणि पुराण सांगणें हीं दोन कामें मात्र त्याच्याजवळ सोंपविण्यांत आलीं. कारण तेवढ्या लायकीचा दुसरा माणूस मिळणें कठीण होतें. वायाक्काचीं अनेक स्वप्नें मनांतच विरलीं. घाबरलेल्या हरिणीसारखी ती मुकाट्यानें सगळीकडेच अंग चोरून वावरूं लागली.

* * *

रामनवमीचा दिवस होता. खास उत्सवासाठीं म्हणून एका



माझं मत मी गुप्त मतदान पद्धतीनं श्री. बंलोबा यांना देत आहे.

मोठ्या कीर्तनकाराला आमंत्रण देण्यांत आलें होतें. देवळाच्या सभामंडपांत श्रोत्यांची अतोनात गर्दी झाली होती. साडेनवाला हजर होईन असें वचन देऊन ज्यावेळीं तो कीर्तनकार अकरा वाजेपर्यंत आला नाहीं तेव्हां महाजन मंडळीचें धावें दणाणलें. त्यांनीं सहदेवाला विनंति केली आणि आजचें कार्य उरकून घ्यायला सांगितलें. सहदेवानें नाहीं म्हटलें नाहीं. त्यानें झटपट आपला वेष चढविला आणि तो कीर्तनाला उभा राहिला. त्यादिवशीं त्याचें कीर्तन इतकें बेसुमार रंगत गेलें, कीं सभामंडपांत जमलेले सगळेच कीर्तनप्रेमी लोक माना डोलवून त्याला दाद देऊं लागले. पूर्वरंग आटोपून तो उत्तररंगांत शिरला तेव्हां पोटीं संतान नसल्यामुळें दशरथराजाच्या आणि त्याच्या राण्यांच्या दुःखाचें वर्णन करतांना त्यानें सर्वांच्या डोळ्यांच्या पापण्या ओल्या केल्या. बायाक्काचा आनंद गगनांत मावेना. खांबाला टेकून ती उभी होती. तिला बसायचें भान देखील राहिलें नाहीं. आपला सहदेव तिला आकाशाएवढा वाटूं लागला. इतक्यांत—"पुत्रसंतती झाल्याशिवाय संसारी पुरुषाला मोक्ष नाहीं. द्विजाला तर नाहींच नाहीं!" हें सहदेवानें काळजाच्या ओलाव्यानें आर्त स्वरानें उच्चारलेलें वाक्य तिच्या अंतःकरणाला भिडलें. आणि त्याचबरोबर "गण्याभटाच्या या पोरानें भलतीच वाट धरून आपल्या बापाच्या आत्म्याला नरकाच्या दारांत लोंबकळत ठेवलेला आहे. याला तरी कसला मोक्ष मिळणार आहे देवाला ठाऊक!" असें एका गृहस्थानें काढलेले कुत्सित उद्‌गारहि तापलेल्या तेलासारखे तिच्या कानांत शिरले. तिला वाईट वाटलें.

तिचा चेहरा एकदम कोमेजला. तिचा सात्विक भोळा भाव दुखावला गेला. एकपरीनें सहदेवाच्या आयुष्याचा आपण नाश करीत आहों, असें तिला वाटूं लागलें. विचारांचें वादळ तिच्या मनांत थैमान घालूं लागलें....आपण त्याला उत्तेजन दिलें नसतें तर तो प्रपंची झाला असता...त्याला संतति झाली असती...त्याचा वंश वाढला असता; आणि त्याच्या पितरांचा उद्धारहि झाला असता. आपल्यामुळें त्याचा अधःपात झाला. देवाच्या दरबारीं आपण काय जाब देणार? सहदेवासारख्या तरुणाला नादीं लावून त्याचा वंश खुडून टाकला असेंच पुढें लोक म्हणतील.—आपल्याला त्याच्या मार्गातील धोंड समजतील.... एक ना दोन सहस्रावधि विचारांची गर्दी बायाक्काच्या डोक्यांत झाली.

आरत्या झाल्यानंतर प्रसाद घेऊन ती घरीं आली. आणि घरीं आल्यानंतर त्या विचारांच्या लाटा अधिक जोरानें उसळी घेऊं लागल्या. सगळीकडेच तिला उदास उदास वाटूं लागलें. विचारांची गति इतकी वाढली, कीं मस्तक नुसतें भणाणून गेलें. सांज होतां होतां तिला एक मार्ग सांपडला. आणि तोच मार्ग पत्करायचा असा निश्चय करून ती रात्रीच्या पालखीच्या उत्सवाला जायची तयारी करूं लागली.

मध्यरात्र उलटून गेली होती. सहदेव तिची वाट पाहात बसला होता. आजचें त्याचें कीर्तन त्याच्या आजवरीच्या तपःश्चर्येची मुहूर्तमेढ ठरलें होतें. जाणत्या समजदार लोकांनी त्याचें मनापासून अभिनंदन केलें होतें. चारपांच गांवचीं त्याला आमंत्रणेंहि मिळाली होतीं. बाया येईल, आपला विशेष गौरव करील. आपल्या आजच्या पराक्रमानें तिचा आनंद उफाळून आला असेल. तिनें केलेलें कौतुक हें खरें कौतुक. त्या कौतुकाला तुलना नाहीं. बाया..माझी बाया...! त्याचा रोम रोम आसुसला. वासना तापून उठूं लागली. अस्वस्थता अधिकाधिक वाढूं लागली. वाढते क्षण त्याच्या अधिऱ्या मनाला बेचैन करूं लागले. आणि बाया खोलीच्या दारांत दिसतांच नेहमीसारखी तिला कवेंत घ्यायला तो झेपावला; पण बाया चटकन् बाजूला झाली. तिनें त्याला आपल्या अंगाला हात लावूं दिला नाहीं. त्यानें तिला जबरीनें पकडली. आपल्या दोन्हीं हातांवर तिला आडवी केली आणि उचलून आंत आणून तिच्या ओठांवर तो आपले ओंठ टेकणार, तोंच त्याच्या तोंडावर आपला हात ठेवून ती म्हणाली—"माझी शपथ आहे सहदेव तुला. थांब. आधीं मी काय म्हणतें तें ऐकून घे,—आणि नंतर तुला काय करायचं तें कर!"

संतापाची उष्ण लाट त्याच्या साऱ्या शरीरांत उसळली. त्यानें तिला खालीं उतरविलें. आणि एक अक्षर न बोलतां तो बाजूला जाऊन बसला. ती त्याच्याजवळ गेली. तिनें त्याचा उजवा हात आपल्या हातीं घेतला. आणि हलकेच कुरवाळीत ती म्हणाली—"माझं एक ऐकशील सहदेव ? सांग!" तिच्याकडे न बघतां थोडयांशा तिरसटपणेंच तो उत्तरला "काय?"

"तूं लग्न कर सहदेव—तूं लग्न कर! माझ्यामुळें तुझा कायमचा अधःपात होतो आहे! मला तूं कितीहि हवा असलास तरी अशा रीतीनं तुझ्या आयुष्याचा नाश करणें मला बरं वाटत नाहीं!"

"हें काय वेड तुझ्या डोक्यांत शिरलं आज? कुणी भरवलं तें? तुझ्या आईनं? कीं एखाद्या भुताखेतानं झपाटलीस? मी किती आनंदांत होतों. तुझ्या कुशींत शिरून आजच्या माझ्या पराक्रमाची पावती तूं मला देशील म्हणून आतांपर्यंत धीर धरून आसुसलों; पण तुझं आपलं भलतंच? हें काय आरंभलंस तूं आज!"

"भलतंच नाहीं सहदेव! खरं आहे तें. तुझ्या आजच्या पराक्रमानं मी दिपून गेलें आहे. खरं सांगायचं तर लाजलज्जा सोडून तिथंच चारचौघांत तुला बिलगावं असं अनिवारपणें मला वाटलं. अजूनहि वाटतं आहे, पण...!"

"पण काय? बोल ना? काय शंका आहे तुझ्या मनांत? काय झालं? माझ्या विषयीं संशय आला? सांग—माझी शपथ आहे तुला आतां अधिक वेळ लावशील तर."

"पुत्रसंतती झाल्याशिवाय द्विजाला मोक्ष नाहीं असं तूं कीर्तनांत म्हणालास, आणि गण्याभटाच्या पोरानं मात्र आपल्या बापाच्या आत्म्याला नरकाच्या दारांत लोंबकळत ठेवलेला आहे, असं लोक कुजबुजले. मला हें सहन होत नाहीं सहदेव" आतांपर्यंत थोपवून





















अनुक्रमणिका

धरलेला अंश्रुप्रवाह एकदम फुटला. ती स्फुंदस्फुंदून रडूं लागली. आणि हुंदके देत देत बोलूं लागली—

"सहदेवा, तूं ब्राह्मण, मी ही अशी ? माझं मूल माझं नांव लावील. तुझ्यां वंशाचा दिवा तो होऊं शकणार नाहीं. तुझ्या पितरांना काय वाटेल ? तें माझा तळतळाट मागतील सहदेव. आयुष्यभर मला तें दुःख सहन करावं लागेल !"

"बाया, जें मी कीर्तनांत सांगितलं तें कीर्तनापुरतं होतं. त्याचा इथं काय संबंध ? आणि लोक तसं कुजबुजले तर तुला संताप यायचं कारण काय ? विहिरीचं तोंड बांधतां येईल तसं नदीचं बांधतां येईल काय ? अखेरीस माझीच शंका खरी ठरली!"

"कोणती ?"

"मी असा भिक्षुक ब्राह्मण ! माझ्यापासून काय मोठंसं सुख मिळणार तुला ? कुण्या लक्ष्मीपुत्रानं तुला डोळा भिडवला असेल. आणि तुलाहि मोह सुटला असेल ! नाहीं तरी व्यवहार नेहमींच श्रेष्ठ असतो. भावनेनं वागणाऱ्याला मनांत इच्छिलेलं थोडंच मिळतं! तुला एखादा चंद्रहार घालायची थोडीचं ताकद आहे मला ? आणि तूं तरी असं भणंगाचं जीवन कां पत्करावं ? मनांत आणशील तर सहज कुणालाहि पचवशील, तेवढं सामर्थ्य आहे तुझ्यांत !"

"असं सैतानासारखं बोलणं शोभत नाहीं तुला सहदेव ! असा संशय घेऊन माझं काळीज तोडतो आहेस तूं ! माझ्या दुःखावर डागण्या देतो आहेस; पण यावेळीं मी तुला एवढंच सांगतें, या इथल्या परिसरांतल्या सगळ्या देवतांची शपथ घेऊन सांगतें, कीं तुझ्याशिवाय या बायाच्या देहाला आणखी कुणाचाहि हात लागणार नाहीं. तूं गाणं शिकवलंस; ज्ञान दिलंस; मोठं केलंस, मी तुझ्यासाठींच गाईन, फक्त तुझ्यासाठीं. तूं माझा देव आहेस सहदेव ! प्रसंगीं भिक्षा मागून मी दिवस काढीन पण कोणत्याहि प्रसंगीं तुझ्याशिवाय माझ्या आयुष्यांत दुसरा पुरुष येणार नाहीं एवढंच तुला सांगतें; पण तूं आतां माझं ऐक. तूं लग्न कर. तुझ्या घरांतला नंदादीप अखंड तेवूं दे ! मला तो पाहूं दे !"

"पण मला आतां मुलगी कोण देणार बाया ? इकडचा हा समाज तर मला वाळींत टाकायला तयार झालेला आहे. आणि लग्न करणं कसं शक्य होईल मला ?"

"त्याची काळजी तुला नको. मला फक्त वचन दे ! मी पाहून घेईन !"

"आणि तूं ? तुझी वाट काय ? तूं माझ्या नजरे समोरून गेलीस माझ्यापासून दूर झालीस तर मी सुखी होईन ?"

"मी तुझ्याच छायेंत राहीन. तुझी दासी म्हणून राहीन. तुझं हित पाहीन. बाया कोण आहे हें तूं पहाशील ! मला तें तुला दाखवायचं आहे सहदेव ! तुझी खात्री पटवून द्यायची आहे !"

सहदेव अस्वस्थ झाला. आजपर्यंत तो विचार इतक्या जोरानें त्याच्या डोक्यांत कधीं आला नव्हता त्या विचारानें ठाण मांडलें. तिच्या कुशीच्या उबेसाठीं आसुसलेलीं त्याचीं गात्रें आकुंचन पावलीं. एक अनामिक नवी जखम त्याचे लक्ष वेधू लागली. बायाच्या डोक्यांतली जाईच्या फुलांची चौपदरी वेणी फुलून तिचा मस्त मादक घम-

घुमाट खोलींतल्या अंधुक प्रकाशांत मिसळून गेला होता. खालचा ओठ दातांत धरून, अतृप्त धुंद डोळ्यांनी बायाकडे पाहात त्यानें आपल्या पाठीला तणावा दिला. बसल्या ठिकाणींच मान पाठी टाकून हात वर करून बोटें कडाकडा मोडून तो म्हणाला—

"जा बाया, तुला हवं तें कर.......जा. मी नाहीं आड येणार तुझ्या संकल्पाच्या !"

☆ ☆ ☆

कोणत्या कुयोगावर बायाक्काचें आणि सहदेवाचें मीलन झालें कुणास ठाऊक ! त्यानें तिला पहिल्या प्रथम कवेंत घेतली आणि तिचें चुंबन घेऊन तो सर्वस्वीं तिचा असल्याचें सांगितलें ती सांज, आणि पुढच्या काहीं दिवसांचा त्याचा सहवास हें एवढेंच सुख बायाक्कानें आपल्या आयुष्यांत पाहिलें. सुखानें तिच्या आयुष्यावर फक्त तेवढाच काल नाजुकशी शिपण केली; पण बायाक्कानें आपल्या हातानें आपलें आयुष्य पणाला लावलें. बायाक्का अशिक्षित होती; पण देवळांत नित्य वाहाणाऱ्या अध्यात्माच्या पाटाचें पाणी ती पोटभर प्यायली होती. त्यामुळें सुखाप्रमाणें दुःखाकडेहि समानतेनें पाहाण्याइतकी तिची वृत्ति आपोआप कणखर बनली होती. आपलें हित न पाहातां नसत्या कल्पनांनी ती दुसऱ्याच्या भरी भरली म्हणून शाणू तिला सोडून गेला. म्हातारी चंद्राक्काहि तिला सोडून शाणूकडे राहूं लागली. आप्तेष्टांनींहि तिला स्वतःच्या हिताकडे पहाण्यासाठीं परोपरीनें विनंत्या करून पाहिल्या; पण त्यांच्या दृष्टीनें तें पालथ्या घड्यावर पाणीच ठरलें. त्यांनीं तिला मूर्खांत काढून तिची उघड उघड निंदा करावयाला सुरुवात केली. आणि त्यांचें तरी काय चुकलें होतें. कारण बायाक्का वागत होतीहि तशीच. तिच्या दृष्टीनें ती बरोबर वागत होती; पण व्यवहारिक दृष्ट्या तें अत्यंत चुकीचें होतें.

सहदेवाला जवळपास कुठें मुलगी मिळेना तेव्हां तिनें जंग जंग पंछाडून काणकोणच्या एका गरीब स्वैंपाक्याच्या अडलेल्या मुलीशीं त्याचें लग्न लावून टाकलें. वर्षानंतर सहदेवाला मुलगा झाला. बायाक्काची प्रतिज्ञापूर्ति झाली. आपण विजयी झालों या आनंदांत ती मश्गुल होती; पण मुलगा सहा महिन्याचा असतांनाच सहदेवाच्या बायकोला पुन्हां दिवस गेले आणि त्याच वेळीं सहदेव आजारी पडला. त्याचा तो आजार विकोपाला गेला आणि एकाएकीं त्याची जीवनज्योत मालवली. बायाक्कावर आकाशींची कुऱ्हाड कोसळली. आपण करायला गेलों काय आणि घडलें काय याकडे पाणावलेल्या डोळ्यांनीं बघत राहाण्याशिवाय तिच्या हातीं दुसरें कांहीं एक राहिलें नव्हतें. तिचें सर्वस्व हरवलें. ती उघडी उघडी पडली. एका जबाबदारींतून ती नुकतीच कुठें मोकळी होत होती; पण दुसरीच एक प्रचंड आणि आयुष्य खाणारी जबाबदारी तिच्या अंगावर पडली. सहदेवाची पत्नी, त्याचा मुलगा चंद्रकांत आणि तिच्या पोटांत वाढणारा दुसरा अंकूर यांना संभाळायची जबाबदारी तिच्यावर पडली.

देवळांतल्या कामाबद्दल तिला फारच थोडे पैसे मिळत. त्या पैशांवर तिचें स्वतःचें सुद्धा भागत नसे. मग तिनें लोकांकडे मोलकरणींचीं कामें करायला सुरवात केली. कुणाचीं धुणीं भांडीं, कुणाचें दळण कांडण, कुणाचीं उष्टीं खरकटीं अशा कामाचा उपसा ती दिवसभर करायची; पण सहदेवाच्या कुटुंबाला कांहींहि उणें पडूं देत नसे. सहदेवाचा सहवास स्वेच्छेनें सोडल्यापासून ती एकभुक्त राहून अनेक व्रतें वैकल्यें करीतच होती; परंतु इतकें सगळे डोंगराएवढे कष्ट उपसून आणि दुःख सहन करूनहि तिच्या देहांत तसा कोणताहि फरक पडला नव्हता. वयाप्रमाणें तिच्या देहाला आलेली कमनीयता तशीच कायम होती. अजून तिनें मनांत आणलें असतें तरी एखाद्या धनिक तरुणाला ती झुलवूं शकली असती. तिच्या नात्यांतील लोकांनीं तिला पुनः पुन्हां विनवून पाहिलें; पण बायाक्काचा निर्धार ढळला नाहीं. अशीं थोडीं थोडकीं नव्हे सोळा वर्षें ती झिजली.. एकटी. कुणाशींहि याचना न करतां. घरीं दारीं सतत अपमान सहन करीत. मुकाट्यानें तिनें सगळी दुःखें गिळलीं.

एक आशा वाटे. चंद्रकांत मोठा होत चाललेला आहे. तो हुशार आहे. आतांपर्यंत त्यानें शाळेंत नांव काढलें. हायस्कुलांतहि चमकतो आहे. तो स्वतःच्या पायावर उभा राहिला कीं सगळें कांहीं सुरळीत होईल. निदान आपल्या आई भावंडाला तरी सांभाळील; मी जबाबदारींतून मुक्त होईन या आशेवर ती आयुष्य ढकलत होती. चंद्रकांत जात्याच वडिलांच्या वळणावर गेला होता. अतिशय मानी, नेहमीं घुमा आणि त्याच्या वृत्तींतहि सदा वरचढपणा असायचा. जरा कुणी कांहीं बोललें, कीं अपमानानें तो धुमसत राहायचा. पुन्हां त्या जागीं पाऊल टाकायचा नाहीं. एकदां गांवच्या वाण्यानें सहज चेष्टा केली तर यानें हातांतली साखरेची पुडी त्याच्या तोंडावर भिरकावली आणि त्याच्या अनेक वस्तूंचें नुकसान केलें. वाणीच तो. त्यानें केली

शोभा. आधीं आरडाओरडा करून गांव जमा केला आणि 'भावणीनें पोसलेल्या पोराला एवढा कशाला हवा आहे तोरा ?" अशा शब्दांची खैरात केली. तेव्हांपासून चंद्रकांत अधिकच गंभीर झाला. तो बायाक्काकडे देखील फारसें बोलत नसे. बायाक्काला त्या गोष्टीचें फारसें कांहीं वाटलें नाहीं. तिनें ती गोष्ट मनाला लावून घेतली नाहीं. आपल्या सहदेवाच्या वंशाचा तो दिवा आहे. आपल्यामुळें तो झालेला आहे. आणि वाढलेलाहि आहे; सहदेवाचा आत्मा कुठून तरी हें पाहतो आहे. कृतकृत्य होत आहे. या कल्पनेवर ती समाधान मानून आपलें कर्तव्य करीत होती. झिजत होती.

कुणीतरी तिला हांक मारून सांगितलें "बाया तुमचा चंद्रकांत परीक्षेंत पहिला आला ग ! पहिलें मानाचें बक्षीस त्यानें मिळविलें. तिचा आनंद गगनांत मावेना. तिनें चंद्रकांतच्या आईला ही गोष्ट ओरडून सांगितली. देवळांत सांगितली. दिसेल त्याला सांगितली. आतां थोड्या वेळानें चंद्रकांत येईल. आपण त्याला पोटाशीं धरूं; त्याला कुरवाळूं...त्याचा मुका घेऊं....माझ्या सहदेवाचा तो अंकूर....तिला भडभडून आलं. किती तरी दिवसांनीं अश्रूंना मोकळी वाट मिळाली. ते अश्रु समाधानाचे, दुःखाचे, विरहाचे कीं कर्तव्यांतून मुक्त झाल्याचें हें तिला कळलें नाहीं. चंद्रकांताच्या वाटेकडे डोळे लावून ती येरझारा घालीत राहिली. दुपारचे बारा वाजले, एक वाजून गेला; दीड वाजायला आला तरी चंद्रकांत आल्याची चाहूल तिला लागली नाहीं. डोळे ताण ताणून ती त्याच्या वाटेकडे पाहात होती.. अखेरीस तिला तो दिसला. तिच्यानें राहवलें नाहीं. ती बाहेर पडली. जातांना तिनें ओरडून सांगितलें "आला गे चंद्रकांत". तिला तशी धांवतांना पाहून पिंपळाच्या कट्ट्यावर दुपारचीं जेवणें जेऊन विश्रांती घेत बसलेले कांहींजण म्हणाले, "बाया सावकाश, अग पडशील. आदळशील आणि ढोपरं फोडून घेशील." पण तिचें लक्ष तिथें होतें कुठें.

चंद्रकांताजवळ ती पोहोंचली तिनें आपले दोन्हीं हात त्याला आपल्या कवेंत घेण्याकरितां पसरले आणि —"चंद्रकांता, माझ्या पाडसा !" अशी आर्त हांक मारून ती त्याला कवेंत घेणार तोंच चंद्रकांतानें तिला लाथ मारली. बायाक्का कोलमडली. तिच्या मर्मावर आघात झाला. तिच्या शरीरांतला तोल एकाएकीं हरवल्यासारखें तिला वाटलें. आपले हात निर्जिव होऊन नुसतेच लोंबताहेत असें तिला वाटलें. निस्त्राण अवस्थेंत उभे राहण्याचा प्रयत्न तिनें केला; पण ती उभी राहूं शकली नाहीं. तिच्या डोळ्यांसमोर वर्तुळें वाढूं लागलीं. एक काळाकभिन्न पडदा डोळ्यांवरून खालीं खालीं सरकला. आणि ती एकदंम जमिनीवर कोसळली. कांहीं क्षण तिची शुद्ध गेली. कांहीं क्षणच; पण थोड्यांच वेळांत ती उठून ताठ उभी राहिली. तिनें डोळे खूप खूपं वटारले आणि विकटपणें ती मोठमोठ्यानें हंसूं लागली. खो खो हंसूं लागली. हंसतां हंसतां धांवत जाऊन पिंपळाच्या कट्ट्यावर मांडी घालून बसली. आणि मोठमोठ्यानें गाऊं लागली.

वाटेंत गांवच्या अंताशेटीनें चंद्रकांताला 'भावणीच्या कृपेनें हें सारें घडलें.' असें कुत्सितपणें म्हटल्यानें त्याचें आणि अंताशेटीचें भांडण जुंपलें — हें बायाक्काला कळलें नाहीं. त्यामुळें चंद्रकांत अपमानीत होऊन आला होता व त्याचें पर्यवसान लाथ मारण्यांत झालें — हा खुलासा बायाक्काला कळला नाहीं. बायाक्काच्या कष्टांवर आपण वाढलों हें शल्य चंद्रकांताला सतत सलत होतें; त्या लाजिरवाण्या जिण्याचा एकदां निकाल लावायचा असा त्याचा कित्येक दिवसांपासून विचार होता हें तिला कळलें नाहीं. आसपासचे सगळे लोक आपल्याला सावव करायचा प्रयत्न करीत होते आणि चंद्रकांताला शिव्यांचा भडिमार करीत होते हेंहि तिला कळलें नाहीं. तिला कांहीं म्हटल्या कांहीं कळलें नाहीं. ती हंसत राहिली आणि हंसतां हंसतां गात राहिली. सोळा वर्षें कोंडून ठेवलेल्या भावनांच्या प्रवाहाचा बांध फुटला. ती मोकळ्या आवाजानें गात राहिली.

तिची वहीण इंदिरा मुंबईहून आली. तिनें तिची खूप शुश्रुषा केली; देवाला अनेक नवस केले पण दोन वर्षें बायाक्काची स्मृति जाग्यावर आली नाहीं. दोन वर्षांनंतर एकाएकीं ती बरी झाली. कुणीं म्हणतात सहदेवासारखा दिसणारा एक सिद्धपुरुष आला, त्यानें तिला आपल्या झोळींतली विभूत लावली आणि बरी केली. कुणीं म्हणतात देवळांतच तिला साक्षात्कार झाला. कुणी असें म्हणतात; कुणीं तसें सांगतात, पण बायाक्का कांहीं बोलत नाहीं. तिचे भोग सरले ती बरी झाली. आयुष्यांत केलेल्या अपार त्यागाचें फळ तिला मिळालें.

इंदिरा तिला मुंबईला आपल्याकडे घेऊन गेली. तेव्हांपासून बायाक्का तिथेंच असते. दरवर्षी ती देवाच्या जत्रेला येते, नवस फेडते आणि निघून जाते. या वर्षींहि ती तशीच आली होती. तिला पाहिली आणि गेल्या तीस वर्षांचा तिचा जीवनप्रवाह माझ्या नजरेसमोरून सरकला. आणि लहानपणीं वाटली त्याहूनहि कितीतरी पटीनें बायाक्का मला मोठ्ठी वाटूं लागली. जें मोठेपण अनामिक आहे. शब्दांपलीकडचें आहे. ● ● ●

# बदफैली नवऱ्यामुळें बदनाम झालेली दुर्दैवी स्त्री



# आनंदीबाई पेशवे

पेशवे घराण्यांतील तीन स्त्रिया प्रसिद्ध आहेत. पहिल्या बाजीरावाची आई राधाबाई, माधवराव पेशव्यांची आई गोपिकाबाई अन् तिसरी रघुनाथराव उर्फ राघोबादादांची बायको अन् दुसऱ्या बाजीरावाची आई आनंदीबाई. पहिल्या दोन कीर्तिवान ठरल्या. तिसरीच्या वांट्याला दुष्कीर्ति आली. कथाकार, कादंबरीकार, नाटककार अन् बखरकार या सर्वांनीं आनंदीबाईस कारस्थानी अन् 'ध' चा 'मा' करणारी ठरविलें. तेव्हांपासून कुणाहि जहांबाज बाईला 'आनंदीबाई' म्हणण्याचा प्रघात पडला.

परंतु आनंदीबाई खरोखरच तशी भयंकर अन् खुनाला प्रोत्साहन देणारी स्त्री होती कीं काय हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. नारायणराव पेशव्याच्या वधामुळें ती कलंकित ठरली तरी त्या

—अरविंद ताटके

प्रकरणीं तिचें अंग असल्याचा प्रत्यक्ष पुरावा ऐतिहासिक कागदपत्रांत आढळत नाहीं. उपलब्ध पुराव्याची छाननी केल्यास ती निर्दोष ठरते, अन् म्हणूनच तिचें चरित्र हृदयस्पर्शी अन् मनाला चटका लावणारें आहे. बदफैली नवरा अन् कुलक्षणी मुलगा यांच्या तिढ्यांत या अश्राप स्त्रीला दुर्दैवाचे दशावतार भोगावे लागले. हिला जोडीदार चांगला लाभता तर ही पेशवे कुळाचें भूषण ठरली असती.

आनंदीबाईचा जन्म १७४७ सालीं (सुमारास) रत्नागिरी जिल्ह्यांतल्या गुहागर गांवीं झाला. हिच्या वडिलांचें नांव राघो महादेव ओक. रघुनाथराव पेशव्याची प्रथम पत्नी जानकीबाई (बर्वे) निवर्तल्यावर त्याच्याशीं आनंदीबाईचा विवाह दि. १७–१२–१७५५ रोजीं झाला. त्यावेळीं ती आठ वर्षांची तर राघोबा एकवीस वर्षांचा असा हा जोडा होता. त्या काळीं मुलीच्या लग्नाची कमाल मर्यादा नऊ असल्यानें नवऱ्याचें वय कितीहि असो अगर तो बिजवर असो, त्याला मुलगी नऊ वर्षांच्या आंतल्या उमरीचीच मिळायची.

आनंदीबाई अत्यंत सुस्वरूप असल्यानें राघोबा तिच्या अर्ध्या वचनांत असे हा समज बरोबर नाहीं. तो पक्का स्त्रैण असून त्याच्या पदरीं अनेक नाटकशाळा अन् छेलछबेल्या होत्या ही वस्तुस्थिती पाहतां आनंदीबाई खरोखरीच जरी अगदीं सौंदर्यखनी असती तरी तो तिच्या तंत्रानें वागलाच असता असें म्हणवत नाहीं. उलटपक्षीं त्याच्याच तंत्रानें तिला वागावें लागलें असा खरा इतिहास आहे. या उभयतांच्या लग्नानंतर सहा वर्षांनीं पानिपतचें रणकुंड पेटलें. सदाशिवरावभाऊ नि विश्वासराव ही दोन "मोत्यें" तिथें गळाल्यावर त्या धक्क्यानें नानासाहेब पेशव्यानें 'भाऊ वांचून दुनिया दौलत व्यर्थ आहे' असें म्हणत प्राण सोडला. नंतर माधवरावाला पेशवेपद प्राप्त झालें. राघोबालाहि त्या पदाची हांव असल्यानें उभयतांमध्यें तंटा सुरू झाला. अखेरीस (१७६८) घोडपेच्या लढाईत माधवरावानें त्याचा पूर्ण पराभव करून त्याला सहा लाखाची वेगळी नेमणूक करून दिली. तेव्हां तो नाशिकजवळ आनंदवल्लीस








राहूं लागला. या गांवचें मूळ नांव होतें चावडस्. पण आनंदीबाईला मुलगा झाला त्याच्या स्मरणार्थ या गांवाला 'आनंदवल्ली' नांव ठेवण्यांत आलें. तिथें राघोबा मोठ्या इतमामानें राहूं लागला. त्याची दोन्हीं मुलें अल्पायुषीं निघाल्यामुळें उभय पतीपत्नी हळहळत असत. माधवरावाचा धाकटा भाऊ नारायणराव यांजवर उभयतांचें फार प्रेम होतें. त्याला आपल्याजवळ बाळगण्याची त्यांना फार इच्छा होती. पण गोपिकाबाई या गोष्टीस तयार झाली नाहीं. जर नारायणराव तेव्हां त्यांच्यापाशीं राहतां तर पुढील अनर्थ टळून इतिहासाला कलाटणी मिळाली असती. पण विधिलिखित वेगळें होतें त्याला कोण काय करणार?

१७७२ सालीं माधवराव मरण पावला. निधनापूर्वी त्यानें राघोबास बोलावून घेऊन नारायणरावाचा हात त्याच्या हातांत देऊन म्हटलें, 'आपण हा नारायण आणि राज्य आतां सांभाळावें. मागचें सर्व विसरून जाऊन सर्व मंडळीनीं एकमतानें चालावें. पुढें नारायणराव पेशवा झाला. तो स्वभावानें तापट असून कारभाऱ्यांना टाकून बोलण्यांत अन् त्यांचा उपमर्द करण्यांत कसूर करत नसे. पण राघोबाशीं त्याचें बरें होतें. उभयतां स्नानसंध्या, पूजा वगैरे एकत्र करीत व बऱ्याच वेळां एकत्र असत. आनंदीबाईचीहि नारायणरावावर फार ममता असे. माधवराव तितकासा तिला आवडत नव्हता. पण राघोबाचें त्याच्याशीं अनेक तंटे झाले त्यावेळीं ती कसल्याहि कारस्थानांत गुंतल्याचें दिसत नाहीं. यांबद्दल रियासतकार सरदेसायांनीं म्हटलें (१) आहे 'आनंदीबाई नवऱ्याप्रमाणें उच्छृंखल असती तर तिच्या हालचालींवर नजर ठेवण्याची तांकीद माधवरावानें दिली असती. परंतु दादावर सक्त नजर असतां आनंदीबाईबद्दल यत्किंचित् तपास ठेविलेला उल्लेख नाहीं, यावरून तिच्याबद्दल विशिष्ट प्रकारचें वाईट मत माधवरावाचें नव्हतें, आणि माधवरावाचे ह्यातींत ती कारस्थानें करीत नसावी, असें अनुमान होतें. एकूण कांय तर माधवरावाच्या मृत्युपर्यंत, आनंदीबाईच्या वयाच्या पंचविशीपर्यंत तिच्याबद्दल कसलाहि प्रवाद नव्हता. नारायणरावाच्या वधानंतर सर्व मामला पालटला अन् मग तिचा न भूतो न भविष्यति असा दुर्लौकिक झाला.

दि. ७–२–१७७३ रोजीं राघोबाची मुलगी दुर्गाबाई हिचें लग्न झालें. त्यांवेळीं नारायणरावानें स्वतः हिंडून निमंत्रणें दिली. नंतर आईस–गोपिकाबाईला भेटण्यास तो गंगापूरला गेला. ही संधी साधून राघोबानें हैदरअल्लीशीं कारस्थान आरंभिलें. नारायणराव परत आल्यांवर त्याला हें वर्तमान समजलें. त्यानें दादास लागलीच अटक केली. (११–४–१७७३) अटकेंत त्याचें हाल झाले. त्यामुळें कटवाल्यांशीं–गारद्यांशीं संगनमत करून नारायणरावाला धरण्याचा हुकूम त्यांनीं दिला. हुकुमांत 'धरावें' असें होतें. पण कुणींतरी 'ध' चा 'मा' केला आणि त्यामुळें दि. ३०–८–१७७३ रोजीं नारायणरावाचा वध झाला. शब्दांची ही फिरवाफिरव आनंदीबाईनें केली असा, समज सर्वत्र झाला. अर्थांत आनंदीबाई कृत्या ठरली. यासंबंधीं तिची जबानी (२) आहे ती अशी: "नारायणराव यास दगा झाला हेहि आम्हांस ठाऊक नाहीं. याविषयीं आमचे आंगीं लावणारानें लावावें. आमचा विश्वास काय गेला असे किमर्थ बोलत नाहीं. उगीच हाल करावे हें काय?...माझी ममता विशेष म्हणोन नारायणरायाची गर्दीचा मार मला सांगत नव्हते. यांणीं चौकशी किमर्थ केली नाहीं? यादीचीं अक्षरें "ध" चा "मा" कोणीं केला याची चौकसी किमर्थ न केली? माझा दस्तऐवज किंवा निरोप कांहीं तरी निवडावयाचें होतें. कांहींच न करितां, उगेच पेन्यांत ठेविलें. दैवास उपाय नाहीं."

हरिवंशाच्या बखरींत (पटवर्धनकृत) मात्र हा 'ध' चा 'मा' आनंदीबाईनें केला असें म्हटलें असून तोच प्रवाद सर्वजण खरा मानूं लागले. नाना फडणवीसानें कटाची कसून चौकशी केली तेव्हां तिच्या विरुद्ध कसलाहि पुरावा त्याला आढळला नाहीं ही गोष्टहि ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. तरीहि नारायणराव पेशव्यांची बखर, मराठी साम्राज्याची छोटी बखर, शेडगांवकर बखर व ग्रँट डफकृत इतिहास वगैरे ग्रंथांत खुनाचें सर्व खापर आनंदीबाईच्या माथीं मारलें आहे. सोहोनीकृत पेशवे बखरींत याविषयीं पुढीलप्रमाणें मजकूर (३) आहे: 'नंतर दादासाहेब यांणी गारदी यांजकडे फितूर मांडला. नऊ लाख रुपये गारद्यांस देऊं म्हणून कागद लिहून दिला आणि नारायणराव यांस कैद करावें....आणखी एक दोन असामी यांचा सल्ला त्यांत होता. हा मजकूर सारा आनंदीबाई यांणीं केला. तेव्हां जे कागदपत्र केले, ते आनंदीबाई यांणीं पाहून, 'धरावें,' असें जें होतें त्या 'ध' चा 'मा' केला. बखरींत दंतकथा व आख्या-

यिकांचा भरणा वैपुल्यानें असल्यामुळें त्यांतील मजकुराला द्यावें तसें प्रामाण्य देतां येत नाहीं. ग्रँट डफनें आपल्या ग्रंथांत नाना फडणवीसाबद्दलहि वाईट साईट लिहून ठेविलें आहे; आनंदीबाईची कथाहि त्यानें तिखटमीठ लावून वर्णिली असल्यास नवल नाहीं. परंतु या सर्व ग्रंथांना अस्सल (कांहीं कागद बनावटहि असतात) ऐतिहासिक कागदपत्रांचा आधार नसल्यामुळें एतद् ग्रंथांतली आनंदीबाई संबंधींची विधानें ग्राह्य मानतां येणार नाहींत. गारद्यांच्या अगर कटवाल्यांच्या साहाय्यानें राघोबानें नारायणरावाला धरण्याचा प्रयत्न केला असेल व धरण्याच्या त्या भाऊगर्दीत माथेफिरू गारद्यांच्या तरवारीला नारायणराव बळी पडला असेल असे, फार तर म्हणतां येईल. 'घ' चा 'मा' अन्य व्यक्तीनें केल्याचा संभवहि कांहीं कमी नाहीं. मात्र नारायणरावाचा वध झाल्यानें त्या विषयींचा लोकापवाद आनंदीबाईला चिकटला नि तो अनेक वर्षें कायम टिकला. त्यामुळें नाटककार, कादंबरीकार अन् बखरकारांना खमंग विषयाचें खाद्य आयतें मिळालें. यासंबंधीं सरदेसायांनीं समारोप केला आहे तो असा (४): 'तथापि आनंदीबाईच्या कृष्णकारस्थानाचा किंवा दुष्ट स्वभावाचा प्रत्यक्ष पुरावा मला यत्किंचित आढळत नाहीं. ती सुस्वरूप असून नवऱ्यास भुरळ पाडून त्याजकडून वाटेल तें कृत्य करवी, असा सामान्य समज त्या वेळीं होता, त्याचाच अनुवाद पूर्वी डफनें व अलीकडे इतिहाससंग्रहाचे संपादक रा. ब. पारसनीस व त्यांच्या साहाय्यानें इतिहास लिहिणारे ना. किंकेड यांनी ठिकठिकाणीं केलेला आढळतो; पण त्याचा पुरावा मात्र कोणत्याहि प्रकारच्या एवढ्या मोठ्या वाङ्मयांत ते देत नाहींत.' सारांश 'घ' चा 'मा' आनंदीबाईनें केला याला काडीमात्रहि पुरावा सांपडत नाहीं. पण या प्रवादामुळें तिचें जीवन मात्र होरपळून निघालें.

नारायणरावाच्या वधानंतर आनंदीबाई एकवीस वर्षें हयात होती. पुढचा तिचा इतिहास करुण असला तरी उपलब्ध असलेल्या कागदपत्रांवरून ती थोर स्त्री होती याबद्दल तिळमात्र संशय मनांत उरत नाहीं. नारायणरावाच्या निधनोत्तर राघोबा पेशवा झाला (ऑक्टोबर १७७३) पण त्याचें हें पद औटघटकेचें ठरलें. कारण त्याच वेळीं बारभाईच्या कारभारास रंग चढला अन् त्यामुळें राघोबाला रानोमाळ भटकावें लागलें. नारायणरावाची पत्नी गंगाबाई ही त्यावेळीं गरोदर होती. आनंदीबाईनें तिलाहि मारण्याचे प्रयत्न केले असा उल्लेख परशरामभाऊ पटवर्धनांच्या पत्रांत आहे. पण या बाबतींतहि राघोबाचीच टोंचणी तिच्या मागें असावी. १८ एप्रिल १७७४ रोजीं गंगबाईला पुरंदरावर मुलगा झाला. त्याचें नांव सवाई माधवराव. याच्या नांवें २९ मे १७७४ रोजीं पेशवाईची वस्त्रें बारभाई कारभाऱ्यांनीं आणल्यामुळें राघोबाचे पेशवाई उपटण्याचे प्रयत्न वांया गेले. सवाई माधवरावाच्या जन्माची हकिकत आनंदीबाईला समजली तेव्हां तिनें बुऱ्हाणपुराहून सखारामबापूंना पुढीलप्रमाणें पत्र (५) लिहिलें : 'चि. नारायणरावांस पुत्र झाला म्हणून तिकडे हुजूर पत्र लिहावें आणि आम्हांस न लिहावें ऐसा तुमचा आमचा ऋणानुबंध चालत आला कीं काय! आतां या पत्राचें उत्तर जलद पाठवावें. आम्हांस नातू झाला म्हणून पत्रे घेऊन खिजमतगार आले, त्यांस देण्यास सोन्याचीं कडीं तयार नाहींत. तरी तुम्हीं तेथें दोघांस दोन कडीं सोन्याचीं आमचेवरचीं द्यावीं. बाळाचा समाचार नित्य पाठवीत जावा. तुमच्या नांवास व वयास योग्य दिसेल तें याउपरी तरी करावें. तुम्हीं आमचें थोडें बहुत ऐकत असतां म्हणून लिहिलें आहे. तुम्हांकडेस वडीलपण आहे. दुर्लौकिक न होतां काय करणें तें समजून करावें.' त्याच दिवशीं तिनें नाना फडणवीसासहि पुढीलप्रमाणें पत्र (६) लिहिलें : 'किल्ल्याची हवा बहुत सर्द आहे. लेकरूं लहान, यास्तव ज्या जाग्यास लेकरास सुख पडे तेथें न्यावें. थोरपणाची रीत हीच कीं, कोणी कोणास बहुत छेडूं नये. चुणूक दाखविण्यांत मौज आहे. परंपरा पाहोन योग्य असेल तो अर्थ समजून घ्यावा', या दोन पत्रांवरून तिच्या मनांतले वात्सल्य अन् तिचें शहाणपण दिसून येतें. अशीं खुबीदार पत्रें लिहिणारी ती, गंगाबाईस मारण्यास प्रवृत्त होते ही गोष्ट मनाला पटत नाहीं. तसा प्रयत्न तिनें केला असला तर त्याचा करविता धनी राघोबा अगर त्याच्या पक्षाची मंडळी हीच असावीत.

सवाई माधवरावाचा कारभार सुरूं होतांच राघोबानें इंग्रजांशीं सूत जमविलें व त्यांच्याकडे फौज मागितली. पण पेशव्यांचे सरदार हरीपंत फडके त्याच्या हात धुवून पाठीस लागले होते. त्यांना झुकांडी देत तो सारखा पळत होता. त्यावेळीं आनंदीबाई गरोदर होती. तेव्हां त्यानें तिला धार येथें ठेविलें. तिथें १०-१-१७७५ रोजीं तिला मुलगा झाला. तो दुसरा बाजीराव या नांवानें इतिहासांत प्रख्याती पावला. या पुत्रजन्माबद्दल सरदेसायांनी पुढील-

प्रमाणें मार्मिक उद्गार (७) काढले आहेत: 'मातेच्या गर्भारपणचे संस्कार संततीवर होत असतील तर अकबर, शिवाजी व बाजीराव यांची उदाहरणें तुलनेकरितां ठळकपणें मनांत भरतात. शिवाजी—बाजीरावांनी राज्याच्या प्रचंड घडामोडी केल्या. एकानें राज्य स्थापिलें, दुसऱ्यानें घालविलें.' शत्रू पाठीवर असतांना शहाजीनें जिजाईस शिवनेरीस ठेविलें: तिथेंच शिवाजीचा जन्म झाला. आनंदीवाईच्या प्रसूतीसमयीं थोडयाफार फरकानें परिस्थिति अशीच होती. पण एकीच्या मुलानें राज्य स्थापिलें तर दुसरीच्या पुत्रानें तें घालविलें. हाच काय तो फरक. जिजावाईचें नांव इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिलें गेलें. बुद्धिमत्ता, कर्तृत्व अन् ग्रंथादिकांचे वाचन यांत आनंदीवाई तिच्या तोडीची. पण नादान नवरा, नारायणरावाचा वध नि कुलक्षणी चिरंजीव या त्रिदोषांमुळें तिचें नांव इतिहासांत कुविख्यात ठरलें.

आपला मुलगा तरी आपले पांग फेडील अशी आशा आनंदीबाईला असावी. पण तिथेंहि तिचा फार मोठा अपेक्षाभंग झाला. ती हकिकत यथाक्रम येईलच. आपल्या मुलाच्या चौथ्या वर्षी तिळगुळ धाडतांना तिनें बाजीरावाकडून काभाऱ्यास लिहिलेलें पत्रहि खुबीदार आहे. तें पत्र (८) असें: 'तुम्हांस रविशंकरमणाचे तीळ शर्करा पाठविले आहेत हे घेणें. . उगेच इंग्रजांचे घरीं पोटास मात्र खाऊन कितीक दिवस पडोन राहावे! यांत पूर्वीपासून तेज मिळविलें आहे. या प्रांतांत पराक्रमाच्या गोष्टी तीर्थरूपांच्या फार ऐकतों, त्या अशा कीं ज्या तऱ्हेनें पुराणांतील गोष्टी ऐकाव्या त्या तऱ्हेच्या असें असोन हें तेथें राहणें आणि उद्योग न करणें, हें काय समजून वडिलांचे मर्जीस येत असेल? वरकड जातीनें तों बहुत मानी आहेत. परंतु कालापुढें इलाज नाहीं. आम्ही लेकरें, विशेष लिहिलें तर तीर्थरूप म्हणतील कीं, 'बाईको सारा वेळ आम्हांस गांजीत असते. तिला लेक झाला तोही तसाच खोटा निघाला!' यास्तव तुम्ही मर्जी पाहून पत्र वाचून दाखविणें आणि आज्ञा जे होईल ते लिहिणें. आम्ही वडिलांस तीळ शर्करा पाठविले आहे ते प्रविष्ट करून उत्तर पाठवावयाची विनंती करणें'. वरील पत्रांत राघोबासारख्या पराक्रमी पुरुषानें इंग्रजांच्या ओंजळीनें पाणी पिऊं नये असें तिनें सूचित केलें असून नवऱ्याला शालजोडीतले टोमणे हाणले आहेत.

अखेरीस सर्व आघाड्यांवर राघोबाचा पराभव झाल्यामुळें त्याला फजितीचे मानकरी बनावें लागलें. त्यावेळीं आनंदीवाईच्या मनांत दु:खाचे कढ कसे रटरटले असतील त्याची कल्पना करणें कठीण आहे. काळ तर मोठा कठीण आला! हें उमगल्यावर सर्वजण कोपरगांवास राहूं लागली. कृतकर्माचा राघोबाला आतां पश्चात्ताप होऊं लागला. माधवरावाची आई गोपिकाबाई गंगापुरास रहात होती, तिला भेटावें असें त्याच्या मनानें घेतलें. विश्वासराव माधवराव अन् नारायणराव असे तीन कर्ते पुत्र अल्पवयांतच मृत्युमुखीं पडल्यानें ही बाई मनांत फार कष्टी होती. तशांत नारायणरावाचा वध राघोबानें केला—करविला हा दंश तिच्या मनांत होताच: तिला जेव्हां त्याच्या भेटीची इच्छा समजली तेव्हां ती मानी गोपिकाबाई मोठ्या कुर्रेबाजपणें बोलली: 'यास अनुताप झाला नाहीं. मी दर्शन घेत नाहीं. आहे त्याप्रमाणें प्रायश्चित घेऊन एकटा येईल तर दर्शन होईल.' तिला भेटण्याचा सल्ला त्याला आनंदीवाईनेंच दिला असावा असें दिसतें. होतां होतां राघोबा प्रायश्चित्तास कबूल झाला. ४–८–१७८३ रोजीं क्षौर करून ब्रह्मवृंदांच्या मेळाव्यांत यानें प्रायश्चित्त घेतलें तेव्हां मग गोपिकाबाईनें याची भेट घेतली. त्याचें आयुष्य आतां संपत आलें होतें. वय तसें फार नव्हतें. पण त्याचें मन त्याला खात होतें. शरीर पोखरलें होतें. तरी नाटकशाळांचा नाद सुटत नव्हता. याच सुमारास त्याची तिसरी बायको मथुराबाई ही निवर्तली. आनंदीवाईशीं याची भांडणें नेहमीं घडूं लागली. रिकामपणांत भांडणाशिवाय त्यानें तरी काय करावें? अन् मग आठ आठ दिवस हा तिचें दर्शनें घेत नसे. असा हा पेशवाईतला कलीपुरुष राघोबादादा कचेश्वर येथें दि. ११–१२–१७८३ रोजीं निधन पावला. दुर्दैव असें कीं त्यावेळींहि आनंदीवाई गरोदर होती. राघोबा निवर्तल्याचें समजल्यावर, तिच्या अंगावरील दागदागिनें अन् जडजवाहीर घेऊन येण्याचा हुकूम नानांनी सोडला. तेव्हां बाई हृदय पिळवटून बोलली, 'अंगावर आहेत ते काढोन घेणें' तेव्हां नानांच्या कारभाऱ्याचा नाईलाज झाला. पुढला दहा वर्षांचा उर्वरीत काळ तिनें कोपरगांवीं घालविला. त्या काळांतलें तिचें वर्तन, तिची दिनचर्या, तिचा मुत्सद्दीपणा अन् ग्रंथावद्दलचें तिचें प्रेम पाहतां ती शहाणी बाई होती असाच इतिहासाचा अभिप्राय आहे. आयुष्यभर दुदैवानें तिचा पाठपुरावा केल्यामुळ तिचें सारें शहाणपण वाया गलें. यालाच भवितव्यतेची लीला म्हणतात. तिचे अखेरचे दिवस नजरकैदेंत गेले. नवरा कलीपुरुष असल्यानें ही कृत्या ठरली. आणि मग कोपरगांवीं ही अपमानास्पद जिण कंठू लागली.

आनंदीबाईला सहा मुलें झाली. चार मुलगे व दोन मुली. सहा मुलांत गाजला बाजीराव, नव्हे रावबाजी. लहानपणापासून ह्याच्या काळजीचा भुंगा आनंदीचें शरीर अन् मन पोखरीत होता. याच्या द्वाडपणाला तोड नव्हती. सैणपणांतहि हा चांगला मुरलेला. बाप से बेटा सवाई जणु! तेराव्या वर्षीच आपली बायको भागिरथीबाई हिला याने एकांतात बोलाविलें. त्यावेळीं ती अवघी नऊ वर्षांची पोर होती. पण या लंपटाला त्याचे काय होय! तिला रजोदर्शनहि घडलें नव्हतें. पण यांची वासना यांला स्वस्थ बसूं देईना. असा प्रकार दोन तीनदां झाल्यावर ही गोष्ट आनंदीबाईला समजली. तेव्हां तिनें त्याची खरडपट्टी काढली,

तेव्हां हे दिवटे चिरंजीव तिला म्हणाले, 'ती तुमची सवत आहे ?' मग मात्र या वासनामूर्तीला तिनें लाथाबुक्यांचा चांगलाच प्रसाद दिला. अशा परिस्थितींत त्याला झाली गरमी. तेव्हां ही म्हणते (९): 'बाजीराव यांस गर्मी जाली आहे; बायको थोर नाहीं हेंच बाधा फार आहे.' मुलाचे हे थेर पाहिल्यावर तिचे हृदय कसें पिळवटून निघालें असेल त्याची कल्पना करावी. बाजीराव विद्याभ्यास मुळींच करीत नसे. स्नानास गेला तर पोहतच बसे. हिनें कांहीं सांगितलें तर तो तिला मुळींच जुमानीत नसे. मग अशा वेळीं ती टाहो फोडते (१०). कीं 'बाजीराव थोर जाळें असतां अद्यापि मर्यादेची तऱ्हा नाहीं. कालचर्येस काय म्हणावें? आम्हीं पेचांत आणि मुलें अशीं. तशांत हा मुख्य यांची तऱ्हा अशी नसावी. याचें दैवानें चालतें आणि यांनी असें असणें हा दैवयोग आहे.' पुढें ती म्हणते (११) 'बाजीराव फार खेळतात. यास कोणी जपत नाहीं. येथें कारभारी आहेत, यांतून कोणी जवळ आसावें तें नाहीं... मूल, शाहाणें होऊं नये, असें सार्‍यांस वाटतें;' आपल्या मुलाबद्दल ती कशी वैतागली होती याची साक्ष म्हणजे हे उद्‌गार!

पण अशा दुःखातहि आनंदीबाई मोठी धीराची अन् कर्तव्याला जागणारी बाई दिसते. गोपीकाबाई दि. ३–८–१७८८ रोजीं निवर्तली

## दुर्दैवी !



**विद्यार्थी आचार्याकडे आला व म्हणाला, "आचार्य ? माझ्यासारखा दुर्दैवी कोणी नसेल. पायांत घालायला मला वहाणा देखील नाहींत !"**

**आचार्य एवढेंच म्हणाले.**

**"चल ! आपण थोडा वेळ नदी काठीं जाऊन येऊं !"**

**रस्त्यांत त्यांना एक माणूस भेटला. त्याचा एक पाय तुटला होता. कांखेंत कुबड्या घेऊन तो कष्टानें पावलें टाकीत होता.**

**ते नदीजवळ गेले. ज्याचे दोन्ही पाय तुटलेत असा एक भिकारी धुळींत लोळत होता.**

**आचार्यांनीं विद्यार्थ्याकडे पाहिले.**

**विद्यार्थी म्हणाला—**

**"आचार्य ! ह्याच्याहून मी पुष्कळच सुदैवी आहे !"**

**—रं. कृ. चिंचलीकर**

तेव्हां तिनें सवाई माधवरावाला पुढीलप्रमाणें दुखवट्याचें पत्र धाडलें (१२) 'बाईसाहेबांस पंचवटीस रविवारी कैलासवास झाल्याचे वर्तमान सोमवारी सायंकाळी येथें आफवा आली....चिरंजीवास आईबाप भाऊ कोणीच नाहीं. आम्ही दूरच आहों. येक आजी तेहि दूरच होती. परंतु ममतेचे तेवढेच मनुष्य होतें. त्यांचाहि कालच जाला होता. सृष्टीची वाट हीच आहे.' नानांच्या ही कैदेंत असूनहि तिला घराण्याची–कुटुंबाची माया कशी होती तें समजतें.

राघोबाच्या मृत्युनंतर आनंदीबाई कोपरगांवीं राहूं लागली. तिथें तिला कडेकोट बंदोबस्तांत ठेवण्यांत आलें होतें. नानांच्या लेखीं परवानगीशिवाय तिला भेटण्याची परवानगी कुणालाहि नव्हती. बाजीरावाचें पहिलें लग्न (१७८६) इथेंच झालें. ती सुनांना प्रमानें वागवी. व्रतवैकल्यें, गोप्रदानें व उपोषणें यांत ती नेहमीं चूर असे. तिला आपल्या परवशतेची चीड येई व मग ती म्हणे (१३). 'पूर्वी सुरतेमध्यें इंग्रजानें आम्हांस बहुत सुख दिलें. पूर्वद्वेष होते, परंतु त्या द्वेषानें हल्लीं आम्हांस कैदेंत ठेवावें तें कांहींच न केलें. तस्मात् राज्याची आधी तऱ्हा असते कीं दुसऱ्या राज्यासीं वाईटपणा असल्यास त्यास युद्धामध्यें प्रसवें आणि परागंदा होऊन आल्यास त्याचें संरक्षण करावें असा धर्म आहे; असें इंग्रजानें केलें. आणि ब्राह्मणी राज्यामध्यें न्यायच नाहीं.' तिच्या कैदेला जबाबदार नाना फडणवीस. तेव्हां ती कांहींसें कळवळून व थोड्या उपहासानें म्हणते (१४) 'नानास या दौलतीचें सूख काय आहे? घरांत मूलबाळ संसारिकाचें, सूख तें नाहीं. दौलत तरी काय करावी ?' नाना निपुत्रिक असल्यामुळें तिनें त्यांच्या मर्मावर अचूक बोट ठेविलें आहे. आपल्यावर नारायणरावाच्या वधाचें किटाळ आलें याबद्दल तिला दुःख होई–राग येई. तेव्हां मागील गोष्टी आठवून ती म्हणते (१५) 'भाऊ साहेबांस हिंदुस्तानांत जावयास कारण व सर्व बराबर व्हावयास कारण थोरली बाई' सदाशिवरावभाऊवर मारेकरी घालण्यांत आले होते व पुढें त्याला जें पानिपतावर जावें लागलें त्याला कारण गोपिकाबाई असा एक प्रवाद आहे. त्याला अनुलक्षून तिचे हे उद्‌गार आहेत. पण तरीहि तिला गोपिकाबाईबद्दल सहानुभूतीच वाटते. ती म्हणते (१६): 'बाईची धन्य आहे. दोन मूल हत्तीप्रमाणें गेले. आम्हांस किती वाईट वाटते मग त्यांचे काय पुसावें !' हिला आपल्या सद्यःस्थितीबद्दल फार वाईट वाटत असे. ती म्हणते (१७): 'आम्हीं केवढीं माणसें होतो आणि कोणत्या योग्यतेस आलो. आन्याय कोणी पाहात नाहीं. उगेच निःकारण कैदेंत ठेविले आहे...धनी आसते म्हणजे ताकत नवती, आम्ही निर्बल जालो ते समई गांजितात.'

कैदेंत असतांना आनंदीबाईची दिनचर्या ती काय असणार? पेशवाई मिळाली नाहीं. नवरा गेला. मुलगा दुर्वतनी निघाला. एक लग्न झालेली मुलगीहि मृत्यु पावली. तेव्हां अशा दुःखद परिस्थितींत ही बागेंत जाऊन बसे. हरतालिकेचें व्रत कडकपणें करी. सप्तशतीचा पाठ न चुकतां म्हणे. गणपतींत ब्राह्मणभोजनें घाली. कच्चेश्वरी चांगली बाग करावी. असें तिला वाटे. पण सत्ता व अधिकार नसल्यामुळें ही साधी गोष्टहि तिला करतां येत नाहीं म्हणून ती हळहळे. श्रावणांत ब्राह्मणांना दक्षणा देण्यांत ती दक्ष असे. वाड्यांत हळदीकुंकु समारंभ करी व गांवांतल्या

बायकांना अगत्यान बोलवी. वाचनाची तिला आवड होती असें दिसतें. तिच्यापाशीं राघोवानें जमविलेले ग्रंथ होते. मोक्षधर्माचे एक पुस्तक परत बोलीच्या करारानें त्यानें आणलें होतें. त्याच्या पश्चात तिनें तें ज्याचें त्यांस परत केलें. भागवताचे पारायण करण्यासाठीं पेशव्यांचे उपाध्याय कर्वे (पुणें) यांजकडून तिनें पोथी आणविली. कर्मविपाकाचे व सूर्य-अरुण हीं पुस्तकेंहि तिनें मागविलीं होतीं. महाभारत ग्रंथहि ती पुण्याहून मागवितांना आढळते. पहिल्या बाजीरावाचा धाकटा मुलगा जनार्दनपंत याची मुलगी सगुणाबाई हिच्याएवढा ग्रंथसंग्रह तिच्यापाशीं नसला तरी एकंदरींत ती ग्रंथप्रमी दिसते. वाचनांत जशी ही प्रवीण तशी लिहिण्यांतहि ही मोठी चतुर होती. महत्त्वाचीं पत्रें ही स्वतः लिही. नानाला तिनें लिहिलेलें हें पत्र पहा. ती लिहिते (१८): आम्ही होऊन (पत्र) पाठवावें, तर कारणाखेरीज आम्हांस पत्रें पाठवितात, म्हणोन तुम्हीच हंसाल. हा काळ समजोन पत्रें न पाठविलीं. हल्लीं पत्राचें कारण कीं तुम्हीं तीन पिढयांचे दौलतींतील फडणीस असोन, दौलतेची तो गति झाली ती झाली. हल्लीं यवनाक्रांत ब्राह्मणी दौलत फितुरांनीं होऊं पाहाते. तुमच्या चित्तांतील उगीच आटी जात नाहीं, आणि ब्राह्मणी तों वुडत चालली ! या दौलतेंत पूर्वी कारभारी झाले, त्यांणी ब्राह्मणी स्थापली व दौलतची वृद्धि केली. हा काळ प्रस्तुत श्रीसत्तेनें आला ! इंग्रज वुंदेलखंडापर्यंत दोन कंपू आले, आणिकही मागून येणार. याचा वारीक मोठा विचार जो करणें तो तुम्हीच करणें. ....त्या पक्षीं दोन्ही गोष्टींचा आंदेशा करून ब्राह्मणपण राहे तें करणें' तत्कालीन परिस्थितीचें ठसठशीत चित्र रंगवून तिनें नानांची कशी कानउघाडणी केली आहे तें दिसून, तिच्या हुशारीचें अन् धूर्तपणाचें कौतुक वाटतें.

पतीवरील निष्ठेनें आनंदीबाईनें राघोवाला आयुष्यभर साथ दिली. पुढें तो निवर्तला तेव्हां हिला एकाकी वाटणें साहाजिक होतें. नारायणरावाचा हिला लळा फार, नारायणराव वहुत मर्यादशील होता असें ती म्हणत. पण त्याच्या वधाचें पाप हिच्या कपाळीं कायमचें वसलें. नशीब म्हणतात तें असें. नवरा व दौलत हीं तिची आराध्यदैवतें. प्रसंगावधान, महत्त्वाकांक्षा, घराण्याचा प्रखर अभिमान, नातलगांबद्दलचा कळवळा अन् प्रेम वगैरे हिचे गुण प्रशंसनीय म्हटले पाहिजेत.

मन थकत चाललें तसें आनंदीबाईचें शरीरहि थकत चाललें. तिच्या पतीच्या अस्थि गंगेंत टाकाव्यात ही तिची साधी इच्छाहि कुणी पुरी करीना. मेल्यावर राग धरणें वरें नव्हे असें तिला वाट. उपेक्षेमुळें ही अगदीं कंटाळली. कोपरगांवला तिचें मन मुळींच रमेना. १७९२ सालच्या अखरीस ती आनंदवल्लीस येऊन राहिली. नांव 'आनंदीबाई'. पण 'आनंद' हिच्या वांट्याला फारच थोडा आला. तरी ती अखेरपर्यंत आनंदी राहिली. नवऱ्याच्या नाटकशाळांचा व त्यांच्या मुलांचा परामर्षहि हिनें चांगला घेतला. हिच्या दिमतीला जे कारभारी, नव्हे पहारेकरी ठेवले होते त्यांना सारखा तिच्याबद्दल संशय वाटे. त्यामुळें, तिला जीवन नकोसें झालें. तिची जीवनज्योत मंदावत चालली. तरी देवपूजा अन् जपजाप्य सुटलें नव्हतें. दि. २६ मार्च १७९४ रोजीं ती अंमळ घाबरीघुबरी झाली. म्हणून गंगोदक तिच्या मुखांत घालण्यांत आलें. हेमगर्भाची मात्राहि देण्यांत आली. तिचे मुलगे तिच्याजवळ बसून होते. पण सर्व उपाय थकून ही दुर्दैवी स्त्री दि. २७ मार्च १७९४ रोजीं निधन पावली. तिची योग्यता सरदेसायांनीं पुढीलप्रमाणें वर्णिली आहे:—

'She was shrewd and wise, honest and outspoken and always anxious to preserve the dignity and the prestige of the Peshwas. If she had been wedded to a better husband, there seems to be little doubt that she would have figured as one of the most patriotic members of the Peshwa's family.'

टीपा.

(१) सरदेसाईकृत मराठी रियासत-मध्यविभाग—४, स. १९२५, पृ. २४७. (२) सरदेसाई संपादित 'पेशवे दप्तर' खंड ४ था, स. १९३०, पृ. ४५,९१. (३) सोहनीकृत पेशव्यांची वखर, संपादकः साने., स. १९२५, पृ. ९०. (४) सरदेसाईकृत मराठी रियासत—मध्यविभाग—४, स. १९२५, पृ. ३४६. (५) सरदेसाईकृत मराठी रियासत—मध्यविभाग—४, स. १९२५, पृ. ३८१. (६) सरदेसाईकृत मराठी रियासत—मध्यविभाग—४, स. १९२५, पृ. ३८१. (७) सरदेसाईकृत मराठी रियासत, उत्तरविभाग १, स. १९२९, पृ. ३१. (८) सरदेसाईकृत मराठी रियासत, उत्तरविभाग १, स. १९२९, पृ. ४२२. (९) पेशवे दप्तर, खंड ४ था, स. १९३०, पृ. ४७. (१०) पेशवे दप्तर, खंड ४ था, स. १९३० पृ. ६१. (११) पेशवे दप्तर, खंड ४ था, स. १९३०, पृ. ६८. (१२) पेशवे दप्तर, खंड ४ था, स. १९३०, पृ. ८५. (१३) पेशवे दप्तर, खंड ४ था, स. १९३०, पृ. ५८. (१४) पेशवे दप्तर, खंड ४ था, स. १९३०, पृ. ५९. (१५) पेशवे दप्तर, खंड ४ था, स. १९३०, पृ. ८८. (१६) पेशवे दप्तर, खंड ४ था, स. १९३०, पृ. ४७. (१७) पेशवे दप्तर, खंड ४ था, स. १९३०, पृ. ८. (१८) सरदेसाईकृत ऐतिहासिक पत्रबोध, स. १९६३, पृ. ८१. (१९) पेशवे दप्तर, खंड ४ था, स. १९३०, प्रस्तावना, पृ. २.

• • •



आदर्श पत्नी, पाकशास्त्र विशारद, प्रेमळ माता आणि क्षमाशील आजी या भूमिका सारख्याच एकरूपतेनें पार पाडणारी एक श्रेष्ठ अभिनेत्री

# चिरयौवना मार्लिन डिट्रीच

—के. टी. देशमुख

टेलिफोन खणखणला. रिसीव्हर उचलला गेला तोंच शब्दांची उडालेली गल्लत आणि त्यानंतर घाबरलेल्या आवाजांत प्रश्न उमटला. "कोण? मार्लिन?"

"हं."

"मला आत्तां समजलं—गायनाच्या जलश्यासाठीं तूं बर्लिनला जाणार आहेस ही बातमी खरी आहे?"

"होय—मला पैसे पण चांगले देऊं केले आहेत."

"छे: छे: रकमेबद्दल म्हणत नाहीं—जर्मनीला गेलीस तर जीवावर उठतील तुझ्या याचा कांहीं विचार केला आहेस कां"

मार्लिननें शान्त चित्तानें उत्तर दिले, "युद्ध केव्हांच संपलेलं आहे. कलेची आराधना करणें हा माझा व्यवसाय आहे!"

ठामपणानें दिलेल्या अशा उत्तरावर आतां पुढें काय म्हणायचें? प्रश्न विचारणारा बिचारा गप्प राहिला आणि तो गप्प म्हणून तिनें फोन खालीं ठेवून दिला. आपल्या मनाशीं ती हंसूं लागली तोंच पुन्हां घंटा वाजली. जर्मनीची वारी तिनें तावडतोब रद्द करावी असा प्रेमाचा, कळकळीचा सल्ला देणारे संदेश एकसारखे येत राहिले. या प्रकरणाची सुरुवात अगदी सहज अचानकपणें झाली.

"बर्लिन शहरांत तुमच्या संगीत जलशाचा कार्यक्रम ठेवावा अशी कल्पना माझ्या डोक्यांत चमकली आहे" असें म्हणत एका चतुर ठेकेदारानें मिस्किलपणानें हंसत हंसत तिला पुढें विचारले, "तुम्ही जर्मनीला येणार काय?" "अलबत कां नाहीं?" क्षणाचाहि विलंब न करतां तिनें उत्तर दिले. या आयत्या चालून आलेल्या संधीचा पुरेपूर फायदा उठविण्याच्या इराद्यानें तिनें प्रश्न टाकला, "पैसे किती?"

आणि त्याच बैठकींत सारी योजना पक्की होऊन करारमदार होऊन चुकले. व्यावसायिक जगांत ही बातमी वाऱ्यासारखी पसरली. तिचें मन या दौऱ्यापासून परावृत्त करावे म्हणून हितचिंतकांची धडपड सुरू झाली. हें बर्लीनचें आमंत्रण धोकादायक ठरणार होतें तें कां आणि कसें? परंतु हें समजावून घेण्यासाठीं आपणांस तिच्या पूर्वायुष्याच्या इतिहासाची ओळख आवश्यक आहे.

सौंदर्यशालिनी चित्रपटतारका मार्लिन डिट्रिच ही मूळची जर्मन. 'डायट्रिक्' हा खरा उच्चार परंतु डिट्रिच् म्हणून रूढ झाला. तिचा जन्म बर्लिन शहरांत झालेला. चित्रतारका म्हणून तिचा उदय आणि बोलबाला सुरुवातीस जर्मनीमध्येंच झाला. परंतु तिचा भाग्योदय ती अमेरिकेस हॉलिवूडला आल्यानंतर झाला. यश, कीर्ति आणि संपत्ति तिथें तिच्या पायांशीं चालत आली. जर्मन देशाच्या नागरिकत्वाचा त्याग करून तिनें अमेरिका देशाचें नागरिकत्व स्वीकारले. हॉलिवूडनें 'मार्लिन डिट्रिच्' हें नांव त्रिखंडात गाजविलें!












तिच्या असामान्य लावण्यावर फिदा असलेल्या लाखों चित्ररसिकांपैकी एक महाभाग—मृच्छकटिक नाटकामधील खलपात्र शकार जसा स्वतःला म्हणवून घेतो त्याप्रमाणें 'मनुष्य वासुदेव' किंवा 'वरपुरुष' होता ! त्याचें नांव ॲडॉल्फ हिटलर? तिच्या मादक आणि अहंकारयुक्त सौंदर्यावर तो इतका वेडा झाला होता कीं, व्हॉन रिबेन्ट्रॉप या आपल्या खास विश्वासू परराष्ट्र मंत्र्यामार्फत त्यानें तिला एकदां मागणीसुध्दां घातली होती. एकंदर व्यवहाराच्या अटी पण चोख कळविल्या होत्या. अमेरिकेंतून मार्लिननें परत जर्मनींत येऊन हिटलरची प्रेयसी म्हणून रहावें - मोबदल्याखातर तिनें हवी तेव्हढी संपत्ति आणि जडजवाहीर मागावें ! शिवाय इतिहासांत तिचें नांव या नरपुंगवाबरोबर कायमचें निगडित राहून अजरामर होईल ही केवढी परम भाग्याची गोष्ट ! असा युक्तिवादहि लढविण्यांत आला होता ! मार्लिननें ही मागणी साफ धुडकावून लावली होती. शिक्षा म्हणून तिच्या चित्रपटांना जर्मनींत फ्यूररनें कायमची बंदी घातली होती.

या हुकूमशहाच्या अनिर्बंध अमर्याद सत्तेखालीं अवघें जर्मन राष्ट्र भरडून जात असतांना त्याच्या खास हुकूमावरून एक सुसज्ज असें चित्रपटगृह नेहमीं 'मुद्दाम राखून' ठेवण्यांत आलें होतें. लहर लागेल त्यावेळी एकट्यानें केवळ मार्लिनची प्रमुख भूमिका असलेले चित्रपट तो मोठ्या आवडीनें पाही. ती त्याची आवडती चित्रतारका होती. चित्रपट अमेरिकेचे आणि भाषा इंग्रजी ह्या खरें म्हटलें तर त्याच्या दृष्टीनें दोन्हीहि कडू गोळ्या ! परंतु त्या निमूटपणानें गिळण्याइतपत त्यानें मनाची तयारी केली होती.

दुसऱ्या महायुद्धाचा वणवा भडकला ! अमेरिका युद्धक्षेत्रांत जातीनें सामील झाली त्यावेळेस आघाडीवरच्या सैनिकांच्या मनरंजनासाठीं मार्लिननें आपल्या संगीत जलशांचे कसलाहि मोबदला न घेतां जे दौरे काढले त्या अपूर्व गायनाच्या सुखद आठवणी हीं दोस्त राष्ट्रांतील शिपाई पेशाच्या वनवासी जीवांना एक अतीव आनंदाची, उत्साहाची, स्फूर्तीची आणि अभिमानाची महापर्वणी भासली ! तिच्या स्वर्गीय गायनाचा जलसा हा केवळ श्रीमंतांनाच परवडेल असा महागडा कलाप्रकार असल्यानें तो सर्वसामान्य जीवांच्या वांटणीस यावा हा राष्ट्रीय आपत्तीमुळें घडून आलेला एक दैवाचा चमत्कार असें म्हटलें पाहिजे. अमेरिकन राज्यसरकारनें आयोजित केलेले युरोपमधील कित्येक रणक्षेत्रांवरील हे कार्यक्रम तुफान लोकप्रिय झाले जखमी सैनिकांच्या इस्पितळांना मार्लिननें भेटी दिल्या. सैनिकांना उद्देशून छोटीं छोटीं स्फूर्तीपद अशीं व्याख्यानें दिलीं. 'जर्मन राष्ट्राचा नेता हिटलर हा एक नराधम रक्तपिपासू नरराक्षस आहे. जर्मन राष्ट्र सर्व जगाला दुःखाच्या खाईत लोटण्यासाठीं उतावीळ झालें आहे' असें जाहीर उद्गार तिनें कित्येक प्रसगीं काढले होते. पुढे जर्मनीचा सर्वनाश झाल्यानतर हिटलरने आत्मनाश करून घेतला. जर्मन राष्ट्र शरण येऊन महायुद्धाची समाप्ति झाली. विजयोत्सवाच्या सुप्रसंगीं अमेरिकेच्या काँग्रेसने आणि फ्रेंच राज्यसरकारने 'बहुमानाचे किताब' 'आणि 'सुवर्ण पदक' तिला मोठ्या सन्मानाने समारंभपूर्वक बहाल केले !

परतु युद्धकाळात तिच्या स्वतःच्या जर्मन देशात मात्र तिला 'राष्ट्रद्रोही' ठरविण्यात आले होते यात काही नवल नाहीं. आता युद्ध समाप्तीनंतरच्या काळात अपमानित जर्मन राष्ट्राच्या अंतरीच्या जखमा हळुहळू भरून यावयास नुकतीच कुठें सुरुवात झाली असतांना मार्लिननें आपल्या संगीत जलशांच्या निमित्तानें बर्लिनवर मोर्चा नेऊन जुन्या जखमांवरची खपली काढून टाकण्याचें धाडस करूं नये असा तिच्या हितचिंतकांचा दावा होता. न जाणो, पुन्हां ठिणगी पडून तिच्या जीवास अपायसुध्दां होण्याचा संभव होता.

परंतु तिची जिद्द मोठी होती. तिच्या कलागुणाची ही एक कसोटी ठरणार होती. तिच्या कलासक्त कर्तबगारीला हें एक मोठें जबरदस्त असें आव्हान होतें !

६ मार्च १९६० रोजीं रात्रीं बर्लिनमधील सुप्रसिद्ध टिटानिया पॅलेस रंगमंदिर जर्मन नागरिकांनीं भरून गेलें. एकंदर वातावरणांत औत्सुक्य वा उत्साह यांचा अभाव भासत होता.

पडदा वर उचलला गेल्यानंतर मार्लिननें रंगमंचावर प्रवेश केला त्यावेळीं स्वागताची जी टाळी पडली ती एक उपचार वाटण्याइतक्या सौम्य स्वरूपाची होती. नम्र अभिवादन केल्यानंतर तिनें धिटाईनें उपस्थितांना आणखी एक चिमटा काढला ! हिटलरने आपल्या तामसी नाझी राजवटीत ज्या विख्यात ज्यू संगीतकारांना जर्मनीमधून हाकलून काढले होते त्यांनी रचलेलीं आणि एके काळीं गाजलेलीं पदें म्हणण्यास तिनें सुरुवात करतांच तिच्या या धाडसाने जर्मन स्त्री-पुरुष चकित होऊन गेले ! परंतु थोड्याच अवधींत हिटलरपूर्व जर्मनीच्या गतस्मृति उजळल्या जाऊन त्यांचीं अंतःकरणें विरघळू लागलीं. बेछूटपणाने उभी रहाण्याची तिची लकब, तिचा निश्चयी आवेश, तिचा आत्मविश्वास



असामान्य सौंदर्य आणि आकर्षक व लोभसवाणें शरीर लाभलेली चिरयौवना "मार्लिन डिट्रिच"



“ब्ल्यू एंजेल” ह्या पहिल्या चित्रपटांत “मार्लिन डिट्रिच” “लोला लोला” या गाजलेल्या भूमिकेंत.

आणि तिच्या निर्भय वृत्ति अनुभवित असतांना वातावरणांत एक प्रसन्नता उदयास आली. तिच्या कंठमाधुर्यानें संतुष्ट होऊन रसिकांचे चेहरे आपुलकीच्या भावनेनें ओथंबून निघाले. टाळ्यांच्या कडकडाची धार प्रत्येक पदानंतर वरती वरती चढूं लागली. सरते शेवटीं तर सारा समुदाय तिचा सन्मान करण्यासाठीं उठून उभा राहिला! टाळ्यांचा प्रचंड कर्णभेदी कडकडाट आणि 'डिट्रिच्!' 'डिट्रिच्' अशा गगनभेदी आवाजांतील घोषणा थांबण्याचें चिन्ह दिसेना! पुन: पुन्हां लवून सर्वदिशांना ती नम्रतेनें अभिवादन करीत राहिली. तिच्या डोळ्यांत अश्रूं जमा झाले. त्या साऱ्या बर्लिनकर मंडळींकडे ती भारावलेल्या नजरेनें पहात राहिली. बाहेरच्या जगांत तिनें मिळविलेली असामान्य लोकप्रियता आणि उज्ज्वल यश मान्य केल्याची ही 'पावती' आतां मिळत होती! दुसऱ्या दिवशीं बर्लिनच्या प्रमुख वर्तमानपत्रांमधून तिचा गौरव करणारे लेख प्रसिद्ध झाले.

तिच्या कलाजीवनाची सुरुवात आणि त्या कलाजीवनाला समृद्ध अशी कलाटणी ह्या बर्लिन शहरांतच मिळाली होती. संगीत नृत्यप्रधान नाटकांत विनोदी घाटणीची भूमिका करीत असलेली पंचवीस वर्षांची मार्लिन दिग्दर्शक स्टर्नबर्ग ह्याच्या तीक्ष्ण नजरेस पडली. 'ब्ल्यू एंजेल' या आपल्या जर्मन बोलपटांत त्यानें तिला एक भूमिका दिली. भूमिका छोटी असली तरी महत्वाची होती. मनाजोगती नटी मिळविण्याच्या शोधांत त्यानें वीसपंचवीस मुली नापास केल्या होत्या. मार्लिननें वठविलेली बेछूट छछोर वृत्तीची 'लोलालोला' ही भूमिका प्रेक्षकांवर एवढी जबर मोहिनी पाडी कीं, तिच्यासमोर एमिल जेनिंग्जसारख्या कुशल अभिनेत्याचा देखील प्रेक्षकांना संपूर्ण विसर पडावा! १९३० सालीं जगभर प्रकाशित झालेला जर्मन भाषेमधील 'ब्ल्यू एंजेल' हा चित्रपट केवळ जर्मनींतच नव्हे तर विशेषत: युरोप अमेरिका खंडांत खूप गाजला. हॉलिवूडनें या चित्राची तात्काळ नोंद घेतली. पॅरामाऊन्ट चित्रसंस्थेनें दिग्दर्शक स्टर्नबर्ग आणि मार्लिन या दोघांना हॉलिवूडमध्यें पाचारण करून त्यांच्याबरोबर चित्रपट-विषयक करारमदार उरकून घेतले.

स्टर्नबर्ग हा हॉलिवूडचा मूक जमान्यापासूनचा दिग्दर्शक. याचें संपूर्ण नांव जोसेफ व्हॉन स्टर्नबर्ग. हा ऑस्ट्रिया देशाचा नागरिक, व्हिएन्ना येथें जन्मास आला. बुद्धीनें कुशाग्र असल्यानें व्हिएन्ना युनिव्हर्सिटीच्या अनेक पदव्या अल्पवयांत मिळविल्यानंतर तो हॉलिवूडला दिग्दर्शक म्हणून रुजूं झाला. चित्रसृष्टींत त्याचे दोन विक्रम गाजले आहेत.

पॅरामाऊन्ट कंपनीसाठीं त्यानें 'अंडर वर्ल्ड' हा गुन्हेगारांच्या जीवनावर आधारलेला असा एक ध्येयवादी चित्रपट दिग्दर्शित केला. १९२७ सालीं प्रकाशित झालेल्या या चित्रानें पॅरामाऊन्टला अमाप पैसा आणि स्टर्नबर्गला उदंड कीर्ति मिळवून दिली! हॉलिवूडची ही पहिली गुन्हेगार चित्रकथा! या पद्धतीवर अनेक चित्रपट निर्माण होण्यास आणि ते विलक्षण लोकप्रिय होऊन गाजण्यास येथून सुरुवात झाली. या गुन्हेगार चित्रकथांना 'गँगस्टर फिल्मस्' असें संबोधण्याचा प्रघात पडला. या चित्रप्रकारामधून जेम्स कॅग्नी, हंफ्रे बोगार्ट, एडवर्ड जी. रॉबिन्सन, पीटर लॉरी असे नांवाजलेले अभिनेते चित्रतारे म्हणून उदयास आले. वॉरेझ, गुड अर्थ, लाईफ ऑफ एमिल झोला अशा संस्मरणीय चित्रांमधून चमकलेल्या पॉल म्यूनी ह्या प्रज्ञावंत अष्टपैलु कलावंताचा चित्रसृष्टींतील प्रवेश 'स्कार फेस' या गँगस्टर फिल्मनें झाला. दिग्दर्शक स्टर्नबर्ग यांस गँगस्टर फिल्मस्चा आद्यप्रवर्तक मानले जाते. हा त्याचा पहिला विक्रम.

रंगभूमीवर सर्वसाधारण कामें करीत असलेल्या एका नटीमधील सुप्त कलागुण अचूक हेरून त्यानें तिला 'चित्रतारका मार्लिन डिट्रिच्' या महत्पदास नेऊन बसविलें हा त्याचा दुसरा विक्रम होय!

मार्लिनला बरोबर घेतलेला स्टर्नबर्ग १९३० सालीं हॉलिवूडला येऊन पोहोंचला. पॅरामाऊन्टसाठीं पुढील चारपांच वर्षांत त्यानें जीं अनेक चित्रें अमाप यशस्वी करून दाखविलीं त्यांत मोरोक्को, डिस्ऑनर्ड आणि शांघाय एक्स्प्रेस विशेष सुप्रसिद्ध आहेत. मार्लिनची प्रमुख भूमिका असलेले चित्रपट उत्पन्नाचे नवे नवे उच्चांक गांठूं लागले. तिच्या भूमिका आवडीनें, श्रद्धेनें पहाणाऱ्या लक्षावधी चित्ररसिकांचा स्वतंत्र असा एक नवीनच वर्ग देशोदेशीं तयार झाला. भारतांत देखील हीं चित्रें प्रकाशित होत होती. त्यावेळचे पुण्याचे कॉलेजचे विद्यार्थी मोठ्या अभिमानानें म्हणत कीं मार्लिन डिट्रिच् त्यांची अगदीं 'पेट् हिरॉईन'!

तिचा शिल्पकार होता जोसेफ व्हॉन स्टर्नबर्ग! ह्यानें तिचे चित्रपट हमखास यशस्वी ठरावेत म्हणून प्रथमपासून आपल्या तंत्रांत कांहीं मूलभूत फेरबदल केले. कथानकाला विशेष प्राधान्य न देतां फक्त नायिकेच्या शरीर सौष्ठव आणि सौंदर्याला उठाव मिळावा अशी त्यानें योजना केली. इतर पात्रांचें सोडाच, परंतु नायकाचीं दृश्येंसुध्दां माफक ठेवलेलीं असा

वयाची. नायक नायिकेच्या जोड दृश्यांत नायिका आपल्या प्रियकराच्या भावनांशीं समरस झालेली दिसत नसे. ती आत्मकेंद्रित शिरजोर व वरचढ आहे असें वाटत असे. मालिनची अहंकारी अशी अलिप्तता पडद्यावर प्रकर्षानें प्रकट होई! तिचें व्यक्तिमत्व अधिक सुंदर, उठावदार, प्रभावी आणि विलोभनीय व्हावें या एकाच हेतूनें अधिकाधिक प्रसंगीं तिच्या चेहऱ्याचे मोठमोठे 'क्लोज अप्स' टाकण्याची सुरुवात झाली. एकामागून एक प्रकट होणारीं तिच्या चेहऱ्याचीं मनोहर गहिरी रूपें पहात असतांना प्रेक्षक अगदीं खूष होऊन जात. या दृश्यांचा कथानकाशीं सुतराम् संबंध नसे. उलट कथानकाच्या गतींत खंड मात्र होई. डोळ्यांना आनंद व्हावा, चित्तवृत्ति प्रफुल्लित व्हाव्यात म्हणून या दृश्यांची योजना! स्टर्नबर्गचें तंत्र कमालीचें यशस्वी झालें. तिच्या चेहऱ्याच्या सुन्दर क्लोज अप्सची सांखळी हें जसें त्या लोकप्रिय चित्रपटांचें खास वैशिष्ट्य होतें त्याचप्रमाणें तिचा सुडौल बांधा विशेषत: तिचे उघडे पाय दिसतील अशीं दृश्यें कटाक्षानें घेतलीं जात होतीं. आज मालिन जशी तिच्या सौंदर्याकरितां आणि गायनाकरितां प्रसिद्ध आहे तितकीच ती आपल्या पायांकरितां प्रसिद्ध आहे! त्या वेळेस तिचें अनुकरण करून आपले पायहि पडद्यावर दिसावेत म्हणून इतर चित्रतारका मोठ्या अहमहमिकेनें आपल्या उघड्या पायांचे शॉटस् घेतले पाहिजेत असा आग्रह धरीत. या एकंदर प्रकाराला सेटवर 'ड्रूलिंग डिट्रिच्' असा एक नवा तांत्रिक शब्दच तयार झाला होता. कारण लाखों चित्रशौकिनांची ती आतां एक 'आराध्य दैवत' बनली होती. तिच्या केसांसारखी वळणं ठेवण्यांत स्त्रिया स्वतःला धन्य समजत. प्रत्येक चित्रपटांतील तिच्या पोषाखाप्रमाणें युरोप अमेरिका खंडांतील पोषाखाच्या फॅशन्स बदलूं लागल्या होत्या. तिच्या अभिनयांतील लकबी हुबेहूब उचलण्याची जरुरी इतर चित्रतारकांना भासत होती. प्रथम श्रेणीमधील सर्व चित्रतारकांना केव्हांच बाजूस सारून ती आतां ग्रेटा गार्बो या चित्रतारकांच्या सम्राज्ञीबरोबर लोकप्रियतेच्या दृष्टीनें स्पर्धा करूं लागली!

पॅरामाऊन्ट चित्रसंस्थेला नेमकें हेंच हवें होतें.

मेट्रो गोल्डविन कंपनीच्या दरबारांत ग्रेटा गार्बो हें एक तेजस्वी रत्न होतें. तिच्या गूढ दिव्य सौंदर्ययुक्त अशा दर्शनानें आणि विलक्षण वचक निर्माण करणाऱ्या व्यक्तिमत्वामुळें सारें जग तिला रुपेरी पडद्यावरील महाराणी म्हणून मानीत होते! चित्रतारकांच्या सिंहासनावरून गार्बोची उचलबांगडी करून त्याच गादीवर मालिनची प्रतिष्ठापना करावी अशी पॅरामाऊन्टची एक सुप्त मनीषा होती.

चित्रपटसृष्टीचा इतिहास आज आपणांस सांगत आहे कीं, ग्रेटा गार्बो ज्या सर्वोच्च आसनावर अधिष्ठित होती तें आसन मालिनच्या उपस्थितीमुळें जरासुद्धां ढळलें नाहीं! मालिनला तिचा मुकुट हस्तगत करतां आला नाहीं हें खरें. परंतु तिनें आपल्या असामान्य कर्तृत्वानें तेव्हढ्याच तोलामोलाच्या दुसऱ्या अधिराज्याची स्थापना करून एक स्वतंत्र सिंहासन थाटलें. ग्रेटा गार्बो अखेरपर्यंत चित्रपट सम्राज्ञी म्हणूनच राहिली आणि यथाकाल चित्रसृष्टीमधून निवृत्त झाली. परंतु मालिननें स्थापन केलेली गादी ही गार्बोच्या साम्राज्यामधील कुणा मांडलीकाची गादी नव्हती! तें एक स्वतंत्र पीठ होतें!

स्टर्नबर्गची चित्रपद्धति रुळलेल्या चाकोरीबाहेर पडेना म्हणून मालिननें त्याचा करार रद्द करविला. यानंतर तिनें अनेक चित्रपटांत यशस्वी भूमिका केल्या, परंतु त्या सर्व चित्रांत 'हेस्ट्री राईडस् अगेन!' या चित्रानें तिच्या साऱ्या चित्रावर ताण केली. वुइटनेस फॉर प्रॉसिक्यूशन आणि जज्जमेंट न्यूरेन्बर्ग हे तिची भूमिका असलेले अलीकडचे चित्रपट नुकतेच भारतांत तुफान गाजून गेले आहेत. चार्लस् लॉटन आणि स्पेन्सर ट्रेसी या प्रतिभाशाली अभिनेत्यांच्या बरोबर तिनें वठविलेल्या भूमिका चित्र-

रसिकांच्या अनंत काळ स्मरणांत रहातील.

दुसऱ्या महायुद्धानंतर आपल्या गायनाच्या जलशांना तिनें आपल्या कलाजीवनांत प्रमुख स्थान दिलें आहे. लंडन, पॅरीस, न्युयॉर्क, रोम अशा जागतिक कीर्तीच्या शहरी होणारे तिचे कार्यक्रम 'हाऊसफुल्ल' जातात. लवकरच ऑस्ट्रेलिया, जपान आणि रशिया या देशांत तिचे कार्यक्रम होणार आहेत. मार्लिनची लोकप्रियता आणि जनमनावरील पकड आजतागायत कायम आहे.

'वेगवेगळे रुचकर' खाद्य पदार्थ स्वतः तयार करणें आणि ते मोठ्या प्रेमानें इतरांना खावयास लावणें हा मार्लिनचा खास छंद आहे. चित्रपटांत भूमिका करतांना तिच्या रंगपटाच्या बाजूस अद्यावत पद्धतीचे एक स्वयंपाक घर तयार करावें लागते हें निर्मात्यांना माहित आहे. तेथें भरपूर शिधा सामुग्री आणून ठेवावी लागते. चित्रपट कलावंत, दिग्दर्शक आणि तंत्रज्ञ या साऱ्यांना ठाऊक असते कीं शूटिंग संपल्यानंतर त्यांना उत्तमोत्तम पदार्थ चाखावयास मिळणार आहेत. 'तुमच्या आयुष्यांतील सुखाचा दिवस कोणचा?' असा प्रश्न चार्लस् लॉटनला विचारला गेला होता. त्याचें उतर प्रसिद्ध आहे. तो म्हणाला "चित्रपटांत मार्लिनला भूमिका असावी आणि त्या दिवशीं सकाळीं लंचपर्यंत तिचें काम संपलेलं असावं, दुपारी माझी लांब पल्लेदार वाक्यें असलेले शॉटस् सायंकाळपर्यंत घेतलें जावेत. माझ्या अभिनयांतील जागा 'खुमासदार' व्हाव्यात. दिग्दर्शक खुषींत असतांना मेक-अप्'चा हुकूम व्हावा आणि त्यानंतर सर्व मंडळींनीं एकत्र बसून मार्लिननें दुपारीं बनविलेल्या पक्वान्नांच्या वशा पुढें याव्यात. त्या फस्त करीत असतांना आपल्याला अनेक तोंडे किंवा अनेक जिभा फुटाव्यात असें वाटूं लागते"

आजारी माणसांची शुश्रूषा करण्यांत मार्लिन मोठी पटाईत आहे. हलुलाइ बँकहेड ही गाजलेली चित्रतारका एकदां म्हणाली, "मार्लिन जर नर्स म्हणून जवळ रहाणार असेल तर मी कोणताहि गंभीर आजार ओढवून घेण्यास आनंदानें तयार होईन!"

मनमोहक चेहऱ्याची मार्लिन आपल्या मोहक पोषाखांबद्दलहि तेव्हढीच प्रसिद्ध आहे.! अनेकरंगी बहुढंगी पोषाख करून समाजांत वावरतांना पुरुषांचीं अंतःकरणें घायाळ करून सोडणें हा एक नित्याचाच खेळ आहे. फरचा कोट आणि टोपीला फरची पिसें लावलेला ऊंची फॅशनेबल पोषाख केलेली मार्लिन नृत्यसमारंभांत आलेली पहातां क्षणींच पॅरीसमधील एका कविराजांना एकदम स्फूर्तीचा झटका आला. तो म्हणतो, "ही फर किंवा हीं पिसें तुझ्या पोषाखाचीं नव्हेत तर एकाद्या उनाड स्वच्छंदी पांखराप्रमाणें तीं तुझ्या बांधेसूद देहयष्टीमधील अंगप्रत्यंगांचाच एक मोहक पिसारा आहेत!"

गायनाच्या दौऱ्यानिमित्ति दौऱ्यांवर असतांना ती येऊन पोहोंचण्याचें अगोदर वृत्तपत्र वार्ताहर आणि छायाचित्रकार विमानतळावर हजर असतात. तिचें आगमन ही एक ताजी गरम बातमी होत असते. तिच्या व्यक्तिमत्वांतील मोहमयी जादू कांहीं क्षणांतच आपला प्रभाव गाजविते. वार्ताहरांचा नेहमींचा उद्धट ताठरपणा नाहींसा होतो. तिच्या तोंडामधील सिगारेट पेटविण्यासाठीं किंवा तिच्यासाठीं कॉफीचा ट्रे मागवितांना त्यांची आपापसांत चुरस लागते. आनंदानें बेहोष झालेल्या पुरुषांचा घोळका तिच्या भोंवतीं सतत जमा व्हावा असा तिच्या पत्रिकेंत एक भाग्यशाली शुभयोग (!) आहे कीं काय कोण जाणें! सुमारें तीन तपापूर्वी ती हॉलिवूडला आल्यापासून पुरुषांच्या घोळक्यांत सांपडली आहे. आजतागायत तिची सुटका झाली नाहीं. आपल्या सौंदर्यानें भारावून गेलेली आनंदानें वेडीपिशी झालेली पुरुषमंडळी ती सतत पहात आली आहे. म्हणून तिचें तारुण्य 'चिरतारुण्य' आहे. तिचें यौवन 'चिरयौवन' आहे. एक रसिक म्हणतो, "तिच्या नांवांतच काय जादू आहे पहा! मार्लिन् या शब्दोच्चारानें कुरवाळण्याचा आलिंगनाचा मृदु असा भास होतो तोंच पुढच्या 'डिट्रिच्' हा शब्द ऐकल्यानंतर चाबकाचा फटकारा सपकन् ओढला गेला आहे कीं काय असें वाटून दचकल्यासारखें होतें."

तिच्या बरोबरीच्या एकूणएक चित्र









तारका केव्हांच निवृत्त झाल्या असल्या तरी मार्लिनची कलासाधना अखंड सुरूं आहे. इतकेंच न्हे तर तिचा उत्साही हुरुप, बोलण्यां-चालण्यांतील तरतरी, उठण्या-बसण्याची झोकदार ऐट पहाण्यासारखी असते. गतगोष्टीची खंत करीत न बसतां आजचें कर्तव्यकर्म कुचराई न करतां मनापासून हौसेनें करीत राहिलें तर वार्धक्याच्या संध्याछाया जवळपाससुध्दां फिरकणार नाहींत असें ती म्हणते. शिस्तवद्ध कर्तव्याची शिकवणूक तिला आपल्या आईकडून बालपणींच मिळाली.

मार्लिनचे आईवडील दोघेहि जर्मन. बर्लिन शहरांत १९०४ मध्यें तिचा जन्म झाला. वडिल सैन्यांत अधिकारी म्हणून करारी आणि कठोर शिस्तीचे भोक्ते. आई रागीट स्वभावाची आणि जुन्या वळणाची. मार्लिनला मनोनिग्रहाची आणि शिस्तवद्ध वागण्याची संवय आईनें लावली. त्यामुळें आजहि कर्तव्यपालनांत कसूर, कंटाळा किंवा हयगय तिला मंजूर नाहीं ! रशियन सरहद्दीवरील युद्धांत वडिल कामीं आले. कुटुंबावर हलाखीची परिस्थिती प्राप्त झाली. छोट्या मार्लिनचें शिक्षण जेमतेम हायस्कूलपर्यंत झाल्यानंतर गायनाची थोडी आवड आणि अभ्यास म्हणून ती संगीत रंगभूमीकडे वळली. कोरस म्हणणाऱ्या मुलींत तिची भरती झाली. चित्रपटसृष्टींत प्रवेश मिळावा, म्हणून खटपट करीत असतांना तिचा सहाय्यक दिग्दर्शक रुॅडॉल्फ साईबरशीं परिचय झाला. त्याच्या मदतीनें दोन तीन कंपन्यांत वशिला लावण्यांत आला. त्याच्य खटपटीला यश मिळाले नाहीं परंतु मार्लिनशीं लग्न जमविण्यांत मात्र तो यशस्वी ठरला. गरीबींतील पण सुखाचा संसार सुरूं झाला. त्यांना एक कन्यारत्न झालें. मुलीचें नांव मोठ्या हौसेनें मारीआ असें ठेवण्यांत आलें. रंगभूमीवर आतां मार्लिनला छोट्या दुय्यम भूमिका मिळूं लागल्या होत्या. याच सुमारास दिग्दर्शक स्टर्नबर्गनें तिला आपल्या 'ब्ल्यू एंजेल' या चित्रपटामधून प्रसिद्धीस आणलें. हॉलिवूडला आल्यानंतर मार्लिन पतिपत्नी आपल्या अपत्यासह मोठ्या प्रशस्त बंगल्यांत इतमामानें राहूं लागले. परंतु पुढें ती एक आंतरराष्ट्रीय कीर्तीची चित्रतारका झाल्यानंतर बिचारा साईबर हॉलिवूडला रामराम ठोकून एकटा कॅलिफोर्निआ येथें आला. एक छानदार शेत त्यांनें विकत घेतले आणि शेतकरी म्हणून तो स्थाईक झाला. आजतागायत तो तिथेंच आहे. गेलीं तीस वर्षें दोघेजण आपापला व्यवसाय सांभाळीत वेगवेगळ्या ठिकाणीं रहातात. परंतु त्यांचें प्रेम कायम आहे. मार्लिन इतकी लौकिकवान चित्रतारका झाली याचें त्याला वैषम्य वाटत नाहीं. वर्षांतून कांहीं दिवस ती नियमानें त्याचेकडे जाते. आपल्या मुलीच्या शिक्षणाची सारी जबाबदारी मार्लिननें उत्तम प्रकारें पार पाडली. मुलीनें वुइल्यिअम राईव्हा या इंजिनिअरशीं लग्न लावलें असून त्यांना तीन अपत्यें आहेत. मार्लिन आपल्या जांवयाच्या घरीं नेहमी भेट देते. नातवंडांना खेळवितांना अगदीं दंग होऊन जाते. मार्लिनच्या न्यूयॉर्कच्या मोठ्या फ्लॉटमध्यें परिचित मंडळींना एक खेळ हमखास पहावा लागतो. तिच्या नातवंडांच्या छायाचित्रांचें प्रदर्शन आणि त्यांनीं केलेल्या नव्या नव्या खोड्यांचें कौतुक!

तिची मुलगी आणि जांवई एकदां रात्रींचे नाटक पहाण्यास जाणार होते. त्यांना त्यांचा बेत रद्द करावा लागणार अशी वेळ आली. कारण मुलांना सांभाळणारी रात्रींची दाई आली नव्हती. इतक्यांत मार्लिन अचानक येऊन उभी राहिली. मुलें आपण सांभाळूं तुम्ही खुशाल आनंदानें मजा करा जा असें आग्रहानें सांगून तिनें त्या दोघांना पिटाळून लावलें. नातवंडें खुषींत आली. मार्लिन स्वयंपाकघरांत शिरली. मुलांच्या जेवणाचा आणि गोष्टी ऐकण्याचा थाट कांहीं और तऱ्हेनें साजरा झाला. रात्रीं तीन साडेतीनला नाटकाला गेलेले जोडपें मोठें खुशालून घरीं परतलें. हॉलचा दरवाजा उघडल्यानंतर त्यांना एक मनोहर दृश्य दिसलें. कोंचावरती दोन लहान मुलें झोपलेलीं आहेत. बाजूस गोष्टींच्या पुस्तकांचा आणि खेळण्यांचा ढीग पडलेला आहे. बाजूच्या कोंचावर मार्लिन आडवी होऊन गाढ झोपीं गेलेली आहे. तिच्या मांडीवर सर्वांत 'लहानगें' झोपलें आहे. झोपी गेलेल्या त्या अजाण लहान मुलाच्या चेहऱ्यावर तृप्तीचा आनंद विलसत आहे. नातवाच्या चेहऱ्यावर जें समाधान दिसत होतें तेंच समाधान आजीच्या चेहऱ्यावर दिसत होतें

ही मनाची शांति तिनें कशी साध्य केली ? वार्ताहरानें तिला एकदां प्रश्न केला होता, "तुमच्या यशाचें रहस्य ?" मार्लिन म्हणाली, "कलाव्यवसायावर निरतिशय श्रध्दा, शिस्त आणि कठोर कर्तव्यपालन ! " •••



## झुलतें आश्वासन !

अनलंकृत अन् विमुक्तकेशा
रात्र विस्मयें उभी
पडला वारा निमूट तारा
साखलेलें नभीं
रातकिडयांची कुजबुज काळी
थर्र कांपतें उरीं
किती सांवल्या दाटूनी येती
जडशिळ माथ्यावरी
दूरावरती कोठें सळसळ
जून खुणांच्या परी
पायाखालीं स्तब्ध जाहली
सरसर रक्तांतली
पल्याड कोठे,—धुक्यापलिकडे
जें मिटुनी गेले
तें गवसावें म्हणून डोळे
आज इथें ओले
घट्ट दुमडते ओठ कोठल्या
शिवले शपथेनें
रुद्ध जाहला गळा कोठल्या
अनवट गाण्यानें ?
तरीहि एका तंतूभवतीं
कधीं कधी रिंगण—
'पुन्हां एकदां येइन'चें तें
झुलतें आश्वासन !

—पद्मा लोकूर









अनुक्रमणिका










ठरलेल्या संकेताप्रमाणें त्याचं पत्र आलं. प्रत्येक शब्द जणुं त्याच्या ओठांत भिजलेला! त्याच्या भेटीचीं स्वप्नं पाहतांना तिचं मन पिसासारखं तरगूं लागलं. —आणि मग तिनें तें दुसरं पत्र वाचायला घेतलं.




—सौ. विजया राजाध्यक्ष

आज बुधवार—त्याचें पत्र येण्याचा दिवस. सकाळीं मळभ आलेल्या आभाळाकडे पाहतां पाहतां हा विचार तिच्या मनांत आला; आणि आभाळाची कळा क्षणार्धांत पालटून गेली. वाटलें, आभाळांतील निळ्या रंगाची धार अवघ्या दिवसावर सांडूं लागली आहे...मन त्या स्वप्नवत् निळाईंत बुडून गेलें; समोरच्या झाडावर बसलेल्या इवल्याशा चिमणीच्या पंखांतील रंगरंग डोळ्यांनीं टिपले; कोंवळ्या उन्हाची भारावलेली, तृप्त चाल उमगली; वातावरणांतील स्वरांचा वेध घेतां आला—त्यांच्या नसांतून जणुं कवितेंतील शब्द वाहूं लागले. आणि मग आठवलें त्याच्या पत्रांतील शब्द! पातळ, बिनरंगी कागद, त्याची एका विशिष्ट प्रकारानें केलेली घडी. ती घडी हळुवारपणें उलगडतांना हात थरथरायचा. घाई केली तर तें पत्र चुरगळेल अशी जणुं धास्ती वाटे! फिक्या शाईंतील वळसेदार हस्ताक्षर. मात्रा आणि वेलांट्या एकमेकींत मिसळून गेलेल्या. अक्षर सुरुवातीला टपोरें—आणि अखेर बारीक होत गेलेलें—जणुं सुरुवातीला जरा दूर राहून बोलणारा आणि हळुंहळुं आपल्या जवळ येणारा, आपल्याला बिलगणारा तो...आधीं संभावित, मग खरा...नसते हट्ट करणारा. मायना साधाच. सुरुवातीचा मजकूरहि कधीं कधीं तेवढाच साधा. पण अखेरचा परिच्छेद!...निदान एखादी—दुसरी ओळ. त्यांतील शब्द तिला जणुं स्पर्श करीत. स्मरणांतील स्पर्शसुगंधाला उकळी फुटे. अंग गरम होऊन जाई. दिवसाच्या उरलेल्या प्रहरांत, रात्रीं, स्वप्नांत त्याच ओळींचा पाठलाग...त्या ओळींत घोळवलेली एखादी पूर्वींची आठवण, नंतरच्या मीलनाचें एखादें स्वप्न, अशा क्षणीं एक सुंदर आकार धारण करी. त्या आठवणीला, त्या स्वप्नाला जणुं दोन शरीरें फुटत. त्या शरिरांच्या शृंगारांत रात्र कणाकणानें सरून जाई. मग दुसरे दिवशीं हा अनुभव लाडिक, मधाळ शब्दांत सांगणारें उत्तर...आणि पुढें चार पांच दिवस कसे उजाड वाटत! त्याच्या मागील पत्रांतील शब्दांखेरीज कशाचीहि सोबत नसलेले; अवघ्या आयुष्यापासून खुडून बाजूला टाकलेले...अधांतरी हेलकावत राहिलेलें...तो दूर जाऊन आतां सहा महिने होत आले होते. गेला, तोहि पुरा न भेटतां...तेव्हांपासून तिच्या आयुष्यावर ही तृप्तीची आणि विरहाची ऊनसांवली रेंगाळत होती. अंगें अधीर झाली होतीं. कधींतरी हे शब्द सरणार होते; शब्दांपोटीं सांठविलेले स्पर्शाचे ते धुंद निःश्वास—ते कधींतरी दरवळणार होते. कधीं?

—हा प्रश्न तिनें त्याला किती वेळां विचारला असेल!

"किती दिवस रे अशी नुसती पत्रापत्री?"

"आणखी कांहीं दिवस."

"कां पण?"

"माझं हें पीएच्. डी. चं काम पूर्ण








होईपर्यंत. . .त्यानंतर माझीच आहेस ना तूं?"

"त्यानंतर माझीच आहेस ना तूं" हे शब्द पडसादांसारखे तिच्या आयुष्यांत पुन्हां पुन्हां निनादत राहिले होते. शब्द विरले–पण स्वर उरले. ते स्वर आणि त्यांतून वाहणारें मीलनोत्सुक संगीत–

आज कानांना तेंच संगीत ऐकूं येत होतें. नुकते नऊ वाजले होते. त्याचें पत्र बारा-साडेबाराच्या सुमारास येई. मधले तीनचार तास ती कोणाचीच नसे. हरवलेली–कांहीं ना कांहीं करत असूनहि हरवलेली. पत्राच्या अपेक्षेची हुरहूर–आणि मधूनच सलणारी शंका–पत्र आलेंच नाहीं तर? मागें तीन चारदां असें झालें होतें, आणि मग उरलेला दिवस कसा रखरखीत भासला होता! नाना शंका, जरासा रागहि–जिवाची नुसती घालमेल! संध्याकाळीं मरगळल्यासारखें पडून राहायचें, रात्रीं डोळे मिटण्याचा यत्न करायचा. . .कसला जीवघेणा अनुभव! आज असें कांहीं होणार नाहीं ना? ती उगाचच अस्वस्थ झाली. खिडकीबाहेर पुन्हां पुन्हां डोकावूं लागली. तिचें पत्र देण्यासाठीं पोस्टमनला तिच्या घरापर्यंत यावेंच लागत नसे. तो दूरवर दिसला कीं, तीच त्याच्यापाशीं धांवत जात असे, आणि पत्र त्याच्या हातांतून जवळजवळ हिसकावून घेत असे. तें मध्यम आकाराचें, लांबट पाकीट. पूर्वजन्मीच्या कमाईसारखें तें हातीं धरून, ती घरांत शिरत असे.

–बारा वाजून गेले, आणि पोस्टमन नेहमीं-प्रमाणें तिच्या घराच्या दिशेनें येतांना दिसला. ती लगबगीनें निघाली. पायांत चपला सरकविण्याचेंहि भान राहिलें नाहीं. पायांना बसणारे चटके जाणवत नव्हते; शक्य तेवढ्या लवकर पोस्टमनजवळ पोंचायचें होतें.

"माझं पत्र आहे ना?" तिनें अधीरपणें पोस्टमनला विचारलें.

"हो." असें म्हणून त्यानें तिच्या हातीं दोन पाकिटें दिलीं. त्यापैकीं एक त्याचेंच. लगबगीनें लिहिलेला पत्ता. . .तिचें नांव मात्र कोरल्यासारखें लिहिलेलें. त्या नांवावर जणुं त्याच्या ओठांचा ठसा तरळत होता. . .आणि हें दुसरें पाकीट कोणाचें?–तेंहि तिच्याच नांवचें? अनोळखी हस्ताक्षर. . .ती संभ्रमांत पडली. पण आधीं त्याचें पत्र वाचायचें होतें. . . .मग सावकाशीनें हें अनोळखी पत्र. कोणाचें कां असेना!

—त्याचें पत्र किती गोड होतें!–नेहमीं येणाऱ्या पत्रांहून गोड. प्रत्येक शब्द जणुं त्याच्या ओठांत भिजलेला. तिनें तें पत्र कितीतरी वेळां वाचलें. मजकूर जवळजवळ पाठ झाला. तो लवकरच येणार होता–तिला भेटण्यासाठीं. त्या भेटीचीं स्वप्नें पाहतांना मन पिसासारखें तरंगूं लागलें. . .इतक्यांत आठवलें, दुसरें पत्र अजून वाचायचें आहे!

तिनें दुसरें पत्र जरा घाईनें उघडलें. कोणाचें असेल? कागद, शाई, अक्षर–कांहींच ओळखीचें वाटेना. मजकूर वाचण्याआधींच तिनें सही पाहिली. . . सुधाकर तांबे. कोण हा ?. . .दुसऱ्याच क्षणीं ओळख पटली, चेहराहि डोळ्यासमोर आला. उंचपुरा, चष्मा लावणारा. तिच्या एका मैत्रिणीबरोबर तो आला होता. तिला ती संध्याकाळ स्वच्छपणें आठवली–पंधरावीस दिवसच झाले असतील. किंचित् गडद झालेल्या अंधारांत ती एकटीच बसली होती. हातांत त्याचें त्याच दिवशीं आलेलें पत्र होतें. आठवणी त्याच्या भोंवतीच पिंगा घालत होत्या. पत्रांतील शब्दन् शब्द चघळत ती बसून राहिली होती. आभाळांत चंद्रबिंब उगवलें. भोंवतीचा अंधार जरा फिका झाला. तिला याचें भान होतें. . .नव्हतें.

अशा वेळीं तिची मैत्रिण आली–आणि बरोबर हा सुधाकर तांबे. खूप मनमोकळा वाटला तो. जुनी ओळख असल्यासारखा बोलत होता. तऱ्हेतऱ्हेचे विषय निघाले. तास कसा निघून गेला हें समजलेंहि नाहीं. त्या हंसण्याबोलण्यानें तिला बरें वाटलें. त्या दोघांना पोंचविण्यासाठीं ती त्यांच्याबरोबर कांहीं अंतर गेली. . .आणि प्रसन्न मनानें त्यांना निरोप देऊन परत निघाली. पायाखालची वाट धड दिसत नव्हती. तो ओळखीचा परिसर काळोखांत बुडला होता. सगळें अंधुक, अंधारानें सारवलेलें. . .सुधाकरच्या रोखलेल्या नजरेची आठवण मात्र उगाचच चाळवत होती. . .पण ती मनापर्यंत पोंचत नव्हती. मध्यें तो उभा होता–तो, त्याच्या भेटी, त्याचीं पत्रें. . .तिला सहजच वाटलें होतें, त्याच्यावर आपलें प्रेम नसतें, तर सुधाकरचा आपण इतका कमी विचार केला असता कां?–आणि येथेंच सगळें थांबलें होतें. सुधाकरची धूसर आठवणहि बुजून गेली होती. आणि आज त्याचें पत्र–

ती वाक्यामागून वाक्यें वाचत होती, आणि अस्वस्थ होत होती. त्या संध्याकाळीं बोललेले शब्द, तिनें नेसलेल्या साडीचा रंग, तिच्या हातांतील बांगड्यांची किणकिण–सुधाकर कांहींच विसरला नव्हता. त्या आठवणींचें आवर्त पत्रांतून भिरभिरत होतें तुटक वाक्यें–सूरहि जरा चमत्कारिकच. स्पष्ट प्रेमयाचना नाहीं, उत्तराचीहि मागणी नाहीं. . .फक्त झपाटलेले शब्द. काय अर्थ लावायचा त्यांचा? तिला राग येईना–आणि बरेंहि वाटेना. बरें कसें वाटणार? आतां त्याच्याखेरीज कोणीहि नको होतें. कोणाचें आकर्षण नको, कोणाची जवळीक नको. . .

–आणि तरीहि तें पत्र तिच्या हातांत येऊन पडलें होतें. कां?–तिच्या मनांत किंचित् चिडखोर प्रश्न उमटला. कां हें विनाकारण वादळ? कां हें माझ्या प्रियकरापासून कांहीं क्षण दूर सरकणें? कां हें अपेक्षा नसलेलें प्रेम. . . .? कदाचित् वर्षापूर्वीं याहून कांहीं वेगळें वाटलें असतेंहि. सुखावलें असतें. . . एका उमद्या, सुस्थितींतील तरुणानें आपल्याबद्दल आकर्षण व्यक्त करावें ही भावना त्यावेळीं इतकी नकोशी वाटली नसती. .आतां मात्र इतर कोणतेंहि प्रलोभन उरलें नव्हतें. फक्त तो हवा होता. . .

तिला त्याच्या सहवासांतील कित्येक धुंद क्षण आठवले. तीं वेडी प्रश्नोत्तरें. . ...

"तुला मी इतकी कां आवडते रे?"

याला उत्तर एका स्पर्शाचें.

"माझ्याइतके इतर कोणीहि आवडत नाहीं?"

"अं ऽ हं. . ."

"खरं. . .?"

"अगदीं खरं?"

–एका पाऊलवाटेवर, फिक्या चांदण्यांत झालेला हा संवाद. ती म्हणाली होती, "या चांदण्याइतकीच नितळ आहे बघ. मी. फक्त तुझा प्रकाश पिऊन लुकलुकत राहिलेली. . .आयुष्य असं स्वच्छ राहावं. नाहीं रे?"

त्यानें फक्त हुंकार दिला होता.

–तिला वाटलें, या पत्रामुळें आयुष्य तेवढें स्वच्छ राहिलेलें नाहीं. माझा काय अपराध?–पण तरीहि लहानसें छिद्र निर्माण झालेंच ना?...कधींकधीं छिद्रेंहि आयुष्य पोखरतात. विचारासरशीं ती दचकली. असें कांहीं व्हायला नको होतें. किती साधें होतें हें सगळें! त्याला इतकें गंभीर स्वरुप यायला नको होतें. कशाला हें हलक्याशा रहस्याचें ओझें? तिच्या कोंवळ्या मनाला तें पेलवेना...त्या रहस्याचा वाढत चाललेला आकार पाहवेना–ती उन्मळली–एका सलग, सुंदर आयुष्याला अचानकपणें तडा गेल्यासारखी. काय करूं या पत्राचें? फाडून टाकूं? – फाडायचें तर आहेच. पण रहस्यें अशी फाडून, गाडून लोपतात कां?– निदान कुणकुण उरतेच...इतर कोणाला ठाऊक नसलें तरी मनापासून कसें लपवायचें?...त्याच्यावरोबरच्या संसारांत असली कोणतीहि टोंचणी नको होती. कसा तळ दिसणाऱ्या पाण्यासारखा संसार हवा–वाहता, निर्भर...काय करूं या पत्राचें?

–आणि वीज चमकावी, तशी एक कल्पना सुचली. तें पत्र त्याच्याकडे पाठवून द्यायचें. ती क्षणार्धांत निश्चित झाली. त्या पत्राला पंख फुटून तें त्याच्याकडे उडत जातांना तिनें पाहिलें. काय वाटेल त्याला? राग येईल? आपल्याबद्दल त्याचा गैरसमज होईल?–शक्यच नाहीं. असा विपर्यास करणाऱ्यांपैकीं, मत्सरी नाहींच तो–आपली चेष्टाहि करेल... "वघ, चांगली मागणी आली आहे. कां नाहीं विचारांत घेत?" –खट्याळ! कदाचित् स्वतःबद्दल अभिमानहि वाटेल–एक इतरांचे लक्ष वेधून घेणारी मुलगी आपल्यावर प्रेम करते...आणि आपल्याबद्दलचें त्याचें प्रेम तर निश्चितच वाढेल–आपल्यापासून कांहींहि न लपवून ठेवणारी, आपली निर्मळ मनाची, निर्मळ भूतकाळ असलेली प्रेयसी...

तें पत्र त्याच्याकडे पाठवायचें या कल्पनेभोंवतीं अनेक वलयें उठलीं–आणि मिटलीं. तिचा अवघा भूतकाळ ती त्याच्या स्वाधीन करणार होती–त्यांत नुकत्याच निर्माण झालेल्या एका किल्मिषासकट. असें करण्याच्या कल्पनेनेंच ती थरारून गेली होती. भूतकाळ स्वतःपाशींच ठेवला तर त्याची एक कारा तयार होते. तिच्यांतून बाहेरच पडतां येत नाहीं...अंतर वाढतें. असें कांहीं व्हायला नको! प्रत्येक पाऊल त्याच्या बरोबरीनें उचलण्याची, त्याची गति पकडण्याची हिंमत असूं दे–वाटेवर भूतकाळाचे कांटे नकोत, त्यानें रक्तबंबाळ होणें नको. असला एखादा इवलासा सलहि नको!

–तिनें त्याला लिहिलें होतें, "हें पत्र तुझ्याकडेच राहूं दे. तूं तें ठेवून दे–फाडून टाक; काय वाटेल तें कर. मी तुझी आहे–अगदी तुझी आहे. मला तुझ्याखेरीज अस्तित्व नाहीं. या पत्राला त्या अस्तित्वाचा एखादा तरी अंश हिरावून घेण्याचा काय अधिकार?"

–आतां–सगळी घडघड सपली होती. सर्वस्व त्याच्यांत विलीन केल्याचा भाव एखाद्या अंकुरासारखा तरारला होता!

पुढें चारपांच दिवसांनीं त्याचें पत्र आलें. दूसरें पत्र वाचून गंमत वाटल्याचें त्यानें लिहिलें होतें – आणि तें दुसरें पत्र, परत पाठवलें होतें! •••

देशासाठीं जो देई रक्त
तोच खरा मातृभक्त




जयवंत
दळवी

लोकलमधून, बसेसमधून, व्हिक्टोरियांतून, टॅक्सीमधून, क्वचित प्रसंगीं स्कूटर वा मोटार सायकलीवरूनही आपण मुंबईत खूप हिंडला असाल. पण मुंबईच्या 'धांवत्या' जीवनांत - थांबून थबकून कांहीं "जीवन" पाहणं तुम्हांला जमलं असेलच असें नाहीं. —आतां जयवंत दळवींच्या या "दुर्बिणी"तून तें अगदीं सावकाशीनें, रस घेऊन पहा !

मोरू आतां आपण थोडा चहा घेऊं आणि फेरफटका मारून येऊं! गेले चार दिवस आपण हिंडून मुंबई पाहतों आहों. त्यावरून तुला मुंबईची वरीचशी ओळख झाली असेलच! मुंबईत दिवसभर गडबड चालू असते, येथें क्षणाची शांतता कुणाला मिळत नाही असें जें तूं काल म्हणालास तें अगदीं खरें आहे ! गडबड गडबड करीत रहाणें हा आमचा जन्मजातच गुण आहे !

ती पहा, मोरू, ती पहा ! चहा करण्याच्या निमित्तानें आमची ही स्टोव्हशीं कशी भांडते आहे ! अरे, स्टोव्ह हा पुल्लींगी आहे म्हणून काय त्याच्याशीं असें भांडायचें ? स्टोव्हला पंप मारायचा म्हणजे अख्खा स्टोव्ह मागें पुढें घसरला पाहिजे असें थोडेंच आहे ? पण त्यांत तिचाहि दोष नाहीं. दोन कप चहा करण्याचा प्रश्न असो किंवा दुसरा कसला प्रश्न असो, आम्हाला थंडपणानें असें कांहींच करतां येत नाहीं.

घेतलास ना चहा ? मग चल आतां. थोडें फिरून येऊं.

आपण आतां कसें जायचें ? टॅक्सीनें, घोडागाडीनें, बसनें कीं ट्रेननें ? मला वाटतें, आपण पायींच जाऊं ? कसें ? कारण टॅक्सींत बसलों तर मीटरकडे लक्ष जाते. घोडागाडीला सर्वच रस्त्यानें जातां येत नाहीं. बसनें जायचें म्हटलें तर रांगेंत थांबायला पाहिजे, आणि ट्रेननें गेलों तर कांहींच पहातां येणार नाहीं ! त्यापेक्षां पदयात्राच केलेली बरी. येथें पदयात्रा फार पॉप्युलर आहे. खर्चाच्या दृष्टीनें आम्हांला दुसऱ्या कुठल्या यात्रा परवडत नाहींत! आमच्या सवयींच्या अशा दोनच यात्रा - एक पदयात्रा आणि दुसरी प्रेतयात्रा !

तेव्हां आपण पदयात्राच काढलेली बरी !

मोरू, या पहा आमच्या चाळी ! मुंबईत गडबड गोंधळ फार आहे असें तूं म्हणतोस तो गोंधळ येथून सुरूं होतो. जगांतली सर्वांत उंच अशी एकशेंदोन मजल्याची इमारत न्यूयॉर्क-मध्यें आहे. पण त्या इमारतींत एकूण जेवढे लोक रहात नसतील तेवढे येथील चार मजल्यांच्या चाळींत रहातात. ही गोष्ट तूं ध्यानीं घेतलीस तर अमेरिकेच्या मानानें मुंबई किती पुढें गेली आहे हें तुझ्या ध्यानांत येईल. येथें मलबारहिलवरील बंगल्यांत रहाणारे जसे थोडे लोक आहेत तसे फूटपाथवर झोंपणारेहि खूप लोक आहेत. तथापि बहुसंख्य मुंबईकर हे चाळींत रहातात. मुंबईची लोकसंख्या गेल्या कांहीं वर्षांत झपाट्यानें वाढली. त्या प्रमाणांत नव्या इमारती वाढल्या नाहींत. पण या चाळीनींच सर्वांना आश्रय दिला आहे. या चाळींत जागेचा असा प्रश्न नसतो. जे जे कोणी नवे येतील त्यांना सामावून घेण्याची वृत्ती या चाळींत आहे.

मुंबईत चाळीसारखें दुसरें प्रेक्षणीय स्थळ नाहीं. वारकरी, टाळकरी, माळकरी असे अनेक पंथ महाराष्ट्रांत असले तरी मुंबईत खरे महत्वाचे चाळकरीच ! या चाळींत एक किंवा दोन खोल्यांचा गाळा असतो. त्यांत एक दोन किंवा कधीं कधीं चार चार कुटुंबें 'नांदूं सुखें संगतीनें' या चालीवर नांदतात. कधीं कधीं त्यांना बिऱ्हाडाची हौस असली तर ती सुद्धां येथेंच पार पडते. फक्त तेवढे स्टोव्ह ठेवले जातात. ट्रंका, गादीच्या वळकट्या, पाहुणे वगैरे सारें स्थावर आणि जंगम याच दीड खणांत असतें. भींतीवर अनेक कॅलेंडरें, फोटो, पचांगें, केरसुण्या आणि देवांचे फोटोहि असतात. त्याच देवादिकांच्या खालीं चक्क मासळी सुद्धां तळली जाते. धूपाऐवजीं देवाला मासळीचाच

वास अधिक घ्यावा लागतो. (देवानें मत्स्यावतार घेतला म्हणून त्याला ही शिक्षा असेल!)

मोरू, तुला येथें भल्या पहांटे कधीं जाग आली तर आसपासच्या असंख्य विन्हाडांतून तुला घडयाळाचें गजर ऐकूं येतील. पहांटे लवकर उठण्यासाठीं रात्रीं झोपतांना येथें गजर लावून ठेवण्याची प्रथा आहे. पण बहुवा गजर वाजून वाजून आपोआप बंद होतो आणि बहुतेक जण ठरल्या वेळेपेक्षां उशीरां उठतात. आणि तिथपासून जी गडबड सुरू होते आणि उशीर झाला म्हणून जो तोंडाचा गजर सुरू होतो तो थेट रात्रीं झोपेपर्यंत! अनेकदां रात्रीं झोंपल्यावर सुद्धां गजर थांबत नाहीं. कारण अनेकांना झोंपेंत बडबडण्याची संवय असते.

सकाळीं उठून पहावें तर नळ गेलेला असतो. मोरू ? आम्ही नळ गेलेला असतो असें केवळ संवयीनें म्हणतों हें तूं लक्षांत ठेव. कारण, खरे म्हणजे नळ आलेला नसतो. जो आलाच नाहीं तो जाईल कसा ? नळाकडे अशी वासलात लागल्यानंतर आम्ही संडासाकडे धांव घेतो. येथें धांव घेतो हा शब्दप्रयोग तूं लक्षांत घे. कारण येथें धांवण्याची संवय म्हणून नव्हे, तर केवळ आंतरिक क्रियेमुळेंच संडासाकडे धांवावें लागतें. अशा वेळीं संडासाचे दार उघडे सांपडलें तर पाप्याला स्वर्गाचें दार उघडे सांपडावें तसा आम्हांला आनंद होतो. वास्तविक नरकांत पाय ठेवूनहि स्वर्गांत शिरल्याचा आनंद व्हावा यांत मुंबईच्या जीवनाचें रहस्य दडलेलें नाहीं काय ?

मोरू, आमच्या चाळीचे संडास घाणेरडे असतात असें म्हणतात. आणि तें खरेहि आहे. जें आहे तें आपण उघडपणें सांगावें. सत्य लपवण्यांत काय बरें अर्थ ? संडास, मुत्र्या, मोऱ्या हीं स्थळें कोठें स्वच्छ असतात ? आणि तीं स्थळें स्वच्छ असून उपयोग काय ? जेव्हां अशीं कांहीं स्थळें स्वच्छ असतात असें म्हटलें जातें तेव्हां आम्हांला तरी त्याचा अर्थच कळत नाहीं. जेथें बोलून चालून घाणच करायची तेथें स्वच्छता असेल कशी ? आमचा एक मेहुणा एकदां (आपल्या मित्राबरोबर) ताज महाल-हॉटेलांत गेला होता. हें मुंबईचें मोठें हॉटेल. तेथें लघवीला लागूनहि तो मुत्रींतून हात-हालवीत परत आला. एवढी स्वच्छ मुतारी घाण करणें त्याच्या जिवावर आलें. अशा स्वच्छ मुताऱ्या काय बरें कामाच्या ? त्या मानानें आमच्या चाळींतलीं तीं घाणेरडीं स्थळें फार उत्तम ! निदान आपण तीं आणखी घाण करीत आहों असें तरी वाटत नाहीं.



तथापि अशीं स्थळेंहि शक्यतों कलात्मक सौंदर्यानें नटलेलीं असावींत म्हणून आमचे कांहीं चाळकरी कलावंत संडासांत खडूनें वेगवेगळीं चित्रें काढून ठेवतात. तीं चित्रें अश्लील असतात अशी कांहीं 'सभ्य' लोकांची टीका असते. या चाळी कोणत्या काळांत बांधल्या गेल्या याचा ऐतिहासिक पुरावा उपलब्ध नाहीं म्हणून ! नाहीं तर हींच चित्रें पाहून वेरूळचीं आणि खजुराहोचीं लेणीं कोरलीं गेलीं असेंहि सिद्ध करतां आलें असतें ! चित्रकलेंत सांप्रत अनेक संप्रदाय निर्माण झाले आहेत. पण या चाळकरी चित्रकलेचा कोठें उल्लेख होत नाहीं याचें राहून राहून वाईट वाटतें.

मोरू ! ही पहा आमची महानगरपालिकेची कचेरी. नगरपालिकेचा आणि चाळीचा संबंध फार घनिष्ट आहे. या नगरपालिकेंत निवडून जाणारे सभासद चाळींत राहणारेच असतात असें नाहीं. तथापि बहुतांशीं चाळींत रहाणाऱ्या लोकांच्या मतांवरच ते निवडून येतात. त्यामुळें चाळीचें प्रतिबिंब नगरपालिकेंत पडावें अशी त्यांची धडपड असते. नळावर जसे चाळकरी भांडतात तसे सभासद सभागृहांत भांडतात. एकानें नळाला लावलेलें भांडे लोटून जसें

दुसरा आपलें भांडें पुढें सरकवतो, त्याप्रमाणें एका ,सभासदाच्या हातांतला मायक्रोफोन दुसरा सभासद ओढतो, आणि भाषण करतो. संडासांत आधीं कोणी जावें यावर जसे चाळकरी भांडतात तसे ठरावावर आधीं कोणी बोलावें यावर सभासद भांडतात. चाळींत अशीं भांडणें चालू असतानां इतर खोल्यांतले चाळकरी जसे स्वस्थ झोंपून असतात तसेंच सभागृहांत भांडणें अगर भाषणें चालूं असतांना इतर सभासद झोंपूं शकतात. अशा रीतीनें आपल्या मतदारांना खूष करण्यासाठीं तनमनानें (धनानें नव्हे!) नगरपिते झटत असतात.

महानगरपालिकेच्या कचेरीची ही इमारत पहा. कशी जुन्या चाळीसारखी दिसते नाहीं? ही कचेरी तूं बाहेरूनच पहा. मागाहून एक मोठी चाळ मी तुला आंतून दाखवणारच आहे. त्यामुळें एकाच फेरींत चाळ आणि नगरपालिका एकदम पाहिल्यासारखें होईल. नगरपालिकेंत काम करणारे सारे कारकून चाळींत रहातात. त्याचाहि नगरपालिकेवर मोठा परिणाम झाला आहे. हे कारकून घरी असतात तेव्हां कचेरींत असल्यासारखें दिसतात. आणि कचेरींत असतात तेव्हां चाळींत असल्यासारखे दिसतात.

मोरू! हें पहा इराण्याचें हॉटेल! मुंबईतल्या प्रत्येक कोपऱ्यावर तुला इराण्याचें हॉटेल दिसेल. प्रत्येक कॉर्नरवर इराणी असल्यामुळें मुंबईला इराण्यांनीं 'कॉर्नर' केलें आहे असें विनोदानें म्हटलें जातें. गेल्या कांहीं वर्षांत मुंबईचीं अनेक हॉटेलें आलिशान झालीं आहेत. पण इराण्यांनीं सुधारणेच्या आहारीं न जातां आपली जुनी परंपरा टिकवली आहे. या हॉटेलांत येण्याजाण्यासाठीं चार चार दरवाजे असतात. येथें अनेक खाद्यपदार्थ आणि इतर गरजेच्या वस्तु मिळतात. तथापि चहा हें इराण्याचें एकमेव आकर्षण. 'पावणा' म्हटलें कीं पुरें! पाण्याचा ग्लास (मोफत) आणि चहाचा कप पुढ्यांत. याहि चहानं आणखी 'पाणी कप' असा एक प्रकार असतो. त्याचा अर्थ अर्क कमी आणि दूध जास्त. किंमत एक आणा. 'एक पावणा और चार खाली बशी' अशी भरघोस ऑर्डर देऊन एक आण्यांत पांच लोकांना पंख्याखालीं तासभर खाजगी गप्पा करतां येतात.

मुंबईंत अधिकृतरीत्या दारूबंदी असली तरी आसपास कुठकुठल्या खोलींत मद्यपान चालू आहे तें इराणी जाणून असतो. कारण त्याचाच पोऱ्या सोडा पुरवतो. पण कधींहि हा इराणी पोलिसांना सामील होणार नाहीं.

रात्रीं या इराण्याकडे बरीच वर्दळ असते. सट्टा, आंकडे, कॉटन, वगैरे अनेक जुगारांच्या तो केंद्रस्थानीं असतो. गुपचूप पैशाची देवाणघेवाण चालूं असते. इतकी गुपचूप कीं, मुंबईच्या अर्थव्यवहारांत या इराण्याला मिळावें तसें स्थान कधींच दिलें जात नाहीं.

एवढ्या अनेक गोष्टी या इराण्याच्या हॉटेलांत चालू असूनहि गल्ल्यावर बसलेला इराणी योगमुद्रा धारण करून ध्यानस्थ झालेला असतो. त्याच्या इतका तटस्थ वृत्तीचा माणूस अन्यथ कोठें सांपडणार नाहीं. भारताला खरेंखुरें तटस्थतेचें धोरण स्वीकारायचें असेल तर या इराण्याचेंच तीर्थ घेतलें पाहिजे असें मला तरी प्रामाणिकपणें म्हणावेंसें वाटतें!

मोरू! चाळी, नगरपालिका आणि इराणी हॉटेलें एवढीं तीन प्रेक्षणीय स्थळें पाहून झालीं कीं अर्धी अधिक मुंबई पाहिल्याचें श्रेय पदरांत पडतें.

☆ ☆ ☆

मोरू, असा आश्चर्यचकीत होऊं नकोस! लोकांचा हा लोंढा लोकलगाडीच्या स्टेशनाकडे धांवतो आहे. हे लोक धांवले नाहींत तर त्यांची गाडी चुकेल. येथें प्रत्येक गोष्टीसाठीं धांवावें लागतें. दुधासाठीं, पावासाठीं, भाजीसाठीं, गाडीसाठीं, आणि आतां दिवे पाहून रस्ता ओलांडण्यासाठीं येथील लोकांना सारखें धांवावें लागतें. मुंबईचा हा गुणच आहे! मुंबईत धांवला तो मेला. खुंटासारखें उभें राहणें मुंबईकरांना परवडत नाहीं. जो थंड उभा रहातो त्याला "असा काय खुंटासारखा उभा राहिला आहेस?" असें विचारण्याची प्रथा आहे. पण मुंबईंत कोणी कोणास हा प्रश्न विचारीत नाहीं. कारण मुंबईंत तसा कोणी उभाच रहात नाहीं. आणि राहिलाच तर त्याच्या अंगावर कुत्र्यानें तंगडी वर केलीच म्हणून समजा!

मोरू, तुला आश्चर्य वाटेल, पण मुंबईत खुंट सुद्धां वर्षेनुवर्षे एका जागेवर कधीं

सांपडायचा नाहीं. दिव्याचा खांब! तो स्थिर रहायला काय हरकत आहे? पण नाहीं, आज दिवा येथें तर उद्यां तेथें! म्युनिसिपालिटीची निवडणूक झाली कीं नवे नगरपिते जुने दिवे हालवून आपल्या घरासमोर आणण्याचा नेहमींच प्रयत्न करतात.

रस्त्याच्या नांवांचे खांब! पुढारी मेला कीं रस्त्याला त्याचें नांव देण्याची येथें प्रथा असल्यामुळें दर मतिकाला रस्त्याला नवें नांव द्यावें लागते. त्यामुळें साहजिकच जुने खुंट हालवावे लागतात.

आमचे बसस्टॉप घे! दरदिवशीं ते कोठे गेले आहेत तें शोधावें लागते. इतकेंच काय, पण आपल्या बसगाड्या सुध्दां रोजच्या रोज एकाच मार्गानें जात असतील असा तूं समज करून घेऊं नकोस. रस्ता दुरुस्तीच्या नांवाखालीं त्यांचे मार्ग रोज बदलत असतात.

असें इथलें विलक्षण गतिमान जीवन आहे. भूगोलांत दहा दिशा असल्या तरी मुंबईकर मात्र असंख्य दिशांना पळत असतात. आणि केवळ पृथ्वी वाटोळी आहे म्हणून ते रात्रीला मुक्कामाला येतात. मोरू! यांतल्या कोणालाहि 'तुम्ही कां धांवतां?' असा प्रश्न विचारलास तर 'गाडी चुकेल', 'बस चुकेल' असें उत्तर मिळेल. उभ्या आयुष्यांत पाहिलेंस ना मोरू!—आमचें आयुष्य सुध्दां उभें!—या उभ्या आयुष्यांत गणित, भविष्य, कोडें कांहींहि चुकलें तरी त्याची आम्हांला खंत वाटत नाहीं. पण गाडी चुकली कीं आम्ही हताश होतों. ज्यांनीं आपल्या हयातींत धड पाढे सुध्दां पाठ केले नाहींत त्यांना गाड्यांचें टाइमटेबल पाठ असते. कुठली गाडी? एवढें विचारून पहा. ७–५१ असें उत्तर मिळेल. म्हणून ७–५०–पर्यंत फलाटावर पोंचण्यासाठीं तो धांव धांव धांवेल. तो ७–५० ला फलाटावर पोचतो तेव्हां ६–३४ लेट आहे एवढें त्याला कळतें.

बरें, आतां गाडीच लेट आहे म्हणून फलाटावरच्या बांकावर बसावें किंवा कुठें तरी तिरक्या नजरेनें पहात खुंटासारखें उभें रहावें, तर मोरू, तेंहि आमच्या नशिबांत नाहीं. कामावर जायच्या कपड्यांवर वरून कावळा अथवा कबूतर घाण करते. मुंबईसारख्या सुधारलेल्या शहरांत सुध्दां या मुक्या प्राण्यांनीं आमचा छळ करावा यापेक्षां दुसरें दुर्दैव तें कुठलें? कांहीं ठिकाणीं हौसेनें कबुतरें उडवण्याचा खेळ खेळला जातो असें ऐकतों. पण आम्हांला वरच्या विजेच्या तारांवरील कबुतरें उडवतां उडवतां 'तुमचा खेळ होतो, पण आमचा जीव जातो' असें म्हणण्याची पाळी येते.

मोरू! आतां हे कावळे! तेराव्याला आ–आ करून मोठ्यानें तोंड वासलें तर पिंडाला स्पर्श करायला एक कावळा समोर येईल तर शपथ. पण येथें आमच्या डोक्यावर घाण करायला शेकडों कावळे टपून बसतात. म्हणजे तेथें मृतात्म्याला सद्‌गति नाहीं आणि येथें जिवात्म्याला सद्‌गति नाहीं. जो कुठेंहि दिसत नाहीं त्या मोराला (कदाचित त्याचें नाचकाम पाहून) राष्ट्रीय पक्षी करण्याऐवजीं काळ्या लोकांच्या या राष्ट्रांत कावळ्याला राष्ट्रीय पक्षी कां केलें नाहीं? त्यांना तेवढें वरचें स्थान दिलें असतें तर कदाचित् ते आमच्या मस्तकापर्यंत आले नसते.

ती पहा गाडी आली! पहा–पहा लोकांची प्रचंड गर्दी! किती चढले, किती उतरले. अशा गर्दींत लोक चालतात कसे? पाय ठेवायला त्यांना जमीन सांपडते कशी! असे प्रश्न तुझ्या मनांत निर्माण होतील. तसे प्रश्न तुझ्या मनांत आले तर त्यांत कांहीं वावगें नाही.

मोरू? आम्ही त्या विसोबा खेंचराच्या जातींतलेच आहों. खेंचर या नांवावरून जाऊं नकोस! विसोबा खेचर हा एक संत होऊन गेला. तो म्हणाला होता, चराचर सृष्टींत देव आहे. त्यामुळें जेथें पाय ठेवावा तेथें देव असतोच. मग शंकराच्या पिंडीवर पाय ठेवला तर बिघडलें कुठें? असें म्हणून तो पिंडीवर पाय ठेवून झोंपला. आम्हीहि तसेंच कांहींसें म्हणतों. हवेंत कांहीं पाय ठेवतां येत नाहीं. जेथें पाय ठेवूं तेथें जमीन असणारच. मग पाय ठेवला तर बिघडलें कुठें? तो पाय शेवटीं जमिनीवर पडणारच! असें म्हणून आम्ही पावलें टाकतों. आणि काय आश्चर्य? मोरू, पाऊल टाकावें तर खालीं जमीन असते. आणि पावलाखालीं जमीन नसतें तेव्हां—

"हात् साला! सुव्वर कुठचा! अरे हमारें पायपर पाय दिया ना? दिखता नहीं?"

पाहिलेंस मोरू! जेव्हां पायाखालीं जमीन नसते तेव्हां अन्य कुणाच्या तरी शरीराचे सुटे अवयव असतात!

आतां त्या इसमानें जी शिवी हांसडली ती कुठल्या भाषेंत असा तुला प्रश्न पडेल. अरे वेड्या, हीच ती आमची राष्ट्रभाषा. हीच बरें ती हिंदी! सुदैवानें आमची राष्ट्रभाषा पाण्यासारखी आहे. मद्राससारख्या



ओऽह!!

दिपावली व नूतन वर्ष आमच्या ग्राहकांस आणि हितचिंतकांस सुखसमृद्धिचें जावो !

# शेंकर आणि कंपनी

ब्लॉक मेकर

# प्रभात प्रोसेस स्टूडिओ

धोबी वाडी, ठाकुरद्धार मुं.२. फोन-२१६५७



-रखरखीत भागांत ती दिसत नाहीं. इतर ठिकाणीं ती दिसते. तेव्हां 'पाणी तेरा रंग कैसा जिस में मिलावें वैसा'- हेंहि हिंदीच बरें! येथील प्रत्येक माणूस आपापला रंग घालून मूळ हिंदीचें पाणी पाणी करतो.

मोरू! तूं आणखी एक गोष्ट लक्षांत ठेव. आम्ही आमची भाषा घुसडून हिंदीचेंच पाणी करतो असें समजूं नकोस. आम्ही आमची भाषा सुध्दां खूप पातळ केली आहे. उदाहरणार्थ, चायल्ला आणि साला हे परभाषेंतले शब्द आम्हांला आमच्या प्रत्येक वाक्याच्या आद्याला आणि अन्ताला लागतातच. आमचे कांहीं लोक खुद्द आपली भाषा सुध्दां उघडपणें बोलायला कचरतात, आणि लाजतातहि. त्यामुळें ते अनेकदां इंग्रजींत बोलणें पसंत करतात. (सुख एवढेंच कीं त्यांचें इंग्रजी खुद्द इंग्रजांना कळत नाहीं!) आमची शेंबडीं पोरें आपल्या आईबापांना मम्मी, डॅडी अशा हांका मारतात. आमचे साहित्यिक सुध्दां कंसांत इंग्रजी शब्द दिल्याशिवाय मराठी लिहायला धजत नाहींत. परभाषेबद्दलची ही आस्था मुंबईत सर्वत्र दिसते.

"ए साला, देखतां नहीं क्या?

पहा मोरू! तथापि घाबरूं नकोस. कांहीं विशेष झालेलें नाहीं. त्या फेटेवाल्यानें पान खाऊन रस्त्यावर पिंक टाकण्याचें आपलें स्वातंत्र्य अबाधित राखलें म्हणून हा टोपीवाला (आंतून दोघेहि टक्कलवालेच असतील!) चिडला आहे. म्हणून टोपीवाला चार पावलें पुढें जाऊन स्वतः रस्त्यावर थुंकणार नाहीं असें नाहीं. उलट झटक्यासरशीं आलेला राग तो थुंकूनच शान्त करणार!

"मंगता उधर थुंकता है!"

"जरूर थुंकेगा! रस्ता क्या तेरा बाप का है?"

ऐक मोरू! एका थुंकीवरून हें झालें आहे. (पण यामुळें थुंकी झेलण्याची कला येथें अस्तित्वांत नाहीं असें समजूं नकोस!) या लोकशाहींत कशावर कोणाची मालकी आहे किंवा त्याहिपेक्षां कशावर कोणाची मालकी नाहीं हें येथील प्रत्येक नागरिक जाणतो. त्यामुळें हा रस्ता तुझ्या बापाचा नाहीं हें तो तात्काळ सांगूं शकला.

* * *

शाब्बास मोरू! तूं अगदीं योग्य तेंच बोललास! इथल्या यांत्रिक जीवनामुळें व्यक्तीचा लोप झाला आहे आणि एकास दुसऱ्याविषयीं कांहीं वाटत नाहीं असें तुला वाटणें स्वाभाविक आहे. पण तुला वाटतें तसें आपलें जीवन दुःखी मात्र झालेलें नाहीं.

मुंबईंत मोठमोठे यांत्रिक कारखाने आहेत, गाड्या आहेत, गिरण्या आहेत, दहा दहा मजले चढण्यासाठीं विजेचे पाळणे आहेत हें सारें खरें. पण म्हणून सारी मुंबई यंत्रांच्या आहारीं गेली आहे असें समजण्याचें कारण नाहीं. यंत्रांच्या जोडीला आम्ही व्यक्तिगत धंदे, आणि हस्तव्यवसाय टिकवून ठेवले आहेत. इतकेंच नव्हे तर त्यांना उत्तेजन दिलें आहे.

बाटानें मोठा कारखाना काढून यंत्रानें जोडे तयार केले तरी ते दुरुस्त करायला नाक्या नाक्यावर तुला मोचीच दिसेल. तो पहा चांभार. तो कसल्याहि चांभारचौकश्या करणार नाहीं. तूं त्याच्या तोंडाकडे पाहिलेंस तरी पुरे! स्वतःच्याच कातड्याचे जोडे करून द्यायला तो सिद्ध आहे असें तुला वाटेल. आजकाल एअरकंडिशण्ड सलूनें निघालीं आहेत पण तरीहि सकाळीं अकरा वाजेपर्यंत कांखेला धोपटी मारून स्वतःच्या दाढीचे खूंट उपटत उभे असलेले न्हावी तुला रस्त्यावर दिसतील.

मोरू, इंग्लंड-अमेरिकेंतून औषधें आणून आणि त्यांत पाणी घालून इथले पदवीधर डॉक्टर वाटल्या भरत असतील. पण म्हणून उघड्या छत्रींत घेऊन पाळा-मुळांचा दवा देणारे वैदु रस्तोरस्तीं दिसत नाहींत असें नाहीं. त्यांनाहि गिऱ्हाईक बरें मिळते. टेलिफोनवर मुहूर्त, भविष्य आणि आंकडे सांगणारे ज्योतिषी येथें खूप आहेत. पण म्हणून रस्त्यावर बसणारे ज्योतिषी कमी आहेत असें समजण्याचें मुळींच कारण नाहीं. कांहीं ज्योतिषी तर यंत्रापासून इतके दूर आणि निसर्गाच्या इतके जवळ जातात कीं त्यांनीं पाळलेल्या चिमण्या भविष्याचें पाकीट चोंचीनें उचलून देतात.

गिरण्यांतून आमच्या अंगावर कपडे येतात हें खरें, आणि कारखान्यांतून आमची भांडीं येतात हेंहि खरें, पण आमचे जुने कपडे नेऊन त्याबदलीं एखादें तपेलें आम्हांला बोहारीणच देऊन जाते. रोजचें वर्तमानपत्र रोटरीवरून आलें तरी महिन्याअखेरीस तें जरीपुराणेवालाच घेऊन जातो. कारखान्यांतून औषधाच्या बाटल्या आल्या तरी त्या रिकाम्या होतांच बाटलीवालीच दारीं येते. इब्राहिम अलीनें छत्र्या पुरविल्या, गोद्रेजनें कुलपें दिलीं आणि प्रायमस कंपनीनें स्टोव्ह दिले तरी ते रिपेअर करणारा कारागीरच घरीं येऊन आम्हांला खरी मदत करतो. म्हणजे मोठमोठ्या यांत्रिक उद्योगधंद्याबरोबर आम्ही मुंबईकरांनीं छोटे छोटे उद्योगधंदेहि टिकवून धरले आहेत, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

यंत्रामध्यें कला नसते; कला ही शेवटीं ज्याच्या त्याच्या हातांतच असते हें आम्ही पुरें जाणतों. म्हणून हस्तकलेला आम्ही उत्तेजन देतों. छोटे धंदे टिकले कीं त्यांची हस्तकलाहि टिकते. अशा किती तरी तऱ्हेच्या हस्तकला आम्ही मुंबईंत टिकवून ठेवल्याआहेत.

मोरू, साधी गायवाली घे! तिच्या रूपानें गोधर्मप्रतिपालनाच्या नांवाखालीं आम्ही हस्तकलेलाच खरें उत्तेजन देतों. गाईच्या तोंडांत चवलीचा चारा घालण्यापेक्षां गायवालीच्याच हातीं चवली टिकवणें कौशल्याचें असतें. तें कौशल्य आम्हीच जाणो! याशिवाय गर्दीची संधि साधून बायकांना धक्के देणे, त्यांचें मांडयांना चिमटे घेणें, त्यांचें पदर ओढणें यासारख्या शृंगारिक हस्तकलाहि आम्ही अभिमानानें टिकवून धरल्या आहेत.

आतां धकाधकीच्या या काळांत मुंबईकरांना एकमेकांविषयीं कांहीं वाटत नाहीं असें जें तूं म्हणतोस तेंहि तेवढेसें खरें नाहीं.

मोरू, चांगले कान उघडे ठेवून हे रेडिओ ऐक. वास्तविक तसे कान उघडे ठेवायलाच नकोत. आवाजानेंच कान फुटतील, एवढ्या मोठ्या आवाजांत गल्लींतले सर्व रेडिओ एकाच वेळीं चालू आहेत. आपल्या घरचा रेडिओ हा आपल्यापेक्षां इतरांनाच ऐकायाचा आहे अशा आपुलकीनें प्रत्येकजण आपला रेडिओ मोठा करून ठेवतो. एवढें उदार मन अन्यत्र कोठें दिसेल का? आणि ऐक मोरू, प्रत्येक रेडिओचें स्टेशन सुध्दां वेगवेगळें आहे. कुणाचे रेडिओ मुंबईवर, तर कुणाचे सीलोनवर, पाकिस्तानवर








चालू आहेत. याचा उद्देश काय? आपण मुंबई स्टेशन लावलें तर रेडिओ सीलोन किंवा रेडिओ पाकिस्तान या स्टेशनवरील कार्यक्रम फुकट जातात. आपल्याला ते ऐकतां येत नाहींत. रेडिओंतली ही यांत्रिक उणीव आमच्या शेजारधर्मामुळें भरून निघाली आहे. आम्ही मुंबईकर एकाच वेळीं सर्व स्टेशनांवरील कार्यक्रम ऐकूं शकतो.

मोरू, दर अमावास्येला 'अवस वाढा अवस' असें ओरडत कांहीं वाया दारोदार फिरत असतात. एका नव्या पैशावर त्यांची अवस भागते आणि आज अमावास्या आहे हें मुंबई-करांना कळतें. म्हणजे यांत दोघांचाहि फायदा नाहीं काय?

ग्रहणाच्या दिवशीं (आम्ही गरोदर असलों म्हणजे हें येणारच! असें घरोघर म्हटलें जातें, त्या दिवशीं–) 'दे दान सुटे गिराण' असे ओरडत मांग, भिल्ल वगैरे लोक मुंबई-भर धांवत असतात. आणि चंद्र, सूर्य यांना मोकळे करावे म्हणून मुंबईकर आपले कपडे देतात. आमच्यासाठीं वर्षभर अर्धा-अर्धा दिवस पाळीपाळींनें खपणाऱ्या या चंद्र-सूर्याचे उपकार आम्ही वर्षांतून एकदां फेडून टाकतो. मुंबईकरांचे कपडे टाकणें हें वस्तुतः कांत टाकण्यासारखेंच असतें. जे कपडे बोहारीण सुध्दां उचलणार नाहीं ते एरव्हीं फुकट घालवतां आले असते. पण मुंबईकर ते फुकट घालवीत नाहींत. कारण मांग, भिल्ल या जमातीच्या बाबतींत सुध्दां आपल्याला कांहीं कर्तव्य आहे हें मुंबईकर जाणतात.

मोरू, हा इसम तुझ्या किंवा माझ्या कानठळ्या बसाव्यात म्हणून ओरडत नाहीं. हा आमचा कल्हईवाला! आमच्या भांड्यांना कल्हई लागली नाहीं तर आमचे अन्न-पदार्थ खराब होतील याची त्याला काळजी! हा भांडीं घेऊन जातो आणि आणून देतो. बारा भांड्यावर तेरावें मोफत देतो. एवढें आठ टक्के कमिशन कुठला व्यापारी देईल? तरी सुध्दां कल्हईचा थर पुसट लावलास अशी ओरड आमच्या बायका करतातच. पण तो अपमान तो कल्हईवाला मनावर घेत नाहीं. कारण भांड्यांना कल्हई लावणें म्हणजे पोळ्यांना तूप लावणें नव्हे हें तो जाणून असतो!

मोरू, हा पहा आमचा घरगडी रामा. (यालाच पूर्वी बाणकोटी म्हणत!) तो कधीं वनवासांत जाईल याचा नेम नसतो. त्याच्या अंगावर फाटकें बनयनसुद्धां नसतें, तरी आमचे पैसे तो नेहमीं अंगावर ठेवतो. त्यानें दारांत पाय ठेवला कीं ताटांतलें अन्न बकाबका गिळून आम्ही ताटें रिकामी करून देतो. आणि त्याला काढून ठेवलेलें जेवण तो शान्त चित्तानें जेवत असतांना त्याच्या-कडे पाहून आम्ही आंवढे गिळतो. तो तत्त्वतः सुका असला तरी प्रत्यक्षांत 'ओला'च असतो. तो आम्हांला फडकावतो आणि आम्ही त्याची मनधरणी करतो. आणि एवढेंहि करून तो आम्हांला मालक मानतो आणि आम्ही त्याला नोकर समजतो. आम्हांला फडकावून त्याचा राग शान्त झाला नाहीं. किंवा आम्ही पुरेसें नरमलों नाहीं असें त्याला वाटलें तर तो कपबशा फोडून आमच्या नाकीं वेसण घालतो. तथापि त्याला आमच्याबद्दल प्रेम नाहीं असें नाहीं. तो गांवाला जातो तेव्हां तो बदली नोकर देऊन जातो. आणि गौरीला होळीला आमच्या दारा-

वर नाच आणतो. (आणि आमच्या खिशांना खार घालतो.) त्याच आपुलकीनें हजामती-साठीं आणि सिनेमासाठीं पगाराबाहेर पैसे मागतो. आणि त्याची युनियनची भाषा ऐकूनहि आम्ही त्याला ते देतो. एवढे आदर्श मालक–मजूर संबंध तुला मुंबईशिवाय आणखी कुठें दिसतील ?

☆ ☆ ☆

मोरू! हें पहा आपलें सचिवालय. आमचे मंत्री या सचिवालयांत बसतात–अर्थातच ते दौऱ्यावर नसतात तेव्हां. येथून या राज्याचा कारभार होतो असें म्हणतात. पण येथें बसून मंत्री झोंपा काढतात असें विरोधी पक्षांचे सभासद म्हणतात. पण तें खरें नसावें. कारण याच विरोधी पक्षांचे लोक मंत्र्यांना भेटण्या-साठीं ज्या अर्थी शिष्टमंडळें घेऊन जातात त्या अर्थी मंत्री झोंपत नसावेत असें अनुमान काढतां येतें.

या सचिवालयांत मंत्री, त्यांचे सचिव, आमदार आणि कारकून यांची रोज एवढी गर्दी असते कीं यापैकीं मंत्री कोण आणि कारकून कोण हें नवख्या लोकांना चटकन् ओळखतां सुद्धां येत नाहीं. त्यांतल्या त्यांत मुख्य मंत्र्यांचा पट्टेवाला तेवढा उठून दिसतो. त्याची जरीबुट्टीची तांबडी पगडी, तांबडे पट्टे यामुळें आणि त्याची इतर पट्टेवाल्यांकडे पहाण्याची दृष्टि यामुळें हा एकमेव पट्टे-वाला सचिवालयांत उठून दिसतो. विशेष आश्चर्याची गोष्ट म्हणजे या पट्टेवाल्याच्या कमरेला एक खंजीरहि म्यानासकट खोंवलेला असतो. आपल्या अहिंसक राज्यांत मुख्य-मंत्र्यांच्या पट्टेवाल्याच्या कमरेला खंजीर असावा हें आश्चर्यच नव्हे काय? तथापि बरींच वर्षें तो खंजीर कधीं बाहेर काढ-लेला नसल्यामुळें तोहि अहिंसक झाला अस-ण्याची शक्यता आहे.

मोरू, हा पहा आमचा काळा घोडा. या घोड्यावर इंग्रज बसला आहे म्हणून हा पुतळा काढून टाका असा कांहीं लोकांचा हेका आहे. पण मोरू, वरचा स्वार जाऊं दे. हा घोडा तर पहा. असा ऐटबाज अवलख घोडा शेवटलाच बरें ! महालक्ष्मीच्या रेसकोर्सवरसुद्धां आतां असा घोडा दृष्टीस पडत नाहीं. या घोड्यावर बसला तो भाग्य-वान्! या घोड्याकडे पाहिलें कीं तो दगडी आहे हें माहीत असूनहि त्याच्या पाठीवर थाप मारावीशी वाटते. असा घोडा येथून हालवतां नये!

याच्यापुढें थोड्याच अंतरावर आपला कौन्सिल हॉल आहे. तेथें आपल्या विधि-मंडळाच्या बैठका होतात. विधिमंडळाच्या बैठका सुरूं झाल्या की, कुठलाहि विधि पार पाडण्याआधीं कुठल्यातरी विरोधी पक्षांचे मोर्चे येतात. तें मोर्चे या काळ्या-घोड्यापाशीं पोलीस अडवतात. सांप्रत मोर्चा थांबविण्याचें ठिकाण म्हणून या काळ्या घोड्यास प्रसिद्धी मिळाली आहे. त्यामुळें अशी एक आशा वाटतें कीं, हा काळा घोडा येथून हालवला जाणार नाहीं. कारण तो हालवला तर मोर्चा कोठें अडवायचा हें पोलिसांना सुद्धां कळणार नाहीं. इतका तो घोडा मोर्च्यांशीं निगडित झाला आहे.



## ओळख

दाटे आंतुनीया देह
कण कण फुटो आला
त्यानें व्यथाग्रही क्षण
आपोआप चढे मोला.

टिचभर नजरेचा
पल्ला वारूहून वाढे
आंतआंतल्या दिठीचें
ठाके समोर रूपडें.

असें दाटतां फुटतां
पटे ओळख स्वतःची
जगा आर्धीच्या काळोखा
वाटे नात्यांतली प्राची.

—मधुकर केचे

मोरू, फिरतां फिरतां येथें पुतळ्यांची संख्या फार आहे हें तुझ्या लक्षांत आलें असेल. पुतळे उभारण्यांत मुंबईकरांचा पैसा फार खर्च होतो असेंहि कांहीं जण म्हणतात.

पण त्यांत आम्हांला फारसें तथ्य वाटत नाहीं. अखेर पैसा पैसा तो काय ? मिळवतां येतो ! पैसा मिळविण्यासाठींच तर आपण मुंबईस येतो. आणि पैसा मुद्धां घेऊन अखेर जाणार कुठें? त्यांतला कांहीं पैसा पुतळ्यांत अडकला तर बिघडलें कुठें ? ज्यांनीं मुंबई-करांची सेवा केली त्यांचें स्मारक पुतळ्या-शिवाय अन्य कोणत्या मार्गानें बरें होईल? हे सर् फिरोजशहा मेहता पहा. हे नामदार गोखले पहा. हे न्यायमूर्ति रानडे पहा. पहा–पहा म्हणण्याचें कारण असें कीं एरव्हीं त्या पुतळ्याकडे कोणी पहातहि नाहीं. स्मारक करणाऱ्यांची स्मारकाकडे लोकांनीं पहावें अशी अपेक्षा असते. पण लोकांना वेळ नाहीं त्याला कोण काय करणार? पण म्हणून काय पुतळे उभारायचे नाहींत?

आणि पुतळे उभारले नाहींत तर आपल्या शिल्पकलेचें काय बरें होईल ? हे पुतळे पहातां पहातां, मोरू, मुंबईतल्या शिल्प-कलेचा एक गुण तुझ्या ध्यानांत येईल. या शिल्पकलेवर मुंबईच्या बांवपळीचा विलक्षण परिणाम झालेला दिसेल. मुंबईंतले बहुतेक पुतळे तुला उभे दिसतील. जे थोडे बसलेले दिसतात ते सुद्धां 'छे ! आतां उठले पाहिजे' असें म्हणून उठत आहेत असें वाटतें. कधीं हुकूम येईल आणि आपल्यास हालावें लागेल याचा नेम नसल्यासारखे ते पुतळे दिसतात. अगदीं अलिकडे उभारलेला गेट वे ऑफ इंडियावरचा शिवाजी महाराज बघ! शिवाजीला आम्ही घोड्यावर बसवलें आहे हें खरें! पण घोडा धांवण्याची पोज घेऊन उभा आहे. कधीं लगाम ओढले जातील आणि त्याला दौडावें लागेल याचा नेम नाहीं. म्हणून आम्ही मेल्यावर आमचे पुतळे बसलेले करा असें सध्यांचे हयात पुढारी आपल्या मृत्युपत्रांत लिहून ठेवीत आहेत असें ऐकतों!

तथापि सुख एवढेंच कीं बहुतेक पुतळे एकान्तांत पडले आहेत. त्यांच्याकडे फारसें कुणाचें लक्ष जात नाहीं. त्यांतल्या त्यांत गिरगांवच्या चौपाटीवरचे हे दोन महा-पुरुष थोडे दुर्दैवी ठरले. हे पहा लोकमान्य टिळक. आणि ते दुसरे विठ्ठलभाई पटेल. या चौपाटीवर प्रत्येक राजकीय पक्षाच्या सभा होत असतात. त्याहि त्यांच्याच भाषेंत 'प्रचंड!' 'हजारोंच्या संख्येत उपस्थित रहा

अशीं आमंत्रणें! खरोखरच आमंत्रणानुसार हजारों लोक येतील अशा अपेक्षेनें लावलेले लाऊडस्पीकर्स! आणि हजारों लोक समोर आहेत अशा कल्पनेनें पुढाऱ्यांनीं केलेलीं भाषणें! बिचाऱ्या या दोन महापुरुषांना ती नित्य नेमानें ऐकावीं लागतात. लोकमान्यां-सारखा जहाल पुढारी तीं ऐकून घेतो. करणार काय? आतां पगडीवरचा कावळा सुद्धां उडवतां येत नाहीं! प्रथम प्रथम तर लोकमान्य तिथें एकटेच होते. पण पुढें विठ्ठलभाईहि आले. पण तेथेंहि महाराष्ट्रीय खुळेपणा आणि गुजराती धूर्तपणाच दिसून येतो. कारण लोकमान्यांना सभेकडे तोंड करून उभें रहावें लागलें, तर विठ्ठलभाई पटेल मात्र सभेकडे पाठ करून उभे राहूं शकले. तथापि त्यांनाहि विठ्ठलभाई पटेल रोडवर नजर ठेवावीच लागते.

मोरू, सांप्रत या पुतळ्यांना दुसऱ्या एका दृष्टीनें महत्त्व प्राप्त झालें आहे. तें म्हणजे या पुतळ्यांकडे आतां भिकारी आणि पाटीवाले यांचें लक्ष वळलें आहे, ही एक खरी आनंदाची गोष्ट आहे. बहुतेक पुतळ्यांच्या चवुतऱ्यावर हे भिकारी, पाटीवाले झोपलेले असतात. त्यामुळें त्यांच्या गांववाल्यांकडून पोस्टानें येणारीं पत्रें अनेकदां केअर ऑफ सर फिरोझशहा मेहता, किंवा केअर ऑफ न्यायमूर्ति रानडे अशा पत्त्यांवर येतात. पुतळ्यांचा हा मानवी उपयोग वाखाणण्या-सारखा नाहीं काय? तसेंच हे दिवंगत महान् पुढारी आणि खालच्या थरांतले लोक यांच्यां-तला हा दैनंदिन संपर्क पाहून आपल्या हयात पुढाऱ्यांनी धडा घ्यायला नको काय?

तसेंच हे पुतळे नसते तर मुंबईंत झाडांच्या अभावीं उडून उडून बेजार झालेले पक्षी कुठें वरें बसले असते? त्या पक्ष्यांनीं सफेद ठिपके टाकायचे तरी कुठें? मोरू, तूं सर्व पुतळे अत्यंत बारकाईनें पाहिलेस तर या पुतळ्यांचा पक्ष्यांना किती उपयोग होतो हें तुझ्या लक्षांत येईल. पुतळा बसवल्यानंतर न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडयांच्या मिशा पिकल्या किंवा बोरीबंदरवर स्थानापन्न झाल्यानंतर फिरोजशहा मेहतांची दाढी पिकली असें तूं समजूं नकोस! तो मुंबई-तल्या पक्ष्यांचा प्रताप आहे! यावरून हे पुतळे पक्ष्यांना किती उपयोगी पडतात तें तुझ्या लक्षांत येईल! पुतळे उभारून मुक्या प्राण्यांवर (म्हणजे पुतळ्यांवर नव्हे, पक्ष्यां-वर) मुंबईकर केवढी दया करतात पहा!

मोरू! मुंबईकर तसे खूप दयाळू आहेत! मुंबईंत कबुतरांना दाणे घालणारे कितीतरी गुजराती तुला दिसतील. त्यासाठीं पोतींच्या पोती रिकामी केलीं जातात. आतां तो जैन माणूस पहा. तो लघवीला बसला आहे असा तुझा समज असेल तर तो खोटा आहे. तो कोठें मुंग्या दिसताहेत कीं काय तें पहातो आहे. त्याला मुंग्यांना रवा घालायचा आहे. 'मुंगी साखरेचा रवा' या संतवच-नाचा अर्थ मुंग्यासकट साखर घालून केलेला रवा म्हणजे शिरा असा कांहीं जण करतात. त्यांना हें दृश्य दाखवलें पाहिजे! श्रावणांत उपास सोडण्याआधीं जेवणाचें पहिलें पान आम्ही गाईला घालतो. म्हणूनच रस्तो-रस्तीं माजलेल्या गाई ट्रॅफिक अडवीत संथ-पणें फिरतांना दिसतात. कुत्र्यांना तर मुंब-ईंत फारच मानाचें स्थान आहे. पोलीससुद्धां गुन्हेगारांना पकडण्यासाठीं कुत्रे बाळग-तात. याशिवाय बऱ्याचशा सुशिक्षित आणि धनवंत बायकांपाशीं त्यांच्या नवऱ्याव्यति-रिक्त एक एक कुत्राहि असतो. ती नवऱ्याशीं घटस्फोट घेईल, पण कुत्र्यावरील तिचें प्रेम कमी होणार नाहीं. कुत्र्याला (नवऱ्या-पेक्षां) चांगली वागणूक मिळावी म्हणून प्रयत्न करणाऱ्या संस्थाहि मुंबईंत आहेत. यावरून मुंबईला मुक्या प्राण्यांकडे किती दयाबुद्धीनें पहातात हें तुझ्या लक्षांत येईल!

मोरू! अशा रीतीनें मुक्या प्राण्यांना या दाखविणाऱ्या मुंबईकरांबद्दल कोणाला बरें दया वाटणार नाहीं? ● ● ●

**केशीराजाच्या दर्शनाला निघाले होते मी ! पण चंद्रभागेच्या वाळवंटांतच केवढी तरी श्रीमंति मी अनुभवली. मन धालं. त्या खेळगाण्यांत रंगलं. देवळांत जाऊन तरी यापेक्षां कोणती अधिक श्रीमंति मी भोगणार होते ?**



# राहिलें दारवंटीं

—डॉ. सरोजिनी बाबर

दाटदुटल्या गल्लीच्या बोळांतून विठूदेवाच्या रथाचा हेलवा आला म्हणजे पंढरीनगरीच्या दुकानदारांनीं आपलीं दुकानं घटकाभर कलवावींत त्याप्रमाणं आम्हीही आमच्या भावनेला त्या दिवशीं थोडी कलती हो म्हटलं. करणारच काय मग? कधीं नव्हे ती मी पंढरी पहायला गेलेली तर विठूदेवाच्या मंदिरापाशीं भक्तगणांची ही भली दांडगी सभा वसलेली. पाऊल ठेवीन म्हटलं तर कुठं मोकळी जागा नाहीं न् श्वास घेईन म्हटलं तर माघारीहि व्हायला जमेना. केशीराजाच्या दर्शनाला माणसांची अशी रीघ लागलेली भल्या पहांटेचीच कीं, त्या रांगेंत चेंगरून जायची वेळ यावी. म्हणून मग कर्ण्याचा मंजुळ आवाज आला त्यासरशीं देवाचं स्नान घडलं न् दह्यादुधाचा अभिषेक झाला असं समजून वर काढलेली मान खालीं करीत मी हातांतील तुळशीमाळा सांवरली.

पण मग बारींत उभं राहून कंटाळा आला तशी राऊळांत जाऊन केशीराजाचं दर्शन घेण्यापेक्षां इथूनंच दंडवत घालून मोकळं व्हावं असा विचार मनांत आला. म्हटलं जाऊं दे; बुक्क्याच्या रांगोळीच्या खुणेनं शोधून काढलेल्या ह्या राऊळाला बाहेरूनच पारखींत मी हातांतील तुळशीमाळा महाद्वाराशी ठेवली न् देवाला हात जोडले. त्यासरशी विचार मनांत डोकावला कीं—

"तुळसीमाळा घाली गळां। त्या भेटे घनसावळा।"

चतुर्भुज सहित कमळा। केशीराज प्रत्यक्ष।।"

हें नामदेवांचं म्हणणं खरं मानून गप्प रहावं. आपणच गळ्यांत तुळशीमाळा घालावी आणि फार तर तो देवाचा प्रसाद म्हणून भाळीं वंदावी म्हणजे त्यांत सारं आलं.

हा असला विचार मनांत डोकावला तशी मन एकदम मोहरून गेलं. वाटलं कीं, आपण अशा खटपटींत आहों हें बघून स्वतः केशीराजा इथं महाद्वारीं येईल न् आपल्या गळ्यांतील वैजयंतीमाळ चोखोवाप्रमाणं आपल्याहि गळ्यांत घालील! म्हणतांना मग मी महाद्वारींच्या पायरीवर उभी राहिले न् गर्दीला मागं सोडून एकलीच अशी पुढं आलें तर आणखी एका कल्पनेनं मला अवचितच घेरलं. नामदेवाप्रमाणं ह्या राऊळीच्या पायरीशीं बसून रहावं न् घडत्या गोष्टींचं दर्शन घेत रहावं म्हणजे खूप मजा येईल. मला हा विचार एकदम पटला हं! आणि खरं सांगायचं तर मी राऊळांत न शिरतांना महाद्वारीच्या उंबरठ्याशींच बसून राहिलें. म्हटलं, बघूंया तरी विठूदेवाला आपली आठवण आहे की नाहीं तें? उगीच आपणच त्याच्या मागंमागं करायचं म्हणजे? त्याला नको आपली गरज? तर काय! देव झाला म्हणून काय झालं?

पण बाई त्याची न् आपली बरोबरी व्हावीच कशी तेव्हां असला विचार मनांत यावा? कुठं तो न् कुठं आपण ? नऊलाख मोत्यांनीं गुंफलेला शेर शेर सोन्याचा त्याच्या नगरीचा कळस न् आमणांजवळ काय तर म्हणू कागदांचे ढीग ! करायचे काय? आणि विचारतो तरी कोण त्याला? आम्हांला कापासाठीं पंधरावीस मोतीं मिळायचे म्हणजे डोक्यावरून पाणी गेलं बाई! आणि इथं बघावं तर












आपले मोतीं खेळवलेत जिकडे तिकडे! हां, बरोबर आहे म्हणा. भिम्मकराजांनी समुद्र आंदण दिल्या कारणानं इथं हिऱ्या माणकांना तरी काय तोटा हो? आमचं तसं कुठं आहे? आम्ही रत्नांची पहाणी फक्त करायची न् ती देखील कुठं तरी आलेली छापील चित्रं बघून इथं! पण हें तरी मी सांगायचं कुणाला? केशीराजाला कीं रुक्मिणीदेवीला?

अगोबाई! एक वेळ केशीराजा परवडेल पण ही नखऱ्याची रुक्मिणी भारीच हं!

विठुलाचं राज रुक्मीन सांगती बापाला
दीड लाख मोतीं तिच्या चोळीच्या बाहीला
विठुलाचं राज रुक्मीन भैनीला सांगती
भांगोभांग मोतीं तिच्या कुंकवा भवती
विठुलाचं राज रुक्मीन सांगती शेजीला
मोत्या पवळ्यांची रास तिच्या वेनीच्या
गोंड्याला

म्हणजे हा तिचा डामडौल तर तिच्याशीं बोलावं कुणीं आणि कसं? म्हणून आपली गप्प राहिलें तर तेवढ्यांत माझ्या समोरून कितीतरी बायका आपल्या निघाल्या. राऊळांतील दाटीवाटीची त्यांना पर्वा नव्हतीच जशी काय. त्या अगदीं नटून थटून आलेल्या अशा कीं,

पंढरपुरांत काय वाजतं गाजतं
लगीन देवाचं लागतं

याच भावनेनं आलेल्या. म्हणतांना मी जरा एकीकडे पाहिलं तर त्या आपल्याच तोऱ्यात हं! आणि—

काळी चंद्रकळा कटारी काठवजा
नेसली सारजा
काळी चंद्रकळा पदरी मोतीं घोस
माज्या लेकीची हावस
काळी चंद्रकळा पाच उणे पन्नासाची
लेक नेसली राजसाची
काळी चंद्रकळा पदरी मोती जाळी
नेसली चंद्रावळी
काळी चंद्रकळा हाई पहिल्या घडीची
हौशा माज्याच्या आवडीची
काळी चंद्रकळा बघावी नवी घडी
घेणाराची दृष्ट काढी
काळी चंद्रकळा नेसण्याची लई खुबी
लेक राऊळांत उभी

प्रत्येकीचा हा थाट. अगदीं बघत रहावा असा हळदकुंकवाचाही थाटमाट. म्हणून मग मी एकीला विचारलं, "एका रंगाची लुगडीं नेसून आला ग?" तशी ती बोलली, "हं! आमच्या भैनीला नवस बोलायचा हाय! ल्योक व्हावा म्हणून." आणि लगेच एका म्हातारीचा आवाज कानांत घुमला—

देईन देवाला वाण खणा नारळाचा
मागते कडेला तान्हुला जावळाचा
जन्मामधी जन्म केळीबाईचा चांगला
पोटीच्या पुत्रासाठी प्राण देईल आपुला
हौस मला मोठी तान्हं बाळ तें असावं
घरा नि दारात दाणे मुठीन नासाव
अप्रुवाई मेवा त्यो ग तान्ह्या लेकराचा
माजा बत्तासा साखरचा राजबिडा
तान्ह्या ग बाळीशाचा अप्रुवाईचा लई मेवा
शेजीला कशी सांगू कडे उचलून घ्यावा

त्यासरशीं मग मी पुढं झालें न् बघतेंय तर काय? आभाळींच्या चंद्रानं चांदण्यांच्या मेळाव्यांत डुलावं तसा विठुदेव हातांत वीणा घेऊन भजन करतेला न् भोंवतीं साधुसंतांचा मेळा नाचतेला! ते बघून माझी तहानभूक हारपली आणि मी ती तुळशी-माळा एकदाचा लांबून देवाच्या अंगावर झेलली तर काय बाई चमत्कार? पतिव्रता चंद्रभागा भावजई पुढं आली न् तिनं माझे पाय धरून मला नमस्कार घालीत ती तुळशीमाळा झेलली. तशी राऊळांत हा गलका उडाला. लोक म्हणाले कीं, चंद्रभागा आली! पाणी चढलं. आणि सांगायचं म्हणजे मी होतें तिथंच आणिक—

भरली चंद्रभागा लाटा मारीती गुलालाच्या
निऱ्या आवरी पैठणीच्या रखमाबाई

भरली चंद्रभागा पाना फुलांची केली नाव
आत बैसली रुक्मीन ओलें हानीतो विठूदेव

भरली चंद्रभागा तुळशीमाळांचं झालं वज्जं
सावळ्या पांडुरंगा शिरीमंता लेणं तुझं

पंढरींत अशी धांदल उडालेली. तर मला काय वाटलं कीं, निदान आतां तरी केश-राजाचं दर्शन आपसूक घडेल. म्हणून आपली हात जोडून उभी राहिलें तर कोण कोण अशा आल्या कीं, जरा पाऊस येतांना माझ्यापाशीं बसायला. तशी म्हटलं येऊं देत. विठूदेव नावाडी होऊन कामाला लागलाय् तर तो माघारीं येस्तोवर बसूं गोष्टी करीत एकमेकींत. म्हणून मग मी एकीला विचारलं, "एकल्याच आलासा का संगं हाय कारभारी वो?"

आतां ह्यावर त्या बाईनं सरळसरळ काय तें सांगावं कां नाहीं? माझ्यावरच्या पदरावरचा झिरीमिरता पाऊस झिजाडून टाकीत ती म्हणाली

आई परायास सासूबाईचा उपकार
दिला प्रीतीचा चंद्रहार
भरतार राजस पूर्वजन्मीचा कोणबाई
माता आठवून दिली न्हाई
गोड भरताराचा सुक रातीं सांगता अंगनीं
तारा तुटला गगनीं

आणि मग एकदम हुंदक्यानं दाटली तशी दुसरीनं खुलासा करावा त्याप्रमाणं मला सांगितलं–

वळवाचा पाऊस कुठं पडतो कुठं न्हाई
भरताराचं सुख घे ग मानून येडे बाई

पण मग दुसरीच्या शेजारचीनं तिला विचारलं, "सोसावं कुठंवर पण मी म्हनतें? लगीन करायचं असतं कशापाय?–
राजसाच्या जीवावरी न्हाई कशाची दगदग
पाण्याच्या जीवावरी लहऱ्यामारती फुलवाग
असं पाइजे कां नको ? काय?"

त्यामुळं मला वाटलं की, आपण उगीच विषय काढला. कारण ती रडतेली बाई डोळे पुशीत पुशीत मला म्हणाली कीं–

"विठूदेवा राजसा तुजी घरमाची मी लेक
माज्यग्रजल्माची तूच करावी देकरेक

असं सांगावं म्हणून आलेय. न्हवरा का भवरा म्हनायचा त्येला न्हाई माजी आगत."

त्यावर मी गप्प राहिलें. पण त्याच मग एकमेकींत बोलत सुटल्या.....

पावसा वाचून वल न्हाई जमीनीला
कंथा राजसा वाचूनी सुक न्हाई कामीनीला.

"सगळं खरं. पन आणावं कुणाच्या बाचं ?"

"मायबापांच्या राज्यांत आंबराई लुटायला मिळतीया पन भरताराच्या बागशाईचा अंत नसतो म्हनत्यात."

"म्हनूं द्यात म्हननारं."

"मस्त घरांत सरतां सरंता एवडं हाय. मोत्यांची झुंबरं दाराव लोंबत्यात. पन ह्या हक्काच्या मालकीची ही तऱ्हा !..."

"अग, त्यो हिला चमेलीसमान मानतो. पन ही मातूर त्येला देवासमान लेखतीया–

हात मी जोडीतें तुळसीसंग नारायणाला
हळदीवरी कुंकू नित असूं दे शिनगाराला

अशी हिची भावना."

"चालायचं ! ज्येचं त्येला दंडतंया..."

तेवढ्यांत "विठ्ठल रखुमाई परतली. पंढरी गांव संकटांतून सुटल्याची दवंडी पिटली गेली. आणि मग राऊळांत पुन्हां हरिनामाचा गजर सुरूं झाला." असं कोणतरी सांगीत आलं. म्हणतांना ह्यांचं बोलणं गप्प झालं. म्हणून मी गडबडीनं आतां देवळांत जायला उठणार तर तेवढ्यांत "कधीं आलीस बाळ?" अशी विचारपूस करीत स्वत: विठूदेव माझ्या समोर आला न् संगं जनाई. तर —

सात पदरी कंठीवर शोभे मुरडीची सरी
देव आले सामोरी चांद उगवला दारी

अशी प्रभा फांकली. म्हणतांना सारं राऊळच मागं परतलं न् माझ्यापुढं पुन्हां ही गर्दी दाटली.

पण विठूदेवाचं लक्ष होतं नामदेवाकडे. त्यांनीं नामदेवाला हांक देऊन सांगितलं कीं, "राऊळांत चोरी झालीय तर गस्त घालावी."

झालं. मग नामदेव महाराज दिल्या कामाला निघाले. लोकांची तपासणी झाली. जनाईनं एवढंसं तोंड केलं. पण ज्यांनीं तिला ऊन लागूं नये म्हणून गोपाळपूरच्या रस्त्यावर दाट चिंचबन लावलं ते काय तवा देणार नाहींत का? पण हे तिला कळूं नये ? तिला उजेड दिसावा म्हणून देवानं कायमची चंद्रज्योत वाटेवर लावली तरी हिनं भांवावून जावं म्हणजे ? मला तर कळलं नाहीं बाई हिचं मन. म्हणून मी रुक्मिणीला कांहीं विचारावं म्हणालें. तर तेवढ्यांत घनदाट यात्रा पांगली. विठूदेव गाभाऱ्यांत गेले. आणि मग—

पंढरीचा हरी हरी बसला दाटणी
पांडुरंगाची माजी चरणं येईना वाटणी

असला प्रकार झाला. तर तितक्यांत–

ववी मी गाईली नित विठ्ठल हिऱ्यायाला
आली हाई रुक्मीन मोती गुंफीत तुऱ्यायाला

असं घडलं. म्हणतांना विठूदेवाच्या चंद्रहारानं दिपलेले डोळे मी गरुड खांबावर टेकवले व्हते ते काढून हिच्याकडे वळवले. पहातेय तर ही आपली दारांत सडा टाकून रांगोळी घातलेली. अंगावर जरीपैठणी पायघोळ ल्यालेली आणि दंडावर हिरकणी चोळी घातलेली. साडेतीनशें मोतीं गुंफलेली जोडवीं ल्यालेली न् भांगांत तुरा ल्यालेली. अंगावर हिऱ्यामाणकांचा झगमगाट. मी बाई तिला जशी पहातच राहिले.

तेवढ्यांत गोरगरीब, संत मंडळी न् पावणेरावळे आले कीं राऊळांत ! तशी ही सरसावून उठली न् कामाला लागली. अंगं सैंपाक रांधला न् पंक्ती वाढीत चालली. जशी काय चंद्रसभा बसलीय न् सूर्याची कन्या राधिका आपल्या बत्तीस लक्षणांसह तिथं वावरते आहे असाच देखावा दिसावा! म्हणून मग मी तिथं टक लावून बघत उभी रहाणार पुन्हा आपला–

विठ्ठल देव बोल नीस रुक्मिणी गहू डाळ
साधूची आली दिंडी ऐंशी पक्वाज नऊशेटाळ

असा राऊळांत दणका उडून गेला! आणिक–

विठ्ठलदेव बोल सोड रुक्मीनी माजी वंडी
आल्याती साधुसंत संगं घेऊनी लाख दिंडी

विठूदेवाची ही धांदल उडून गेली. त्या कारणानं मी आपली दरवाजाशींच एका कोन्यांत उभी हं ! या धांदलींत माझं घोडं आणिक कुठं पुढं दामटं ? नाहीं कां? तर तितक्यांत काय गंमत झाली कीं,

पंढरीची वाट कशानं ग सादळली
कावड ग बाई एकनाथाची हिंदळली

अशी वार्ता आली न् मागोमाग कोणतरी बोललं-
प्रदक्षिणेच्या वाटेला दिंडी कशानं थटली
तार विण्याची तुटली
प्रदक्षिणेच्या वाटेला हिऱ्यामाणकाचे खडे
साधु नाचतो देवापुढें

म्हणतांना मग मी आपली रुक्मिणी देवीला बघावी म्हणाले तर ती—

पंढरपुरामंदीं गल्लो गल्लीनं लाल माती
रुक्मीन सारवीती रंगम्हालाच्या आडभिती

ह्या कामांत दंग असलेली. आणि सांगायचं म्हणजे ह्या गडबडींत विठुदेव कुठाय म्हणून राऊळांत बोभाटा झाला तर तो–

पंढरपुरामंदीं तुळशी आल्यात दुरड्याला
सावळी पांडुरंग वीणा वाजवी भोरड्याला

अशी थाटांत तुळशीबनांत उभा असलेला मला दिसला ! म्हणून मी तिकडे जाऊन तुळशीला न् देवाला नमस्कार घालावा म्हणालें तर तितक्यांत—

राना मांगली तुळस
पाना फुलांनीं फुलली
पैंजणाच्या भारूभार
गवर कशीग लवली

हे गीत गात रुक्मिणी न् राऊळांत दर्शनाला आलेल्या बायका फेर धरून गीत गातेल्या तशी बाई मी धूम पळत त्यांना गांठलं न् त्यांच्या खेळांत सामील झालें. तर रुक्मिणीनं गीत सांगितलं. म्हणाली कीं—

नदीच्या पल्याड सातजनी गौळणी
आल्या रं आल्या बाळा माज्याच गडणी
शेला नेसूनी पिवळा
मधुपका काचोळी
सोन्या रुप्याच्या भिंती ऐका ग साजणी
आडकित्याचा देव्हारा
करा देवाचीच पूजा.
मग तूं जेव बा गोविंदा
असा कसा जी जेवीन न्हाईला नथ घडवीत
घडवूनी मोडूनी तिला रवा जी जोडीतो...

आणि मग असा त्या खेळगाण्याला रंग भरला कीं, मी देवळांत जाऊनच काय श्रीमंती भोगावी ? •••







अनुक्रमणिका

# प्रत्येक आघाडी अटीतटीने लढवा







दिवाळी म्हणजे दुर्जनांवर सज्जनांची, असत्यावर सत्याची मात! आपणहि परकीय आक्रमकांवर व आपल्या अंतर्गत उणीवांवर विजय मिळवून समृद्धीच्या आणि भरभराटीच्या दिशेने वाटचाल करूंया. दुप्पट जोमाने काम करण्यासाठीं आपण स्वतःला वाहून घेऊंया; आणि खर्चात काटकसर करून आपली बचत राष्ट्ररक्षणाच्या आणि प्रगतीच्या कारणीं लावूंया!



**प्रगतीचा नंदादीप सतत तेवत ठेवा!**

**जयहिंद**

महाराष्ट्र सरकारचे प्रसिद्धी संचालक, मुंबई.













गार्डीखालीं जीव देणारा कुशाभाऊ भ्याड, डोंगरावरून आपलं प्यारं शरीर फेंकून देणारी वासंती भ्याड कीं, मरणें देखील ज्याला नीट जमलें नाहीं तो मी भ्याड ?—कोण ? कोण ?? कोण ???



—जितेंद्र अभिषेकी

लिंगायत स्वामींच्या मठांत शरण वसवेश्वराचीं भजनं ऐकून अंतर्मुख झालेले मी व वंडा कुलकर्णी एकमेकांशीं काहींच न बोलतां गुलवर्ग्याच्या त्या भयाण दिसणाऱ्या रस्त्यांतून चाललों होतों. घनाश्रीची वेळ असेल. मी व वंडा रस्त्याच्या एका वाजूनें, आणि गुलवर्ग्यांत पदोपदीं दिसणारे महारोगी दुसऱ्या वाजूनें. वंडा चिडून म्हणाला, "साले कुठून येतात आणि जातात कुठं, कधींच समजलं नाहीं. "चिक्कप्पा, रुद्राप्पा, यल्लव्वा आणि यासीन सोडल्यास वाकी सगळे महारोगी गुलवर्ग्याला— वाहेरून आलेले. रोज नवीन चेहरे दिसतात. रोज नवीन वेदना, नवा निर्लज्जपणा, आणि नवी लाचारी. मरण जगून साले आम्हांला हंसतात." डोळ्याची खोवण झालेला यासीन तर घरासमोर अमीरांच्या थाटांत उभा राहून 'तुम्हें तो लाज रंहे अपने आस्ताने की' असं मुर्दाडासारखं ओरडतो."

वंडा बोलतच होता. मी समोर पसरलेल्या अवाढव्य दर्ग्याकडे पहात वंडावरोवर चालत होतों. हसन गंगू वहामनी कां कुणाचा तरी दर्गा. आगऱ्याला जाऊन ताजमहालकडे ज्या निर्विकार नजरेनें मी पाहिलें होतें तीच दृष्टि आतांही होती. लोक पहातात, छान म्हणतात, सुंदर, भव्य म्हणतात म्हणून मीहि म्हटलं. दर्गा मोठा ऐसपैस होता. मुसलमानांच्या भव्यतेच्या आणि अस्ताव्यस्तपणाच्या सगळ्या खुणा इथं देखील होत्या. दरवाज्यांतून आंत गेल्यावरोवर लहानपणाच्या टॉयफॉयडची आठवण करून देणाऱ्या धुपाचा आणि सव्जाचा तिरमिरी आणणारा वास सगळ्या नाकांतून फटीफटींत घुसून बसला. निळ्या काळ्या फरशीनें गच्च भरलेला चौक ओलांडून मी व वंडा दर्ग्याच्या शेवटच्या टोंकाला येऊन उभें राहिलों. या टोंकाला साठ फूट उंचीची वुरुजी भिंत उभी होती. आणि खालीं अफाट हातपाय पसरून पडलेलें मैदान. तुटून पडूं पहाणारें निळें निळें आकाश.

असें कांहीं भव्य पाहिलें कीं, चीड येते. खुरटेपणाची, खुजेपणाची जाणीव मोठी वेशरम आहे. येऊं देणार नाहीं म्हटलें तरी येते. आयुष्यांतल्या संधिसाधु आणि क्षुद्र कृत्यांची सणक देऊन भणभणून सोडते. दर्ग्याच्या एका भल्यामोठ्या वुरुजानें अरव्यांची गांवठी नक्कल करणारी वांग घातली. वंडा म्हणाला याला मुसलमान अल्फातिहा आणि 'सूरत-ई-इखलास' म्हणतात. मला कांहींच कळलें नाहीं आणि वंडाला तरी ठाऊक होतें कीं काय कुणाला माहीत! समोरच्या मैदानांत मघांचेच महारोगी चुली पेटवीत वसलेले दिसले. भात शिजवतां शिजवतां अर्वाच्च्य आणि अभद्र बोलत होते.

दुसऱ्या एका कपारीच्या तळाशीं बोट दाखवून वंडा म्हणाला "ती, चुलीसमोर वसलीय् ती यल्लव्वा. वसवाणकर पाटलाच्या रखेलीची मुलगी. महारोग झालाय् पण अजून चांगली दिसते, म्हणून लोक भीकहि पसे भरून घालतात, आणि दुरून लंपटासारखे हिच्याजवळ वघतात. दहा वर्षांपूर्वी गुलवर्ग्यांत हैदरावादकडचे रानडे नांवांचे डिस्ट्रिक्ट जज्ज आले होते. वरींच वर्षे हा म्हातारा वसवाण पाटलाला चोरून यल्लव्वाच्या आईकडे संबंध ठेवून होता; आणि रानड्यांचा कुशाभाऊ यल्लव्वाच्या

मागें गोंडा घोळत होता.

कुशाभाऊ हा रानडयांचा मोठा मुलगा. नुकताच वकिली पास झालेला. गोरागोमटा आणि खूप बोलका. यल्लव्वा त्यावेळीं शाळेंत शिकत होती. पण, कळूं नये त्या वयांत तिला खूप कळत होतं. याचा फायदा कुशाभाऊनं घेतला. यल्लव्वाला दिवस गेले. यल्लव्वाची धाकटी बहिण सांगे, कुशाभाऊनं यल्लव्वाला लग्नाचं वचन दिलं होतं. लग्न होऊन मुंबईला जायचं. यल्लव्वा आपलं वाढलेलं पोट घेऊन दिमाखानं गुलवग्र्यांत फिरत असे. आणि एक दिवस कुर्डूवाडीच्या आसपास रेल्वेच्या फाटयांत एक छिन्नविच्छिन्न झालेलं प्रेत सांपडलं. प्रेताच्या कोटांत कुशाभाऊची सनद होती. लोकापवादाच्या दणक्यानं कुशाभाऊचा बळी घेतला.

वंडा कितीतरी वेळ असाच वडवडत होता. कुशाभाऊचा बाप पोराच्या प्रेताकडे पाहून म्हणाला—

"रानडयांचं पोर म्याडासारखं मेलं."

"पोरानं सगळं नाकारलं असतं तर...."

एवढें बोलून बंडा यल्लव्वाकडे टक लावून पाहूं लागला. मीहि पहात होतों. यल्लव्वा कांहींच न घडल्यासारखी चुलीसमोर बसून यासीनशीं लगट करीत होती. माझे विचार मात्र वेलगाम उधळले होते. रानडे म्याड होता! माझ्यासारखाच म्याड! पण निदान मेला तरी. मी मात्र मरणाला घावरलों. पळालों. डोंगरावरून धूम पळत सुटलों, आणि कांहींच न घडल्यासारखा आजपर्यंत वागतोय्. सभ्य म्हणून मिरवतोय्. लोक देखील मला फारच चांगला आणि भला माणूस म्हणतात. लुमा, आमच्या घरांत जिनगी घालविलेला कुणवी मात्र याला अपवाद. त्या दिवशीं भर दुपारीं तो एकटाच त्या रिकाम्या दिसणाऱ्या फोंडयाजवळच्या डोंगरावरून बुधवारचा बाजार करून परत घरीं चालला होता. घामाघूम झालेला, अंतर्बाह्य उडालेला मी धांवत, ठेंचाळत मागचा पुढचा विचार न करतां डोंगर उतरत होतो—"काय धन्या आज धांवतां कुठें, पळतांसे?" लुमानें नेहमींसारखंच मिस्कीलपणानं मला विचारलं.

"खूप उशीर झालाय्, शास्त्रीबुवा घरीं येऊन बसले असतील."

कांहीं तरी उत्तर देऊन मी तसाच पळालो. जीव घेऊन पळालो.

आणि दुसऱ्याच दिवशीं गुरं चरवायला घेऊन गेलेल्या लुमाला, छिन्नविच्छिन्न झालेलें वासंतीचें प्रेत सांपडलें. "अब्रूचे धिंडवडे होण्याची वेळ आलीय् म्हणून जीव देतें." या अर्थाची चिट्ठीही मिळाली होती.

लुमा घरीं आला आणि मला म्हणाला "काय धन्या? काल खूप धांवलांत. असं पळून जाणं वरं नव्हे."

लुमा एवढंच बोलला आणि गप्प झाला. पुन्हां कधींच बोलला नाहीं. आजपर्यंत कधीं बोलला नाहीं. त्यानें बोलावें, मला जाव विचारावा, मी त्याला सगळें सांगावें असें खूप वाटतें पण लुमा सगळें कांहीं माहीत असल्यासारखा वागतो. मला स्वतःची जन्मभर शरम वाटावी असाच वागत असतो.

वासंतीचा आणि माझा चोरटा संबंध जाणणारा तो एकटाच या जगांत होता. त्यानें आम्हांला भेटणें सोपे व्हावें म्हणून आपली गावांबाहेर असलेली झोंपडी देखील आमच्या स्वाधीन केली होती. रात्रीं अपरात्रीं वासंतीला भेटण्यासाठीं मी भुतासारखा तिथें खेपा टाकीत होता. लुमाला, फक्त लुमालाच हें माहीत होतें. आमच्या वाडवडिलांचे सगळे धंदे पाहिलेला लुमा मलाहि जाणून होता. हें असेंच चालायचें अशा निर्विकारपणानें वागत होता. आयुष्यभर अन्याय भोगलेला आणि इतरांवर झालेले अन्याय डोळयांनीं पाहिलेला लुमा, अन्यायाचा प्रतिकार करणें शक्य असतें या विचारानांहि पारखा झालेला. आणि या सर्व वेदना लुमाच्या डोळयांत सांठल्या होत्या. सगळं कांहीं निस्तरल्यामुळें आतां बेदरकारपणें जगणाऱ्या मला, लुमा आपल्या त्या वेदनामय नजरेनें सदा अस्वस्थ करीत असे.

वासंतीला दिवस गेले, तिनें हें मलाच सांगितलें, दुसऱ्या कुणालाहि नाहीं. आईला देखील संशय येऊं दिला नाहीं. कांहींही सुचत नव्हतें. शेवटचा उपाय म्हणून मी व वासंतीनं फोंडयाच्या त्या डोंगरावरून आत्महत्या करण्याचें ठरवलें.

बुधवार, बाजाराचा वार. घरचे सर्व वडीलधारे बाजाराला गेलेले. वासंतीला मी पुढें जाऊन माझी वाट पहायला सांगितलें. तिनें कांहींतरी ठाम निर्णय घेतला होता. मी मात्र मनांतून घावरलों होतो. मरणाला घावरलों. मी जाणून बुजून उशीर केला. आणि टरल्यावेळेपेक्षां उशीरां डोंगरावर गेलो. माझी वाट पाहून वासंतीनें निराशेनें डोंगरावरून खालच्या दरींत देह फेंकून दिला होता. कपारीच्या तळाशीं वेडीवांकडी पडलेली वासंती मला हंसून बोलवत होती..... आणि तरीहि मी घावरलों जगण्यासाठीं मरणाला घावरलों. धूम पळत सुटलों. त्या स्थितींत पळणाऱ्या मला, लुमानें—फक्त लुमानें पाहिलें.

लुमानें मला लहानपणापासून अंगाखांद्यावर वाढवलें. मला पाहून लुमा हजार तोंडानीं हंसायचा. पण त्या दिवसापासून लुमा कधींच हंसला नाहीं. वासंतीची आई यमुना मी, खूप खूप शिकलो, मोठा झालो म्हणून माझी गांवीं गेल्यावर आजहि दृष्ट काढते.

कुणालाच माहित नाहीं. वासंती कां मेली. क्षोभ उडविणाऱ्या क्षणीं वाटतें लुमानें हें सगळें गांवाला ओरडून सांगून टाकावें. आणि पुन्हां मी भितों. म्याड म्हणून घालविलेलं कालचं आणि आजचं जीवन जगतो. लुमाला टाळतो.

* * *

अंधार पसरत चालला होता. मी व वंडा कुलकर्णी अजूनहि हसनगंगू बहामनीच्या त्या दर्ग्याच्या कोपऱ्यांत बसलो होतो, इतक्यांत यल्लव्वाची, कुणींतरी महारोग्यानें टिंगल केली. यासीन त्याच्यावर लांडग्यासारखा तुटून पडला. या मारामारींत सगळे महारोगी सामील झाले. हलकल्लोळ माजला होता.

माझें मात्र या प्रकाराकडे लक्षच नव्हतें. मी स्वतःला पुन्हां विचारीत होतों.

"रानडयाचं पोर खरंच म्याडासारखं मेलं कां?"

रानडयाचा कुशाभाऊ म्याड, वासंती म्याड कां मरणें देखील ज्याला जमलें नाहीं तो मी म्याड! ●●●








मला वाटलं, एकतर हिनें मला हिंस्रपणें मुस्कटांत तरी मारायला हवी होती किंवा पाशवी आवेगानें माझ्यांत सामील व्हायला हवं होतं. —मी अकल्पितपणें तिथून बाहेर पडलों




दिलीप पु. चित्रे

केमिस्टच्या दुकानाजवळ आल्यावरोबर माझी छाती धडधडायला लागली. माझ्याजवळ प्रस्क्रिप्शन नव्हतं. मेथिड्रिन सहसा प्रिस्क्रिप्शनशिवाय मिळत नाहीं. प्रिस्क्रिप्शन नसलं तर डॉक्टरचं नांव आणि पत्ता सांगावा लागतो. लहान दुकानांत प्रिस्क्रिप्शनची जरूर पडत नाहीं. सफाईनें औषध मागितलं कीं झालं — पण मोठीं दुकानं ड्रग्ज् ॲक्ट कसोशीनं पाळतात – गिऱ्हाईकच ड्रग्ज इन्स्पेक्टर निघाला तर ? मी कधींच स्वत: मेथिड्रिन खरेदी केलेलं नव्हतं.

मग मनाचा हिय्या करून मी मेथिड्रिन मागितलं. काऊंटरवरला माणूस तात्काळ बाटली घेऊन आला. "प्रिस्क्रिप्शन ?" त्यानें विचारलं.

"ओ, हेल् !" मी स्वत:शीं पुटपुटल्यासारखं केलं. "आयव्ह् फर्गॉट्न् इट् होम्. नेव्हर् न्यू यूड् आस्क् फॉर इट्. आय् नो द नेम ऑफ् द ड्रग् व्हेरि वेल्, एनिवे."

"नेव्हर माइंड् सर्. दॅट्स् ओ. के. सुटलो ! पैसे चुकते करण्यापूर्वी मी उगाचच आणखी एक नको असलेलं औषध घेतलं. उगाच ह्याला संशय यायला नको.

खरं म्हणजे ही धडधड अनावश्यक होती. मी कांहीं गुन्हा करत नव्हतो. माझं मन उदास झालेलं होतं. सगळं सुनं सुनं, एकटं एकटं वाटत होतं. म्हणून मी हें हर्पजनक औषध घेत होतो.

जहन्नम्‌मध्यें गेले केमिस्ट् आणि पोलिस्.

जेमतेम चार वाजलेले असतील.

मी एका इराण्याच्या हॉटेलांत शिरलो आणि वेटरला प्रथम ओपनर आणायला सांगितला. बाटलीचं बूच मी काढून टाकलं आणि तळहातावर दोन गोळ्या घेऊन कोका कोला मागवला.

कोका कोलाचा एक घोट घेऊन प्रथम घसा ओला केला आणि दुसऱ्या घोटाबरोबर त्या छोट्या, पांढऱ्या गोळ्या गिळून टाकल्या.

सगळा कोका कोला संपवायला मला पंधरा मिनिटं लागली. चार पंचवीसला मी बिल् चुकतं करून उघड्यावर आलो आणि बीच् कँडीच्या दिशेनं चालायला लागलो. उन्हं कलत होतीं. समुद्र झिलमिल करत होता. सगळं शांत किंचित् खारट, आणि पुष्कळ उजळ होतं. मी आपोआप झप्‌झप् चालायला लागलो. नुकताच मला नव्यानं घाम फुटत होता रस्ते भयंकर स्पष्ट होते. साला सताड सताड सडेतोड सफेद मार्ग. दोन गोळ्या नुक्त्या डाय्‌जेस्टिव्ह ट्रॅक्टवर पोंचलेल्या. बाहेर मी जातोय् - घाईतच.

हाजी अलीपर्यंत आलों तेव्हां माझ्या लक्ष्यांत आलं कीं आतां हें द्रव्य रक्तप्रवाहांत मिसळून मेंदूपर्यंत पोचलंय्. माझ्या मेंदूमधलीं केंद्रं भराभरा उघडत गली. रस्ता अजून होता. लांव लोटस् सिनेमा दिसत होता. मी पिक्चर बघणार नव्हतो. मी काय करणार होतो हें नक्की नव्हतंच.

वरळी नाक्याला पुन्हां एका रेस्तॉरांत जाऊन मी आणखी एक कोका कोला आणि आणखी दोन गोळ्या घेतल्या. मला केव्हांहि शब्द फुटणार असं वाटत होतं. मनावरलो जाड छतं भराभर वितळत होती, फक्त तळ, तळ, दिसत नव्हता. कोणाहि माणसाजवळ जाऊन त्याच्या खांद्यावर हात टाकून मी म्हणालों असतो, "यार, माझी गोष्ट ऐक..." माणसं, माणसं, माणसं, सगळीकडे माणसं. "यार—" आणि मुली, बाया. लहान मुलं. कलंडलं माझं मन एका रासायनिक मोकळेपणांत. ह्या क्षणीं माझ्या






अनुक्रमणिका

हातांत पेन असतं तर जगांतलं सर्वोत्कृष्ट महाकाव्य मी वरळीपासून थेट वाडचापावेतों फाळलं असतं. पण महाकाव्याची जरूरच नव्हती. रस भयंकर स्पष्ट होता. सूर्य बुडायला टेकला होता. दोन्हीं बाहू भरभरून गर्दी रस्ताभर ओसंडत होती. बोलण्याऐवजीं, हंसण्याऐवजीं, रडण्याऐवजीं मी फक्त नेहमींसारखा चालत होतो. रस्ता सतत उपलब्ध होत होता.

नाक्यावर पान घेऊन मी तोंडांत जरा तंबाखू घोळला. माझं रक्ताभिसरण, श्वासोच्छवास् प्रचंड वेगानें होत होता. जगं नांगरली जात होती, जमिनी उघडल्या जात होत्या. मला एकाएकीं आत्यंतिक नेक झाल्यासारखं वाटलं. धारदार प्रामाणिक पाजळ. माझा तटस्थपणा नाहींसा झाला होता. उघडचा रस्त्यांत मी संपूर्ण नागडा होऊन चाललों होतो — बुलंद आणि नेकजात. माझ्यासमोर प्रांजल सत्यं होती. माझी भाषा एकाएकीं गच्च भरली होती आणि खरी झाली होती. आतां दांतादांतावर तजेला विलसत होता. –उच्चार, संभोग, चालणं, बोलणं, रंगवणं, जाणं— सगळं सरळ-झोंक दरीसारखं होतं आणि कडेलोटाची ताकद माझ्या अंगांत आली होती.

• • •

उत्तुंग रात्र. सम्राट रात्र. मुंबईची उभार उंच लक्ष लक्ष रात्र. शुभ्र लखलखीत दिव्यांच्या क्रूर उजळ हास्यांमधून मी माझा कोंवळा नागडा निर्भय जीव भराभर उघडा पाडत जातोय्. उच्छवासांसारखे वापरून निकामी झालेले गतवैभव वारे. सैराट मोटारी. उत्तुंग रात्र. सम्राट रात्र. खुनी आणि आत्मघातकी रस्ते. तडकच्या सडका. मी शब्दाला मोताद. मी लखपति.



• • •

आणि घडण्याचा क्षण येतो तेव्हां मी गाफील गारेगार कारागीर, झोतभट्टचांत झोंप घेत असतो. थेट, माझ्या प्रामाणिक वेगांत, मी एका मैत्रिणीकडे चालत गेलो. जणुं काय मला दुसरीकडे जातांच येत नव्हतं. जणुं काय ही एक भेट अटळ होती. आणि ही एक भेट अटळ होतीच, कारण ती अडवणाऱ्या भिंती आजवर अटळ होत्या. वागणुकीचे कायदे आणि संकेत अटळ होते.

• • •

ही स्त्री, अलभ्य, बेदरकार श्रीमंत, अव्याज पापमुक्त, संकेतबाह्य, अपरंपार स्वप्नांच्या रक्तामांसानें घडवलेली ही स्त्री अस्तित्वांतच नाहीं. अस्तित्वांत नसली तरी ती एखाद्या स्पोर्ट्स् कारप्रमाणें सदैव वेगावर टेकलेली असते. मी शर्यत धांवतो; तर्र्, सुंसाट. मी वळणावर उलथतो आणि तिचा चक्काचूर होतो. मी छिन्नविच्छिन्न होतो आणि माझ्या मस्तकांत नुसते बेफाम ट्रॅक्स् गरगरतात.

ती आंतल्या खोलींत होती. तिची आई बाहेर जायला निघाली होती, ती म्हणाली, "कसं काय ? मुलगा कसा आहे तुमचा ?" "बरा आहे," मी म्हणालो, "बाहेर जायला निघालांत काय ?"

"हो. हिला म्हटलं जरा भाजी आण. ती म्हणते कंटाळा आलाय्. काय करणार, तरण्या मुलांना थकवे येतात — म्हटलं आपणच जावं. बसा, बसा. बऱ्याच दिवसांनीं आलांत. मी आत्तां आलेंच." – जणुं काय मी ह्या म्हातारीलाच भेटायला आलों होतो! मी नुसता हंसलो. ती आली.

तळपायापासून मस्तकापर्यंत आग. शरीर म्हणजेच एक आसन्न संताप – आणि तरी भयंकर शांत. भयंकर, भयंकर स्फोटासारखी शांत. "पुष्कळ दिवसांनीं आलास," ती म्हणाली. "तीन-चार वर्षांनीं". मी म्हणालो, मी ठार वेडा झालों होतो, फक्त अशक्य गोष्टीच आतां माझ्या हातून घडायच्या होत्या. "सहज ? माझी आठवण कशी झाली ?"— ती सहज कृत्रिमपणें म्हणाली.

मी हेतूनीं खचून गेलो होतो. तूं, तूं – हें तुझं भरदार पाशवी लावण्य, पाशवी आडमुठेपणा, अकलेचा अभाव, भावनेचा अभाव, मनाचा अभाव, idiocy, imbecile, तूं–तूं, एकदां केव्हां तरी तूं मला हवी हवीशी वाटली होतीस आणि एकदां इच्छा होऊन न झालेल्या गोष्टी माझ्या मनांत वर्षानुवर्षं घडण्याच्या आविर्भावांत उभ्याच असतात हें तुला स्वच्छ सांगायला मी आज आलोंय्.

"मी मेथिड्रिन घेतलंय्" मी म्हणालो, "आणि मला भयंकर एकटं वाटतंय्."

"मेथिड्रिन ? म्हणजे काय असतं ?"

मी खिशांतून बाटली काढली आणि म्हणालों, "हें. हें मेथिड्रिन. हें एक युफोरिॲक औषध आहे – तें घेतलं कीं मेंदू उत्तेजित होतो — बोलावसं वाटतं – प्रामाणिकपणें मन मोकळं करावसं वाटतं – कल्पनाशक्तीला आणि स्मरणशक्तीला उत्तेजन मिळतं –" माझं वाक्यं उंच स्वरावरच संपलं. जणुं काय त्याला शेवट अधांतरीच होता.

"पण हें तूं कशाला घेतलंस् ?"

"सहज."

तिला काळजी वाटत होती. घरांत कोणी नव्हतं. माझे डोळे सुजल्यासारखे आणि लालसर दिसत होते. माझा आवाज एखाद्या धमकीसारखा प्रत्यक्ष आणि तांतडीचा होता.

"मी तुझा विनयभंग करायला नाहीं आलोंय्." मी म्हटलं, "मला फक्त बोलायचंय् तुझ्याशीं. तुला नको असेल तर मी जातो."

विनयभंग ह्या शब्दानें ती चरकलीच. एवढ्या सहासात वर्षांच्या आमच्या ओळखींत मी कधींच अशा रीतीनें बोललेलों नव्हतो. "आणखी एक —" मी बोलत गेलो, "माझं तुझ्यावर प्रेमबीम कांहीं नाहीं. हे शब्दच मला कळत नाहींत. माझी एक इच्छा मात्र मी आजवर दडपलेली होती ती तुला सांगून मोकळा व्हायला आलोंय्. तुला पहिलून पाहिलं तेव्हांपासून मला तुझ्याबद्दल आकर्षण वाटत होतं. कां, तें मला सांगतां येत नाहीं. तुलाहि माझ्याबद्दल आकर्षण होतं हें मला ठाऊक आहे–" मला तिचा चेहरा लालबुंद आणि भराभर पांढराफटक पडत जातांना दिसत होता "मला फक्त जें खरं आहे तें नागडं करायचंय्. No, I've not gone mad. I'm terribly I'am terribly sane. तूं मला पुस्कळदां नकळत केल्याप्रमाणें स्पर्श केलेस. तूं माझ्याशीं बोलतांना कावरी बावरी झालेय्स्. Let's face it— आपल्याला एकमेकांबद्दल आकर्षण वाटलंय् आणि आपण तें दडपलंय् – आज संध्याकाळीं मला हें आठवलं, असह्य झालं, आणि मोकळं होऊन जायला मी इथें आलो. आत्तां आपण एकटे आहोंत, आणि तुझ्यांत ताकद असली तर तूं हेंहि ऐक—ह्या क्षणीं मला तूं हवी आहेस."

ती हतबुद्ध झाली होती, तरी तिचे कान माझ्या वाक्यांवर खिळलेले होते.

"– मला ठाऊक आहे, तूं मला ह्या वेळीं हें बोलल्याबद्दल मुस्कटांत मारूं शकतेस, सुसंस्कृत शब्दांत माझी निर्भत्सना करूं शकतेस, गप्प बसूं शकतेस. पण हा विषय बदलूं देणार नाहीं मी तुला. मी तुला जबरदस्तीनें कांहींच बोलायला किंवा करायला लावणार नाहीं. मला स्वानुभवानें ठाऊक आहे कीं मध्यम वर्गीय मुलींशीं वागायची ही रीत नाहीं. तुझी आई गेल्यावर मी यापेक्षां



अनुक्रमणिका

धूर्तपणें, तूं बेसावध असतांनाच, तुला स्पर्श करूं शकलों असतो. आणि कदाचित् तूंहि आपोआप, न बोलतां मला हवं तें देऊन टाकलं असतंस्. किंवा कदाचित गेल्या तीन वर्षांत तुझं लग्नबिग्न जमलं असेल— अणि तूं एकनिष्ठ वगैरे राह्यचं ठरवलं असेल.... मला ह्याची कांहींच कल्पना नाहीं. मी तसा शरीरसुखाला आंचवलेला माणूस नाहीं. माझं लग्न जगांतलं अत्यंत समाधानकारक लग्न आहे — एक अतूट संबंध आहे. मला एक मुलगा आहे. मला शेकडों मित्र आहेत. आणि ह्या सगळ्यांची मला तुझ्याइतकीच गरज आहे. पण ह्या क्षणीं मला फक्त तुलाच आणि हेंच सांगायचं होतं. आत्तां मी तुझ्यासाठीं एकाकी झालोंय्. आत्तां मला जें सांगायचंय् तें तुलाच सांगायचंय् आणि आत्तांच तुलाच तें समजलं पाहिजे—" ताप चढून माणसाला जी एक एकाग्र, feverish sincerity यते, कोणतंहि अंगांगांतून व्यक्त होणारं, उच्चारलं जाणारं अघटित घडतांना जो निद्रिस्त एकात्मपणा जाणवतो — तो मला जाणवत होता. तें सगळंच चमत्कारिक होतं. एक सुसंस्कृत, वस्त्रभूषित तरुण स्त्री आणि एक सर्वस्वी नागडाउघडा कायमचा आदिवासी समोरासमोर एकत्र, एकटे, एकांतांत होते. आणि कोणाचीच पापणी लवत नव्हती. सगळं जगच अलभ्य, एकांतिक, एककल्ली, अव्यक्त, अमानुष आणि अटळ.

"प्लीऽज्" ती म्हणाली, "प्लीज्, कांहींच बोलूं नकोस. मला वाटतं तुला बरं नाहीं. घरीं जा. स्वस्थ झोंप."

सो, मला वाटलं—

You all get away with that superior feeling. Morally superior beings—all of you. Et moi? Poor, Poor, Penniless me! Bloody bitch! आणि तरी तूं केवढी लोभस वाटतेय्स् अजून मला.

माझ्या पायाखालीं सगळं सुसंस्कृत, परंपरा समृद्ध, ऐतिहासिक जग विखरून जात होतं त्या वेळीं.

एकाएकीं बेफाम वजनानें मी उठलो, तिच्याजवळ गेलो, आणि तिला अक्षरशः हातांमध्यें ओढून तिचं चुंबन घेतलं. ह्या चुंबनावर उभ्या जगाचं भवितव्य अवलंबून होतं. माझ्या आयुष्याचीं सव्वीस जिवंत तडफडती वर्षं माझ्या ओठांवर आलेली होती आणि अनोळखी मुखस्तंभ ओठांवर टेकली जात होती. माणसं एकमेकांकडे काय व्यक्त करूं धजतात तें मला कळून घ्यायचं होतं— इंद्रियांचा आकांत मांडून मी अखेरचा न्याय मागत होतो.

तिनें प्रतिकार केला नाहीं, प्रतिसाद दिली नाहीं. No Commitment.

मला वाटलं, एक तर हिनें मला हिंस्त्रपणें मुस्कटांत तरी मारायला हवी होती किंवा पाशवी आवेगानें माझ्यांत सामील व्हायला हवं होतं. मी अकल्पितपणें तिथून बाहेर पडलो.....

● ● ●

रात्र आणि मुंबईभर मी भटकत भरकटत होतो. हें म्हणून म्हणून चोथा झालंय्— पण खरोखरच काळोखांत एक जंगली आणि अस्खलित शुभ्र राजहंस सतत फडफडत जातो. तसंच चिखलांतल्या अनादि गारव्यांत हिप्पोपोटेमस् पहुडलेले असतात. विषुववृत्तावर कायदा संपतो. उत्तरार्धांत चांदण्या माखळून दिवस अवाढव्य होतात. माणूस एक नांगराचा फाळ आहे, पण जमीन हवी. सिमेंट कॉंक्रीटच्या भिंती, पोलादी रूळ, लोखंडी पायलन्स्, झगमगतें अमानुष दिवे, अफाट डांबरी रस्ते... ह्या सगळ्यावर मी कुर्बान होतो—— फक्त माझं रक्त सांडायला कुठेंतरी सुईच्या अग्रावर राहील इतकी भुई हवी. ●●●

( पान ३५ वरून – रागिणी )

–मला तुमच्यासमोर मुकीच होऊं दे. तुमच्या सहवासांत मुक्या होणाऱ्या इतर स्त्रियांचा मी हेवा करीत नाहीं. जें त्यांच्याजवळ होतं तें माझ्याजवळ असतं तर हेवा करण्याचा अधिकार मला आला असता. पण पुरुषाला देण्यासारखं माझ्याजवळ कांहीं नसलं तरी मी माणूस आहे, हेमंत. स्त्रीचं बळ माझ्याजवळ नसलं तरी स्त्रीचं दुबळेपण माझ्याजवळ आहे. मला तुमचा आधार हवा. सागराला किनारा हवा, हेमंत. किनाऱ्यानं सागराला आधार मिळतो, आकार येतो, अर्थ येतो.

–किनारा मला ठाऊक नाहीं, मंजू. म्हणूनच आजवर असा ऐल थडी ना पैलथडी भरकटत राहिलों आहे. माझ्यांत किनारा भासला तो टाळीत आलो. नुसतं भरकटणंच प्रिय होऊन बसलं. कसा होऊं तुझा किनारा?

–मला सतत तुमची ही भीति वाटत होती. म्हणूनच आजवर सारी तळमळ मनांतल्या मनांत सोशीत आले. तुमचा नकार सोसण्याची तयारी ठेवूनच आले आहे मी. पण मी मनांतलं मनांतच ठेवून, आलेली संधि गमावली नाहीं, एवढं तरी समाधान हवं आहे मला. या समाधानालाहि कांहीं अर्थ नाहीं, हेंहि मला कळतं. तेंहि सांगितलं माझ्या मनाला. पण ज्याच्यामुळं हें सारं वादळ उठलं त्या किनाऱ्यापर्यंत अंतरीचे उमाळे पोंचवल्याशिवाय सागराला चैन पडत नाहीं. किनारा दाद घेवो न घेवो. आणि किनारा दाद कशी घेणार नाहीं? तो पत्तरांचा असला तरी ओलावतोच, मऊ होतो, आणि कणाकणानं झिजतो. सागराला एवढंहि समाधान पुरतं, हेमंत. किनारा कधींच सागराला सोडून जाऊं शकत नाहीं.



तुम्ही खुशाल नकार द्या. माझा किनारा मनोमन माझ्या जीवनाला साथ देईल.

–मला वाटतं, आपलं बोलणं आतां एकमेकांना कळेनासं होतंय्. आपण आपल्या–आपल्या रिंगणांतून बोलतो आहोंत; आणि ही रिंगणं इतकी एकांतिक आहेत कीं, त्यांना स्पर्शणारे साधारण शब्द त्यांचेच आशय घेतात. तूं किनारा कशाला म्हणतेस, कोण जाणे. पण मला वाटतं, आपला किनारा असा बाहेर कुठें नसतो. आपला आपल्यांतच असतो. आपल्याच व्यक्तित्वाच्या मर्यादांनीं त्याला आकार येतो. आपल्या जीवनाची प्रवाहिता जिथें संपते तिथें आपला किनारा लागतो. आपली जडता तोच आपला किनारा. आपल्या प्रवाही पाण्याइतकाच तोहि आपल्या व्यक्तित्वाचा भाग आहे; आणि त्या दोहों मिळूनच आपल्या व्यक्तित्वाची नदी, तळं किंवा समुद्र तयार होतो. माझ्यासारखा कृत्रिम किनारा बांधून आपल्या व्यक्तित्वाला कां कृत्रिम खोडं घालून घेतेस?

–कोण कोणाचं खोडं? पुरुषाला प्रकृतीचं कीं प्रकृतीला पुरुषाचं? आणि कोणतंहि मीलन हें आपल्याच व्यक्तित्वाचं बाह्य अंग आपल्याला परत लाभणं नसतं का, हेमंत? आपल्याला आपल्या प्रिय माणसांत दिसतं तें आपल्याच व्यक्तित्वाचं अंग नव्हे का? केवळ प्रतिबिंब नाहीं; आपल्याच व्यक्तित्वाचा संक्रमित तुकडा. नदीला नदीच भेटते. नदी न् रस्ता एकत्र आले कीं, एकमेकांना अडथळा होतो.

–खरं आहे तुझं म्हणणं. पण दुसऱ्यांत दिसणारं आपलं रूप हा कधीं नुसता भासहि असूं शकतं आणि मग त्या दोन व्यक्तित्वांचं मीलन म्हणजे एकमेकांच्या नाशासाठीं स्वतःच गळ्याभोवतीं आवळलेले पाश असंही होऊं शकतं.

–माझं जें रूप मला तुमच्यांत दिसलं तें खोटं नव्हे ना? इथें तर माझी फसवणूक होत नाहीं ना?

–कसं सांगूं तुला?

–काय सांगायचं आहे तुम्हांला? 'माझं तुझ्यावर प्रेम नाहीं' असं कांहीं तुम्ही मला सांगूं शकणार नाहीं. मी माझ्या मताशीं हें खूप पडताळून पाहिलं. तुम्ही पुरुष आहांत. पुरुषाला —नुसतं प्रेम पुरेसं होत नसेल. पुरुषाला आकर्षण वाटण्यासारखं माझ्याजवळ आतां कांहीं उरलं नाहीं हें मलाहि समजतं. तारुण्याच्या उतारावर आहे मी आतां. तारुण्य मला केव्हां आलं न् तें कसं होतं हें कळलंच नाहीं मला. एवढ्याच साठीं तुम्ही मला अव्हेरलंत तर मला तें अस्वाभाविक वाटणार नाहीं. पण कां कोण जाणे, मला आपलं वाटतं कीं, तुमच्या मनांत हा विचार येणार नाहीं. तुमच्या जवळ खोलांत कांही तरी वेगळं आहे. दुसरं कांही आकर्षण? तुम्हांला स्त्रीचा मोह कधीं पडलाच नसेल का? याचं उत्तर मला कधीं सापडलं नाहीं. मघां तुमच्या बोलण्यांत अनेक स्त्रियांच्या









मुकेपणाचा उल्लेख आला. उत्तर अेकदम सापडलंसं वाटलं. पण त्या उत्तरानं मी बावरून गेलें. कोणीहि स्त्री तुमच्या प्रेमाची कितीहि भागीदार झाली असली तरी त्या प्रेमांतून शेवटीं तुम्ही वेगळेच राहिलांत हें दिसलं. तुमच्या अंतर्मनांत एक पोकळी असल्याचं मला अनेकदां भासलं. ती पोकळी मला भरून काढतां येईल का?—असा विचार आला तेव्हां तेव्हां वाटलं, आपण ती भरून काढूं. आतां शंका वाटते. कोणीहि स्त्री जर आजवर ती पोकळी भरून काढूं शकली नाहीं तर आपण तरी ती कोणत्या बळावर भरून काढणार? मघांच्या मुकेपणांत हें सारं मनांत बोलून घेतलं. मी हें कां सांगतेय् सारं? तुमच्यांत दिसलेलं माझं रूप जर खोटं नसेल तर असं कांहीं तरी तुमच्याहि मनांत येऊन गेलं असेल. आलं ना?.... काय बघताहांत समोर?

—समुद्राची ओहोटी. पाणी किती दूर गेलंय् तें पाहतोय्. या झिरमिळ धूसर चांदण्यांत नीट दिसत नाहीं. पण पाणी खळवळतंय्. त्याचा खळाळ कानांत घुमतोय्. कांहीं वेळापूर्वींच या पाण्याला भरती आली होती. हें बघ, आपण बसलोय् या इथपर्यंत पाणी चढलं होतं. आतां तें सारं पाणी समुद्राच्या पोटांत आंखडून बसलंय्.

—मी स्वत:शींच बोलत होते?

—हो स्वत:शीच बोलत होतीस. पण मी तें सारं ऐकलं. तें बोलणं त्या खोल गेलेल्या पाण्यापर्यंत पोचतंय् का, हें पाहत होतों. छान बोललीस. आजवर कोणी बोललं नव्हतं असं बोललीस. आजवर फक्त मुक्या भेटल्या. त्यांच्या मुक्या मनोगतानं मी उचंबळलो. पण त्या जेव्हां बोलल्या तेव्हां त्यांच्या तोंडून माझ्यासाठीं शिव्याशाप बाहेर पडले. ते ऐकून ऐकून मी स्वत:च आटून गेलो. भरतीची भीति वाटूं लागली. म्हणूनच तुला म्हणत होतो—बोलत रहा. मुका आवेग फुटून जाऊं दे. आणि तूं इतकं वेगळं बोललीस कीं, तें ऐकून ती ओहोटी उघडी पडली. किती विषण्ण पोकळी आहे ही! खरं आहे तुझं म्हणणं. तुझं सारं बोलणं त्या पोकळींत पूर्वीं उमटलंय्—पण स्वत:ला सावर. या पोकळींत स्वत:ला उधळूं नकोस. ऐकून घे. तुझं हृद्‌गत समजतं मला. पण तें माझ्या हृद्‌गताशीं जुळेलच असं समजूं नकोस. कोणाहि स्त्रीच्या प्रेमांत विरून जात नाहीं असं कांहीं विलक्षण कठीण द्रव्य माझ्या अंतरांत भरलं आहे. आणि तें तुला फोडतां येईल असं मला वाटत नाहीं. कदाचित त्या सर्व स्त्रियांच्या शिव्याशापांना खरोखरच पात्र असेन मी. म्हणूनच मी तुला प्रेमाचं प्रोत्साहन कधीं दिलं नाहीं. आपण भेटत आलो. वारंवार भेटलो. एकमेकांच्या ओढीनं एकमेकांचा सहवास शोधूं लागलो. मला दिसत होतं—ही त्या प्रेमाची सुरुवात आहे. पण म्हणूनच मी सावध राहिलो. आपल्या सहवासाला भावनेचा रंग चढणार नाहीं अशी दक्षता घेतली. सुदैवानं, वादांत रंगण्याची दोघांनाहि हौस होती. या सहधर्मित्वांतून आपलीं हृदयं एकमेकांना खुणावूं लागली, पण त्यांच्या खुणा जाणीवेला कळूं न देण्यास या वादांचाच आडपडदा आपल्या उपयोगी पडला. जेव्हां त्या खुणा जाणवल्या तेव्हां मी फक्त थट्टेनं तें बोलून दाखविलं. हेतु हा कीं, त्या भावनांना धार चढण्यापूर्वीं त्या बोथटून टाकाव्यात; नकळत—कां होईना, तुझ्या भावनेला माझ्याकडून उत्तेजन मिळूं नये. आणि तरीहि असा प्रसंग कदाचित् येईल अशी अलिकडे मला भीतीहि वाटूं लागली होती. पण तुझ्यावर प्रेम करूं लागलों त्या दिवशीं तुझे शाप घेण्याचीहि मनाची तयारी केली.

—असं भयंकर कां बोलतांहांत तुम्ही? मी शेवटीं माझ्याबरोबर तुमच्याहि दु:खालाच कारणीभूत होणार आहे का? कां वाटतं तुम्हांला असं?

—कां वाटतं! तूं स्त्री आहेस हें मी विसरूं शकत नाहीं म्हणून. मी केवळ पुरुष असतो तर हें भोक्तृत्व कदाचित् माझ्या कपाळीं आलंहि नसतं. पण मी पुरुषाहून कांहीं अधिक द्रव्याचा बनलो आहे. तेंच द्रव्य, जें या समुद्रांत अदृश्य आहे, जें साऱ्या सृष्टींत अदृश्य वास करीत आहे, जें एक नुसती हवा आहे, जें मला कोणालाहि नीट सांगतां आलं नाहीं, जें कोणालाहि सांगून समजत नाहीं—आणि स्त्रीला तर मुळींच नाहीं.

—पण त्यापायीं स्त्रीचं प्रेम तुम्हांला इतकं दु:खद् कां व्हावं?

—होतं. होत आलं आहे. आपण प्रेम करतो; पण आपल्याला प्रेमांतहि व्यवहार विसरतां येत नाहीं. लग्न हा मला प्रेमाचा व्यवहार दिसला. कोणीहि स्त्री जेव्हां पुरुषावर प्रेम करते तेव्हां ती लग्नाचा सौदा करूं पाहते. प्रेमाच्या स्थैर्याला लग्न हवं असेल तर माझी त्याला हरकत असणार नाहीं. पण तसं होत नाहीं. लग्न हवं असतं तें प्रेमाला सामाजिक चलन देण्यासाठीं. मला हा

प्रेमाचा व्यापार वाटतो. स्त्रीला आपल्या सामाजिक सुरक्षिततेसाठीं, प्रतिष्ठेसाठीं हा व्यापार आवश्यक वाटत असेल. पण आईहि मुलावर प्रेम करते; त्या प्रेमासाठीं समाजाशीं सौदा करण्याची तिला गरज भासत नाहीं. मग स्त्री–पुरुषाच्या प्रेमाचाच व्यापार कां व्हावा? त्या व्यापारांत प्रेम मरून जातं. आणि मग फक्त व्यापारच उरतो. स्त्रीला आपला नवरा म्हणजे फक्त बाजारांत खरेदी केलेली वस्तु वाटते. कदाचित पुरुषालाहि तसंच वाटत असेल. हा व्यापार मला पटत नाहीं, माझ्या प्रकृतीला झेंपत नाहीं. फार पूर्वीपासून मला हें जाणवत आलं. पण तरीहि मी लग्न केलं, मंजू. तुला माहीत नाहीं म्हणून मुद्दाम सांगतों. माझ्याविषयींच्या प्रेमाचा विचार करतांना माझ्या आयुष्यांतलं हें प्रकरण काळजीपूर्वक वाच. मला लग्नाची कल्पना पटत नसतांनाहि तिच्या आग्रहासाठीं केलं. कारण तिच्यावर माझं प्रेम होतं. लग्नापूर्वी दोन अडीच वर्षं प्रेम करीत होतो आम्ही एकमेकांवर. लग्नानंतरच्या सुखी संसाराचे सारे बेत मोठ्या चवीनं आधीं रचून ठेवले होते. पण लग्न झाल्यावर सारं बदलूं लागलं मी बदललो नाहीं, आणि मी बदललं पाहिजे असा तिनं हेका धरला. ती निश्चितच बदलली होती. जबाबदारी, वैवाहिक प्रतिष्ठा या नांवाखालीं अनेक बंधनं लादली जाऊं लागली. तपशीलांत शिरण्यांत अर्थ नाहीं. पण बायकोशीं प्रतारणा करण्यासारखं माझ्या हातून कांहींहि घडत नव्हतं. तिला संसाराच्या तुरुंगांत डांबून स्वतः चैन करण्याची मतलबी वृत्ति माझ्यांत कधींच नव्हती. पण तिच्याखेरीज, तिच्या तेव्हांच्या आणि नंतरच्या संसाराखेरीज मला अस्तित्व असूं नये, हें मला सहन होत नव्हतं. माझी अपेक्षा उलट होती. परस्परांच्या स्वातंत्र्यांत हें सहजीवन फुलावं, असं मला हवं होतं. हें तिला सांगूनहि समजलं नाहीं; खरं म्हणजे, मलाहि धड कधीं सांगतां आलं नाहीं. व्यवहारांतल्या अमक्या गोष्टीचं स्वातंत्र्य न् तमक्या गोष्टीचं स्वातंत्र्य. ही परिभाषा मला कधींच समाधानकारक वाटली नाहीं. आणि यापलिकडे स्वातंत्र्य म्हणजे काय, हें मला सांगतां आलं नाहीं. सांगतां आलं नाहीं तरी मनोमन एकमेकांनीं तें जाणावं. जगावं, अशी माझी अपेक्षा होती. ती फसली. त्या संसारांत माझा जीव गुदमरूं लागला. प्रेमाचा जाच होऊन बसला. पहिल्या धुंदींत हा जाच फारसा बोचला नाहीं. दोन वर्षं अशीं गेलीं. पण तो जाच जसजसा जाणवूं लागला तसतशी ती धुंदी उतरूं लागली आणि या संसाराचा विध्वंस मला दिसूं लागला. आणखी अधिक जीवांची जबाबदारी वाढवणं मला धोक्याचं वाटूं लागलं; आणि त्यानंच या संसाराचा शेवट जवळ आणला. ती स्त्री होती, हणूनच तिला ही वेल फुलायला हवी होती. 'मी स्त्री आहे' एवढाच तिचा त्यासाठीं युक्तिवाद. कदाचित् तिचं खरं असेल. स्त्रीचा निसर्ग कांहीं वेगळा असल्यास तो मला कसा कळणार? पण पुरुषाच्या निसर्गाला अशा कांहीं भावना नसतात असं मला वाटत नाहीं. हें सहजीवन मला जाचक दिसलं नसतं तर माझ्या निसर्गानं तिच्या निसर्गाला आनंदानं साथ दिली असती. पण युक्तिवादानं हा पेंच सोडवतां येत नव्हता. आणि प्रेमांतहि आपल्यावर कांहीं सक्ति व्हावी, आणि तेंहि प्रेमच म्हणावं, हें सारंच मला मनस्वी टोचूं लागलं. सुदैवानं आम्हांला एक मूल झालं. पण तें नांव ठेवण्यापूर्वीच अंगठा चोखतां चोखतां गेलं. मी 'सुदैवानं' म्हटलं. कोणतं सुदैव–झालं हें कीं गेलं हें–कोण जाणे त्याच्या जाण्यानं आणखी आग भडकली. मला मूल नको होतं म्हणूनच तें गेलं असा तिनं ग्रह करून घेतला. एक चमत्कारिक वैर आमच्यांत निर्माण झालं. त्या वैराचा दर्प घरांतल्या वातावरणांत भरून गेला. न बोलतांहि तो जाणवूं लागला. ती माथेफिरूपणानं अद्वातद्वा बोलून उठल्या सुटल्या माझा पाणउतारा करूं लागली. अशीं तीन वर्षं गेलीं. ती तीन वर्षं ज्या भयंकर अव-

स्थेंत मी काढलीं तिच्या आठवणीनं अजून माझ्या अंगावर कांटा येतो—

—हेमंत !

—नाहीं ऐकवत ना तुला ! तुला नुसतं ऐकावं लागतंय्. मला हें सारं भोगावं लागलंय मंजू ! आणि तिलाहि. कोणामुळं कोणाला हें ठरवण्यांत अर्थ नाहीं. अरे, तूं रडायला लागलीस ! ...माफ कर मंजू मला. तुझ्या सांत्वनाला हा हात अपुरा पडला तर मला दोष देवूं नकोस. तूं कां रडतेस हें मी तुला विचारीत नाहीं. माझ्यासाठीं कीं तिच्यासाठीं कीं स्वतःसाठीं—कोणाहिसाठीं रड. ज्या वेदनेनं रडतेस तशीच वेदना मीहि अनुभवली आहे. एवढी सहसंवेदना हा हात तुला नक्कीच देईल. तेव्हां मीहि रडलों. तीहि रडली. स्वतःशींच. वेगवेगळे. आम्ही एकमेकांचं सांत्वन करूं शकत नव्हतो, त्या प्रेमाचा केव्हांच चेंदामेंदा झाला होता आणि आतां दोघांमध्यें मोठी भिंत उभी होती. माझी ही कहाणी अधिक लांब-वीत नाहीं. शेवटीं आम्ही एकमेकांपासून दूर होण्याचा निर्णय घेतला. दूर झालो, आणि उरला सुरला काय-द्याचा पाश घटस्फोटानं तोडून टाकला. जें प्रेमांतून मिळ-वायचं होतं तें स्वातंत्र्य आम्ही प्रेमाचा खून करून मिळवलं. पुन्हां आम्ही भेटलो नाहीं. ती मला विसरली कीं नाहीं, हें मला ठाऊक नाहीं. पण ती आतां सुखांत आहे. मी मात्र तिला विसरलों नाहीं. ती भेटल्यापासून जाईपर्यंतच्या त्या सात वर्षातलं कांहींच मी विसरूं शकत नाहीं. भुताटकीचं घर असावं तसं माझं मन त्या सात वर्षांनीं मारलेलं आहे. पण जीवनाचा प्रवाह स्वभावतःच अनिरूद्ध असतो. ही भुताटकीची जागा टाकून तो वाहूं लागला. रमण्यासारखं स्थळ आढळलं तिथें रमला. स्त्रियांच्या बाबतींत हें रमणं परिणामीं सुखावह झालं नाहीं. माझी मजबुरी आड आली. खरं म्हणजे स्वतःला विसरण्याइतकं मला कुठेंच रमतां येत नाहीं. मघां तूं मला रंग विचारलेस. थपथपीत तांबडा भडक रंगच अधिक माझ्या वांट्याला आला. हा भडक रंग बेगडी नसला तरी उथळ, कातडीपुरता थर वाटला, गोंडस, सूक्ष्म छटा कुठेंच आढळल्या नाहींत. सर्वच ठिकाणीं प्रेमाचा सौदा करावा लागला. लग्नाला मी नकार दिला तेव्हा तिघींचं माझ्यावरचं प्रेम एकाएकी आटलं. लग्न कां नको ह्या प्रश्नाला मी कोणालाच उत्तर दिलं नाहीं. मी दुष्ट नि व्यभिचारी वृत्तीचा बेजबाबदार माणूस आहे ही त्यांची समजूत बदलण्याचा मी प्रयत्न केला नाहीं. ज्या एकीला लग्नाशिवाय आमची मैत्री चालूं शकत होती तिच्या थिल्लर लाघवी-पणाला मी पुरेशी साथ देऊं शकत नाहीं. तेव्हां अजून तिनं मला तोडलं नसलं तरी ही मैत्री म्हणजे किना-ऱ्याशीं जमलेला फेंस.... हा किनाऱ्याचा फेस, तिकडे उरांत तो ज्वालामुखी—आंतल्या आंत धुमसत राहणारा. आणि या दोहोंवरून आपल्याच एकाकीपणांत हेलावत राहणारा दिशाहीन, तटहीन समुद्र......किती विषण्ण वाटते ही ओहोटी आतां !..मंजू, काय आनंद आहे तुला या धोकेबाज समुद्रावर आपली होडी लोटण्यांत ?

—लग्नावर तुमचा विश्वास नाहीं पण ज्या प्रेमाचा आग्रह तुम्ही मानतां त्या प्रेमावर तरी तुमचा विश्वास आहे का ?

—मीहि स्वतःला हेंच विचारीत आलो आहे.

—आणि तरीहि प्रेम करीत आलांत.

—मंजू !.........

—कां दचकलांत ? मी लग्न करा म्हणेन. आणि तुम्ही नाहीं म्हट-ल्यावर तुम्हांला दुष्ट ठरवीन, अशी भीति वाटते का तुम्हांला ?

—तुझ्यावर माझं प्रेमच नाहीं म्हटलं तर खरं वाटेल तुला ?

—आजवर वाटलं असतं.

—प्रेम म्हणजे काय हें तुला कळतं अशा निश्चितीनं बोलते आहेस !

—तुम्हांला तरी तें कुठें कळतं ?

—मला प्रेम म्हणजे काय हें कळत नसलं तरी प्रेमाच्या नांवानं ओळखल्या जाणाऱ्या क्षेत्रांत पुरेसा हिंडलो आहे मी.

—आणि त्या क्षेत्रांत प्रेम म्हणावं असं कांहींच आढळलं नाहीं तुम्हांला.

—आढळलं, आणि नाहींहि. जें आढळलं त्याला प्रेमच म्हणायचं का, हें मात्र ठरवतां आलं नाहीं. कारण ज्याला प्रेम म्हणा-वंसं वाटलं त्याला कोणी प्रेम म्हणत नाहीं. ज्याला प्रेम म्हणतात ती केवळ हाडामांसाची आसक्ति असावी असं दाट वाटूं लागलंय् मला. स्त्री-पुरुषांच्या तथा-कथित प्रेमांत तर ह्या आसक्तीचं फार उघड नागडं आणि प्रसंगीं ओंगळ स्वरुप दिसलं.

—पण आपल्या प्रिय माणसासाठीं माणसं केवढा त्याग करतात—आपल्या आसक्तीचा सुद्धां.

—मला खरं वाटत नाहीं हें. त्याग हा बहुधा आसक्तीचा अतिरेक असतो.

—पण माणूस जर हाडामांसाचाच बनलेला आहे तर त्याचं प्रेम तरी हाडामांसाचे धर्म कसे सोडील?

—नाहीं सोडणार. पण हाडामांसाच्या धर्मांनाच प्रेम समजून चालण्याची चूक होत आहे प्रेमिकांच्या हातून. ही चूक जर प्रेमिकाला कळली तर प्रेमाचा सारा जाच आपोआप गळून पडेल. प्रेम कधींच कोणावर बंधन होणार नाहीं. अनिर्बंधता वासनेलाहि आवडते. पण दोहोंच्या अनिर्बंधतेंत फार मोठा फरक आहे—दोघांची पातळीच भिन्न. वासना स्वतः अनिर्बंध राहून आपल्या विषयाला बंधनांत लोटूं पाहते. प्रेम आपल्या विषयासह अनिर्बंधतेंत संचार करतं. प्रेम हाडामांसांत प्रतिबिंबित होत असलं तरी हाडामांसाच्या पलीकडून स्वच्छंद गतीनं येतें. वासना हाडामांसांतूनच उद्‌भवते आणि तिथेंच जिरते








—इतकी सूक्ष्म भावना जाणण्याची कुवत सामान्य माणसाला कुठें असते? मग तो सामाजिक संकेतांना आणि अपल्या हाडामांसाला चिकटून राहिला तर तुम्ही त्याला दोष देऊं नये.

—मी कोणालाच दोष देत नाहीं, मंजू. व्यक्तीला नाहीं किंवा समाजालाहि नाहीं. कदाचित् माणसाची दुर्बलता ओळखूनच समाजानें त्याला कावूंत ठेवण्यासाठीं संकेत निर्माण केले असतील. त्यांना मी चूक म्हणत नाहीं. माणसाला आपली अपूर्णता, उणीव जाणतां येत नाहीं, पुढें जातां येत नाहीं, म्हणून तो कळतं तवढ्याचंच शास्त्र बनवतो म्हणून त्यालाहि मी चूक म्हणत नाहीं. सारींच आपापल्या परीनं बरोबर आहेत. जी माझ्यावर कायमचा आघात करून निघून गेली तिला मी दोष देत नाहीं. ज्या माझ्याशीं प्रेम करून माझ्यावरच उलटल्या त्यांनाहि दोष देत नाहीं. पण दुसरे जितके बरोबर आहेत तितकाच मीहि बरोबर आहे. त्यांच्या कल्पनांनुसार जगण्याचा जितका त्यांना अधिकार आहे तितकाच माझ्या वेडेपणांत जगण्याचा मलाहि अधिकार आहे. कदाचित् मी नुसत्या भासावर जगत असेन. पण माझे भास मला प्रिय आहेत. तुमचं सत्य हें जोंपर्यंत माझं सत्य नव्हे तोंपर्यंत तें मी स्वीकारूं शकत नाहीं. मला माझ्या भासांतच जगूं दे. कोणाच्याहि अधिकारावर मला आक्रमण करायचं नाहीं—तुझ्याहि. म्हणूनच मंजू, तुलाहि माझ्या भावनेची मी कधीं जाणीव दिली नाहीं.

—माझ्याविषयीं तुम्हांला एवढाहि विश्वास वाटला नाहीं?

—कसा वाटेल? प्रेम म्हटलं की साऱ्यांच्या मनांत कांहीं वेगळंच चित्र उभं राहतं. मला दिसणारं चित्र तुझ्या मनांत उभं राहिलं असं कोणत्या भरवंशावर मानूं मी? आणि चित्र जुळलं नाहीं म्हणून फेंकून दिलं, असं करतां येत नाहीं. इथें जिवंत मनांशीं गांठ आहे. लहानसा चंद्र पाहून समुद्राच्या उरांत केवढी खळवळ माजते! चंद्र गेला कीं, ओहोटी लागते तीहि केवढी भयाण! माझी प्रेमाची भावना तुला कळल्यावर तुझ्या जीवाची जी तगमग होईल ती कशी शमवायची? त्या जबाबदारींतून मी कसा सुटूं शकतो? आणि कोणाहि जित्या जीवाचे शिव्याशाप खातांना माझ्या जीवाला अत्यंत यातना होतात, मंजू!

—सागराचं पाणी चढूं लागलंय् पुन्हां. त्या पहा, लाटा दिसूं लागल्या आहेत... माझं एवढं तरी ऐकाल?... लाटा जवळ येईपर्यंत इथेंच बसूं या.

—मला काळाचंहि बंधन नाही, मंजू. तूंच स्वतःचा विचार कर. घाई तुला असेल.

—हो. घाई मला असेल. मला सारीच घाई झाली आहे. पण माझ्या घाईनं सागर माझ्याजवळ येणार नाहीं हें मला आतां कळतंय्. वाट पाहीन मी. अशीच कांठावर उभी राहीन—त्याचं स्वतःच्याच नादांत घुमणं पहात. देह इथें उभा असेल; मन त्याच्या लाटांबरोबर नाचत असेल.

—मंजू! भावनेच्या आहारीं जाऊं नकोस. स्वतःला नीट जोखून घे. माझ्यासारख्या कलंदराची सोबत विनभरवंशाची आहे बरं! माझ्याच कल्पनांनीं माझ्या सुखाचा बळी घेतलाय्; आतां तुझ्या सुखाचा बळी देऊं नकोस. त्या तिघीहि शहाण्या होत्या. माझा नाद सोडण्यांत त्यांनीं स्वतःचं सुख राखलं. तूं मूर्ख ठरूं नकोस.

—खरंच यांत समाधान आहे तुम्हांला?

—यांत असलेल्या असमाधानापेक्षां समाधान मोठें आहे.

—मग असमाधान तरी कां असावं?

—हाडामांसाच्या सत्यांतहि तथ्य आहे म्हणून. त्याहून जें वेगळं मला वाटतं तें सत्य आहे कीं भास, हें मला ठाऊक नाहीं.

—पण तरीहि तेंच तुम्हांला अधिक प्रिय आहे!

—हो. आणि मला वाटतं, तुलाहि. हाडामांसापलीकडे जगूं पाहणाऱ्या सर्वांनाच हें असं होत असावं.

—पण हाडामांसाच्या सत्याची तुम्हांला एवढी किंमत कां वाटावी?

—मलाहि हाडामांसाचा देह आहे म्हणून. पण निष्ठेशीं प्रतारणा करून हें सत्य मला आपली किंमत मागत नाहीं. त्या रागिणीचा कांहीं ना कांहीं उल्लास मला भेटलेल्या प्रत्येक स्त्रींत आढळला. कोणत्या स्त्रींत तो नाहीं, हें मला ठाऊक नाहीं. हाडामांसांत भिनलेला मी अनुभवला. हाडामांसाच्या पलिकडे तो पोचला नाहीं आणि कांहीं भलत्या विकारांनीं किंवा विचारांनीं त्यावर मात केली ऐवढीच माझी तक्रार. पाणी कांठाशीं फेसाळलेलं असलं तरी तें समुद्राचंच ना! तें स्त्रीत्व मला नेहमींच ओढत आलं आहे. सर्वच पुरुषांना ओढत असावं. स्त्रियांना ही ओढ जाणवत नसेल तर त्यांचा निसर्ग वेगळ्या अनैसर्गिक पुटांनीं दडपला असावा.

—अनेक स्त्रियांवर प्रेम करीत राहण्याचं तुमचं रहस्य, मला वाटतं, मला आतां उमगतंय्.

—खरंच उमगत असेल तर त्याबद्दल तूं कींव करशील माझी माझ्या आयुष्यांतली तीच मोठी दुर्घटना आहे. असफल प्रीतीचा जणूं शापच आहे मला. मन ओढ घेतं. पण ज्यासाठीं ओढ घेतं तें तिथें सांपडत नाहीं. आणि मग ती ओढ आपल्याच विफलतेच्या संभ्रमांत, आपल्याच आवेगापुढें अगतिक होऊन, तियल्या तिथेंच फुटते—समुद्राच्या लाटेसारखी. आणि हातीं उरतो तो आपल्याच भावनांचा चुरा. या असफल ओढींत त्या स्त्रीचं दुःख किती आहे हें तिच्या शिव्याशापांतून मला कळतं पण फुटलेल्या लाटेंतलं दुःख मी कोणाला सांगूं? मी करूं शकतो तें ऐवढंच—स्वतःला आणि दुसऱ्याला दुःखच








देणारी ही ओढ स्वतःतच जिरवून टाकायची. तेंच चाललं आहे अलिकडे.

—आपण उठूं या कां आतां?

—माझी हरकत नाहीं. आपण बोललों हें बरं झालं. माझ्याबद्दल इतरांसारखा तूं गैरसमज करून घेणार नाहींस अशी आशा करतो. तूं स्त्री असूनहि तुझ्या वेगळ्या समंजसपणाबद्दल मला आजवर विश्वास वाटत आला आहे. मी हा असा वेडसर, कलंदर आहे म्हणून मला क्षमा कर. हा प्रसंग तूं विसरणार नाहींस हें मला ठाऊक आहे; तेव्हां 'विसरून जा' वगैरे पोरकट भावनेची भाषा बोलत नाहीं. तूं समजतेस तसा पुरुष हा केवळ विलासप्रिय नाहीं, त्याच्या अंतरंगांत कांहीं वेगळ्या ऊर्मीहि असतात. एवढं जरी या प्रसंगांतून तुला कळलं तरी माझ्या बोलण्याचं सार्थक झालं. या प्रसंगानं मी एका भुकेजल्यापुढें दुःखदायक रितं ताट मांडलं आहे हें मी जाणतो. पण ग्रह आपल्याच रिंगणांत फिरत असले तरी त्यांना परस्परांचं आकर्षण असतं. परस्परांविषयीं तीच सहानुभूति बाळगून आपण आपली नियति स्वीकारूं या. चल आतां. तुला उशीर होईल.



—मी पुन्हां बसा म्हटलं तर बसाल?

—तूं कांहीं परीक्षा पाहते आहेस कां माझी? आणि कशाला? तीहि व्यर्थ नाहीं कां?

—तुमच्याशीं कसं बोलावं हें कळेनासं झालंय् मला. बोललें नाहीं तर कदाचित् तुमचा गैरसमज होईल, आणि उगीच तुमच्या दुःखांत मी भर टाकल्यासारखं होईल. पण न बोलतां वागणं तुम्ही अशक्य करून टाकताहांत मला.

—माझ्यासाठीं तुझ्या बोलण्या-वागण्यांत कांहींहि फरक पडूं नये, अशीच इच्छा आहे माझी. माझ्या अस्तित्वाचं कोणतंहि बंधन तूं मानूं नयेस.

—तुमच्या अशा बोलण्यानंच मी गोंधळून जाते. तुम्ही इतके अलिप्त वागतां कीं, आपण काय करावं हें कळेनासं होतं. दोन माणसं जेव्हां एकत्र येतात तेव्हां एकानं दुसऱ्याच्या आवडीनिवडीचा विचार करणं हा साधा मानवी संबंधाचा व्यापार नाहीं का? तुमच्यासारखं एकांतिक होऊन कसं चालेल?

—हा मानवी संबंधाचा व्यापार इतका साधा असता तर मला त्याचं कांहीं वाटलं नसतं. पण हा व्यापार एकमेकाला बंधनरूप होऊन बसतो, तें मला नको आहे. आणि माझ्याकडून त्यांत अप्रामाणिकपणा होऊं नये म्हणून दुसऱ्यालाहि मी माझ्या बंधनांत टाकूं इच्छित नाहीं.

—म्हणजे तुमची ही अलिप्तता कांहीं खरी नव्हे. दुसऱ्याला आपला उपसर्ग पोचूं नये एवढ्याचसाठीं ती तुम्ही स्वतःवर लादून घेतली आहे.

—खोटी मानली तरी काय फरक पडणार आहे माझ्या वागण्यांत?

—पडावा. म्हणजे...दुसऱ्याच्या आनंदांत सहभागी व्हायला तुमची हरकत नसावी. निदान, दुसऱ्याचा आनंद तुमच्या आनंदानं सफल होणार असेल तर....

—पाण्याला ताठर होतां येत नाहीं, मंजू. तें कशांतहि मिसळायला तयार असतं. पण त्यालाहि अट आहे—पाण्याची प्रवाहिता, त्याची स्वच्छंदता खंडित होऊं नये.

—माझ्यावर तुमचा विश्वास असेल तर मी सांगते, मी पाण्याला बांध होणार नाहीं.

—म्हणजे?

—म्हणजे कांहीं नाहीं. चला माझ्याबरोबर.

—कुठें?

—पाण्यांत. तें बघा, पाणी किती जवळ आलं आहे. मला तें जवळून पाहायचं आहे. पायाखालची वाळू निसटत असतांना लाटांच्या गुदगुल्या अनुभवायच्या आहेत...असं संथ नको. जलद चला.

—माझा हात ओढण्याची गरज नाहीं, मंजू. माणसानं आपल्या नेहमींच्या गतीनं चालावं.

—कधीं-कधीं माणसाची गति इतकी वाढते हेमंत, कीं त्याच्या पायांचं धांवणंहि त्याला मंद वाटतं.








—पण ती त्याची नेहमींची गति नव्हे.

—नेहमींची नसली तरी अनैसर्गिक नव्हे ना? सागराला नाहीं का आवेग चढत?

—पण समुद्रच आपला आवेग पचवूं शकतो, मंजू.

—किती मौज वाटते नाहीं या पाण्यांत?

—मी अनेकदां असा पाण्यांत उभा राहून समोरचा विशाल मर्मर आसमंत बघत राहतो.

—किनाऱ्यावरून दिसणाऱ्या सागरापेक्षां आतां दिसणारा समोरचा सागर वेगळा वाटतो.

—अनुभवाच्या ह्या दोन भिन्न अवस्था आहेत म्हणून.

—मी घाबरले नाहीं. पण या विशालतेंत आपलं अस्तित्व विरून जातं कीं काय, असं वाटतंय्...हेमंत, माझ्या अस्तित्वाचं भान राखण्यासाठीं मला तुमचा हात हवा आहे...किती गार आहे माझा हात!

—शेवटीं बाई येथून तेथून वेडीच!

—तुम्हांला नाहीं आवडलं ना हें? पण आजच्या दिवस मला माझ्या आवडीनं वागूं द्या...मला वाटतं, माणसाला आयुष्यांत कधीं तरी वेडं व्हायला आवडत असावं. वेडं होणं या वयांत मला शोभत नसेल. पण शोभण्यासारखंच तुमच्यापुढें वागण्याची सक्ति तुम्ही मला करणार नाहीं. मी कांहीं न शोभण्यासारखं केलं असं तुम्ही म्हणूं नये, असं वाटतं...कां हंसलांत? तुम्हांला नाहीं कधीं असं वेडं व्हावंसं वाटलं?

—अनेकदां. कोणासाठीं तरी वेडं होण्यांत फार मोठं सुख वाटतं, मंजू! पण तें वेडेपण आहे असं आतां कळूं लागलंय् ना मला!

—मला कळूं लागलं म्हणजे मीहि तुमच्यासारखी शहाणी होईन. तोंपर्यंत मला अशीच वेडी राहूं द्या. तुमची वेडी म्हणून मला सांभाळून घ्या. झिडकारूं नका.

—ज्या प्रेमासाठीं जीव सतत तळमळत राहिला तें झिडकारावंसं कसं वाटेल, मंजू? पण आपला हात लागल्यानं फूल करपल्याचं पाहिलं कीं आपला हातच नकोसा वाटूं लागतो, तसं झालंय् माझं.

—नाहीं करपणार, हेमंत! यापुढें नाहीं करपणार. तुमचा हात माझ्या हाताला सांगतोय् हें. तुमच्या हृदयाचे ठोके माझ्या कानांत कुजबुजताहेत हेंच. मला सारं कळलंय् आतां. जें कळलं तें न उमजण्याइतकी मी स्वार्थी नाहीं.

—कोण जाणे! माझ्याजवळ कसलाच निर्णय नाहीं. पाण्यासारखं वाहणं एवढंच मला कळतं. म्हणूनच मला भीति वाटते— माझी, आणि तुझीहि. आज ज्याला तूं प्रेम म्हणतेस तें उद्यां उडून गेलं तर त्याचं मला दुःख नाहीं. पण तें प्रेम मला किंवा तुलाहि खंडित करूं लागलं तर मला यातना होतील.

—आपण पाण्यांत उभे आहोंत, हेमंत. पायांखालीं वाळू निसरत असतांना उभे आहोंत. या पाण्यांत पायाखालची वाळू घसरत जाण्यांत गंमत वाटते. पण म्हणून कांहीं पाय घसरत नाहीं. माझ्यावर विश्वास ठेवा—मी या वाहत्या लाटेंत आनंदानं राहीन. तुमचा किनारा होणार नाहीं. किनारा सोडला मीं, हेमंत आतां. आतां फक्त तुमची सोबत.

—सोबत! आपल्याला कोणाची तरी सोबत हवी असते. तुला माझी सोबत हवीय्. मला तुझी सोबत नको असं मी कसं म्हणूं? पण खरोखरच कोणी कोणाला सोबत करतं का? कीं आपणच आपली सोबत करतो? दुसऱ्याच्या सोबतीचा नुसता भास! आपलीच सांवली! आणि मला तर सांवलीहि नाहीं. निरा माझा मीच. तुझ्यावरचं वाटणारं माझं प्रेम ही माझ्याच मनाची प्रतिमा. स्वतःच्या मग्नतेंत स्वतःशींच गर्जना करीत राहणारा हा समुद्र केवळ कांहीं निसर्गनियमांनीं घडलेला. तो माड फळतो तो केवळ स्वतःच्या निसर्गाच्या परिपूर्तीसाठीं; कोणालाहि आपली फळं देण्यासाठीं नव्हे. तुला मी काय देऊं, मंजू? तुझी सोबत कशी करूं? मला कांहीं देण्याचं तुझ्या मनांत असेल तर तो तुझा केवळ भ्रम आहे हें मला ठाऊक असतांना तें मी घेतल्याचा आनंद मी तुला कसा देऊं?

—कांहींहि असूं दे, हेमंत! मी तुम्हांला कांहींहि मागत नाहीं. कधींहि मागणार नाहीं. तुमचा निसर्ग तुम्हांला जसें वाढवील त्याच्या आड मी कधींहि यणार नाहीं. माझा निसर्ग मला घडवील तशी मी घडत राहीन. पण माझा निसर्ग मला सध्यां माझ्या स्त्रीत्वाची जाणीव देत आहे. आणि माझा पुरुष मला तुमच्यांत आढळला आहे. तुमच्या पुरुषत्वावर स्त्री म्हणून माझा अधिकार आहे, हेमंत. तुमचा निसर्ग तो अधिकार मला नाकारूं शकत नाहीं. पण तुम्ही माझ्या स्त्रीत्वांतून मुक्त आहांत. प्रकृतीपासून पुरुष जसा मुक्त आहे तसेच.

—आणि पुरुषाला प्रकृतीचं जसं आवरण असतं तसं दाखवण्यासाठींच तुझे बाहू माझ्याभोवतीं आवळले आहेत ना! त्या पुरुषाला स्वतःगुण—विकार नसेल; पण मला आहे, मंजू! त्या गुण-विकारानं तुला केव्हांच माझी मानलं आहे. आज त्यांतला पडदा दूर झाला एवढंच. हा पडदा कधींहि घालूं नकोस एवढीच विनंती!

—चला. बाहेर जाऊं या. लाटा अंगावर यायला लागल्या.

—समुद्राला कोणीतरी सतत ओढीत असतं, मंजू! कधीं इकडे कधीं तिकडे. जीवा-जीवाची ही ओढ सनातन आहे.

—वाळूवर बसूं या का जरा? मनांतल्या लाटा पायांना घरीं जाऊ देत नाहींत.

—तुझ्या उधाणाला इथें समुद्राची साथ आहे म्हणून!

•••









अनुक्रमणिका

वाल्मिकीनें उत्तरकांड मुळीं लिहिलेंच नाहीं. तो प्रक्षेप कुणींतरी मागाहून जोडलेला आहे. पण त्या प्रक्षेपानें मूळ 'रामचरिता' वर किती भयानक अन्याय केला आहे त्याचें हें मार्मिक (व मर्मभेदक) चित्रण !!



# श्रीरामानें सीतात्याग केलाच नाहीं

—आनंद साधले

वृक्षाला बांडगुळानें शोषून टाकावें, कमलास शेवाळानें लपेटून घ्यावें, ही दुर्दैवाची केवढी परवड! पण दैवाची शक्ती जबर खरी. जो त्याच्या तावडींत सांपडेल त्याची सुटका नाहीं. मग तो प्रत्यक्ष रामचंद्र असो अथवा सीतामाई असो.

रामानें सीतेचा त्याग केला ही कल्पना म्हणजे रामचरित्रास जडलेलें बांडगूळ. तो मर्यादा पुरुषोत्तम होता असें दाखविण्यासाठीं त्याच्या चरित्राला चिटकविलेली खोटीच पुस्ति. वाल्मिकी रामायणास चिकटलेला हा प्रक्षेप. वाल्मिकीनें जें अमृताचें ताट वाढिलें त्याच्या बाजूला ठेविली गेलेली ही नरोटी. पण आज वाल्मिकीच्या अमृतस्त्रावी कथेपेक्षां या नरोटीचीच मोहिनी जनमनावर अधिक आहे. शृंगाररसाच्या मवाळ चिकटपणांत गुंतलेले कवि जसे श्रीकृष्णाच्या काल्पनिक रासक्रीडांत रुतून बसतात तसेंच करुण रसाच्या अश्रुपटलानें हळुंवार झालेले अधू दृष्टीचे कवि सीतात्यागाचीं करुणागीतें गाण्यांत धन्यता मानतात.

युद्धकांडापर्यंतचें रामायण हेंच वाल्मिकीचें रामायण. यांत सीतात्यागाची कथा नाहीं. या रामायणाशीं समकालीन अगर त्या पूर्वीच्या कुठच्याही वाङ्मयांत सीतात्यागाला विश्वसनीय आधार नाहीं. महाभारताच्या वनपर्वांत युधिष्ठिराचा विषाद सुकर व्हावा म्हणून जी रामकथा सांगण्यांत आली तिच्यांत सीतात्याग नाहीं. रामानें सीतचा त्याग केला असता तर युधिष्ठिराचें दुःख त्याला हलकें वाटावें यासाठीं त्याचें वर्णन करण्यास इथें केवढी संधी होती! महाभारताचा विस्तार करणारानें ही संधी सोडली नसती. रामायण आणि महाभारत यांचे काल पंचवीसशें वर्षां-अलीकडे येऊं शकत नाहींत. रामाचा काल सुमारें पंचेचाळीसशें वर्षें पूर्वींचा आहे. अर्थात् सुमारें दोन हजार वर्षें रामचरित्र सीतात्यागाशिवाय प्रचलित होतें. कालिदासाच्या रघुवंशांत सीतात्याग आहे. भवभूतीनें तर उत्तररामचरित नाटकच सीतात्यागावर लिहिलें आहे. अर्थात् या मधल्या काळांत म्हणजे इसवी सनाच्या आगमागें रामायणाला उत्तरकांड जोडण्यांत आलें आहे. वाल्मिकीच्या रामायणांत काव्य सरितेला जो रससौंदर्याचा महापूर आलेला दिसतो त्या मानानें उत्तर कांडांत काव्यानंदाचा केवळ ठणठणाट आहे.

एक भ्रम प्रथमच दूर करावयास हवा कीं, वाल्मिकीनें आधीं रामायण लिहिलें आणि मग राम तसें चरित्र जगला. राम या चालत्याबोलत्या माणसाचा देव करण्याच्या खटाटोपांतील हीहि एक कल्पनाच आहे. वाल्मिकी हा आदिकवि होता या विधानाचा शब्दशः अर्थ घेऊन या कल्पनेला आधार दिला गेला आहे. आदिकवि याचा अर्थ गौरवानेंच घ्यावयास हवा. त्या काळीं रामायण हेंच नितांत रमणीय असें काव्य असल्यानें कविश्रेष्ठ या अर्थानें वाल्मिकीचा गौरव आदिकवि या पदवीनें केला गेला आहे. वेदांची रचना रामायणाच्या आधींची आहे. वेदांत छंद आहेत, त्यांत अनुष्ठुभ छंदही आहे; वेदांत काव्य आहे आणि त्या काव्याचे उद्गाते ऋषि ज्ञात आहेत, हें पाहिल्यावर वाल्मिकी हा पहिला कवि होता आणि छंदाचें स्फुरण ईश्वराकडून प्रथम त्यालाच झालें या कल्पनांमागील वस्तुस्थिति जाणण्यास कठीण जाऊं नये. याचा अर्थ एवढाच घ्यावयाचा कीं, वाल्मिकी हा त्या काळीं थोरांतील थोर कवि होता आणि त्याच्या हातून अनुष्ठुभ छंदामध्यें रससौंदर्याचा परमोत्कर्ष साधला गेला.

रामायण आधीं घडलें आणि वाल्मिकीनें तें नंतर लिहिलें या बाबतींत आपला संशय फिटला कीं, सीतात्याग रामायणांत घडला असता तर तो वाल्मिकीनें लिहिला असता हें आपणांस पटतें. वाल्मिकीनें आपल्या अधिकारांत ही गोष्ट गाळली असती तर तें त्याला इतिहासकार म्हणून आणि कवि म्हणूनहि उणेपणा आणणारें ठरतें.









अनुक्रमणिका

वाल्मिकी रामायणाची जी प्रस्तावना आहे तिच्यांत वाल्मिकीनें रामायण कां लिहिलें त्याची प्रेरणा आहे. शृंगार क्रीडेंत रमलेल्या पक्षी-युगुलांतून नराचा व्याधानें वध केला. त्यामुळें मादीच्या डोळ्यांतून जे अश्रुबिंदु टिपकले ते पाहून वाल्मिकीचें कोमल कविमन द्रवलें. त्याला एवढी अस्वस्थता प्राप्त झाली कीं, त्याचें मन कशांतच रमेना. या कष्टलेल्या मनाला शांति लाभावी यासाठीं वाल्मिकीनें रामकथा निवडली आणि आपलें रामयण रचिलें. रामाच्या हातून जर सीतेचा कठोर असा त्याग घडला असता तर त्या कथानकानें वाल्मिकीचें मन अधिक शांत झालें असतें कीं, अधिक व्याकूळ झालें असतें बरें? मनोभंग झालेल्या पक्षिणीचे अश्रुं पाहून तें कोमल मन एवढें विरघळलें कीं त्याला जीवन अशक्य झालें. यःकश्चित पक्षिणीसाठीं एवढी करुणा! मग भुवनकोमला अशा अश्राप, मंगलमूर्ति सीतेसाठीं केवढी करुणा बरें! आणि ही करुणा मनाला शांति देणार कीं अशांति ? आणि अशांतीवर उतारा म्हणून कां अधिकतर, दारुणतर अशांतीला मिठी मारावयाची! रावणाकडून लादल्या गेलेल्या विरहानंतर घडलेल्या मिलनांत रामकथा संपली होती; त्या मंगल मीलनानंतर सीतामाईच्या दुःखाचा अंत झाला होता; म्हणूनच ती कथा वाल्मिकीनें गाण्यासाठीं निवडली. रामानें सीतेचा त्याग केला असता तर ती कथा अशा पार्श्वभूमीवर वाल्मिकीनें निवडलीच नसती.

चर्चेकरितां क्षणभर असें मानूं कीं, रामानें सीतेचा त्याग केला होता. मग केवढा दारुण हा प्रसंग! असा प्रसंग फत्तराच्या हातांत पडला तर त्या फत्तरांतून महाकवि जन्म पावेल. आणि तो महाकवीच्या हातांत पडला तर त्याचे वितळून पाणी होऊन जाईल. सीता ही रामासारख्या पुरुषश्रेष्ठाची पुण्यमूर्ति पत्नी; कुसुमकोमला, महामंगला; त्रिभुवनाची राणी होण्यास उचित अशी; गंगेच्या ओघाप्रमाणें पावनचरिता; नुकतेंच, वनवासाचें, रावणाघरचें आणि अपमानाचें संकट कसें बसें पार पाडून आलेली ती अबला; नुकतीच संसारास लागलेली; पहिल्यांदाच गरोदर म्हणून अननुभवानें बावरलेली; जुळ्या गर्भाच्या उतरल्या भारानें क्लान्त झालेली; पोटांतील ढुशांमुळें आणि शंभर क्रोशांच्या प्रवासानें श्रांत झालेली; आपलें बाळ स्तनपान करीत आहे असें स्वप्न पहात डोळे मिटून चाललेली; पवित्र ऋषींच्या पादवंदनासाठीं म्हणून एक दिवस वनांत रहाण्यास आलेली; वचन देऊनहि राम बरोबर आला नाहीं म्हणून ईषद् रुसलेली; पुत्रवत् भावोजी बरोबर आहे म्हणून निर्घोर असलेली; तिच्यावर वज्रपात घडत आहे, तिला एकाएकीं वनांत टाकून देऊन लक्ष्मण सांगत आहे कीं, तिच्या नवऱ्यानें तिचा कुलटा म्हणून त्याग केलेला आहे. किती दारुण हा प्रसंग! व्याधाचा शर तो तरी दुसरा काय असावयाचा! रक्तबंबाळ तें तरी याहून अधिक काय व्हावयाचें!

असा प्रसंग घडला असता तर त्यानें वाल्मिकीची कवित्वशक्ति समूळ हलवून टाकली असती; आणि ती शक्ति त्या प्रसंगाला पुरीही पडती. वाल्मीकी हा सामान्य कवि नव्हता. रामचरित्राच्या पहिल्या सहा कांडांतील करुण प्रसंगांना तो पुरून उरला, हेंच रामायण काव्याच्या सौंदर्याचें गमक आहे. याही करुणगंभीर प्रसंगावर वाल्मिकीच्या कवित्वाचे संस्कार घडते तर काव्यसौंदर्याचे जे उन्मेष प्रकटते त्यांनीं विश्व दिपतें. करुणेला असा पूर येतो कीं, अश्रुं आटते. पण उत्तरकांडांत आपणांला काय दिसून येते ? त्या कांडांत रामकथा एवढीच. पण एकशे अकरा सर्गांतील फक्त साडेतीन सर्ग या कथेला मिळाले आहेत. आणि साडेतीन हजार श्लोकांतील उणेपुरे शंभर श्लोक मिळाले आहेत. वर्णन आहे तें "राम लक्ष्मणास बोलावतो आणि म्हणतो चूप, बोलूं नकोस. उचल तिला, घाल रथांत आणि टाक नेऊन वनांत" अशा तोलाचें! राणीची भिकारीण, पतिव्रतेची कुलटा, कळीची माती करणाऱ्या करुणाघन प्रसंगाचें उत्तर कांडांतील वर्णन वाल्मिकीचें आहे असें म्हणणें म्हणजे आपल्या रसिकतेचें












दिवाळें फुंकून वाल्मिकीच्या कवित्वाला घोर अन्याय करणें आहे.

• कुठल्याही कलाकृतीला एक आकार असतो. शिल्प असतें. वाल्मिकीनें आपल्या रामायाणाचें शिल्प घडविलें तेव्हां शेवटीं उपसंहार लिहून ग्रंथसमाप्ति केली. हा उपसंहार युद्धकांडाच्या शेवटीं आहे. उत्तर कांडाच्या शेवटीं दुसरा एक उपसंहार आहे तो पाहिला कीं, एकाच ग्रंथाला दोन उपसंहार आणि त्यांतला एक ग्रंथाच्या मधेंच यांतलें अनौचित्य प्रकट होतें आणि उत्तर कांड हें वाल्मिकीनें लिहिलेलें नाहीं हें स्पष्ट होतें.

ग्रंथाची प्रस्तावना, शैली आणि शेवट या तीनच गोष्टी उत्तर कांड हें वाल्मिकीचें नाहीं असें सिद्ध करतात असें नाहीं, ग्रंथाच्या या दोन भागांत इतरही असे शेकडों पुरावे आहेत कीं, त्यांनीं हीच गोष्ट सिद्ध होते. त्यांतील कांहींचा विचार करूं.

वाल्मिकी रामायणांत राम हा माणूस आहे. तो सुखदु:खांत पडत आहे, घळघळां रडत आहे, प्राण कंठाशीं आणून लढत आहे. बेशुद्ध पडत आहे. पण उत्तर कांडांतील राम हा, दीन झालेले देव, त्यांच्या विष्णूस प्रार्थना, विष्णूचें अवतार घेण्याचें वचन इत्यादि ठराविक चाकोरींतून विष्णूचा चतुर्थांश अवतार झालेला आहे. महाभारतांतील कृष्णाचा हरिवंशांत देव बनला तसाच वाल्मिकीच्या रामाचा उत्तर कांडांत देव बनला. सीता ही पूर्वभागांत जनकाची कन्या आहे तर ती उत्तर कांडांत विष्णूवर प्रेम करणारी आणि तो पति मिळावा म्हणून तप करणारी वेदवती झाली आहे.

शंबुकाचें चरित्रहि उत्तर कांडांतच आहे. शंबूक हा सह्याद्री पर्वतावर तप करीत असतो. त्यांत पाप आहे असें क्षणभर मानलें तरी रामाचें राज्य हें हिमालयाजवळ असतें आणि त्याचा राजा म्हणून दंडकारण्याशीं कांहींही संबंध नसतो. अशा वेळीं शंबुकाच्या पापाचीं फळें रामराज्यांत कशीं प्रकट व्हावीं हें कळत नाहीं. परस्परांचा परिचय करून दिल्याशिवाय वध करावयाचा नाहीं ही शिष्टांची नीति राम पूर्व रामायणांत पाळतो तशी आतां पाळत नाहीं.

पूर्व रामायणाचा विचार करतां वाल्मिकीची दृष्टि अतिशय उदार दिसते. एक दोनच पुरावे घ्यावयाचें तरी मारुती हा अनार्य होता. पण त्याचा वेदाभ्यास आणि तप याचा वाल्मिकीनें गौरव केला आहे. रावण बिभीषण हेहि आर्य अथवा ब्राह्मण नसूनही तपस्वी होते. त्यांच्या तपाचीं फळें ब्राह्मणमृत्यूच्या रूपानें अयोध्येंत प्रकटलीं नाहींत. गुह हा हीन वर्णाचा होता. पण रामाचा त्याशीं अकृत्रिम स्नेह होता. जटायू हा तर गिधाड. मृतमांस खाणारा. पण रामानें त्याच्याशीं स्नेह ठेवला व त्याच्या मृत्युनंतर त्याला पिंडदान केलें. या साऱ्या घटनांतून वाल्मिकीची जी जातीभेद निरपेक्ष मानवतामय दृष्टि दिसून येते त्या प्रागतिक दृष्टीशीं संपूर्ण उलट अशी शंबूक वधाची घटना आहे. जटायूशीं रामाचे स्नेहबंध जुळण्यास कारण होणारा अगस्तीच इथें उत्तर कांडांत शंबूकवधाची स्तुती करत आहे. या गोष्टी भौगोलिक दृष्ट्या तर विसंगत आहेतच पण वाल्मिकी आणि अगस्ती यांच्या मनोपिंडाशींही विसंगत आहेत.

उत्तर कांडांतील प्रत्येक उपकथेचा समारोप 'ही कथा वाचील त्याला पुत्रपौत्रांचा लाभ होईल' अशा थाटांत केलेला आहे हें पूर्व भागांतील कथांशीं जुळणारें नाहीं. उत्तर कांडांत मधुराक्षरास मारावयास अयोध्येंतून मथुरेस चाललेला शत्रुघ्न वाल्मिकीच्या आश्रमांत येतो असें जें वर्णन आहे तें पूर्व रामायणांतून ठरणाऱ्या प्रयाग जवळील वाल्मिकी आश्रमाच्या स्थानाशीं विसंगत आहे.

उत्तर कांडांतील अप्रयोजकता इथेंच संपत नाहीं. रामायणांतील मुख्य आदर्शानाच काजळी लागावी अशी घटना उत्तर कांडांत आहेत. कुलांतील ज्येष्ठास राज्य द्यावयाचें व कनिष्ठांनीं त्याची सेवा करावयाची हीच तर रघुकुलाची कीर्ति. हाच रामायणाचा आदर्श. सारें रामायण याचसाठीं घडलें. राम आणि भरत यांत राज्याची वांटणी दशरथ करून देता तर रामायण कशास घडतें? पण असें घडावयाचें नाहीं, घडूं द्यावयाचें नाहीं, याच परंपरेसाठीं एवढा त्यागाचा पर्वत उभारला गेला. पण उत्तर कांडांत या आदर्शावर पाणी पडलें आहे. रामाच्या राज्याचें सारखें वांटे करून ते पुढील पिढीच्या हवालीं केले आहेत. हें पाहिलें कीं, हंसावें कीं रडावें हें कळेनासें होतें. जे आदर्श आपणच निर्मिले त्यांना आपल्याच हातांनीं नख लावावयाचें! कुलकीर्ति अशी वाऱ्यावर सोडावयाची तर सीतात्याग तरी कशासाठीं करावयाचा?

जो राम 'मी तुमच्यासाठीं राज्य करणार' असें पूर्वी म्हणत असतो तो प्रसंग येतांच उत्तर कांडामध्यें लक्ष्मणाच्या मुलांना दूर बलुचिस्तानकडे मुलुख देऊन पाठवितो. जो राम अकारण कुणावरही शस्त्र उचलत नाहीं असें पूर्वकांडांत दिसतें, तोच राम केवळ भरताच्या मुलांना मुलूख मिळावा म्हणून उत्तरकांडांत अकारण काश्मीरवर चालून जातो आणि तीन कोटी निरपराध लोक भरताहातीं मारवितो. ज्या भरतानें हातीं आलेलें राज्य लाथाडून चवदा वर्षें उकिरड्यावर निवास केला त्याच भरताची राज्यलोभानें उत्तर कांडांत अशी अवदशा झालेली दिसते. पूर्वी हातीं आलेलें लंकाराज्य रामानें सोडून दिलें; मांडलिक होऊं शकता तो सुग्रीव सार्वभौम ठेवला; लक्ष्मण आणि भरत किती कष्टले कीं, आदर्श

टिकावे, मंगल घडावें. ही रघुकुलाची तीव्र तपस्या व्यर्थच काय? एकाच पिढींत या तपस्येची माती घडावी आणि ती रघूंनीच स्वहस्तें करावी काय?

पूर्वकांडामध्यें निर्जीव गोष्टींना वाचा नाहीं. उत्तर कांडामध्यें विमानांनाही वाचा फुटली आहे. रावण सीतेवर बलात्कार कां करीत नाहीं याला पूर्व कांडांत जें कारण सांगितलें आहे त्याहून उत्तर कांडांतील कारण भिन्न आहे. उत्तर कांडांतील कारण वर्णितांना उत्तुंग स्तन आणि चक्राकार नितंब यांच्या मोहांत गुंतलेल्या प्रक्षेपकाला आपण आपल्या पायांवर धोंडा पाडून घेत आहोंत याचें भान उरलेलें नाहीं.

रामायणाच्या पूर्व कांडांत जे पराक्रमाचे डोंगर उठतात ते राम आणि लक्ष्मण यांच्या सहकारानें उठतात. या दोन व्यक्तींत्यांच्या संगमानें एक मनोज्ञ व्यक्तित्व साकार होतें. दैववादी राम अनेकदां हताश झाला असतां "किं नाम कृपणं दैवं" म्हणजे दैव हा कोण्या झाडाचा पाला? असें म्हणणारा प्रयत्नवादी लक्ष्मण त्याला पौरुषाची प्रेरणा देतो. पण उत्तर कांडांत हाच लक्ष्मण "दैवं हि दुरतिक्रमम्" म्हणजे दैव अटळ आहे म्हणून हातपाय गाळून बसतो—जो एकतिसाव्या वर्षी पराक्रमाचा पुतळा असतो तो बत्तीसाव्या वर्षी दैवाचा दास बनतो. पराक्रम हाच पुरुषार्थ मानणाऱ्या माणसानें पराक्रमाची शर्थ केल्यावर त्याच्यावर दैवानें मात करणें ही गोष्ट वेगळी आणि पराक्रमी पुरुषानें दैवापुढें हातपाय गाळणें ही गोष्ट वेगळी.

पूर्व भागांतील राम हा "बुद्धिमतां वरः" म्हणजे ज्ञात्यांमध्यें श्रेष्ठ आणि संभाषणकुशल आहे. उत्तर कांडांतील रामाला हीं विशेषणें लावतां येत नाहींत. उत्तरकांडांत हा राम अक्षरशः 'ती रामाची सीता कोण होती' 'तो रावण कोण होता' असले प्रश्न विचारतो मग कोणीतरी ऋषि त्याला तें समजाऊन सांगतो आणि तें ऐकल्यावर राम म्हणतो "हं! हें मी आधींच ऐकलें होतें खरें!"

उत्तर कांडांतील राम असा अनवधानीच बनला आहे असें नाहीं तर तो अशिष्टही बनला आहे. अनेक वर्षांनी मुलीच्या भेटीस आलेला जनक आनंदानें अयोध्येस चार दिवस रहातो त्याला राम म्हणतो "सासरेबुवा, तुम्ही आमच्याकडे आतां बरेच दिवस राहिलांत. आतां आपल्या घरीं जाल तर बरें" हें वाचल्यावर मन विषादानें भरून जातें.

रामाचें पत्नीप्रेम एकनिष्ठ यांवर तरी विशेष भाष्य नको. या गोष्टी म्हणजेच रामचरित. पण उत्तर कांडामध्यें रामाचें वर्णन (उ. ४३।२०–२१) "मैथुन करणारांत अत्यंत प्रवीण असा तो राम दारू पिऊन झिंगलेल्या त्या अनेक सुंदरींशीं मैथुन करता झाला", असें केलें आहे. यावर अधिक भाष्य करणें माझ्या सामर्थ्याबाहेरचें आहे.

वाल्मिकीनें आपलें काव्य संपविलें आहे तें कवित्वाचा झेंडा लावल्याच्या उन्मादांत! या समाप्तींत एक डौल, गति, आकार आणि सौंदर्य आहे. या उलट उत्तर कांडाचा उपसंहार आहे कीं, जो ही पोथी वाचील त्याला सुवर्ण, धेनु, वस्त्रें यांचें दान करावें. या उपसंहारावर विचार केला असतां उत्तर कांडाचा प्रक्षेपक हा पुराणिक असावा आणि त्यानें पोथी वाचणाऱ्याच्या उदरनिर्वाहाची सोय जातां जातां करून ठेविली असावी हें स्पष्ट होण्यास कठीण जात नाहीं.

पुराणिक हा समाजशिक्षक असल्यानें आपल्या समाजशिक्षकाच्या कर्तव्याच्या अनुषंगानें त्याला कर्तव्य म्हणूनच अनेक गोष्टी करणें भाग पडलें असणार. या गोष्टी भल्याबुऱ्या कशाही असल्या तरी त्या कर्तव्यासाठीं घडल्या तर क्षम्य ठरल्या. परंतु त्यागशील कर्तव्यांत जसजशी उदरनिर्वाहाच्या स्वार्थीचीही दृष्टी मिसळत गेली तसतशी त्या कृतीची क्षम्यताही कमी कमी होत गेली. वाल्मिकीचा स्त्रीविषयक दृष्टिकोन हा अतिशय उदार होता. प्रागतिक विचारवंतांनाही न पेलण्याइतका तो प्रागतिक होता. रावणाच्या बंदींत आपलें शील अभंग राखण्याचें जें अग्निदिव्य सीतेनें आपल्या पातिव्रत्याच्या प्रखर तेजामुळें केलें त्यावर रामाचा असंदेह विश्वास बसला. सीतेशीं सहजीवन जगतांना रामाला किल्मिषाचा स्पर्शही झाला नाहीं. तरुण आणि सुंदर अशी कामिनी, तिचें बलात्कारासाठींच हरण करणाऱ्या परपुरुषाकडे दीर्घकाल राहिली असतां तिला असंशय शुचिर्देहिनी मानून तिच्याशीं अकिंतु सहजीवन जगणें हें मोठमोठ्या सुधारकांना पचूं शकणार नाहीं. पण राम असें सहजीवन जगला आणि वाल्मिकीची उदार दृष्टि हें मनोमीलन जाणून घेऊन वर्णूं शकली. ही वाल्मिकीची उदार दृष्टि त्याच्या नंतरच्या समाजशिक्षकांना पचली नाहीं.

स्त्रीयांच्या नीतीविषयीची ही दृष्टि सीतेच्या बाबतींतच पूर्व रामायणांत दिसते असें नव्हे. या दृष्टीचा सीतेहूनही अधिक लाभ अहिल्येला झालेला आहे. वाल्मिकीची अहिल्या ही एक नवयौवना असते. तिचा पती असतो म्हातारा, सात्विक प्रवृत्तीचा, तपस्वी, जितेंद्रिय, काम हा उपभोगानें शमत नाहीं असें मानणारा; अर्थात नवयौवनेला असून नसून सारखा. त्यामुळें कामकेलीविषयीचें अहिल्येचें कुतूहल अविवाहितेइतकेंच अतृप्त असतें. त्यामुळें विलासी, तरुण आणि रूपवान इंद्र समोर येतांच ती जाणीवपूर्वक कामतृप्ति करून घेण्यासाठींच त्याला वश होते. इथें फसवणूक मुळींच नाहीं. इंद्रानें तिचें समाधान केल्यावर तीं "मी धन्य झालें, तृप्त झालें, कृतार्थ झालें" अशी कबुली देते – (बा-४९।२०). इंद्रही "तूं आज मला तृप्त केलेस" अशी पावती देतो. पण असें जाणीवपूर्वक कुलटाकर्म घडलें असूनही वाल्मिकी तिला दगड करत नाहीं. तर चार लोकांच्या नजरेआड तप करावयास लावून पश्चात्तापानें शुद्ध करतो. जणुं तो तिला म्हणतो, "मुली, हें वाईट झालें. पाप झालें. पण हें तुला समजलें ना! तूं शहाणी आहेस. पुन्हां नको हो असें करूं" केवढा हा देवस्वभाव केवढी ही उदार दृष्टि! केवढें मानस शास्त्राचें ज्ञान! केवढी अथांग क्षमाशीलता!

पण आपण करंटे! कामधेनु दारांत आली ती आम्ही ओळखली नाहीं. तत्त्वज्ञानाचा विकृत अतिरेक आणि स्त्री-स्वातंत्र्याच्या कोत्या कल्पना यांच्या बंधनांनीं नाडलेल्या आपल्या समाजशिक्षकांना वाल्मिकीची दृष्टि समजली नाहीं. समाजाच्या नीतीची गुरुकिल्ली स्त्रीपुरुषांच्या शारिरीक संबंधांतच केवळ आहे अशा संकुचित खुंटाळ्या भोवतीं फिरणाऱ्या समाज धुरीणांना वाल्मिकी पेलला नाहीं. वाल्मिकीच्या उदार दृष्टीचा कस्तुरीसारखा परिमल मोठमोठ्या चंदनी पुरुषांनाही सोसला नाहीं. त्यामुळें त्यांच्याकडून उत्तर कांड रचलें गेलें. अहिल्येचा उद्धार आणि सीतेचा स्वीकार

# ही ज्योत सतत जागती ठेवा



ज्योत जागती ठेवण्यासाठी
तेलाचा अखंड पुरवठा हवा;
तसेंच निष्ठायुक्त सेवेसाठी
स्फूर्तीचा झरा वाहता हवा.
निरपेक्ष जनसेवेचें व्रत
चालू ठेवण्याची पुनर्प्रतिज्ञा
करण्यास शुभ-समय म्हणजे
ही महन् मंगल दिवाळी !

राष्ट्र सेवेंत सदैव मग्न




मध्य आणि पश्चिम रेल्वे
यांजकडून प्रकाशित









यम रामाच्या चरित्रांतील दोन परमोदात्त गोष्टींवर पाणी पाडण्यासाठीं उत्तर कांडाची रचना झाली. पूर्व रामायणांतील अनेक कथांपैकीं फक्त अहिल्येचीच कथा याच कारणानें उत्तरकांडांत पुन्हां बदलून लिहिली गेली. अहिल्येचें कुतूहल गाळलें जाऊन तिला फसविण्यांत आले, आणि तिची शिक्षाहि घोरतर करण्यांत आली. सीतेचेंही चरित्र एवढ्याच दृष्टीनें बदलण्यांत आलें. रामानें जिला मांडीवर वाहिली, जिला सम्राज्ञी म्हणून अभिषेक घडविला, तिला उत्तर कांडांत जीवनांतून उठविण्यांत आलें. रघुकुलाचें आदरणीय मातृत्व रामानें जिला बहाल केलें ती कुलटा म्हणून चवाठ्यावर आली. रामसीतेच्या शरीर संबंधाची निरपेक्ष दैवी उदात्तता ज्यांना पेलली नाहीं त्यांच्या मनांत किंतु उत्पन्न झाला तो सुद्धां "कीदृशं हृदये तस्य सीता संभोगजं सुखं" अशा थिल्लर शब्दांमध्यें झाला.

वाल्मिकीचा राम माणूस खरा. पण किती थोर ! तो उत्तर कांडांत देव झाला आणि दगडांत विरला. रामानें माणूस म्हणून जो पुरुषार्थ केला तो दगडांत गाडला गेला.



ज्याचें चरित्र उदात्त, त्यांना अमानुष ठरवून माणसांपासून दूर न्यावयाचें, त्यांना देव ठरवून दगडांत ओतावयाचें, त्यांचें चरित्र दैवी म्हणजे आपल्या आंवाक्याबाहेरचें ठरवावयाचें ही आपल्या समाजशिक्षकांना जडलेली विकृति तेव्हांपासून आजवर अबाधित चालूं आहे आणि समाजाचा पाय मागें ओढण्यांत ती हातभार लावीत आहे.

उत्तर कांडाची रचना करतांना अप्रयोजकपणाची मजल इथवर गेली आहे कीं, प्रत्यक्ष कविश्रेष्ठ वाल्मिकीला जें रामायण लोकांकडून ऐकून घेऊन मग लिहिणें शक्य झालें त्यांत भर घालतांना प्रक्षेपकाला मात्र त्रिकालज्ञता लाभली. त्यानें त्या भरांत रामाच्या हातून लक्ष्मणाचा जवळ जवळ वध घडविला, रामास जवळजवळ वेड लाविलें आणि त्याच्या मृत्यूचें वर्णन तो जिवंत असतांनाच त्याला गाऊन दाखविलें.

सीतेला टाकून लक्ष्मण आला तर लगेच रामानें उत्तर कांडांत त्याला गोष्टी सांगावयास प्रारंभ केला. नृगराजाची गोष्ट, निमि राजाची गोष्ट, मिथी राजाची गोष्ट, यातुधानाची गोष्ट, मग कुत्र्याच्या फिर्यादीची आणि घुबडाच्या फिर्यादीची. जणुं सीतेची कांहीं फिर्याद असेल याचा यांना पत्ताही नाहीं. आपला जणुं दुसरा प्राण अशा सीतेला वनांत सोडून आलेल्या आपल्या स्नेह्याशीं आणि प्रियबंधूंशीं काय बोलणें होईल तें जाणावयास आणि त्याचें वर्णन करावयास हवा महाकवि ! सीतारामाचीं मनें जाणावीं आणि वर्णावी वाल्मिकीनें तें प्राकृतांचें काम नव्हे.

लोकमताचें उत्तर कांडांतील कारणही अयोध्येच्या पौरांना अन्याय करणारें आहे. जेव्हां मातापित्यांचा पत्ता नसलेली आणि अज्ञान जातकुळीची सीता युवराज्ञी म्हणून घरांत आली तेव्हां लोकांनीं काय केलें ? तेव्हां जर दशरथाच्या शब्दावर विश्वास बसला तर आतां सीतेच्या शुद्धतेबद्दल रामाच्या शब्दांवर विश्वास कां बसूं नये ? आणि तो बसला नाहीं तर नको तेव्हां उतरून सीतेच्या शुद्धीची खात्री देणारे शंकर अग्नि इत्यादि महापुरुष यावेळींच कां झोपून रहावे ?

ज्या दृष्टिकोनांतून वाल्मिकीच्या उदार दृष्टिकोनावर पाणी ओतणारें उत्तरकांड लिहिलें गेलें तो जरी सकृत्दर्शनीं यशस्पद वाटला तरी तो घातक होता. जगाचीं क्षितिजें मर्यादित होतीं तोवर या घाताचें स्वरुप प्रगट झालें नाहीं. पण जेव्हां क्षितिजें विस्तारलीं, समाज कूपांतून बाहेर आला, चढाओढीचा प्रसंग आला, इतर समाजाशीं संपर्क आणि संघर्ष होऊन जो लायक तोच जगेल असें निर्वाण पुढें ठाकलें तेव्हां आपला घातच झाला.

सीताहरणाचें आणि सीतात्यागाचें रामायण पुन्हां पुन्हां घडतच राहिलें. आणि त्या प्रत्येक वेळीं वाल्मिकीनें वर्णिलेला राम हा माणूस प्रक्षेपकानें वर्णिलेल्या राम या देवापेक्षां अधिक श्रेष्ठ होता, कितीतरी अधिक उदात्त होता हेंच सिद्ध झालें. माणूस असलेल्या वाल्मिकीच्या रामानें ज्या पुरुषार्थाचा डंका गाजवून सीतेला संरक्षण दिलें तो पुरुषार्थ आपल्या स्वप्नांतही आला नाहीं. पण कुणा पुराणिकाच्या देव बनलेल्या रामानें जो सीतात्याग केला तो मात्र आम्ही क्षणांत अनुसरलों. रामाच्या गुणांत भर पाडण्यासाठीं सीतात्याग वर्णिला असें जे मानतात ते खोट्यानाट्या वर्णनानें गुणांत भर पडत नाहीं हें विसरतात. आपला इतिहासविषयक दृष्टिकोन आणि सत्यचरित्राची चाड हिणकस आहे हेंही विसरतात पण शिवाय सीतात्यागानें रामाच्या महात्म्यांत भर न पडतां त्याला उणेपणा आला हें लक्षांत घेत नाहींत. सीतात्याग करून झालेल्या प्रक्षेपकाच्या रामदेवापेक्षां वाल्मिकीचा माणूस राम अधिक श्रेष्ठ आहे. सीतात्याग करणारा देव हा अनुकरणसुलभ ठरला आहे पण सीता संरक्षण करणारा माणूस मात्र आपल्या पल्ल्याच्या वर राहिला आहे. हीच उत्तर कांडाची शोकांतिका ! हेंच त्याचें अपयश ! हेंच त्याचें हीण !

हें हीण समाजाच्या रक्तांत खोलवर भिनलें आहे. त्याचे जे दुष्परिणाम झाले तेच अखेरचे असें म्हणतां येत नाहीं. आपण सावध व्हावयास हवें. रासक्रीडेचे रसरंग आणि सीतात्यागाची रडगाणीं गाण्याऐवजीं आपण द्रौपदीच्या अब्रूसाठीं कृष्णानें केलेलें राजकारण गावयास हवें आणि सीतेच्या मुक्तीसाठीं रामानें केलेले पराक्रम गावयास हवे. आपण हें जाणावयास हवें, की रामानें सीतेचा त्याग केलाच नव्हता. केलाच नव्हता. त्रिवार केला नव्हता.

• • •














# लंगर छाप बिडी

TOM & BAY/TSC/M-1/63

**ठाकूर सावदेकर आणि कंपनी प्रायव्हेट लि**

३७७, गुरुवार पेठ, पुणे-२








अनुक्रमणिका

(पान १० वरून—**हिमानी)**

स्वभाव असेल. पण आतांहि तसंच झालं. हिमानी स्तब्ध झाली.

"काय झालं हिमानी ?" मी विचारलं. माझा स्वर किंचित् चिडखोर होता.

"कांहीं नाहीं." पदराच्या टोकानें तिनें डोळे टिपले.

"मी तुला दुखावलं का ?"

"छी : छी : !" ती उद्गारली.

हिमानीचं "छी : छी :" मोठं मधुर असतं. छोटसं पांखरूं किलबिलावं तसं. अगदीं बंगाली. "छी : छी :" म्हणून चालतां चालतां हिमानी माझ्याजवळ आली. ती भरपाई करण्याचा प्रयत्न करीत होती. तिचं हें असं काय होतं तेंच मला कळेना. ती जवळ येत होती आणि दूर जात होती. दूर जात होती आणि पुन्हां जवळ येत होती. बोलत होती आणि अबोल होत होती. अबोल होत होती आणि बोलत होती. हिमानी आतां माझ्या जवळ आली आणि म्हणाली—

"आभाळांतले ते ढग पाहिलेत का ?"

"पाहिले."

"कुरणांत चरणाऱ्या मोठाल्या मेंढ्यासारखे ते ढग दिसतात नाहीं !"

"दिसतात दिसतात !" मी टाळी वाजविली. तिची उपमा मला एकदम पटली. उपमेवरून मला उपमा सुचली आणि मी म्हणालो—

"निळ्या गालीच्यावर कुणा पोरट्यानें शाईचे डाग पाडावेत तसेसुध्दां ते ढग दिसतात नाहीं का ?"

हिमानी हंसली. मग गंभीर झाली. आणि म्हणाली, "कुठल्याहि गोष्टीची तेढी बाजू तुम्हांला अचूक दिसते नाहीं का ?"

"दिसते आणि खुपते" मी म्हणालो.

"कां ?" तिनें विचारलें.

"आम्हीं मराठे स्वभावानेंच तेढे आहोंत असं म्हण, किंवा आमच्या उत्कृष्ट सौंदर्यदृष्टींत कांहीं वेडंवाकडं खपतच नाहीं, असं म्हण. बंगाल्यापेक्षां बऱ्याच विषयांत आम्ही वेगळे आहोंत. तुला काय वाटतं ?"

"मला कांहींच वाटत नाहीं."

"कां ?"

"पूर्व बंगाल्यांतून पिटाळलों गेलो तेव्हांपासून सगळं वाटणं संपलं ?"

"असं कसं होईल ?"

"असंच आहे. डाक्क्याहून आम्ही पळालों तेव्हां मी तेरा वर्षांची होते. आज चौदा वर्षें झालीं त्या गोष्टीला."

"म्हणजे तूं सत्तावीस वर्षांची आहेस हिमानी ! पण दिसतेस वीस—एकवीस वर्षांची !"

"Thanks for the Compliments. पण मला कांहीं वयच नाहीं ! शंभर वर्षं जगून भोगावं लागणार नाहीं तेवढं आम्ही एकेका दिवसांत भोगलं. एका दिवसांत डाक्क्यांतलं घर गेलं. माझ्या दोन्ही वडील वहिणींना त्या दिवशीं आम्ही मुकलों—मृणालिनी आणि नलिनी ! ह्यावेळी कुठें असतील त्या ? काय करीत असतील ? मी ह्यावेळीं मजेंत तुमच्याबरोबर चाललें आहे...."

हिमानीचे डोळे शून्यांत पाहूं लागले. तिची चाल मंदावली. मी अस्वस्थ झालो आणि म्हणालो—

"जाऊं दे त्या गोष्टी हिमानी !" पण हिमानीनें जणुं माझे शब्द ऐकलेच नाहींत. ती बोलूं लागली—

"मी, बाबा, आई आणि भाऊ कसे तरी सुटलों. सुटलों, पण देशोधडीला लागलों. इथें आलों आणि वर्ष—दोन वर्षांत बाबा गेले. भाऊ बिघडला. आई खचली. कसं तरी मी शिक्षण पूर्ण केलं. बी. ए. झाले, आणि बसलें ओढत नोकरीचा गाडा ! मी जेवतें खाते, हिंडते फिरतें, चांगले कपडे घालते, पण त्या दोघींचं काय ?" हिमानीच्या गालांवरून आंसवें ओघळूं लागलीं. काय बोलावें तें मला सुचेना. कांहींतरी बोलायचें म्हणून मी म्हणालो, "लेण्यांचा डोंगर जवळ आला हिमानी. हा हिरवाचार डोंगर मोठा सुंदर दिसतो नाहीं ?" हिमानीनें क्षण दोन क्षण टक लावून समोरच्या डोंगराकडे पाहिलं आणि ती म्हणाली—

"हिरवेपणा वरवरचा आहे. खालीं नुसती घाण आहे—माती आहे. आग आहे ? उकळतां लाव्हा आहे ! तुम्ही नुसतं वरवर पाहतां सौंदर्याचा वरचा वर्ख ! आंतलं तुम्हांला कांहीं दिसतंच नाहीं ! कांहीं दिसतंच नाहीं तुम्हांला !"

मी हिमानीकडे पहातच राहिलो. क्वचित् असें बोलतांना मी तिला ऐकलें होतें. सामान्यतः ती शांत असे. आज तर घरून निघतांना ती आनंदांत देखील होती. पण ह्या क्षणीं तिच्या अंतर्यामांत वादळ उठलें होतें. तिला शांत करण्यासाठीं मी म्हणालो, "जरा माझं ऐकतेस का हिमानी ?"

"ऐकण्यासारखं आतां कांहीं उरलेलं नाहीं. ऐकणं मला शक्य-होणार नाहीं "

"ऐकण्यासारखं आज कांहींतरी मी तुला सांगणार आहे."

"कांहीं – कांहीं – कांहीं मला ऐकतां येणार नाहीं !" बोलतां बोलतां हिमानी हुंदके देऊं लागली. व हुंदके देतां देतां थांबली. गोंधळून व गांगरून कांहीं क्षण मी स्वस्थ उभा राहिलो. व मग तीव्र स्वरांत म्हणालो—

"तर मग चला घरीं !" मी तोंड फिरविले व उलट दिशेनें चालूं लागलो. मी दहा—वीस पावलें गेलों असेन नसेन तोंच हिमानी माझ्या मागें धांवत आली आणि म्हणाली, "ऐकलंत का ? थांबा !"

"कशाला थांबायचं ?" विरक्तपणें मी विचारलें "ही सहल आपण आनंदासाठीं काढली होती. तुला त्यांत आनंद नसेल तर घरीं गेलेलं काय वाईट ?"

"नको नको !" हिमानी म्हणाली. "माझ्यासाठीं ही सहल काढलीत. मी तुमचा विरस केला. क्षमा करा. मी पुन्हां नाहीं असं करणार !" बोलतां बोलतां हिमानीनं माझ्या खांद्यावर हात ठेवला आणि विनवणीनें माझ्याकडे पाहिलें. तिच्या त्या दृष्टीनं आणि स्पर्शानं मी तत्काळ विरघळलो. आणि म्हणालो,

"क्षमा कसली मागतेस ? क्षमा मागण्यासारखं तूं केलंस काय ?"

"पुष्कळ केलं " हिमानी भुईकडे पहात म्हणाली. "तुम्हांला क्षणभरसुध्दां दुःख होऊं नये असं मी वागायला पाहिजे. तसं मी वागलें नाहीं. मला 'युनिव्हर्सल ॲडव्हर्टायझर्स'मध्यें नोकरी मिळवून देणारे तुम्ही ! मला चांगल्या वस्तींत घरदार मिळवून देणारे तुम्ही ! माझ्या भावाला पोलिसांच्या भानगडींतून सोडविणारे तुम्ही !

अनुक्रमणिका







सहस्रावधी रुपयांचे व्यवहार करणारे तुम्ही उगवते उद्योगपति, आणि मी तीन–चारशें रुपये मिळविणारी एक सामान्य मुलगी. पण माझ्या आईला वेडाचे झटके आले तितके वेळां तुम्ही माझ्या सहाय्याला धांवलांत! स्वतःच्या आईसारखी तिची काळजी घेतलीत. माझ्या आजारांत तुम्हीं मला स्वतःच्या घरीं आणून ठेवलंत! मला ठेवलंत, माझ्या आईला ठेवलंत, भावाला ठेवलंत! किती केलंत तुम्ही माझ्यासाठीं किती केलंत!" हिमानीनें माझा हात धरला व उमाळ्यानें दाबला. माझा हात ती कुरवाळत राहिली. माझा वैताग पूर्णपणें संपला. जीव हरखून गेला व मी म्हणालों—

"विसरून जा त्या गोष्टी!"

"विसरतां कसं येईल?"

"तर मग विसरलं पाहिजे तेवढं विसरून जा. लक्षांत ठेवलं पाहिजे तेवढं लक्षांत ठेव!"

"एक गोष्ट मी लक्षांत ठेवली आहे."

"कोणती?"

"तुम्ही मला एकदां एक उंच नऊवारी साडी भेट दिली होतीत. तुम्ही म्हणाला होतांत, तूं महाराष्ट्रांत राहतेस, मराठी बोलतेस, मला तुला एकदां नऊवारी साडी नेसलेली पाहायचं आहे!"

"होय, पण तूं कांहीं कधीं ती नऊवारी साडी नेसली नाहींस."

"नाहीं नेसलें, पण आतां नेसेन!"

बोलतां बोलतां आम्ही एका ओढयाच्या कांठीं आलों. ओढयांतून गढूळ पाणी खळाळत होतें. ओढा फारसा रुंद नव्हता पण खोल किती असेल तें सांगतां येत नव्हतं. ओढयान्च्या कांठाशीं हिमानी थबकली आणि म्हणाली, "आतां कसं?"

"कसं काय? चलायचं!" मी उत्तर दिलं. मी धोतर सांवरलं पायांतल्या वहाणा हातांत घेतल्या. हिमानीनें वहाणा माझ्या हातांतून ओढल्या व स्वतःच्या हातांत घेतल्या.

"हें काय?" मी म्हणालो. माझ्या वहाणा तूं घेणार!"

"डोक्यावरसुध्दां घेईन!" तिनं उत्तर दिलें. ह्या उत्तरानें माझं मन हरखलं. तीन वर्षं ह्या अशाच कांहीं शब्दांची मी वाट पहात होतो. आणखी अशाच कांहीं शब्दांची–शब्द ऐकण्याची अपेक्षा मी करीत होतो. हळुंहळूं आम्ही दोघेंहि पाण्यांतून पावलें उचलत होतों. पाणी प्रथम घोटयापर्यंत आलें मग गुढघ्यापर्यंत. मग मांडीपर्यंत. प्रवाहाच्या मध्यभागीं पाण्यांत बरीच ओढ होती. ती ओढ हिमानीला सोसेना. तोल सांवरत क्षणभर ती जागच्या जागीं उभी राहिली, आणि म्हणाली, "पुढें पाणी जास्त खोल तर नसेल?"

"असेल सुध्दां." मी उत्तर दिलें. "पाणी खोल असेल. प्रवाहाला ओढ असेल."

"तर मग?" माझी पादत्राणें घट्ट छातीशीं धरून डगमगत्या पायाझेर उभी असलेली हिमानी उद्गारली.

"तर मग हें!" झटकन् मी दोन्हीं हातावर हिमानीला उचललें. हिमानी इतकी मृदु असेल, इतकी हलकी असेल ह्याची मला कल्पना नव्हती. तिचा इतका निकटचा स्पर्श मला कधीं झाला नव्हता. त्या स्पर्शाची गेलीं तीन वर्षं मी केवळ स्वप्नें पहात होतो. हिमानीचें हिमगोरें शरीर मी नुसतें दुरून पहात होतो. तें शरीर आतां माझ्या हातांवर होतें, माझ्या छातीशीं होतें. तिच्या स्पर्शानें शरीर कांपलें, तापलें. प्रवाहाच्या मधोमध मी पुतळयासारखा स्तब्ध उभा होतो. हिमानीचें शरीर शहारत होतें. डोळे मिटलेले होते. तिच्या ब्वासाला वेग आला होता, व एखाद्या पिसाप्रमाणें तो सुगंधी श्वास माझ्या गालाला स्पर्श करीत होता.

"हिमानी!" मी घोगऱ्या–दाटलेल्या कंठानें म्हणत होतो. "हिमानी! तुला अद्याप कळत नाहीं का? माझं........" परंतु माझं वाक्य पूर्ण झालं नाहीं. दोन टिटव्या माझ्या कानांजवळून ओरडत गेल्या, फडफडत गेल्या, हिमानीचं शरीर थरथरलं. तिचा माझ्या मानेभोवती असलेला विळखा घट्ट झाला, अधिक घट्ट झाला आणि मग एकदम सैल पडला. तिनं एक खोल उसासा सोडला व डोळे न उघडतांच ती पुटपुटली.

"मला ह्या पाण्यांत तुम्ही बुडवून टाका!"

"त्या शब्दांचा जणुं मला चटका बसला. टिटव्या पुन्हां ओरडल्या. पुन्हां फडफडल्या. गढूळ, गरगरत्या पाण्यांतून मी पावलें टाकूं लागलो. "बुडवून टाका" कां म्हणून हे शब्द? हें शब्द प्रेमाच्या सीमेचें की विटलेल्या विरक्तीचें? मी हिमानीच्या चेहेऱ्याकडे पहात होतो. अद्याप तिचें डोळे मिटलेलेच होते. मी तिला कांठावर खालीं ठेवलें. व तिनें डोळे उघडले. स्मित केले. ती खालीं वांकली. रुमालानें तिनें माझीं पावलें कोरडी केली व माझ्या पायांत वहाणा सरकावल्या. माझें हृदय भरून आल्यासारखें झालें मी म्हणालो, "ही एवढी सेवा कां म्हणून हिमानी?"








"तुम्ही माझं केवढं तरी ओझं उचलतं. नेहमीं उचलत आला आहांत. मी काय तुमच्यासाठीं एवढं करूं नये ?"

"तुझं सगळं ओझं तूं मला उचलूं दिलेलं नाहींस. असं कां म्हणून हिमानी ?"

"सगळं ओझं कुणीं कुणाचं उचलूं शकत नाहीं. देवाच्या सृष्टीचा असाच न्याय आहे "

"जरा माणसावर विश्वास ठेव हिमानी. माणसं एकमेकांचं ओझं हलकं करूं शकतात. सुखासारखंच दुःखहि वांटतां येतं. वाटण्यानं तें हलकं होतं. नाहींसं सुध्दां होतं. प्रयत्न तर करून पाहशील ?"

"करते आहे, करून पाहीन !" चालतां चालतां हिमानीनें चेहरा वळविला आणि माझ्याकडे पाहून स्मित केलें. त्याच क्षणीं ढगांतून सूर्य डोकावला आणि आमच्या सभोंवार सोनेरी प्रकाश फांकला.

"पहा, पहा." डोळे विस्फारून हिमानी म्हणाली, "इथं उजेडाचा पट्टा आहे आणि पुढें सांवलीचा पट्टा आहे. त्याच्या पुढें पुन्हां उन्हाचा पट्टा आहे ! सोनेरी उन्हांत न्हालेला तो हिरवा डोंगर किती सुंदर दिसतो आहे !"

"सोनेरी उन्हांत न्हालेलं आणखीहि कांहीं सुंदर दिसतं आहे." हिमानीच्या डोळ्यांकडे पहात मी म्हणालो.

"सुंदर डोळ्यांना तें सौंदर्य जास्तच सुंदर दिसत असेल."

"जें सुंदर आहे तें मला ह्यावेळीं खूप सुंदर दिसत आहे खरं !" आपल्या लांब पापण्या उचलून काजळ भरल्या डोळ्यांनीं हिमानीनें एकदां माझ्याकडे आपादमस्तक पाहिलें व लज्जेनें लालीलाल होत एखाद्या लहान मुलीच्या चपळाईनें तिनें समोर सूर घेतला. त्याच उल्हासानें ती डोंगर चढूं लागली. "थकवा तर येणार नाहीं हिमानी?" मी तिला विचारलें.

"नाहीं येणार" ती म्हणाली. व चालत राहिली.

"आलाच थकवा" तिच्या उडत्या पदराचें टोंक पकडून मी म्हणालो "तर मी तुला उचलून डोंगर माथ्यापर्यंत नेईन. मघां पाण्यांतून नेलं आतां डोंगरावरून नेईन !"

"तुम्ही नाहीं थकणार ?"

"नाहीं थकणार. उलट माझं बळ वाढेल."

"असं कितीसं ओझं उचलूं शकाल तुम्ही !"

"तुझं जेवढं कांहीं ओझं आहे, तेवढं निश्चितच उचलूं शकेन."

"पण मला माझ्या पायानंच चालूं द्या. तेवढं बळ माझ्यांत आहे!" हिमानी म्हणाली व ती माझ्या मागोमाग चढण चढत राहिली. चढणं वाढत होतीं आणि हिमानीचा उल्हासहि वाढत होता. धाप लागत होती. शरीर थकत होतें, पण तिचा आनंद मात्र वाढतच होता. तिला एवढ्या आनंदांत मी पूर्वी कधीं पाहिलें नव्हतें. घड-पडत, धापा टाकत ती माझ्या मागोमाग येत होती. मी तिला मधूनच हात देत होतो. मधूनच ती माझा हात मागत होती. मनावरचें सारें दडपण, परकेपणाचा सारा दुरावा जणुं तिनें डोंगर–पायथ्याशीं ठेवला होता. उत्साहानें ती चढण चढत होती. भिरभिरत्या दृष्टीनें सभोंवार पहात होती. ढगांचे आकार पालटत होते. सूर्यकिरणांचे सोनेरी पडदे मधूनच सोडले जात होते व गुंडाळले जात होते. पाव-साळी पाण्याचे अनेक आरसे दृष्टिपथांत येत होते. आम्ही वर चढत होतो, व तो हिरवा विस्तार वाढतच होता. वारा मोकळ्या सुट-लेल्या वांसराप्रमाणें मधूनच हुंदडत होता. हिमानीचा पदर उडत होता. माझे कपडे फडफडत होते. वाऱ्याचा तो राकट स्पर्श एखाद्या जीवनदायी वरदात्यासारखा वाटत होता. सारा आसमंत शांत होता. दूर चरणाऱ्या गुरांचे ठिपके हलतांना दिसत होते. वाऱ्याचा एक नवा झोत दिसत आला. तो झोत रानांतले परो-परीचे गंध घेऊन आला. त्या वाऱ्यावरच गुराख्याच्या पाव्याची तान विखुरली आणि हिमानी एकाएकीं गुणगुणूं लागली, "Full are thy pitchers, and far to carry, lone is the way and long!"

कान टवकारून मी ऐकूं लागलो. सरोजिनीदेवींचें हें गाणें मुळां-तच अतिशय हृदयस्पर्शी होते. हिमानीच्या मंद, बालिश स्वरानें तर तें हृदयभेदक वाटत होतें.

"हिमानी, तें गाणें म्हणूं नकोस !" मी म्हणालो.

"कां ?" तिनें विचारलें.

"गाणें दुःखाचें आहे." मी उत्तर दिलें.

"पण मी तें आनंदानें म्हणतें आहे !" ओल्या डोळ्यांनीं हंस-तच हिमानीनें प्रतिवाद केला.

"दुःखाचें गाणें आनंदानें कसें म्हणतां येतें हिमानी ?"

"दुःखानें भरलेला आयुष्याचा घडा, आनंदमय क्षणांच्या माथ्यावर जसा देतां येतो तसेंच !"

त्यानंतर मी हिमानीला अडविलें नाहीं. मी केवळ तिच्या वाक्याचा विचार करीत राहिलो. तिचा व तिच्या आयुष्याचा विचार करीत राहिलो. हिमानी गुणगुणतच होती. "Full are thy pitchers, and far to carry, lone is the way and long!"

गुणगुणतच ती बहुतेक डोंगर पार करून गेली. माथ्याखालीं डोंगर कुशींत इतस्ततः लेणीं कोरलेली होती. बरींच लेणीं धड होती. कांहीं लेणीं झाडा-झुडपांनीं पूर्णपणें वेढलेली होती. मजल्यावर मजले दिसावे तशी लेण्यांवर लेणीं दिसत होती. वेणींत फुलांवर फुलांच्या ओळीं दिसाव्यात तशी ! कांहीं लेण्यांच्या समोर स्वच्छ पाण्यानें भरलेली टाकी होती. "हुऽश्" करीत एका टांकी शेजारींच शिला–खंडावर आम्ही बसलों. हिमानी एखाद्या लहान मुलीसारखी अगदी 'धप' करून बसली. पण क्षणांत ती सांवरली. पिशवींतून तिनें घडीचा पंखा काढला आणि मला ती वारा घालूं लागली.

"हें काय हिमानी ? तूं स्वतः थकली आहेस !" तिचें मनगट धरण्याचा प्रयत्न करीत मी म्हणालों—

"ही आमची पद्धत आहे." मला चुकवत हिमानीनें पंखा चालूं ठेवला.

"पद्धत फार गोड आहे, पण तूं मला वारा घालूं नकोस."

"कां ?"

"माझी तशी इच्छा आहे. आज तूं माझें ऐकणार आहेस !"

"तुम्हांला वारा घातल्यामुळें मला आनंद वाटत असला तर ? तरी मी पंखा वापरूं नको ?" क्षणभर मी गप्प झालो. तोंच गडप

अनुक्रमणिका







BI-TFN-10 MAR



# ताजा चहा,
# स्वादिष्ट चहा, उत्तम चहा

# टाटा-फिन्ले
# चहा

*अप्रतिम चहा आहे!*

टाटा-फिन्ले चहा खास पॅकबंद पुड्यांतून व डब्यांतून मिळत असल्यानें तो नेहमींच ताजा असतो.

टाटा-फिन्ले चहांत अगदीं निवडक अशीच पत्ती वापरली असल्यानें आपल्याला नेहमीं स्वादिष्ट सुवासयुक्त चहा मिळतो.

टाटा-फिन्ले चहा काळजीपूर्वक मिश्रित केलेला असतो. त्यामुळें आपल्याला नेहमीं कडक व उत्तम चहा मिळतो.

**टाटा-फिन्ले** *चहा प्या;*
*चहाचा खरा आस्वाद घ्या!*






झालेला वारा झोतानें उसळून आला. आणि मी ओरडलो, "आज दैवाची साथ मला आहे, तुला नाहीं !" हिमानी हिरमुसली झाली. फाडकन् मी वाक्य बोलून गेलो होतो खरा. पाठमोरी हिमानी शेजारच्या टाकींतून पाण्याचे पेले भरत होती.

"चूळ भरा." पेला समोर धरून ती म्हणत होती, "मग कॉफी देते." हिमानीनें माझ्यासमोर 'नॅपकिन' ठेवत कॉफीचा पेला ठेवला. लवंग–वेलदोडे ठेवले. आणि सिगरेटची पेटीहि ठेवली. झटपट ती साऱ्या हालचाली करीत होती. तिच्याकडे पहात मी म्हणालो,

"हिमानी !"

"काय ?" मान वळवून तिनें विचारले.

"तूं गृहिणी व्हायला अतिशय योग्य आहेस. तुझं अगदीं लवकर लग्न व्हायला पाहिजे. हिमानीनें चेहरा फिरविला. भांडीं विसळली, पुसली, पिशवींत भरली आणि माझ्या हातावर वेलदोडा ठेवीत ती म्हणाली—

"चला ! लेणीं पहायची ना ?"

लेण्या–लेण्यांतून आम्ही फिरूं लागलों. सर्वत्र सारा शुकशुकाट होता. अंधेऱ्या आणि अंधुक उजेडाच्या लेण्यांतून आम्ही दोघेंच फिरत होतो. जणुं ह्या लेण्यांत आणि ह्या अवनीतलावरहि आम्ही केवळ दोनच माणसें अस्तित्वांत होतो. सारी मनुष्य जात जणुं पुसून गेली होती. त्या अथांग शांततेंत केवळ आम्हां दोघांचे शब्द घुमत होते, केवळ आम्हां दोघांचीं पावलें उमटत होतीं.

"हीं लेणीं किती जुनीं आहेत हो?" सोंड मोडलेल्या एका दगडी हत्तीकडे पहात हिमानीनें विचारले.

"निदान एक सहस्र वर्षांची! कदाचित् जास्त सुद्धां !" मी सांगितलें.

"इथें कुणीं माणसें कधीं येत नाहींत का?"

"मी जितके वेळां आलो, तितके वेळां इथें कुणीं आलेलं पाहिलं नाहीं!"

"कां बरं माणसं इथें येत नसतील? लेणीं तर चांगलीं सुंदर आहेत!"

"सौंदर्य ओळखायची आणि निर्माण करायची बुद्धि आज आमच्यापाशीं फारशी उरलेली नाहीं. ज्यांच्यापाशीं ही बुद्धि होती, तीं माणसें वेगळी होतीं. त्यांच्या खुणा जागोजाग पहाणाऱ्याला सांपडतात!"

"पण त्यांनीं जें ठेवलें तें आपल्याला राखतांसुद्धां आलेलं नाहीं!"

"नाहीं राखतां आलं." मी म्हणालों, "मिळालेलं राखायलासुद्धां वद्धी आणि शक्ति लागते."

मी बोलत होतों आणि हिमानी एकेका मूर्तीकडं टक लावून पहात होती. लेण्या लेण्यांतून कुबट घाण होती. अनेक लेण्यांतून अंधेर होता. पाकोळ्यांचा व वटवाघुळांचा दर्प तेथें दाटला होता. त्या दुर्गंधींत, सुगंधित केवळ हिमानी होती. त्या अंधेरांत प्रकाशज्योतीसारखी केवळ ती होती–शुद्ध–शुभ्र! मोहित होऊन मी तिच्याकडं पहात होतों. विजेरीचे झोत फिरवीत होतों. मनोहर मूर्तींचेंच तें जग होतें. शेकडों लहान मोठ्या मूर्तींचें जगच. दगड येथें सजीव झाले होते. व दुर्दम्य प्रतिभेनें येथें प्रतिसृष्टि निर्माण केली होती. सुभगतेची व सौंदर्याची प्रतिसृष्टी. त्या सृष्टींतून मी व हिमानी भटकत होतों. एका वेगळ्या जगांत गेल्यासारखें मला वाटत होतें. देवतांच्या, देवतातुल्य स्त्री–पुरुषांच्या जगांत! परीसारखीच हिमानी ह्या क्षणीं मला भासत होती. एका परीच्या चित्रासमोरच ह्या क्षणीं ती उभी होती.

"पाहिलीत का ही परी?" तिनें विचारलें.

"पहातो आहे!" विजेरीचा झोत परीवर व हिमानीवर टाकत मी म्हणालो.

"तिचे पंख किती खरे वाटतात. असं वाटतं कीं ही क्षणभरांत उडूं लागेल. ही दगडाची परी वाटतच नाहीं!"

"नाहींच आहे!" मी शिल्पतुल्य हिमानीवरून व शिल्पानें भरलेल्या भिंतीवरून विजेरी फिरवीत राहिलो.

"अय्याई!" दुसऱ्या एका परीकडे पहात हिमानी उद्गारली. "ह्या परीच्या पंखावर कुणीतरी घाव घातला आहे." पहिल्या परीकडे न्याहाळून पहात ती म्हणाली, "त्या परीचे पायसुद्धां कुणीतरी तोडून ठेवले आहेत."

"होय!"

"पाहतां पाहतां भारून जावं इतकी ही मूर्ति सुंदर आहे. इतक्या सुंदर मूर्तीवर कुणा दुष्टाचे हात उचलले असतील?" हळहळत हिमानी म्हणाली.

"दुष्टता हाच कुणाकुणाचा धर्म असतो." मी उत्तर दिलें. "सौंदर्याचा नाश हाच त्यांचा आनंद असतो."

"ह्या अशा माणसांना म्हणायचं काय?" तिनें उद्वेगानें विचारलें.

"त्यांना माणसं म्हणायचं कारण नाहीं." मी वाक्य संपविलें व विजेरी फिरविली. एका नव्या लेण्यांत आतां आम्ही प्रवेश केला होता. प्रवेशद्वाराजवळचे तोरणच मुळीं फोडलेलें होतें. हिमानीनें तिकडे पाहिले व दृष्टी फिरविली. आंतल्या अंधेरांत विजेरी फिरली व शिव-पार्वतीच्या एका मनुष्याकृति मूर्तिजवळ स्थिरावली. हिमानी मूर्तीसमोर आली. चार-दोन क्षण त्या मनोरम मूर्तीकडे तिनें पाहिले व मग वेदनेच्या स्वरांत उद्गारली, "पाहिलंत का? ह्या मूर्तीसुद्धां फोडलेल्या आहेत!"

हिमानी मला जें पहायला सांगत होती, तें मी आधींच पाहिलेलें होतें. शिव-पार्वतीच्या त्या अनुपम मूर्ति कुणा भंजकाच्या अधम हातांनीं विद्रुप करून ठेवलेल्या होत्या. शंकराचे हात मोडलेले होते. पार्वतीचे पाय तोडलेले होते. डोळे फोडलेले होते. परोपरीनें त्या मूर्तीची विटंबना केलेली होती. हिमानी त्या मूर्तीकडे बांधल्या दृष्टीनें पहात राहिली. विजेरी फिरत होती, व सर्वत्र विनाशाचें विद्रुप चित्र दिसत होतें. गणेश मूर्तीवर घाव पडले होते, नंदी विच्छिन्न झाला होता, नारदाची विणा मोडली होती, व कृष्णाची बांसरी भंगली होती. विजेरीच्या शुभ्र प्रकाशांत शुभ्र वस्त्रांतली हिमानी उभी होती. तिचें शरीर ताठ होतें. चेहरा ताठ होता. केवळ दृष्टि तेवढी फिरत होती. एकदां तिनें त्या भग्नहस्त, भग्नशङ्ग शिव मूर्तीकडे पाहिले. एकदां त्या अपमानीत, विटंबीत पार्वतीकडे पाहिले व मग ती कांपऱ्या स्वरांत म्हणाली,






"चला इथून. हें माझ्यानं पाहवत नाहीं!" हिमानीनें डोळे मिटले. शिव-पार्वतीच्या त्या मूर्तिसमोर तिनें एकदां मस्तक वाकविले. व तोंड फिरविले. तिचें तोंड फिरलें. विजेरीचा प्रकाश फिरला व हिमानी किंचाळून उठली. क्षणांत कांहीं फडफडलें. उडत गेलें. विजेरी पडली व विझली. हिमानी धडपडली, किंचाळली व मला येऊन बिलगली.

"वटवाघूळ!" मी उद्गारलों. मी हिमानीला घट्ट जवळ घेतलें. तिचें शरीर कांपत होतें. विजेरीचा प्रकाश पुन्हां फांकला व बाहेरच्या उजेडांत निस्तेज झाला.

एका अर्धवट कोरलेल्या, अर्धवट फोडलेल्या अपूर्ण लेण्यांत आम्ही बसलों होतों. फार प्राचीन काळीं कोरलेल्या एका आसनावर आम्ही रेललों होतों. लेण्याच्या छताला भले मोठें भगदाड होतें. झाडा-झुडपांनीं तें वेढलेलें होतें. लेण्याच्या दाराशीं वेली वाढल्या होत्या. गवत वाढलें होतें. स्वप्नासारखा हिरवा प्रकाश आंत पाझरत होता. दारांतून ढगाळलेलें आकाश एखाद्या चित्रासारखें दिसत होतें. त्या रंगीत प्रकाशांत, त्या नक्षीदार लेण्यांत हिमानी एखाद्या राजकन्येसारखी दिसत होती, एखाद्या यक्षकन्येसारखी दिसत होती. अद्याप ती मला विलगून बसली होती. अद्याप ती विमनस्क दिसत होती, उसासे सोडत होती.

"थकलीस हिमानी?" तिची हनुवटी वर उचलीत मी विचारलें.

"थोडीशी." माझ्या हातावर तळवा टेकत ती म्हणाली.

"उदाससुद्धां दिसतेस!" मी तिचा चेहरा न्याहाळत म्हणालों.

"हूं!" माझ्या हाताशीं खेळत ती म्हणाली, "पण तुम्हीसुद्धां नेहमीसारखे दिसत नाहीं."

"आज मी नेहमींसारखा नाहींच आहे हिमानी!"

"कां बरं?" तिनें चितातूर दृष्टीनें माझ्याकडे पाहिले.

"सांगतों." मी म्हणालों.

"थांबा, थांबा!" चुटकी वाजवून ती म्हणाली, "मी विसरलेंच होतें. तुम्हांला खूप बरं वाटेल असं कांहींतरी मी आतां करणार आहे!"

"काय?" मी उत्कंठेनें विचारलं.

"पहा तर खरं!" उठून उभी होत ती म्हणाली, "मी आतां येतें हां! तुम्ही थांबा इथंच!" आणि बोलतां बोलतां हिमानी झटकन् दाराबाहेर गेली. फार लडिवाळ हालचाली करीत ती बाहेर गेली. मी पहात राहिलों. विचार करीत राहिलों. तीन वर्षें ह्या हिमानीसाठीं मी तपश्चर्या करीत होतों. कां अद्याप ती माझ्या हातीं येत नव्हती? कां अद्याप ती माझी होत नव्हती? कां माझ्या प्रेमाला ती पूर्ण प्रतिसाद देत नव्हती? मी काय तिला आवडतच नव्हतों? तिला काय माझ्याविषयीं प्रेमाचा लवलेशहि वाटत नव्हता? तसें म्हणणेंहि कठीण होतें. तिचा स्पर्श सर्वस्वी कोरडा नव्हता. तिचें भाषण कोरडं नव्हतं. माझी संगत तिला आवडत होती. माझा स्पर्शहि प्रसंगीं प्रिय वाटत होता. आतांच तिनें मला मिठी मारली होती. माझा हात कुरवाळला होता. अनेकदां प्रेमभरानें तिनें माझ्याकडे पाहिले होते. मला स्पर्श केला होता. माझी सेवा केली होती. आज तर माझीं पादत्राणेंहि तिनें उचलली होती. आणि तरीहि एका मर्यादेपाशीं ती अडली होती. ती अडली आणि माझे शब्द अडले. कृति अडली. हें कां झालें? ह्या शुद्ध, सुंदर आणि संवेदनाक्षम मुलीनें मला वेड लावले होते. संवेदनाक्षम? होय, एखाद्या तंतूवाद्याइतकी ही मुलगी संवेदनाक्षम होती. सुगंधासारखी ती तरल होती. स्वप्नासारखी आकर्षक होती. आणि एखाद्या स्वप्नाकडे पहावे, तसाच मी तिच्याकडे पहात राहिलो होतो. ती माझ्या हातीं येत नव्हती. प्रिया म्हणून हातीं येत नव्हती, पत्नी म्हणून हातीं येत नव्हती. ती माझ्या अगदीं निकट होती, आणि तरीहि माझ्यापासून अतिशय दूर होती—दूर—दूर! अद्याप माझ्यापासून इतकी दूर ती कां होती? इतकं दूर मी तिला कां राहूं दिले होते? आज मी तिला मिळविणार होतों. जवळ घेणार होतों. हिरव्या प्रकाशानें भरलेल्या त्या दालनांत मी पाहिलें, स्थळकाळाचें भान मी विसरलों. हिमानीनें माझें सर्वस्व व्यापलें होतें. माझें मन, बुद्धी, भावना, इच्छा! हिमानी मला हवी होती. फार फार हवी होती. कुठे होती ती? मी उठून उभा राहिलों आणि लेण्यांतून संगत येणाऱ्या सायंप्रकाशाच्या पट्टयाकडे पहात राहिलों.

"हिमानी कुठें आहेस तूं? मी ओरडलों.

—आणि त्याच क्षणीं हिमानी आंत आली. हिमानी नऊवारी साडी नेसून आंत आली होती. मी दिलेली नऊवारी साडी नेसून! हंसून हिमानी मला म्हणाली, "तुम्हांला आवडणारी गोष्ट आज मी केली ना?"

मी हिमानीचे हात धरले व तिला शेजारीं बसवीत म्हणालों, "होय हिमानी! पण माझ्यासाठीं आणखी कांहीं तुला केले पाहिजे. तें तूं करशील तेव्हां मी पूर्ण सुखी होईन. मग तुला माझ्यासाठीं दूसरें कांहीं करायलाच नको!"

"तुमच्यासाठीं काय करूं मी?" हिमानीनें विचारलें.

"तूं माझ्याशीं लग्न कर!"

"लग्न?" हिमानीच्या चेहऱ्यावरून अभ्र फिरून गेलें. तिच्या चेहऱ्यावर संभ्रमाचे भाव उमटले. वेदनेचे भाव उमटले. ती दुखावली आणि सुखावली. आणि जड स्वरांत जणुं स्वतःशींच ती उद्गारली—

"लग्न!"

"होय हिमानी. माझें वय बत्तीस वर्षांचें आहे. तुझ्या आणि माझ्या वयांत असावें तितकेंच अंतर आहे. माझी सांपत्तिक स्थिति चांगली होणार आहे. मी मूलबाळ नसलेला विधुर आहे. अनेक मुलींचे बाप आज माझ्यामागें आहेत."

"तें मला ठाऊक आहे" हिमानीच्या स्वरांत अधिक वेदना होती. ती मला आशादायक वाटली. मी पुढें बोलूं लागलों—

"अनेक मुलींहि माझ्यामागें आहेत.

"तेंहि मला ठाऊक आहे." दाटूं बघणाऱ्या कंठानें हिमानी म्हणाली, "त्या मुलींपैकीं एखाद्या मुलीचें भाग्य तुम्ही उजळून टाका आणि सुखांत रहा!"

"मला सुखी करणें केवळ तुला शक्य आहे." मी हिमानीचे दोन्ही हात हातांत घतले.

"नाहीं!" हिमानीनें मस्तक हलविलें.

"माझ्या आयुष्याची जोडीदार म्हणून मी तुला निवडलें आहे.

अनुक्रमणिका






मला केवळ तूं हवी आहेस. तूं माझी हो हिमानी. तूं माझ्याशीं लग्न कर!"

"तें शक्य नाहीं!" हिमानीनें अधिक दृढतेनें मस्तक हलविलें.

"कां शक्य नाहीं हिमानी?" हिमानीचे दोन्ही हात खांद्यावर घेत मी म्हणालो, "आपल्या लग्नाला कुठली अडचण आहे? तुझी आई म्हणाली आहे, तिला वेडाचे झटके येतात. पण तिची चिंता तूं करूं नकोस. स्वतःच्या आईप्रमाणें मी तिची काळजी करीन."

"कराल!" हिमानीचे ओंठ कांपत होते. डोळे ओलावले होते. ती माझे खांदे थोपटत होती.

"तुझा भाऊ उनाड आहे, वेछूट आहे. पण त्याला माणसांत आणण्यासाठीं मी आकाश-पाताळ एक करीन. माझ्यावर विश्वास ठेव!"

"विश्वास आहे. माझा तुमच्यावर पूर्ण विश्वास आहे! तुम्ही प्रेमळ आहांत, दयाळू आहांत, फार चांगले आहांत." हिमानीचा स्वर कांपला व तिच्या गालावर खळकन् आंसवें ओघळलीं. तिची आंसवें मी टिपली. तिचा चेहरा तळव्यांत घेतला व म्हणालों—

"तर मग तूं माझी होशील ना? माझ्याशीं लग्न करशील ना?"

हिमानीनें उत्तर केलें नाहीं. विलक्षण दृष्टीनें ती माझ्याकडे केवळ पाहात राहिली. मी हिमानीच्या कोमल देहाभोंवतीं हात टाकले व भावनावेगानें म्हणालों, "जरा माझ्या डोळ्यांत पहा हिमानी! तिथें तुला माझें प्रेम दिसेल. मी तुझ्यावर प्रेम करतों. फार फार प्रेम करतों. माझें हें प्रेम तूं नाकारूं नकोस! तूं माझी हो!" हिमानीच्या पापण्या लवल्या, देह कांपला, ओठ विलग झाले, आणि क्षणार्धांत तिला घट्ट आवळून मी तिच्यावर चुंबनांचा वर्षाव केला. कांहीं क्षण हिमानी जणुं बेभान होती. गुंगींत होती. तंद्रींत होती. ती माझा प्रतिकार रीत नव्हती. मला अडवीत नव्हती. मी तिच्या केसांची, गालांचीं, कपाळाचीं व ओठाचीं चुंबनें घेत होतों. त्या चुंबनांनीं मी धुंद झालों होतों. तोच मला धक्का बसला. हिमानीचा देह ताठ झाला. तिचे डोळे उघडले. डोळ्यांतले भाव पालटले व कल्पनातीत आवेशानें मला दूर लोटून ती ओरडली.

"मला हें नको आहे—हें नको आहे मला!"

"तुला हें नको आहे?" घोगऱ्या स्वरांत मी विचारलें.

"नको आहे—नको आहे." तिच्या चेहऱ्यांजवळ जाणारा माझा चेहरा थोपवीत ती चित्कारली.

"तुला हें नको? तुला मी नको? तुला माझ्याशीं लग्न नको?" वाढत्या चिडीनें मी विचारलें.

"नको नको!" ती ओरडली.

"कां नको?" तिचे दोन्ही खांदे हलवीत मी म्हणालों, "हें सारें तुला कां नको हिमानी? इतक्या वर्षाच्या स्नेहानंतर कां नको? सहवासानंतर कां नको? तपश्चर्येनंतर कां नको? मी तुझ्यासाठीं वाट पाहिली आहे. तुझ्यावर जीव टाकला आहे. तुझ्यासाठीं मी झिजलों आहे. तुझ्या आईसाठीं आणि भावासाठीं मी झिजलों आहे!"

"त्याचें मोल मागतां आहांत का तुम्ही? पडलेला पदर खांद्यावर फेंकीत हिमानी म्हणाली.

"मोल नव्हे, स्पष्टीकरण मागतो आहे. आजवर तूं काय माझा नुसता खेळच केलास का हिमानी?"

"खेळ?" पिचलेल्या स्वरांत हिमानी उद्गारली.

"तर मग सांग, मी तुला कां नको तें?"

"नका विचारूं!"

"सांग—सांग. तुला माझ्यासाठीं निदान एवढें केलेंच पाहिजे" मी हिमानीचें खांदे घुसळीतच राहिलो.

"सांगूं?" ती आर्त, तप्त स्वरांत चित्कारली.

"सांग—सांग! कुठल्या कारणासाठीं तूं मला नाकारतेस?"

"कारण!" क्षणभर मस्तकावर हात ठेवून हिमानी तटस्थ झाली. मग वात झालेल्या माणसाप्रमाणें तिनें आपला पदर फेंकला, चोळी फाडली व आपले उघडें वक्षस्थळ मला दाखवीत ती ओरडली, "हें पहा कारण!" डोळे फाडून मी पहात राहिलों. हिमानीच्या वक्षस्थळावर जागोजाग शिक्के होते, डाग होते, अक्षरें होतीं. 'हा आमचा माल आहे,' 'ही आमची दासी आहे,' 'ही वस्तु वापरलेली आहे,' तीं अक्षरें वांचतांच माझें डोकें गरगरलें. लेण्यांतला हिरवट प्रकाश भयंकर भासूं लागला. रांगत आलेली उन्हाची तिरीप तापलेल्या सळईसारखी दिसली. चोळी फाडून माझ्यासमोर उभ्या असलेल्या हिमानीच्या विटंबित देहाकडं मी नुसता पहात राहिलों. हिमानी फाटलेल्या स्वरांत बोलत होती. "डाक्यांत त्यांनीं मला दिलेले हे डाग आहेत. त्यांनीं मारलेले हे शिक्के आहेत. माझ्या, तुमच्या आणि साऱ्या मनुष्यजातीच्या लौकिकाला काळोखी लावणारे हे शिक्के आहेत. असे शिक्के माझ्या पाठीवर आहेत, माझ्या मांड्यांवर आहेत, माझ्या दंडांवर आहेत. पहायचे आहेत ते शिक्के तुम्हांला? पहायचं आहे मी लग्न न करण्याचं कारण?

हिमानीनं आपलं वस्त्र ओढण्यासाठीं एक पिसाट हालचाल केली. आणि माझ्याकडे पहात ती थांबली. दगडाच्या डोळ्यांनीं मी पहात होतो. हिमानीचं धवल वक्षःस्थळ होरपळून गेलं होतं. विद्रुप दिसत होतं. उन्हाची रांगत आलेली तिरीप तिच्या अंगावर पडली होती. खडकांत कोरलेल्या विच्छिन्न स्त्री मूर्तीवर पडली होती. हिमानी सैराट स्वरांत म्हणत होती, देश ह्या डागण्या विसरला, मनुष्यजात हा कलंक विसरली, पण हे शिक्के मला विसरतां येत नाहींत. वयाच्या चौदाव्या वर्षापासून ते माझ्या अंगावरच आहेत. त्यांचा जीवघेणा चटका मला पावलोपावलीं बसतच असतो! जेवतांखातांना, बोलतां—चालतांना—झोंपेंत—जागेपणीं—सर्वत्र—सर्वकाळ! कपड्याआड दडलेल्या ह्या शिक्क्यांची चटका देणारी जाणीव मला भाजतच असते. मरेपर्यंत ही जाणीव मला अशीच जाळणार आहे. असेच हे शिक्के रहाणार आहेत. हे शिक्के घेऊन मी कसं कुणाशीं लग्न करूं. कसा कुणाशीं शृंगार करूं? ह्या शिक्क्यांनीं माझ्यांतली शृंगाराची सगळी इच्छा जाळून टाकली आहे. हे शिक्के पाहिल्यावर कुणी पुरुष माझ्याशीं शृंगार करूं शकेल का? करूं शकेल तो हाडाचा पुरुष नव्हे! ह्या डागलेल्या शरीरानंहि जी शृंगार करूं शकल ती हाडाची स्त्री नव्हे! माझ्या साऱ्या कोमल भावनांवर, साऱ्या पवित्र निष्ठांवर, माझ्या शरीरावर आणि मनावर जळते, चटत भयानक डाग उमटले आहेत. हे डाग मी कसे पुसूं? कसे नाहींसे करूं? सांगा, मी तुमच्याशीं कसं लग्न करूं?

हिमानीला कुठल्या शब्दांत उत्तर द्यावें, तें मला कळेना. माझे ओठ नुसतेच हलले. जागोजाग देह विच्छिन्न झालेल्या लेण्यांतल्या दगडी स्त्री मूर्तीकडे मी पाहिलें. त्या मूर्तीवर उन्हाची तिरीप पडत होती. तीच तिरीप हिमानीच्या पोळलेल्या देहावर पडली होती. हलकेंच माझा हात हिमानीच्या मस्तकापाशीं गेला. तिनं माझा हात झटकला. व माझ्या पायाशीं लोळण घेऊन ती रडत म्हणाली "माझं आयुष्य जळालेलं आहे. प्रेम माझ्यासाठीं नाहीं. लग्न माझ्यासाठीं नाहीं. कांहीं कांहीं माझ्यासाठीं नाही. ही साडी तुम्ही मला दिलींत ती मी नेसलें. तेवढंच सुख माझ्याकडून तुम्हांला व तुमच्याकडून मला! तुम्ही माझ्यासाठीं नाहीं! मी तुमच्यासाठीं नाहीं. माझं कांहीं नाहीं—कोणी नाहीं माझं—कोणी नाहीं. तुम्ही नाहीं, लग्नहि नाहीं, संसार नाहीं, कांहीं नाहीं—कांहीं नाहीं! हिमानीचे शब्द थांबले. अश्रूंच्या महापुरांत बुडून गेले. आणि त्या दगडी देव्हाऱ्यांत तिचे नुसते हुंदके घुमत राहिले. अद्यापहि मला शब्द सुचत नव्हते. एकदां मी तिच्याकडे पहात होतो आणि एकदां उन्हाच्या कवडशानें पेटून उठलेल्या त्या विटंबित दगडी स्त्री मूर्तीकडे! •••







अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



एका 'मुक्या' माणसाची ही 'बोलकी' वेदना ! आणि वेदना नेहमींच सुंदर बोलते असं म्हणतात ! नाहीं का ?



—प्रभाकर श्रीधर नेरुरकर

घर कसं सामसूम झालं आहे. मी आपला एकटा इथं पडवींत पडलो आहे. कांबळ अंगाखालीं घेऊन नि त्याचीच मोटकळी टोकाला करून व तिथं उसं करून सकाळपासून कधीं त्या कोनवाशाकडे तर कधीं आढ्याकडे पहात पालथा पडलो आहे. धनी पण घरांत कुठे तरी आपल्या खोलींत पडले आहेत. धनीण पण आपल्या खोलींत डोकं टेकून पडली आहे. आज काय आग पेटली नाहीं आणि पोटांत पण अजून आग कशी पेटतच नाहींशी झाली आहे. आज कांहीं खायला नको, प्यायला नको, कुठं जायला नको आणि कांहीं नको. सकाळपासनं माझ्या डोळ्यांसमोर सारखी धन्यांची बाय उभी रहाते आहे. बाय महिनाभर घरांत होती तर घर कसं भरल्यासारखं झालं होतं. महिनाभर बायला कुठें ठेवू आणि कुठं नको असं आपलं मला झालं होतं. माझं आणि बायचं तसं आपलं कसलं होतं नातं नि गोतं ! कुठची बाय नि कुठचा मी...मी धन्यांचा आपला घरगडी राखणा. शाळेंत दोन यत्ता गेलो पण काय घड जमलंच नाहीं. बाबा म्हणाला,

'पांड्या, तुला काय शाळा ही जमणार न्हाय... खरं कीं नाय ?'

मी म्हणालो, 'खरं बी आणि नाय बी'

'म्हणजे रे ?'

'म्हटलांत रवा शाळेत तर रवीन बापडा... न्हाय म्हटलांत तर न्हानार नाय ?..

'अरे, काल धनी आले होते'

मी सगळं ऐकलं होतं. धन्याचं बाबाशीं झालेलं बोलणं. धन्याची गुरं-ढोरं वाढत होतीं. त्याची पोरंबाळं सगळी मुंबईला रहातात. घरांत दोघंच. आणि गडी कोण नव्हता. आमचा बाबा त्याचा भागेली. वंशाचा. मग बाबाचं पोरगं धन्याला लय आवडलं असं तो बाबाला म्हणाला. बाबालाही बरं वाटलं. मग माझी उचलबांगडी इथं या धन्याच्या गांवाला झाली. मी आपली दोन वर्षं त्याची गुरं ढोरं रानांत नेतो. चरवतो. रात्रीं आणून गोठ्यांत बांधतो. त्यांचं दूध काढतो. त्यांना करड गवत घालतो. त्यांचं शेणमूत काढतो. धनीण घालते तें चार घास खातो. मजेंत झोंपतो आणि मधून मधून विडी पण ओढतो. असं आपलं चालतं आणि लय बरं चालतं. एक दिवस धनीण म्हणाली,

'अरे, पांड्या'

'जी ?'

'उद्यां संध्याकाळचं तुला त्यांच्याबरोबर •शेल्याला जायचं आहे. गोखं दाव्याला बांधून ठेव. न्हेऊं नको रानांत...'

मला चटकन आठवलं. धनीणीची थोरली लेक यायची होती.

'बाय येणार हाय काय ?'

' होय होय..बाय येणार, तिचा नवरा पण येणार, तिचा थोरला अवी येणार, धाकटी पमी येणार..'

' मजाच मजा हाय तर..' मी म्हणालो.

मी पण मनांत हरकून गेलो. मजा येणार. आतां घर सगळं भरून जाणार. माझा पण वेळ जाणार. मुंबयचं खाय प्यायला मिळणार.

मग आम्ही संध्याकाळचे चार मैल चालत शेल्याला आलों. शेल्याला चार गांवाचा एक चव्हाटा झाला आहे. बाकी सगळं रानच. समोर एक म्हाळसादेवीचं देऊळ. कसलं तें देऊळ. चार खांब चार विटा. खाली देवी. बाकी सगळं उघडं. एक भज्याचं नि चायचं दुकान. खाली पलीकडे नदी. माडाचीं आगरं. पोफळी. पाणीच पाणी..पण सुन्न..माणूस फिरकायचा म्हणजे एस्टीच्या वेळेला. आम्ही दोघं शेल्याला पोचलो तेव्हां रात्र झाली होती. वाळा शेर्लेकराच्या भज्याच्या दुकानांत रॉकेल दिवा डबडब पिटपिटत होता. तीन दगडांच्या चुलींत निखारे पेटले होते. आग रणरणत होती. वर कढईंत भजी सळसळत होती. भज्यांचं पीठ हातांच्या दोन बोटांत धरून चळकन् वाळा तें कढईंत सोडून देत होता. दोनचार वाकडी होती. एकाचे तीनच खुर होते. अर्धा मोडला होता एक खूर. तरी पण एस्टीची वाट पहात आणि भजी खात लोक त्याच्यावर बसले होते. आम्ही गेलो तसा वाळा शेर्लेकर झारा कढईवर ठेवून उठला. म्हणाला, 'धन्यानु, तुम्ही रात्रीचे कुठे ?

'बस रे वाळ्या.. तुझं काम चालूं ठेव..'

'नाय नाय, तसं कसं ?'

'अरे माझी बाय यायची आहे...'

'अस्सं...किती वर्षें झाली बायला येऊन, धन्यानु ?'

'झाली असतील दोन दीड वर्षं...'

'बसा बसा धन्यानु...' वाळानें एक बाकडं त्याच्यावर बसलेल्या उपऱ्यांना हिडीस फिडीस करून रिकामं केलं आणि धन्याना बसवलं. मी आपला उभाच. वाळ्यानें दोनदा माझ्याकडे बघितलं नि मग बघितलंच नाहीं. माझं आपलं हें नेहमीं असंच होतं. धन्याबरोबर मी असलो म्हणजे लोक आपले माझ्याकडे बघतात. बोलतात पण कधीं कधीं, मग धनी आंत आणि मी आपला बाहेर. कुठं पडवींत बस. नाहींतर कोपऱ्यांत बस. नाहींतर आडमेरेला भिंतीला टेकून उभा रहा.

धनी बसतात तोच मोटार वाजली. सगळेच उठले...

'पांड्या, कुठं आहेस ?' धनी ओरडले... मी पुढें झालो. मला आपलं आठवूं लागलं. बाय कशी दिसणार. धनीण चार दिवस घरांत आपली बोलायचं तें सगळं बायचंच बोलायची. माझी बाय अशी. माझी बाय तशी. तिचा अवी पण माझ्या वयाचाच असं ती म्हणायची.

एस्टी आली नि सगळी मंडळी खाली उतरली. बाय कशी. गोरीगोरी पान दिसली. हंसली पण कशी धन्याबरोवर. अवीचे कपडे तर सगळे झॅकीत होते. पमू तर तशी मुलगी मी बघितलीच नव्हती. मला आपल्या आंत आंत उकळ्या फुटत होत्या. गुदगुल्या होत होत्या. मी मनांत ठरवून सुद्धां टाकलं कीं सकाळीं उद्यां उठलो की धन्याच्या सोनचांफ्यावर चढायचं नि पिवळी पिवळी वासाची रसरशीत सोनचाफी बायला नि पमूला काढून आणायची. अवीला मग सोनारकोंडींत सूरकांड्या मारायला न्यायचं..कोंडींत उलट्या सुलट्या पलट्या घेऊन त्याला पोहून दाखवायचं नि त्याला पण शिकवायचं.. मी माझ्या शेंडीची गांठ आणखी घट्ट बांधली, कांबळं खांद्यावर घडी करून घट्ट बसवलं, हातांतील लाटण वर धरला नि काठी गच्च जमिनीला टेकली. मग मी धन्याकडे बघून घेतलं. बाय नि तिच्या मुलांना पण पोटभर बघून घेत होतो. पण माझ्याकडे लक्ष द्यायला त्यांना कुणाला फुरसतच होत नव्हती. धन्यांचे जावय पण लय रुबाबदार होते. ते विंग्रजीत बोलत होते. त्यांचं सगळ्यांचं यस फस चाललं होतं. अवी पण मधून विंग्रजी बोलत होता आणि पमू यस. नो करीत होती.

खूप वेळानं धन्याचं माझ्याकडे लक्ष गेलं.

'पांड्या, इकडे ये. बघतोस काय असा ?' त्यांनी मला शेपाडलं.

मी आपला पुढे गेलो. मग माझ्या डोक्यावर दोन बॅगा चढल्या. सामान फारसं नव्हतं. बायपासून पमूपर्यंत आणि जावईबुवानीं पण कास्टोटीला कसल्या छान छान पिशव्या मारल्या होत्या. आम्ही मग शेलीं सोडलं आणि चालत चालत एकदाचं घर गांठलं. मध्यान रात झाल्यासारखी वाटत होती. अवी आणि पमू माझ्या बरोबरीने चालत होती. हा आपला घरचा गडी आहे हें त्यांनी ओळखलेलं दिसलं. बायने फक्त एकदां धन्याना विचारलं होतं, 'केव्हांपासून हा आपल्याकडे आला, पांड्या ?' मग धन्यानी नेहमीचं उत्तर दिलं होतं. मी आपलं मनांत सारखं म्हणत होतो, आतां बाय माझ्याशी पण बोलेल. मला पण विचारील. कायरे मुला तुझं नांव. पण कसचं काय नि कसचं काय. एकदां वाट मोठी अगदी चिचोळी आली. सगळं घुडु घुप. किर्र. चारी बाजूला झाडं नि झुडूपं. मी आपला पुढे होतो सगळ्यांच्या. कंदील मिणमिणत होता. जावईबुवा मध्येच बॅटरी पण मारायचे. कुणीतरी पक्षी केकाटला. कुठेतरी घसघस झाली. काळोख बोलल्यासारखा वाटला आणि वाट हलल्यासारखी वाटली. तसा अवी घाबरला की काय कुणाला ठाऊक. मला कसा घट्ट येऊन विलगला. पमू पण माझ्याजवळ आली. अगदी











• जवळ आणि मला कशी मजाच मजा वाटली. परत परत गुदगुल्या झाल्या. मला भीति वाटलीच नव्हती.

'काय रे पांड्या, कोण तें ?' धन्यानी मला टरकावून विचारलं होतं.

'कोण कुठे ?... कुणीच नाही धन्यानु...'

अशी गंमत झाली. मग आमचं खळ्यांत पाऊल पडलं आणि घरधनीण धांवत आली. बायनें तिला मिठीच मारली. अवी पमू तिला चिकटले काय. जांवईबाना हातांत धरून धनीणीनं घरांत नेले. धनी पण आंत गेले. मी आपला बॅगा डोक्यावर घेऊन बाहेरच उभा. मग मी पण तसाच आंत गेलो. पडवींत हळूच वाकून मीच सामान खाली उतरलं. आणि हासहुस करीत खांबलीला टेकून तिथेच बसलो. मला आपलं वाटायला लागलं, मुंबईंत काय मजा असते. मी शिकलो असतो तर अवीच्याच वर्गात असणार असतो. पण आतां कुठंच शिकणार आणि आम्हांला कोण मुंबईला नेणार ! तिथंच मला डुलकी आली आणि मग धनीण आली ओरडत. मला तिनं हांकावर हांका मारल्या पण मी चांगलाच डारडूर झालो होतो. मी डोळे उघडले तर समोर अवी पण कपडे बदलून उभा होता. पमू पण होती. माझ्याकडे दोघे कौतुकानें पहात होती.

'दमला ग आजी तो' पमू म्हणाली..

'मग दमणार नाहीं तर काय. दोन बॅगा डोक्यावर घेऊन तर चार मैल चालला...' अवी पण बोलला. मला कसं उमळून आलं. मग मी बका बका जेवलो. गोठ्यांत गेलो. गाई म्हशींना चारापाणी केलं. माझ्या लाडक्या तांबड्या गाईवरून हात फिरविला. गोंद्या बैलाला आंजारलं गोंजारलं. दुडदुड्या म्हशीला नि तिच्या रेडूकाला पेंडपाणी केलं. हातांत एका होतं पत्र्याचं पेटतं डबडं नि दुसऱ्या हातान मी काम उरकून घेत होतो. भरभर भरभर...

सकाळ कधीं होते नि सोनचांफ्यावर मी कधी चढतो असं मला झालं होतं. तसं मग दुपार होईल नि अवीला घेऊन सोनारकोंडीत जाईन असं पण मनांत येत होतं... सगळी घरांत झोपली. सामसूम झालं. मग मी नि धणी परड्यांत एक फेरी मारून घरांत आलो. मी अंग पटकुरावर टाकलं. धन्यानीं दिवा मालवला. त्यांचं घोरणं पण चालू झालं. पण मला काय झोप येईना. पडल्या पडल्या काळोखांत काय काय दिसायला लागलं. मुंबई दिसायला लागली. बाय दिसायला लागली. एस्टीची गाडी धांवत आली नि समोर थांबली. दह्यालोण्यासारखी गोरी गोरी पान, मऊ मऊ अशी झॅक कपडे केलेली अवी नी पमू दार उघडून बाहेर आली नि धन्यानी त्यांना पोटाशीं धरलं तें दिसूं लागलं. माझ्याकडे कुणी बघत नव्हतं. मीच सगळं बघत होतो तें पण दिसूं लागलं. झोपेंत माझी आवस नि बाबा स्वप्नांत आली नि मला पण त्यांनी अवी पमूला धन्यांनी धरलं होतं तसं पोटाशी धरलं. बाबापूता केलें. पाठीवरून हात फिरवला आणि ते निघून गेलें तेव्हां फटफटलं होतं. तितक्यांत मीच उठलो. पटकुर झाडून टाकलं गोडदी गुंडाळली. जांभई दिली. लंगोटी घट्ट केली नि कामाला लागलो. सगळ्यांत अगोदर सोनचांफ्यावर जाऊन चढलों. सरसर वर गेलो तर तें खालून अवी नि पमू कौतुकानं बघत होती. मी मिळतील तितकी सोन-चाफी काढून खाली फेकत होतो. मग तितक्यांत कुठूनतरी बाय पण आली. तिला सोनचाफी खूप आवडली. ती अवी पमूकडे सारखी मागूं लागली. मला बाय खूप आवडली म्हणून मी आणखी, आणखी सोन-चाफी काढू लागलो. बाय पण वळून वळून माझ्याकडे बघत होती. आपल्या मुलांना कांहींतरी सांगत होती. ती पण हंसत हंसत वळून वर माझ्याकडे बघत होती. मग 'पांड्या, आता पुरे' म्हणून बाय म्हणाली. अवी पण म्हणाला. पमू नुसती हंसली. मी झरझर सरड्यासारखा खालीं उतरलो. मोठी मजा आली. मला आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या.

सोनारकोंडीत देखील अवी दुपारीं माझ्याबरोबर आला. पण त्याला पोहायची बंदी होती. मी त्याला खूप सुरकांड्या मारून दाखवल्या तो माझ्यावर खूष झाला. म्हणाला उद्यां पण येऊंया. मग मी पण हळूंच आंत येईन कोंडीत. नि हात मारीन. थोड्या दिवसांनीं उड्या पण मारीन. परत मुंबईला जाईपर्यंत तुझ्यासारखा पटाईत होईन. मुंबईला गेल्यावर मग समुद्रांत पण पोहायला जाईन..

'केवढा मोठ्ठा असतो हा समुद्र...?' मी त्याला विचारलं...

'खूप खूप मोठ्ठा.... आभाळा एवढा' तो म्हणाला... म्हणजे एवढ्या आभाळाएवढ्या कोंडींत तो पोहणार. मी आपला सोनारकोंडींतच डुंबत राहणार. मला वाईट वाटलं; पण अवी दोस्त झाला म्हणून बरं पण वाटलं. अवीला पण बरं वाटलेलं दिसत होतं... असं मग आमचं रोज रोज चाललं. अवी माझ्याबरोबर रानांत पण आला गुरांना चरवायला. आमच्याबरोबर झाडावर चढला. झाड बंदर खेळला. पमू आपली घरांत राहायची. पण मी गोटवं घेऊन परतलो कीं माझ्याकडे यायची. हें विचारायची. तें विचारायची. गोठ्यांत पण यायची. मला म्हणायची 'पांडोबा...' नि आपणच बडबडत रहायची.

दिवस कसे गेले ! मला घरची आठवण पण आली नाही. एकदां आवस नि बाबा धन्याच्या चेडवाला भेटायला आले. आवशीनं आपल्या डोक्याला कसं लाल लाल भडक कुंकु फासलं होतं. कशी जाड जाड मळकट रंगाचं नेसून ती आली होती. माझा बाबा तर अगदीच गावटी दिसत होता. नाहीतर बाय कशी दिसत होती ! कशी छान छान नेसली, होती. जावय माणूस पण कसा रुबाबदार दिसत होता. आपला सकाळ दुपार संध्याकाळ चुरूट ओढत बसायचा. एकट्यानंच पत्ते खेळायचा. कधीं कधीं मुलं, नि बाय नि जावय माणूस सगळीच पत्ते कुटीत बसायची. धनी काय बोलायचे नायत. धनीण पण काय बोलत नसे. उलट तिथं







येऊन त्यांना खेळतांना तासन् तास पहात उभी राहात असे. नातवंडांच क्रौतुक करीत असे. त्यांना खायप्यायला पण आणून देत असे. न्हायतर माझ्या बाबान एकदा मला मर मर मारलं होतं. पत्ते खेळलो म्हणून. आवस पण माझ्यावर चीडली होती. आवशीनं नि बाबानं येतांना फणस आणला होता.भाजीचा पण नि पिका पण.वऱ्याचे तांदूळ आणले होते. पिकें रायवळ आंबे आणले होते. काय माय खूप आणलं होतं. मी आपला त्यांना दुरून येतांना बघितल नि धावत 'आई बाबा' करीत गेलो तर बाबा थंडपणानं विचारतो. 'तू रे कशाला धावतोस? तुला काम नाय घरांत? तुझी धनीणीची लेक आलीय न्हा?' मी आपला बघतच राह्यलो. सगळी आपली बायला बघायला येताहेत. अबी पमूची चौकशी करताहेत. मी आपला सगळं बघतो आणि न बघल्यासारखा उभा राहतो; नाहीं तर कामाला लागतो.

मला आपलं वाटायचं बाय माझी आहे. अबी नि पमू पण माझी आहेत. माझ्या बाबापेक्षां मला तो जावय माणूस आवडायचा. त्यांचा शब्द कानावर पडतो कां म्हणून मी सारखा कान घेऊन रहायचा. नि काय असलं नसलं तरी धावत पळत पडेल ते काम त्यांच्यासाठीं करायचा. कधी मला त्यांचा राग आला नाही. कधी ती मंडळी माझ्यावर रागावली नाहींत. कशी मजा येत होती. कसे मजेंत दिवस जात होते. मला दुसरं तिसरं काहीं सुचत नव्हतं. रुचत पण नव्हतं. पमू मला 'पांडोबा' म्हणायची तर मला गुदगुल्या व्हायच्या. अबीने मला 'पांड्या लांड्या' म्हटलं तरी मला गंमत वाटायची. मी त्याला अबीच म्हणायचा. त्यानें मला आपल्या दोन चड्डया दिल्या. दोन आंगातली दिली. एक गळयांत घालायचं दिलं. एक कमरेला गुंडाळायचं दिलं. तो आपला पुस्तक वाचत पडला की मी त्याच्या जवळ जाऊन उभा रहायचा. नि त्याच्याकडे नि पुस्तकाकडे बघत रहायचा. रंगीत छान छान चित्रें आंत होती. पमू पण त्याला खेटून तेच पुस्तक वाचायची. मग दोघीं खुदकन् हंसायची. एकमेकाला चिडवायची. रागे भरायची आणि बायला 'आय'म्हणन ओरडत घरांत पळत सुटायची. त्यांची मोठी मजा चालली होती नि पुस्तकांत तर जास्त मजा असली पाहिजे. खरं म्हणजे. मला माझ्या बाबान शाळेंतून काढून टाकलं. नाहीं तर मी पण अशीच पुस्तकं वाचली असती नि माझ्या धाकट्या चंद्रीशी मस्ती केली असती. पण आता मी काय शिकणार नि कसं शिकणार! मला आपलं वाईट वाटत रहायचं नि मग अबी पमू मला हांका मारू लागली कीं वाटायचं. बाय्. कधी कधी मला 'काय पांडुरंगराव' असं म्हणायची तर ते जावय माणूस म्हणायचे, "काय मिस्टर पांडोबा...कुठे चाललात?" मी आपला मग पोट धरधरून हंसायचा नि कास्टी घट्ट करीत तेथून कामाला जायचा.. ही माणसं आम्यापासून बनीच खूपसं काम करायचे नी धनीण चुलीकडे नि चुलीकडे. रोज नवेनवे जिन्नस खायप्यायची चंगळ. आपला घरांत खमंग वास सकाळ संध्याकाळ पसरलेला आहे. कधीं शंकरपाळी आहे तर कधी चकली. लाडू तर दररोजच. आणखी पण खूप काय काय गोड, तिखट, मऊ, घट्ट, पातळ, जाड...अबी मला आपल्यांतलं द्यायचा. पमू पण आपला वाटा मलाच द्यायची. 'पांडोबा खा' म्हणून अपूर्वाईनं म्हणायची. मी आपला बोकणा मारायचा नी खुदूखुदू हंसायचा. मनांतल्या मनांत नाचायचा.

कसे दिवस गेले कांहीं कळलं पण नाहीं. काल धनी म्हणाले, 'पांड्या आज दुपारचं काय घेशील ते झोपून घे. रात्रीं सगळी बांधाबांध आहे

(पृष्ठ २१७ वर पहा)











वसंत
फेणे



**अजब शोध ! अजब इंजेक्शन आणि त्याची अजब (पण खदखदून हंसवणारी) प्रतिक्रिया— पण त्यासाठीं 'ह्या' प्रयोगशाळेंत गेलंच पाहिजे.**

गेले तब्बल दोनशें ऐशीं दिवस केलेल्या तपश्चर्येचें फळ आज मिळणार आहे ! त्यामुळें प्रोफेसर घायगुड्यांच्या मनाची अवस्था पूर्ण दिवस भरलेल्या पहिलिटकरणीसारखी झाली आहे. मनांत तीच अपेक्षा नि हुरहूर, तीच भीति नि आशा आहे. मात्र पोट रिकामं आहे. कारण सकाळपासून त्यांनीं कपभर कॉफीशिवाय कांहीं घेतलं नाहीं ! पोट रिकामं असलं तरी डाव्या हातांत अमोल रसायनाचा कांचेचा चंबू आहे !

ते प्रयोग–टेबलापाशीं उभे आहेत. प्रयोग टेबल एखाद्या सुगृहिणीच्या स्वयंपाक-ओटचा-सारखं सजलं आहे. त्यावरील रिकाम्या बाटल्या गच्च झांकल्या आहेत, तर रसायनं असलेल्या बाटल्या तोंड वासून उघड्या पडल्या आहेत. कांहीं किंचित् स्मितमुखी बाटल्या "हृदये नु हलाहलम्" घेऊन उभ्या आहेत. तर स्वतःला विनोदी समजणाऱ्या पात्रांप्रमाणें कांचपात्रें विनाकारण तोंडं उघडीं करून पडलीं आहेत ! उजव्या हाताला लांकडी स्टँडवर कांहीं परीक्षानलिका ताठ उभ्या आहेत तर विस्तवाशीं संबंध आलेल्या कांहीं नलिका मरगळून टेबलावरच पडल्या आहेत. कोटींनीं आपल्या पोटांत रासायनिक गुह्यें दडवलीं आहेत पण त्यांची कांति त्यांच्या अंगावर चढलेली समजून येतेच !

या गर्दींतच एक विजेची शेगडी, नि एक गॅस बर्नर आहे नि कुत्र्याचें हृदय असलेला शिसा आहे. त्यावर Status Liverundum म्हणजे "जिवंत स्थितींत असें" लेबल लावलें आहे. जित्याची खोड म्हणूनच जणुं तें या गर्दींत निपचीत पडलें आहे !

जवळच भिंतीवर एक क्लिपबोर्ड आहे. त्यानें दांत ओठ खात वेड्यावांकड्या कागदांची चळत नेटानें धरली आहे. 'शॉपिंग'ला निघालेल्या एखाद्या पुरंध्रीच्या पर्समध्यें नोटांचीं जशी गलथान गल्लत असते तशी त्या कागदांची आहे. त्यावर लाखमोलाचं ज्ञानभांडार-आहे— त्या ज्ञानाचं सार प्रोफेसर मजकुरांच्या हातांतील एका गोल बुडाच्या कांचेच्या चंबूंत आहे !

टेबलाच्या मधोमध वर विजेचा दिवा आहे. पोलादी नळीनें तो छतापासून टांगलेला आहे. त्याचा प्रकाश प्रो. घायगुड्यांच्या ज्ञान-प्रकाशाला साजेसा आहे. कारण दिवसा उजेडी देखील त्याचा प्रकाश भासमान् होतो आहे !

बाजूला एक-दोन जुनाट मोडक्या खुर्च्या व त्यांना साजेसं एक स्टूल आहे. एक आराम-खुर्ची आहे. त्यावर 'गुडलक टु यू' हें इंग्रजींत विणलेला चेअरबॅक आहे.

चंबू तोंडासमोर धरून ते प्रयोग-टेबलाच्या समांतर येरझारा घालूं लागतात. रस्त्यावरचा जादूगार धूळफेंकीचा किंवा कॉलेजमधील एखादा प्राध्यापक ज्ञानफेंकीचा प्रयोग करतांना फिरतो त्याप्रमाणें.

"मग ? तुमच्या लक्षांत आलं कीं, मी काय म्हणतों तें; Isn't it?" ? ते चंबूशींच पहात मोठ्यानें बोलतात. वर्गांत शिकवितेवेळीं बोलतात तसे. परंतु प्रयोगशाळेंत केवळ तीनच माणसें आहेत. एक त्यांचा नोकर गणप्या. तो इंजेक्शनच्या सुया पाण्यांत उकळत ठेवून साहेबांच्या सूचनेची वाट पहात आहे. कुत्र्याच्या

इमानानें तो तेथें बसला आहे. दुसरे दोघे स्वत:-वरप्रयोग करून घ्यावयास आलेले. पैकीं एक-जण सामान्य वेषांत निर्विकारपणें उभा आहे. दुसरा बोकड दाढी ठेवलेला असामान्य (असं समजणारा) आपला दाढी अस्वस्थपणें खाज-वीत उभा आहे.

"या पंचरंगी द्रावणांत आहे कॅनेफिकाय-सलीन ! मी तुमच्या शरीरांत – तुमच्या रक्तांत तें प्रक्षेपित करणार. तें मग तुमच्या हृदयांत जाईल. तेथून तें शरीरभर पसरेल. कांहीं मिनिटांच्या आंतच. आणि – आणि–" यानंतरच्या प्रसंगाच्या कल्पनेनें प्रोफेसर घाय-गुड्यांचा आत्मा शहारतो. एकदोन मिनिटांनीं अंगावरील रोमांच निवल्यावर ते म्हणतात "आणि – आणि विसाव्या शतकांतला एक सर्वश्रेष्ठ शोध सिद्ध होईल. मानव हा प्रति-परमेश्वर होईल. Do you understand me? मिस्टर — नांव काय तुमचं ?"

"जॉली कुकर ! पण —"

"येस्. येस्. जॉली कुकर ! अॅण्ड यू लेखक, तुमचं नांव काय म्हणालांत ?" बोकड दाढी-वाल्याकडे पाहून ते विचारतात.

"अं– अं– माझं नांव– म्हणजे मी –?"

"What अंऽअं ?" घायगुड्यांचा पारा बॉय्लिंग पॉइण्टला पोंचतो. "तुमचं नांव तुम्हांला माहित नाहीं ? इतकीं वर्षे झालीं तरी माझें नांव अजून मला माहित आहे. अन् तुम्ही विसरलांत ? You young!

"नाहीं — मी कविता कर्वे म्हणून लिहीत असतो !"

What of that? तर हें कॅनेफिकाय-सलीन. It contains the essential harmones of species canne in status liverundum!"

"म्हणजे कुत्र्याला मारून—?" आपलं शहाणपणा दाखविण्याचा प्रयत्न करीत कर्वे बोलूं पहातो. कारण भैघांच्या दमानं तो जरा down झाला आहे ! पण घायगुड्यांचा पारा परत बॉइलिंग पॉइण्टला–

"What मारून ? मी सांगतो कीं, हीं इसेन्शियल हारमोन्स जिवंत स्थितींत आहेत– –इन स्टेट्स liverundum समजलीस– I mean, समजलास कविते ?"

"हा परयोग हाऊसफुल्ल– म्हंजी सक्सेस फुल्ल जाला मंजी–" गणप्या बोलूं लागतो

"मलॉ किती जास्त पैसे द्याल ?" जॉली कुकर प्रश्न करतो.

"पैशांनीं बुडवून टाकीन तुम्हांला !" घायगुड आपण कुबेराचे बाप होणार असल्याच्या रास्त विश्वासानें सांगतात.

"पण – पण हा इफेक्ट नाहींसा करण्याचा–" दाढी खाजवीत कविता विचारतो.

"अर्थात् ! कॅनेफिकायसलीनचा परिणाम शून्य करणारें हें पहा डीकॅनेफिकायसलीन !" ते टेबलावरील एका चंबूकडे बोट दाखवून म्हणतात. "तें टोंचल्यावर तुम्ही पूर्ववत् व्हाल !"

"पण – पण –" कविता बोलण्याचा प्रयत्न करतो "मी लेखकच होईन ना" असं त्याला विचारायचं असतं. परंतु लघुकथा लिहितांनी नव्या प्रतिमेसाठीं अडखळावं तसा तो अडखळतो. "What पण ? तुम्ही इथं कशासाठीं आला होतांत–"

"मी – मी माझं अनुभवविश्व समृद्ध, सखोल व्यापक नि वेगळं करण्याच्या दृष्टीनं–" आपल्या आवडीचा विषय निघाल्यानं कवितेचं मन पाडाला आलेल्या आंब्यासारखं आमूर-पिकं होतं. "म्हणजे मराठींत आतां प्रादेशिक-तेतला उथळपणा उघड झालाय् म्हणे नि आतां वेगळं लिहिल्याशिवाय मार्केट नाहीं. झोंपड-

पट्टीवर फार लिहिलेलं नसलं तरी तिथं जाऊन अनुभव घ्यायचा म्हणजे— म्हणजे तेथें दादा असतात, तेथील स्त्रिया देखील महा विलंदर असतात म्हणे —"

"चूप !" स्वस्थ असलेला जॉली कुकर एकाएकीं ओरडतो "विलंदर बाया मी तुला बंगल्या बंगल्यांत दाखवतो, फलाटा फलाटांत दाखवतो नि तुझ्यासारखी माणसं रहातात तशा चाळीचाळींत दाखवतो—"

"Order! order!! " प्रोफेसर घायगुडे डाव्या हाताची मूठ टेबलावर आपटून दरडावतात. "So, हें द्रव्य रक्तांत गेल्यावर तुम्ही शरीरानं आकृतीनं मानव असाल पण प्रवृत्तीनं श्वान म्हणजे कुत्रा व्हाल. तुम्ही बोलूं शकणार नाहीं. कुत्र्याप्रमाणें भुंकाल. कुत्र्याप्रमाणें वागाल ! So be ready! गणप्या—"

"होय साहेब !" म्हणून गणप्या इंजेक्शनची सुई घेऊन येतो.

"साहेब आम्ही रक्त देतों तेथें देखील वीस मिळतात—"

"Well हें घ्या" म्हणून प्रोफेसर घायगुडे दहाच्या तीन नोटा त्याच्या हातांत कोंबतात



नि चंबूतलें रसायन इंजेक्शन नळींत भरूं लागतात. भली मोठी नळी रसायनानं भरल्यावर ते कविताला बोलावतात.

"ही–ही– इतकी मोठी सुई न् हें इतकं-" कवितेचें पाऊल आधीं वांकडे व नंतर सरळ (पण उलटें) पडतें.

"गणप्या पकड त्याला–" म्हणून खवळलेले घायगुडे हातांत सुई धरून धांव घेतात. गणप्या देखील धांवतो. पुढें कविता नि मागें घायगुडे आणि गणप्या अशी धांवाधांव सुरू होते. कविता "नको – नको– प्रोफेसर साहेब ! हें नको. माझं अनुभवविश्व उथळ राहूं दे – मी कमी मोबदल्यांत खूष होईन पण हें नको–" म्हणत धांवत असतो. तो स्टुलावरून उडी मारतो. खुर्चीवर चढतो. तेथें त्याच्यामागून दोघेंहि पोंचतात. 'गणप्या sss ! तूंच वांऽऽचऽऽव !" म्हणून कविता ह्. ना. आपटे कालीन कादंबरींतल्या नायिकेसारखा करुण रस प्रधान टाहो फोडतो. नि त्यामुळें गणप्या पाझरतो.

"जाऊं द्या साहेब – आपण या जॉली कुकरला टोचूं !"

"पण या लेखकानें पहिल्यांदा असा अपशकून करावा–"

"शुभ शकुनच हाय् साहेब– निस्तं कॅनेफिकायसलीन पाहूनशान कुत्तरड्यावानी केंकाटलं नि शेपटी आंत घातलीन् काय ! आन् तसं ह्ये लेखक न्हाई !"

"असं ?" घायगुडे चमकून विचारतात.

"तर काय सांगतो सायेब! मऱ्हाटींत दोनच लेखक हायत सायेब ! येक आबूराव कर्नाळकर न् सूर्यकांत चाचोडकर. दोगं बी लय टेसदार लिवतात. बाकीचं आपलं लिवतात झालं– बाराखड्या ! अंकलिपीतल्या पोरांवानी!"

"अच्छा! अच्छा! !" आपल्या हरकाम्यावर घायगुडेंचा दांडगाच विश्वास असतो. "माझ्या आमदानींत एक गुर्जर का कोण होता. आतां दोन आहेत म्हणतोस – म्हणजे मराठी लिटरेचरचा सेण्ट परसेण्ट प्रोग्रस दिसतो !"

एका कोंपऱ्यांत पिसुडलेल्या कावळ्यासारखा कविता उभा असतो. डोळ्यांत नपुंसकलिंगी जखम बाळगीत...

"कुकर साहेब बसा खुर्चीत!" गणप्या कुकरला उद्देशून म्हणतो. इतका वेळ निर्विकारपणें चारमिनार फुंकत असलेला जॉली कुकर शेवटचा दमदार झुरका घेतो. थोटुक जोरानें खालीं फेंकतो. पायाखालीं चिरडतो. खिशांतल्या खिशांतच नोटा डाव्या हातानें कुरवाळतो नि आरामखुर्चीत तेवढ्याच निर्विकारपणें बसतो.

जॉली कुकर रक्तावर जगणारा माणूस.. म्हणजे स्वतःचं रक्त इस्पितळाला विकून. महागाई भडकली तरी रक्ताची किंमत वाढली नाहीं म्हणून त्याचं नि त्यांच्या साथीदारांचं रक्त तापलंय्. खुनाचा पुरेसा (मो) बदला मिळेपर्यंत रक्तदान करायचं नाहीं असं त्यांनीं सध्यां ठरवलंय्. चार पैसे मिळविण्याच्या इच्छेनें तो या ठिकाणीं आला आहे. तरीहि प्रो. घायगुडेंनीं पैशांनीं बुडवून टाकीन म्हणून सांगितल्यावरहि त्याच्यावर कांहीं परिणाम होत नाहीं. त्याला हातांत पडलेल्या तीस रुपयांचं तेवढं मोल वाटतं !

"हाताची मूठ दावा साहेब !" गणप्या त्याला म्हणतो.

"च्यायला !– रक्त काढतेवेळीं पण मूठ दावायची नि रक्त भरतेवेळीं पण–"

"नो–नो–नो ! हें रक्त नाहीं जॉली" त्याची रक्तवाहिनी पकडून तींत सुई खुपसीत घायगुडे बोलतात. "हें आहे कॅनेफिकायसलीन. श्वान जातीचीं इसेन्शियल हारमोन्स् यांत आहेत. अगदीं जिवंत. हें रक्त नाहीं वरं. हें अद्‌भुत रसायन आहे. प्राणिमात्रांच्या अंतरंगाचं कायापालट घडविणारं ! ही जादूहि नाहीं. जगांतल्या साऱ्या विद्वान् शास्त्रज्ञांना केवळ अवाक् करणारं हें महान् शास्त्रीय सत्य आहे. हें माझ्या प्रज्ञेचं आणि परिश्रमांचं फलित आहे !"

प्रो. घायगुडे आपल्या शोधाच्या अपूर्व यशानं भारलेले असतात. त्यांच्या बोलण्यानं वातावरण गंभीर बनत असतं. तें अद्‌भुत रसायन हळुंहळूं जॉली कुकरच्या शरीरांत जात असतं. गणप्या सावकाश ते आंत ढकलीत असतो. अन् कोंपऱ्यांत उभा राहून मराठी (पण वेगळा) लेखक (सुरक्षित) कलात्मक अलिप्तता राखून अनुभव ग्रहण करीत असतो. प्रो. घायगुडे बोलतच असतात.

"तुम्हांला माहित आहे प्राणिमात्रांच्या शरीरांतून रक्त वाहात असतं. पण तें कांहीं सर्वव्यापी विश्वतत्त्वाला अपवाद नाहीं. तें तत्त्व म्हणजे प्रत्येक वस्तुमात्र धन-ऋण विद्युत् प्रभारित आहे. प्रत्येक जातीच्या धन-ऋणाची स्वतंत्र सायक्लिक विद्युत् गति असते ! तिच्यावर





परिणाम होतो तो सजीव शक्तिकेंद्राचा, किंवा इसेन्शियल हारमोन्सचा. या दोन शक्तींच्या टक्करींतून – समन्वयांतून किंवा संघर्षांतून जो अंतिम परिणाम घडतो त्यावरून प्रत्येक प्राण्याची प्रवृत्ति ठरते ! कुत्रा भुंकतो कां नि घोडा खिंकाळतो कां, वाघ डेंडर कां अन् ससा भित्रा कां, या सर्वांची उत्तरं यांत आहेत. तें मी शोधून काढलंय् ! आणि अंतराळ–यानाच्या संशोधकापेक्षां पहिला अंतराळवीर म्हणून गॅगॅरिनचाच जसा अधिक गौरव होतो तद्वत् जॉली कुकर, पहिले 'श्व'मानव म्हणून तुमचा गौरव जग अंतापर्यंत करीत राहील !" असं बोलून ते रिकामं झालेलं इंजेक्शन बाहेर काढतात.

जॉली कुकर पहिल्याच निर्विकारपणें खुर्चीत बसून आहे.

"कसं काय वाटतं कुकर साहेब ?" गणप्या प्रश्न करतो.

"बरं वाटतं !"

"बरं वाटतं ?" आश्चर्ययुक्त प्रश्न. अर्थात् घायगुडचांचा. "जरा वेगळं नाहीं वाटतं ?"

"वाटतं; वाटतं – जरा नाहीं वरंच !"

"राईट ! राईट !! कॅने. तुमच्या हृदयांत जाईल. तेथून तें सर्वत्र पसरेल. तुमच्या रक्तांतील विद्युत् प्रभारित धन-ऋणायीं त्यांची टक्कर होईल. दोन गतींच्या संकटामुळें तिसरी गात निर्माण होईल नि तुमच्यात श्वानवृत्ति निर्माण होईल. तुम्ही कुत्र्यासारखे वागूं लागाल. कुत्र्यासारखे भुंकाल !"

"भुंकणार ?" डोळे विस्फारून कोपऱ्यांतूनच कविता किंचाळतो. सर्वांचं लक्ष त्याच्याकडे जातं. "मराठींतल्या सर्वच टीकाकारांना तुमचं हें कॅनेफि–कॅनेफी–का काय तें टोंचलंय् कां हो ?"

"Don't talk rot!" घायगुडे उसळतात. नि जॉलीकडे पाहून म्हणतात, "तुम्ही कुत्र्यासारखं भुंकाल, त्याच्यासारखं वागडाल. तुम्ही जितकं कुत्र्यासारखं वागाल तितका माझा शोध यशस्वी !"

"पण बुक्का लावायला सांवली नसलेल्या उन्हांत नेलं तर हा ल्हा–ल्हा करीत पडेल काय हो ?" कवितेचं कुतूहल अनिवार्यपणें मुखर होतं. "साऱ्या प्रादेशिक वाङ्मयांत ऊन नि कुत्रं अशींच असतात म्हणून म्हणतो."

"स्स ऽऽ !" नाकावर बोट ठेवून घायगुडे, त्याच्याकडे पाहतात. जरा बाजूला सरतात. ते कमालीचे अस्वस्थ झाले आहेत. आत्तां होईल, जरागानं होईल असं प्रत्येक पळा पळाला त्यांनाहि वाटतं !

ते हळूंच पुटपुटतात "अंडर–अंडर येतोय्! आतां कोणत्याहि क्षणीं कुत्र्यासारखं भूंकूं लागेल."

त्याच क्षणाला "भू: ! भू :!! भू :!!!" असा आवाज येतो. पण तो पाठीमागून. घायगुडे अन् गणप्या वळून बघतात. तो कविता भुंकत असतो "भू : ! भू :!! भू : !!!"

"गणप्या, याला मी टोंचलं होतं आधीं ?"

"नाहीं सायेब ! हें रडलं न्हवं का ? नाय् टोंचलें. गनपावडरवर स्पार्क पडल्यावर व्हावा तसं घायगुडचांचं एक्स्प्लोजन होतं !

"And you bark you dog!-damn swine!!" म्हणून ते खाड्दिशीं कवितेच्या थोबाडांत देतात ! कविता त्या आघातानें 'म्यें–म्यें–म्यें' करून केंकाटतो.

"कविता नाय् – नाय् सायेब ! तुमाला न्हायी टोंचलं सायबानीं कॅनेफिकायसलीन.










कशापायीं केंकाटतां तुमी कुत्र्यावाणी ?" त्याच्या बोकडदाढीला हात लावीत गणप्या विचारतो. "आं काय जालं ? नाय—नाय माझी बाऽऽय ती !" बाळू गोलटकरांच्या नाटकांतील सज्जन पात्राप्रमाणें तो. अतीव सहानुभूतीनं विचारतो.

गणप्याच्या या सहानुभूतीपर उद्गारांनीं कविता कर्वे भानावर येतो. तो चक्क माणसासारखं बोलूं लागतो. "अरे, चुकलंच माझं. नेहमीं असं होतं माझं. माझं मन अत्याधिक तरल नि संवेदनाक्षम आहे. मी कोणत्याहि भावनेशीं तात्काळ समरस होतो. त्यामुळें असं होतं कधीं कधीं !"

"होतं न्हवं का ? मग भुकां !—"

"नाहीं—"

"न्हाओ— कशापायीं ? भुका ! भुका तुमी. भुकाची सयच हाय् म्हनतासा, मंग काय सांगाव ? पर हथ नग. आमचा सायब लय् भडक डोस्क्याचा. मी म्हून सांभाळलाय् !!"

जॉली कुकरकडे एकाग्र चित्तानें पहात असलेले प्रो. धायगुडे त्यांना गप्प रहाण्याची खूण करतात. "तो अंडर येतोय्–अंडर येतोय् इफेक्टच्या !"

दचकून गप्प बसतो. गणप्या जरा जवळ येऊन जॉलीकडे पाहूं लागतो.

तेवढ्यांत जॉली जरा हालचाल करतो. प्रो. धायगुड्यांचं हृदय लपलपतं. अन् दुसऱ्याच क्षणाला त्याच्या तोंडून हलकासाच आवाज निघतो "भो ! भो !!"

"आं– आं !" ध्वनिमुद्रिकेचा शोध लावत असतां ध्वनिमुद्रिकेंतून पहिल्यांदा स्वर उमटल्यावर खुद्द एडिसनच जसा दचकला होता तसे धायगुडे दचकतात. दोन पावलें मागे सरतात. त्यांच्या डोक्याचा केंसन् केंस डुकऱ्याच्या केसासारखा ताठ उभा रहातो. डोळे विस्फारले जातात. आनंदातिशयानें ते म्हणतात, "गणप्या ! गणप्या !! ते भुंकले ना !"

मग ते गणप्यालाच घट्ट मिठी मारतात. गणप्यालाहि आनंदाश्चर्याचें भरतं येतं.

"भू:! भू:! भू:!! भू :! भू :! भू :!!" जॉली आतां मोकळेपणीं भुंकतो.

धायगुडे त्याच्याकडे प्रेमानें पाहतात.

"जॉली! जॉली! तूं गॅगॅरिनसारखा हीरो झालास. पहिला श्व-मानव झालास! पहिला श्व-मानव झालास!" त्याचं डोकं थोपटीत ते म्हणतात.

"जॉऽऽलि ! जॉऽऽलि !! यूऽ यूऽऽ यूऽऽऽ!" जरा दूर जाऊन ते म्हणतात.

आरामखुर्चीत मुटकुळं करून पडलेला जॉली उठतो. दोन पायांनींच चालतो व लडिवाळपणें धायगुड्यांकडे जाऊन भुंकतो.

धायगुड्यांना हर्षवायू होण्याची वेळ येते. त्यांनीं पहिला 'श्व-मानव' बनविला. ते पहिले प्रतिपरमेश्वर! आजवरच्या शोधांत सर्वश्रेष्ठ शोध लावून क्रांति करणारे म्हणून ते अमर होणार!!

"गणप्या! गणप्या!! लेका प्रभाला बोलाव! म्हणावं तुझ्या त्रिखंड कीर्तीच्या, जगांतला पहिला प्रतिपरमेश्वर असलेल्या, या नवऱ्याचा शोध बघायला ये!"

"व्हय् सायेब! आत्ता आलूच!" म्हणून गणप्या हर्षनिर्भर होऊन जातो.

कविता कर्वेला जॉलीबद्दल कमालीचा आदर वाटूं लागतो. तो गॅगॅरिनएवढा मोठा झाल्यामुळें पोटांत जळनहि होऊं लागते. ती लपविण्यासाठीं तो दुरूनच विचारतो "जॉली– म्हणजे जॉली साहेब!" ("गॅगॅरिनएवढ्या मोठ्या (श्व) मानवाला नुसती नांवानं कशी हांक मारायची!")

"कसं काय वाटतं–"

"भो:! भो:! म्याऽऽक्!" जॉली एकदम त्याच्या दिशेनें उडी मारून भुंकतो. कविता टुणदिशीं धायगुड्यामागें लपतो नि म्हणतो, "धायगुडेसाहेब, अनुभव नको पण कुत्रं आवरा!"

कवितेकडे न बघतांच घायगुडे आनंदानें म्हणतात, "कविते, कविते, घाबरूं नकोस!" "जॅाऽऽली ! जॅाऽऽलि !!" असं म्हणून जॅालीच्या पाठीवरून ते हात फिरवतात.

थोड्याच वेळांत गणप्या प्रो. घायगुड्यांच्या स्वरुपसुंदर पत्नीला घेऊन येतो!

"Darling congratulate me!" म्हणून प्रो. घायगुडे तिला कवटाळतात. गणप्या दुसरीकडे पाहूं लागतो. कविता कलात्मक तटस्थपणा राखण्याचा केविलवाणा प्रयत्न करीत त्यांच्याकडे पहात असतो. त्याच्या बोटांची चाळवाचाळव सुरूं होते. गणप्या त्याच्या जवळ जाऊन म्हणतो, "सायब! या भावनेशीं नका समरस होऊं—! न्हाय—वाईच कठीण हाय् पर—!"

"प्रभा, तूं बोलाव बघूं त्याला" असं म्हणून ते स्वतःच जॅालीला बोलावतात "जॅालीऽऽ जॅाऽऽली!! यूऽयूऽऽ यूऽऽऽ!!" जॅाली तिथेंच उभा रहातो.

"जॅाल्या, जॅाल्या, यूऽऽ!- बाईसाहेबांच्याकडे यूऽऽ!!" गणप्या म्हणतो.

प्रो. घायगुडे त्यांच्या तोंडाकडे हात नेऊन म्हणतात, "Don't you afraid Jolly!" नि त्याच्या नाकाला हात लावून ते ओरडतात हा हुंगतोय् माझा हात!"

जॅाली खरोखरच त्यांचा हात हुंगू लागतो.

"तूं हात पुढें कर—"

प्रभा हात पुढें करून नाजुक आवाजांत बोलावते "यूऽऽ!" यूऽऽ!! जॅाली मान हलवीत तिचा हात हुंगतो.

"अय्या! ॲक्च्युअली कुत्रा होऽऽ!" त्या किंचाळतात! "खरंच किती थोर आहांत तुम्ही—नि मी किती भाग्यवान्! माय डार्लिंग—म्हणून आनंदातिशयानें तीं स्थळ काळ विसरून प्रो. घायगुड्यांच्या गालाचं चुंबन घेते.

पुन्हां ती जॅालीला बोलावते. जॅाली आतां लुटुलुटु तिच्याकडे जातो. तिच्या हाताचा तळवा हुंगतो नि जीभ बाहेर काढून एकवार मनगट चाटतोहि!

घायगुडे कमालीचे संतुष्ट होतात. "आकृति मानवाची मात्र प्रवृत्ति श्वानाची, चाल माणसाची मात्र चालणूक कुत्र्याची!" त्यांना आनंद कसा व्यक्त करावा तें समजत नाही. ते नुसते ओरडतात, "ब्रेव्हो! ब्रेव्हो जॅाली!!"

जॅाली प्रभावती भोंवतीं वागडूं लागतो. त्यांच्या भोंवतीं फिरतो. मधूनच रांगतो. आपलं डोकं त्यांच्या मांड्यांवर घांसतो.

"गणप्या! जा लवकर प्रोफेसर गॅान्सालिवसला बोलाव! घांवत जा!" गणप्या घांवत जातो.

कविता कोंपऱ्यांत अस्वस्थपणें उभा असतो. त्याला वाटत असतं हा भुक्कड एखाद्या लघुकथेच्या नायकासारखा विवाहित स्त्रीशीं— "Why are you silent there? Come on! Dance baby dance!! डान्स कविते डान्स!" असं म्हणून प्रो. घायगुडे कवितेपाशीं येतात. ते आपल्या यशानें अगदीं हुरळून गेले आहेत. खस्दिशीं कवितेचे हात ओढून ते धरतात. नि उड्या मारूं लागतात. त्याच तालावर गाणं म्हणूं लागतात.

"ब्रेव्हो जॅाली ! वक् अप जॅाली!! ब्रेव्हो जॅाली ! वक् अप जॅाली!!"

जॅालीला स्फुरण चढतें! 'भुक्-भुक्-भुक?' असं प्रश्नार्थक भुंकून तो आपलं डोकं तिच्या मखमली पोटावर घासूं लागतो. ती जॅालीला एकदम दूर ढकलते. पण तो जातिवंत लोचट कुत्र्याप्रमाणें लगट करतो नि लांब जीभ काढून टक्कन् तिचं पोट चाटतो. "औ ऽऽऽ!" ती ओरडते अन् त्याला ढकलून दूर जात म्हणते "मेला—"पण जॅाली तिचा पदरपाठीमागून दांतांनी धरून ओढतो!

जॅालीची ही जातिवंत श्वानप्रवृत्ति पाहून 'ब्रेव्हो जॅाली! वक् अप जॅाली' ची लय

वाढते. धायगुडे लहान मुलासारखे कवितेला बरोबर घेऊन खिदळत खिकाळत नि गाणं ओरडत उड्या मारीत नाचत असतात!

"ब्रेव्हो जॉली! बक् अप् जॉली!!
ब्रेव्हो जॉली! बक अप जॉली!!"

जॉली आतां प्रभावतीच्या कमरेभोंवतीं दोन्ही पंजे टेकतो नि खर्जांत 'भू: भूक–भू: भूक' करतो. नि तिला इथं तिथं हवं तिथं हवं तसा हुंगूं लागतो. प्रभावती चवताळते. ती त्याला डोक्यावर मारते पण जॉलीची श्वान प्रवृत्ति प्रदीप्त होते. तो सारखा तिला ठिकठिकाणीं गच्च हुंगूं लागतो.

त्याची श्वानप्रवृत्ति पाहून धायगुड्यांना अस्मान ठेंगणं होतं. त्यांना काय करावं तें सुचत नाहीं. ते कोट काढून हवेंत फेंकतात व पुन्हां कवितेला धरून नाचूं लागतात! कविताहि त्याच्याबरोबर नाचल्यासारखं करतो. पण मनांतून एका सुंदर रमणीला वक्षस्थळीं इथें तिथें हुंगणाऱ्या त्या कुत्र्याचा त्याला भयंकर हेवा वाटतो असतो. गॅगॅरिन-लाहि हें भाग्य मिळालें नसावें; कवितेला वाटतं.

"मेल्या ही कुत्र्याची प्रवृत्ति कां? हो–ही तर माणसाची–पुरुषाची–" प्रभावती थरथरणाऱ्या ओंठानीं बोलते. पण तें धांगडधिंग्यांत कुणाला ऐकूं येत नाहीं. ती मोठ्यानें ओरडण्याचा प्रयत्नांत असते तोंच जॉली आपले पुढील पंजे तिच्या मानेभोंवती टाकतो नि तिचे ओंठ असे कांहीं सुदीर्घ हुंगूं लागतो म्हणतां–

कविता नाचायचा थांबतो. ? "अहो, अहो–तो पहा–तो काय करतो–तुमच्या बायकोला–"

"Yes! मी पाहतोय् ना! तो हुंगतोय्!! कुत्रा आहे तो? Under the effect of cannefícaisalynel!" असं म्हणून ते आपली टाय नि शर्ट हवेंत उडवतात नि वळेंच कवितेचे हात धरून नाचूं लागतात.

"ब्रेव्हो जॉली। बक् अप जॉली!!
ब्रेव्हो जॉली! बक् अप जॉली!!"

प्रदीप्त श्वान प्रवृत्तीनें अजून ओंठ हुंगणाऱ्या जॉलीकडे कविता नाचतां नाचतां पहात असतो! त्याची एकहि भावना सलग जमत नाहीं.

अखेर ती बाई आपली सुटका करून घेते! "भू:! भू:! भुक्!" जॉली अतृप्त समाधानाचे घोगरे उद्गार काढतो.

तेवढ्यांत प्रभावती प्रयोग टेबलावरील एक शिसा उचलते. ती चवताळलेली असते. तें पाहून जॉली केविलवाणें भुंकत धायगुड्यापाशीं येऊं लागतो. कविता त्याला चुकवून दुसऱ्या बाजूला जातो व तसं करतांना प्रभावतीनं जॉलीच्या टाळक्यावर फेंकलेला शिसा त्याच्या डोक्यावर आपटतो! "मेलों–मेलों!" म्हणूत बोंबलत कविता बसतो. अॅमोनियाचा वास क्षणांत सर्वत्र पसरतो. सारं अॅमोनिया सोल्यूशन कवितेच्या अंगावर पडतं. तो "हु: हु: थंडी–थंडी वाजते!" म्हणून कोंकडत म्हणतो.

परंतु धायगुडे भलतेच खूष असतात कारण जॉली डिट्टो कुत्र्यासारखा घाबरून पळालेला आहे. नि कुत्र्यावर बायको चिडली आहे. धायगुडे खदखदां हंसत असतात.

प्रभावती अधिकच चिडते. जॉली 'भू: भू; भू:' करून धायगुड्यांची करुणा भुंकत असतो. चवताळलेली प्रभा भला मोठा उर्ध्वपतित पाण्याचा शिसा उचलते नि जॉलीचा कपाळमोक्ष करायला तयार होते. नि तो जोरानें ती जॉलीवर फेंकते—

"मी मरतो मला वांच—" धायगुड्याकडे जाण्यासाठीं उठलेल्या कवितेच्या तोंडून पुढील शब्द बाहेर पडत नाहींत. त्याच्या कपाळावर त्या भल्या मोठ्या शिशाचा आघात होतो. शिसा फुटतो. 'मेलों ऽऽ' अशी आरोळी ठोकून तो मटकन् बसतो. कविता शुद्धोदकानें भिजतो. त्यामुळें अॅमोनियाचा परिणामहि कमी होतो. पण त्याच्या डोळ्यापुढें मात्र काजवे चमकतात.

"अग जॉली कुत्रा आहे आतां! त्याच्या मागें कशाला लागतेस?" सहर्षोन्मादांतून जरा जमिनीवर येत धायगुडे विचारतात.

"मी? मी मागें लागलें त्याच्या? कां तोच–तोच माझ्या–माझ्या–" ती अडखळते ती बोलणं तसंच सोडते व पदरानें ओंठ पुंसत "मेल्याच्या सिगारेटची घाण–"असं पुटपुटत बाहेर पडते.

"भोः भो! भो! भो!!" जॉली ती गेल्यावर मोकळेपणीं भुंकतो!...

"छ्या! छ्या!! छ्या!!! काय राड ही लेब्रोटरींत–"

"गोन्साल्विस कुठें?" ओरडत प्रवेश करणाऱ्या गणप्याला धायगुडे विचारतात.

"मसणांत!"

"काय?"

"मसणांतच सायब! घरच्यांनीं सांगितलं मला.

"कुणाला पोचवायला–"

"What पोंचवायला? ही काय वेळ झाली?"

"न्हाय तर काय व! मी बी तेंच म्हनलं! हिथं सायबानीं मानसाचा कुत्रा बनवला न हे बसले मसणात जाऊन शान्!—"

"पम्या, टम्या छू!" प्रभावतीचा आवाज एकाएकी येतो. सारे दाराकडे पाहतात.

"छान! छान!! छान!!!" आतां खऱ्या कुत्र्यांशीं हा कसा वागतो तें पाहूं या! Nice idea, Darling! मला ही स्ट्राईकच झाली नाहीं!"

पण त्यांच्याकडे साफ दुर्लक्ष करून ती पम्या-टम्याला जॉली व कविता यांच्यावर सोडते. तें दोघें कुत्रे भुंकत आपल्या लक्ष्यांकडे झेंपावतात. तशीं दोघें उडी मारून प्रयोग टेबलावर चढतात.

पम्या टम्याना टेबल उंच पडतं, ते कविता नि कुकर असलेल्या बाजूला जमिनीवर येतात नि भुंकूं लागतात. कविता नि

जॉली टेबलावर एका टोंकाहून दुसऱ्या टोंकाकडे, व दुसऱ्या टोंकाहून पहिल्या टोंकाकडे धांवतात व पम्या-टम्या जमिनी-वरून त्यांचा पाठलाग करीत असतात.

"घाबरूं नकोस जॉली! तुझेंच भाईबंद हे! भेटायला आलेत तुला!" घायगुडे कमालीच्या प्रेमळपणें जॉलीला समजावूं पहातात.

प्रभावती पम्याला हातांनीं उचलून टेबलावर ठेवते "छू:! मेल्या आतांतरी त्या मुड्याला घर!" असं चिडून म्हणते. पम्या वर आल्यावर गप्पकन् डोळे मिटून कविता उडी मारतो नि प्रभावतीच्या अंगावरच कोंसळतो. "हाड–कुतरडा" म्हणून ती त्याला ढकलते. नि त्याच क्षणाला जॉलीनें बाजूच्या शेल्फवर पाय देऊन वरील दिव्याची नळी पकडलेली असते. तिच्यावर तो लोंब-कळतो.

पम्या त्याला पकडण्यासाठीं टेबलावर उड्या मारतो. जॉली तात्पुरते पाय वर करतो. पुन्हां खालीं. पम्याच्या उडी बरो-बर पुन्हां वर या गडबडींत टेबलावरील व जवळील शेल्फवरील बाटल्या कांचपात्रं पड-तात. रसायनं पसरतात. त्यांचा विचित्र वास पसरतो. एकदम उघडा पडलेला गंधक पेट घेतो. पम्या खालीं उडी मारतो. लोंबकळत असलेला जॉली आपले पाय वर करतो.

हें सारें पम्याला वर ठेवल्यापासून एक दोन क्षणांत घडतें.

एकदम मोठा भडका होतो.

"अरे! अरे! डीकॅनेफिकायसलीन खलास झालं. जॉली आतां जन्मभर असाच रहाणार!"

"साहेब! तुमचा फॉर्म्युला–"

भिंतीवरील क्लिपबोर्डासकट जळत अस-लेल्या टांचणाकडे बोट दाखवीत गणप्या ओरडतो.

"देवा! मेलो-फॉर्म्युला-गेला–गणप्याऽऽ!" घायगुडे त्याच्यावर बेहोष होऊन कोसळतात.

प्रभावती अपराधी चेहऱ्यानं पम्या-टम्यासहित आधींच गेलेली असते.

आग आपणच विझते. तसा वर लोंबकळ-णारा जॉली उडी मारतो. त्याचे पाय गरम पत्र्यामुळें पोळतात.

"अयायी–मेलोंऽऽ!" म्हणून तो ओरडतो. व खालीं उडी मारतो.

त्याचे शब्द कानांत जातांच घायगुडे शुद्धीवर येतात. "तो बोलला?"

"होय साहेब!" "डी–कॅनेफिकायसलीन-शिवाय? जॉली कसा बोलूं लागलास तूं परत?"

"कपाळावरून घाम येत होता तोच गेला तोंडात बराच."

"घाम–गणप्या! त्याच्या घामाचं अॅनॅ-लिसिस केलं पाहिजे. टिपून घे–टिपून घे, तो!"

"आतां न्हाऊं द्या सायेब! बसा तुमी. मी कॉफी करून देतो तुमास्नी!" गणप्या बोलतो "न्हारं भाईर आतां–तुमचं न्हाई काम"

फाटक्या पँटच्या खिशांतील तीस रुपये काढून पहात जॉली निर्विकारपणें बाहेर पडतो. त्या पैशाकडे अधाशी नजरेनें पहात कविताहि येतो.

बाहेर पडल्यावर कविता कर्वे खाजगी आवाजांत जॉली कुकरला विचारतो, "तुम्हांला काय अनुभव आला एकंदरींत?"

"अनुभव?" जॉली त्याच्याकडे न पहा-तांच बोलतो "शास्त्रज्ञापेक्षां त्याच्या बायको-लाच अधिक अक्कल असते असा अनुभव आला!"

"अस्सं! अस्सं!!" तरी त्याच्या मनांत साहित्यिक मोलाचा प्रश्न वळवळतच असतो. "पण–म्हणजे–त्या बाईला टच होतो बाई–तिला हुंगतांना आलेला–"

"अरे हाड्—जा आपल्या वाटेनं. कुलंगी नाहीं तर"

नि मग कविता नसलेली शेपटी दुमडतो व पहिला श्व-मानव शेरे पंजाबकडे वळतो. • • •



हा "आपू" आबांचा मुलगा,

पावटे, बागाईतकर मास्तरांचा विद्यार्थी, वामन दाजींचा शेजारी, बाबुलीचा वैरी, आतां ओळखलं ना?

वर्षभरापूर्वी दीपावलींतून तो नियमितपणें तुम्हांला भेटला आहे. आपल्या बालपणांतील एक एक गंमत सांगून त्यानें तुम्हाला हंसवलें आहे. एक एक 'जत्रेंतील पात्रें' त्यानें तुमच्या समोर उभी केली आहेत. 'एकेक नग आहेत नग' म्हणून विविध वल्ली त्यानें तुम्हाला दाखविल्या आहेत.

दीपावलींतून प्रसिद्ध झालेल्या या दोन्ही मालिका, अधिक आकर्षक होऊन 'सारे प्रवासी घडीचे' या नांवानें पुस्तक रूपानें प्रसिद्ध झाल्या आहेत.

**'सारे प्रवासी घडीचे'** या वर्षी विशेष कौतुकानें प्रकाशित केलेलें एक विशेष पुस्तक. या पुस्तकाचे लेखक आहेत जयवंत दळवी, **'चक्र'** या गाजलेल्या (महाराष्ट्र साहित्य परिषद आणि महाराष्ट्र सरकार यांनीं गौरविलेल्या) कादंबरीचे लेखक.

दक्षिण कोंकणांतील एका खेड्यांत आपूचें बालपण गेलें. म्हटलें तर हें आपूचें आत्म-चरित्र आहे. म्हटलें तर हीं व्यक्तिचित्रें आहेत, म्हटलें तर विनोदी गप्पा गोष्टी आहेत, म्हटलें तर विनोदी कादंबरी आहे, आणि कांहीं म्हटलें नाहीं तरी पुन्हां पुन्हां वाचावेसें वाटणारे, हंसवतां हंसवतां शेवटीं खिन्न अंतर्मुख करणारें मराठींतील एक श्रेष्ठ पुस्तक आहे.

लेखक, प्रकाशक, मुद्रक आणि चित्रकार यांच्या सहकार्यानें 'सुबक' ग्रंथ निर्मितीचा प्रयत्न येथें यशस्वी झाला आहे.

**[सारे प्रवासी घडीचे,** लेखक: **जयवंत दळवी,** प्रकाशक: **मॅजेस्टिक बुक स्टॉल,** गिरगांव नाका. मुंबई ४, **पृष्ठें १९२, कापडी बायडींग, सोनेरी गिल्डींग, मोठा आकार, मूल्य साडेसात रुपये.]**











घरांत मुलाची मुंज होती!
पहिल्या मुलाची मुंज!
घर माणसांनीं भरलं होतं.
सारे जण तिची आस्थेनें
चौकशी करीत होते.
पण ती मात्र
"त्या" जगांत नव्हती....



—प्रभाकर अत्रे

उद्यां नितिन्‌ची मुंज आहे. घरांत माणसं अगदीं माशांसारखीं घोंगावताहेत. कुणीं येतो आणि म्हणतो "वहिनी, मला चहासाठीं साखर द्या!" कुणीं येऊन म्हणतो नारळ, सुपाऱ्या द्या! कुणीं येतात आणि म्हणतात "स्वस्थ काय बसलांत वहिनी. उद्यां घरांत येवढं मोठं कार्य आहे. दहा गांवची शंभर माणसं आलीं आहेत. त्यांचं काम जातीनें नको कां करायला घरांतल्या लक्ष्मीनं? सासूबाई आल्या आणि दोनचारदां म्हणून गेल्या कीं, लक्ष्मी, ऊठ बरं आतां. थकली आहेस हें खरं! पण कार्य पार पडेपर्यंत स्वतःचा म्हणून विचार करायचा नसतो घरांतल्या माणसानं! कार्य पार पडलं कीं, खुशाल जाऊन झोंप त्या गच्चीवरच्या खोलींत! नितिन येतो आणि माझ्या गळ्यांत हात टाकून म्हणतो "आई, तो शेजारचा संजय बघ मला चिडवतो. म्हणतो आज रात्रीं तुझी मांडी कापून त्यांत बेडूक भरणार आहेत म्हणून! खरंच कां ग आई माझ्या मांडींत बेडूक भरणार आहेत?" त्याच्या पाठीवरून हात फिरवून मी त्याला समजावते. तो परत जातो. मग धांवत येते संध्या! माझ्या कंबरेला विळखा घालून म्हणते "आई ग, आपल्या नितीन दाचा गोटा करणार कां ग? किती ग त्याचे केंस छान आहेत." "अग, छान असले तरी मुंजींत गोटा करायलाच हवा! केंस पुन्हां येतील!"

"मला नाहीं बाई तो गोटा आवडत. मी बाबांना सांगेन जा!" असं म्हणत ती निघून जाते. मग येतात तिचे बाबा! ते घामाघूम झालेले असतात. ते केलेल्या कामांचा पाढा वाचतात, "द्रोण पत्रावळी भरपूर आणल्या. निमंत्रणें केली जेवणाची! बँडवाल्याला परत आठवण करून आलो. नाहीं म्हटलं तरी आपलं हें पहिल्याच मुलाचं कार्य! थाटांत झालं पाहिजे. लोकांनीं म्हटलं पाहिजे "पहिल्या मुलाचं कार्य थाटांत करावं तें अवधूतरावनेंच!" ते खूप उत्साहानें बोलतात. त्यांच्या त्या वाक्यानें मी वास्तविक बहरून जायला हवें अशी त्यांची अपेक्षा असते आणि तीही स्वाभाविक असते. पण तसं कांहीं घडत नाहीं तेव्हां ते चिडतात, संतापतात. "काय झालं काय तुला असं मख्ख चेहरा घेऊन बसायला? अगं आपल्याच घरांत कार्य आहे. शेजारच्या वाडेकरांकडे किंवा धर्माधिकाऱ्यांकडे नाहीं!"

मी नुसतं म्हणते "मला ठाऊक आहे. तुम्ही बाहेरून दमून आलां आहांत. जरा स्वस्थ बसा पाहूं. मी तुम्हांला चहा करून आणून देते." मी उठते आणि स्वयंपाकघराकडे जाते. मी उठले त्याला चहाचं खरं म्हणजे केवळ निमित्त! मला टाळायची होती त्यांची सरबत्ती! सासूबाईंजवळ मी चहा मागितला आणि त्यांना नेऊन दिला. त्यांनीं प्रथम मान फिरविली. पण नंतर माझ्याकडे पहात कप हातांत घेतला.

"तुला काय झालंय् आज? पुन्हां ते मला म्हणाले. तुझा चेहरा आज असा कां दिसतोय्!"

"कुठें काय? गेल्या आठ पंधरा दिवसांत नाहीं म्हटलं तरी हिंडणं फिरणं खूप पडलं. जाग्रणं झालीं. मला आतां इतकीं कुठें संवय राहिली आहे हिंडण्या फिरण्याचीं?"

"तुला बरं वाटत नसलं तर जरा जाऊन पड वर गच्चीवरच्या खोलींत! उद्यां तुला पडून रहायला सवड मिळणार नाहीं"

पण तेवढ्यांत सासूबाई येतात. आणि म्हणतात "झोंपायला काय सांगतोस तिला! घरांतल्या पहिल्या मुलाचं कार्य आणि त्याची आई झोंपून राहणार? लग्न कार्यांत अशी दगदग पडतेच जरा! पाहिजे तर कांहीं औषध पाणी घे. भूक लागली असली तर खा. चहा कॉफी घे. पण आज उद्यां तर तुला वाघासारखं काम करायला पाहिजे सूनबाई. तो आचारी आला आहे. त्याला जिलबीचं पीठ काढून दे पाहूं!

हें निघून जातात आणि मी स्वयंपाक घरांत जाते. जिलबीचं पीठ देते. आणखी कांहीं सामान हवं असतं. तेही सामान काढून देते आणि मग परत बैठकीच्या खोलींत येऊन बसते. आज माझ्या पायांत गोळे आहेत. डोक्यावर जणुं मणांचे दगड कुणींतरी आणून ठेवले आहेत हें जाणवतं ! पोटांत जळजळ होते आहे. डोळे क्षीण झाले आहेत. कानांत सारखी एक आर्त हांक ऐकूं येते आहे. माणसं येतात. त्यांचे प्रश्न मी ऐकते आहे आणि उत्तरेंही देते आहे. त्यांच्या प्रत्येक कामाला योग्य ती साथही मी देते आहे. पुन्हां पुन्हां नितिन येतो. त्याची नवी नवी काल्पनिक भीति माझ्यापुढें मांडतो आणि मी तिचें निवारण करण्याचा प्रयत्न करते आहे. आपली मुंज आहे; आपल्याला नवे कपडे शिवले आहेत. नवा बूट घेतला आहे. नवी जरीची टोपी घेतली आहे. बँड सांगितला आहे. वाजंत्रीवाल्यालाही बोलावले आहे. संध्याकाळीं सजवलेली मोटार येणार आहे. गांवांतून आपली मिरवणूक काढणार आहेत या गोष्टीचा त्याला खूप आनंद झाला आहे. 'दादाशेजारीं मीहि मोटारींत बसणार' म्हणून संध्या आजपासूनच नाचते आहे. सारं घर कसं आनंदानें गाजतं–गरजतं आहे. पाहुणे खुषींत आहेत.

आणि तरीही माझ्या मनाला मात्र आज बरं वाटत नाहीं. पाय जड झाले आहेत. वृत्ति बधिर झाल्या आहेत. डोळे जड झाले आहेत. आणि कानांत कुठें तरी अतिशय आर्त हांक ऐकूं येते आहे ! कुणींतरी सारखं मला बोलावतं आहे. "मी आहे", "मी आहे" म्हणून माझ्या न विचारलेल्या प्रश्नांना उत्तर देतं आहे. आणि "कोण तूं ?" म्हणून मी त्याला विचारलं तर म्हणतो कसा "तुझ्याच मनाला विचार ! आठवण कर जरा !"

मी जोरानें म्हणते, "नाहीं. मला कांहीं आठवत नाहीं !"

"कांहीं आठवत नाहीं ?" पुन्हां कुठून तरी क्षीण आवाजांत प्रश्न येतो.

"खरंच, मला कांहीं आठवत नाहीं !"

"पहा प्रयत्न करून ! आठवेल कदाचित्"

"माझं डोकं आज बधिर झालं आहे. मला आज कांहीं आठवेनासं झालं आहे. कांहीं सुचेनासं झालं आहे."

"तेंच तें !"

"तेंच तें काय ?"

"मी म्हणतो तेंच ! आठवत नाहीं म्हणतेस ना तें सारं खोटं ! साफ खोटं."

"मी म्हणते तें खोटं ! माझं मन मला कळत नाहीं ?"

"कळतं ना ! कळतं म्हणून तर तुला सारं आठवतं ! पण आठवत नाहीं हा जो दावा आहे ना तो मात्र खोटा ! साफ खोटा !"

"कशावरून ?"

"मी म्हणतो म्हणून ! तुला सारं सारं आठवतं. आणि सारं आठवतं म्हणूनच तूं आज अस्वस्थ झाली आहेस."

"नाहीं ! नाहीं !!" म्हणून मी मोठ्यानें ओरडले आणि एकदम सारीं माणसं धांवून आलीं. "काय ग काय झालं ?" म्हणून सासूबाईंनी मायेनें पाठीवरून हात फिरवीत विचारलं.

"कांहीं नाहीं" मी चांचरतच त्यांना म्हणाले–"मग कुणाशीं बोलत होतीस ?" इथें तर कुणींच दिसत नाहीं !"

"कुणीं नाहीं ? मग मला भास झाला !"

"भास झाला ? कसला ?"

"भूताचा !"

"नको ग बाई भूत ! पार गाडून टाक भूत मनांतून ! यांव मीच रामरक्षा म्हणते देवापाशीं आणि लावते हा अंगारा ! अजीबात विचार करूं नको भूताचा !"

"मी तसा प्रयत्न करून पाहीन" मी म्हटलं. सारीं माणसें परत गेलीं. थोड्या वेळानें सासूबाई परत आल्या. त्यांनीं मला रक्षेचा अंगारा लावला आणि बाकीचा अंगारा आपल्या बिरल्या भांगातून फिरवीत म्हणाल्या "इडा पिडा टळो ग बाई माझ्या बाळीची !" त्यांनीं माझ्या तोंडावरून हात फिरविला आणि "पड जराशी" म्हणून बाहेर निघून गेल्या.

त्या गेल्या तेव्हां माझ्या जिवांत जीव आला. त्यांच्या मायेच्या स्पर्शानें माझ्या अंगावर भीतीनें फुललेला कांटा विरून गेला. छातीचे ठोके नेहमींच्या गतीनें पडूं लागले. मी जरा सांवरून बसले. मला शीण आला होता. पडावेसें वाटत होतें. म्हणून जराशी लवंडले. डोळ्यांवर हात ठेवून शांत पडून रहायचा मी प्रयत्न केला.

तेवढ्यांत बाहेरच्या गॅलरींतून कुणातरी मुलाचें अगदीं खदखदून हंसणें कानीं आलें. प्रथम मला भास झाला कीं नितिन असेल. म्हणून मी तशीच पडून राहिले. पुन्हां मोठ्यानें हंसण्याचा आवाज आला. आणि त्या हंसण्यांत नितीनचें तर हंसणें होतेंच पण आणखी कुणाचें तरी—

"कुणाचें बरं ?" खरंच कुणाचं ?" आणि मग एकदम मी दचकलो. डोळ्यांवरचा हात बाजूला केला आणि पाहूं लागले. बाहेर गॅलरींत अगर माझ्या खोलींतही कुणींच नव्हतं.

"मग कोण हंसलं ? कां हंसलं ? खरंच हंसलं कीं केवळ तो एक भासच होता – भास ? भास ??

"भास नाहीं सत्य होतं ते !"

"तुला काय ठाऊक ?"

"मला नाहीं तर कुणाला ठाऊक असणार ?"

"पण तूं कोण ?"

"मीच तो मघांचा हंसणारा ! नाहीं ओळख पटत ? पहा पटते का? असं म्हणून पुन्हां एकदां हंसण्याचा आवाज आला.

"छे ! छे ! ! मी हा आवाज ओळखत नाहीं. मला हें हंसणं परिचित नाहीं. यांतलं कांहीं कांहीं मला ठाऊक नाहीं ?"

"अजून आठवण्याचा प्रयत्न कर ! आठवेल. ह्या विषयांत मन घाल. अंगातल्या कणांना विचार कां दचकलीस ?" असं म्हणून पुन्हां तो हंसण्याचा आवाज !

"नाही ! नाहीं ! ! मला कांहीं आठवत नाहीं." असं नकळतच मी मोठ्यानें ओरडले. तेवढ्यांत हे धांवत आले.

"काय ग, काय झालं वासंती ? अशी घामेजलीस कां ?"

"मला वाटतं मला भोंवळ येते आहे."

"मग तिकडे घरांत जाऊन पड जरा ! कॉफी देतो तुला !" असं म्हणून ह्यांनीं मला हात धरून कॉटवर निजविले आणि तेवढ्यांत नितिन बाहेरून धांवत आला आणि मला बिलगला.

"अरे ! अरे ! तिला बरं नाहीं. तिला त्रास नको देऊं."

"खरं कां ग आई ? तुला बरं नाहीं वाटत."

"बरं वाटतं रे राजा—तुला जवळ घेतलं कीं, फार बरं वाटतं" असं म्हणून मी त्याचं चुंबन घेतलं.

"आई, आजच्या दिवस घे मुके हवे तेवढे ! उद्यां मुंज झाल्यावर नाहीं मी घेऊं देणार हं !"

"कां रे ? मी तुला आवडत नाहीं ?"

"तूं आवडतेस ग ! पण मला मुके नाहीं बाबा आवडत आणि उद्यां मी मोठा होणार ना ! मग मोठ्या माणसांचे मुके घेतात वाटतं ?"

त्याचे हें चुरचुरीत बोलणें ऐकून मला एकदम खूप हंसू फुटलं आणि मग एकदम माझे डोळे भरून आले. ऊर दाटून आला. कंठ कोंदला आणि मग मी एकदम उशींत मान लपविली. मला हुंदका आवरेना !

"कां ग काय झालं ?" हे म्हणाले.

"आई तूं रागावलीस ? नितिन मला बिलगत व मला आपल्याकडे बळेंच पहायला लावीत म्हणाला.

"मग तूं उद्यां मुके देणार नाहीं कां म्हणालास ? असं मी त्याला म्हणाले. त्यासरशी तो पुढें झाला आणि म्हणाला, "बरं बरं देईन तुला."

"तुला बरं वाटत नाहीं. पड जरा. चल नितिन !" असं म्हणते हे बाहेर गेले. नितिन मागें रेंगाळला. त्याला मी एकदम आवेगानें मिठी मारली. "नितिन ! माझा नितिन ! माझा लाडका नितिन ! नाहीं नितिन मी तुला सोडून कुठें कुठें म्हणून जाणार नाहीं !" असं तोंडानें बडबडत मी त्याचे पटापट मुके घेतले. तो माझ्याकडे बघतच राहिला. त्यानें एक दोनदां माझे खांदे हलविले. आणि म्हणाला "आई, अग, आई ! आपण घरींच आहोंत. मी तुझ्याजवळच आहे. आपण कुठें गेलों नाहीं. आणि तूंही मला सोडून कुठेंच गेली नाहींस !"

"नाहीं ना गेले ?" असं म्हणून मी स्वतःशीच हंसले. "जा बाळ तूं !" मी वेड्यासारखी कांहीं तरी बडबडत होते."

नितिन बाहेर निघून गेला. आणि मग मी पुन्हां उशींत मान खुपसली. मला हुंदके आवरेना.

"आतां कां रडतेस ? ओळखत नाहींस ना तूं मला ?"

"नाहींच ओळखत ! मी रडते आहे त्याचं कारण फार वेगळं आहे."

"अवघड नसलं तर सांग तरी मला."

"तूं कोण रे मेल्या मला विचारणारा ? मघांपासून सारखा येऊन ओळखलंस का ? ओळखलंस का म्हणून सारखा विचारतो आहेस तें !"

"ओळखणाऱ्याला ओळख काय करून द्यायची ?" नात्याच्याच माणसाला नातं काय सांगायचं ?"

"कसलं रे नातं ?"

"नातं रक्ताचं ! फार जवळचं !"....

—"रक्ताचं नातं ! तूं आणि मी मुळीं वेगळे नाहींच !

"कोड्यांतलं उत्तर नको आणि काव्यांतलंही नको. साधं सोपं, समजेल असं उत्तर दे !

"माझं नांव विवेक बुद्धि ! आतां मला साक्ष ठेवून आठव म्हणजे माझी ओळख पटेल. पण माझी खात्री आहे कीं माझी ओळख तुला कधींच पटलीय्. मी अगदीं प्रथम हें जग पाहिलं तेव्हांच ! कदाचित त्यापूर्वीही !

"कांहींतरी बडबडूं नकोस. कां असा छळवाद मांडला आहेस ?"

"कुणीं ? मी तुझा छळवाद मांडलाय् ?" आणि मग तो मोठ्यानें हंसूं लागला. हंसणं थांबवून मग तो मला म्हणाला. "माझाच छळ चाललाय् अन् मी कसला तुझा छळ करणार ?"

"तुझा छळ ? कुणीं तुझा छळ मांडलाय् ? आणि माझा आणि त्या छळाचा संबंध काय ?"

"तेंही तूंच आठव. तूंच ! तूंच मला दूर लोटलंस् ! तूंच माझा छळ सुरू केलास ?"

"आतां मात्र फार होतंय्. मला हें सहन होत नाही."

"मी सोसलं हेंही फार आहे. मला सहन करणं शक्य नव्हतं म्हणून तर रक्ताचा वास घेत तुला शोधीत आलो इकडे."










"काय सोसलंस ?"

"एकाकीपण ! बेवारशीपण !"

"पण-त्याचा काय संबंध ?"

"संबंध असा तोडून कसा तुटेल ? तूंच मला तें बेवारशीपण बहाल केलंस ! तूंच मला त्या अनाथाश्रमांत ठेवून पळून गेलीस !"

"नाहीं ! नाहीं !! मी पळून गेले नाहीं. मी तुझी नीट व्यवस्था करून आलें होते."

"अखेर तूं ओळखलंस म्हणायचं ! छान !"

"नाहीं ! नाहीं ! मी नाहीं ओळखलं !"

"कशाला भितेस येवढी ? इथं कुणीं नाहीं. फक्त तूं आणि मी !

"नाहीं ! नाहीं !! तूं जा, उद्यां माझ्या घरीं मुंज आहे. माझ्या मोठ्या मुलाची ! खूप माणसं आहेत इथें !"

"मी जाणार आहे. मुंजही चांगली पार पडणार आहे. पण मला तुझ्याशीं बोलायचं आहे. खूप बोलायचं आहे. खूप वर्षांनीं मी तुला भेटतो आहे. मला जवळ घे. पान्हा चोरूं नकोस."

" पान्हा विन्हा कांहीं नाहीं ! कोण कुठला येतो आणि —

"आई ! काय बोलतेस तूं हे ! इतका वेळ मी सारं कांहीं सहन केलं. आतां ओरडेन मी मोठ्यानें.

"नको ! नको !! बोल तूं ! काय सांगायचं आहे तें सांग."

"माझ्या छळाची कहाणी तुला ऐकवत बसत नाहीं. आई असून मी बेवारशी आहे आणि बाप असून मी पालकहीन आहे. मी त्या अनाथाश्रमांत वाढलो. खूप मुलं होतीं तिथें. कुणींतरी यायचं. मुलांना खाऊ द्यायचं. कुणींतरी येतं आणि तेथला एखादा मुलगा घेऊन जातं. कांहीं मुलीही अशा कुणाच्या तरी घरीं गेल्या. मी रोज संध्याकाळीं दिवे लागले कीं, बाहेरच्या व्हरांड्यांत स्टुलावर बसून वाट पहात राही. कुणीतरी येईल आणि मला म्हणेल "बाळ !" आणि मग मी त्याला म्हणेन "बाबा", पण असं कुणीं कधीं आलंच नाहीं. "आई" म्हणून धांवत जाऊन कुणाच्या तरी कुशींत शिरावं म्हणून मन नेहमीं आसुसलेलं असायचं. पण ती प्रेमळ हांक मी कधीं ऐकलीच नाहीं. दोन वेळां देतील ते खात होतो. सांगतील तो अभ्यास करीत होतो. परीक्षेंत पहिला नंबर मिळवीत होतो. चांगली चित्रें काढीत होतो. चांदीचे कप आणि पदकें मिळवीत होतो. पण कुणीं-तरी तीं चित्रें पहावीत अशी माझी आस होती. कुणींतरी तें पदक माझ्या छातीवर लावावें म्हणून मला फार वाटायचं. पण कुणीं कधीं मला भेटा-यला आलंच नाहीं. आई, तूं सुद्धां आली नाहींस ! तूं मला बेवारशी करून टाकलंस ? नऊ महिने माझा भार वाहिलास आणि मग मला विसरलीस ?"

'विसरले नाहीं रे तुला ! कशी विसरेन माझ्या राजा !"

"खोटं बोलूं नकोस." मवाचं बोट लावूं नकोस."

"नाहीं रे. मी खोटं बोलत नाहीं."

"मग मघां ओळख कां दिली नाहींस ?"

"तूं अजून लहान आहेस. ह्या जगाची रीत तुला ठाऊक नाहीं. इथें नातीं सुद्धां कधीं कधीं विसरावी लागतात. ओळख सुद्धां जपून दाखवावी लागते."

"मला त्या जगाशीं काय करायचं आहे ? माझं जग तर तुझ्यापुरतं आणि माझ्यापुरतंच होतं."



"पण माझं जग फक्त तुझ्या माझ्या पुरतं उरलं नव्हतं. त्यांत आणखी का माणसाची जमा होती. पण त्यानेंच तुझं माझं जग उध्वस्त करून टाकलं. तुझी माया त्याला अडवूं शकली नाहीं. माझा आक्रोश त्याला थांबवूं शकला नाहीं. एका कैफांत तो माझ्याजवळ आला आणि त्याच कैफांत त्यानें मला आणि तुलाही सोडून दिलं. त्याची ओळख मागें ठेवणं ह्या जगाला मानवलं नसतं ! रुचलं नसतं."

"म्हणून मला शिक्षा ? म्हणून माझ्या नशिबीं बेवारशीपण ?"

"कुणींतरी जगण्यासाठीं कुणींतरी मेलंच पाहिजे असाच ह्या जगाचा न्याय आहे. मोठ्यासाठीं छोट्यांनीं. सबलांसाठीं दुबळ्यांनीं मेलं पाहिजे अशीच येथली नीति आहे. मला त्या माणसाचं नातं विसरायचं होतं; त्याची ओळख पुसून टाकायची होती. त्यानें व्यवहार पाळला होता.'

"म्हणून तूंही व्यवहार पाळलास असंच ना ? मग मातृत्वाची भावना ? वात्सल्य ?"

"ती भावना मेली नाहीं. तें वात्सल्य आटलं नाहीं."

"मग भेटायला कां आली नाहींस ? माझी साधी चौकशीसुद्धां कधीं कां केली नाहींस ?"

"मी तुला रोज भेटत होते. रोज रात्रीं निजतांना मला तुझी आठवण येतच होती. मी देवाला हात जोडून विनवीत होते कीं, माझ्या बाळाला मोठं कर."

"मग मला कसं दिसलं नाहीं तें !"

"दिसलं नसलं, तरी तें चांगलं देवाच्या कानीं जातच होतं. तो तुला मोठा करीतच होता. तुला पहिला नंबर मिळवून देतच होता."

"पण तूं भेटली कां नाहींस ?"

"पाण्यांत राहून माशांशीं वैर करतां येत नाहीं म्हणून !"

"म्हणजे काय ?"

"मी ज्या जगांत राहते तिथले नियम मला पाळले पाहिजेत म्हणून !"

'माणसांपेक्षां नियम मोठे ?"

'चुकलेल्यांनीं ही शिक्षा इथें भोगलीच पाहिजे."





अनुक्रमणिका

"कोण चुकलं ? त्यांत माझी काय चूक ?"

"चूक तुझी नाहीं. चूक माझी झाली."

"तुझ्या चुकीची शिक्षा मला काय म्हणून ?"

"माझ्यासारख्या दुर्दैवी स्त्रीच्या पोटीं तूं जन्म घेतलास म्हणून !"

"तूं तर आनंदांत आहेस. शिक्षा मी भोगतो आहे. तुझ्या अपराधाची शिक्षा !"

"तुला कल्पना नाहीं. पण मीही ती भोगते आहे. नितिनची, संध्येची प्रत्येक गोष्ट करतांना मला सारखी तुझी आठवण येते. नितिन मला बिलगला कीं, मला तुझीच मिठी पडली आहे असं वाटतं. त्याला मी प्रथम पाजायला घेतलं तेव्हां पान्हा एकदम आटला आणि तो खूप रडायला लागला. मीही पिचते आहे रे ! मीही भोगते आहे."

"तरी तूं सुखांत राहतेस."

"माझं दुःख केवळ माझंच आहे. त्या दुःखाचं मोल देऊन मी माझ्या मुलांचं, नवऱ्याचं सुख विकत घेतलं आहे मी ! सुखाची इमारतही कुणाला तरी दुःखांत पाडण्याशिवाय उभी रहात नाहीं इथें ! कुणींतरी जगलं पाहिजे आणि कुणींतरी मेलं पाहिजे."

"यांत मार्ग काय ?"

"सोसणं ! जें वांट्याला आलं आहे तें सोसणं. दुसरं काय ? मुकाट्यानें सोसणं."

"तूं काय सोसशील ?"

"तुझ्या जन्माची वेदना ! इतकीं वर्षं सोसतेच आहे. जन्मभर सोसणार आहे."

"मग मला काय देणार आहेस ?"

"सर्व चांगले आशीर्वाद ! सदिच्छा !"

"आणखी कांहीं ?"

"काय हवंय् माझ्या बाळाला ?"

"तूं मला घांस भरव. आणि मला आई म्हणून तुला मिठी मारू दे."

"मी तुला रोज घांस भरवीन. माझ्या पानांतला पहिला घांस तुझा राहील."

"आईऽऽऽ" म्हणून तो आवाज माझ्याजवळ आला. ती बाळ मिठी मला पडली. माझा पान्हा दुधावला. अंग घामानें चिंब झालें. छातीची धडधड वाढली. मी त्या माझ्या पहिल्या बाळाला मिठी मारीतच राहिले. आणि मग एकदम मोठ्यानें "बाळ" म्हणून ओरडले.

"काय झालं ?" म्हणून हे धांवत आले.

"कांहीं नाहीं." थकवा आला. म्हणून नितिनला हांक मारली.

"तुला बरं नाहीं हेंच खरं."

"मला बरं आहे. मला नितिन हवा आहे." नितिन ! म्हणून मी मोठ्यानें हांक मारली. नितिन धांवत आला. "काय ग आई ?"

त्याच्या प्रश्नाचें उत्तर मला देतां आलें नाहीं ! त्याला मी अतिशय आवेगानें मिठी मारली. त्याच्या गालाचीं, केसांचीं, कपाळाचीं मी चुंबनें घेत राहिले. "बाळ, तूं माझा आहेस. मी तुझी आहे." असं तोंडानें म्हणत राहिले.

नितिन त्याच्या बाबांकडे आणि बाबा माझ्याकडे पहात राहिले मला काय झालं आहे हें त्यांना कळत नव्हतं——

——पण मला तरी तें नेमकं कुठें सांगता येणार होतं ! •••














(पृष्ठ २०३ वरून-कळ)

वरं का ? नि पहांटे शेल्यांकिडे निघायचं सगळ्यांनीं. कंदील घासून फुसून ठेव. काठी जपून ठेव. पायताण बघून ठेव. एस्टी पहांटेची आहे. चुकतां नये हां..."

मला एकदम चरका बसला. म्हणजे आतां बाय आली तशी चालली. अवी चालला. पमू चालली. जावयमाणूस चालला. सगळीच जणं परत मुंबईला चालली. म्हणजे मग रहाणार कोण इथं ? या गावांत ? या घरांत ? म्हातारी धनीण, म्हातारा धनी नि मी पोरगा पांड्या... पांड्या, तूं शाळेंत गेला नाहींस नि तुझा हा अस्सा घात करून घेतलास. अरे, तुझ्याबरोबरची पोरं बघ कशी शिकताहेत. तो बाबल्या पालव तुझ्या गांवचा आतां मुंबईला आणखी पुढं शिकायला गेला. हा अवी बघ. शिकला म्हणून कसा दिसतो, कसा हंसतो, कसा बसतो. कसा वाचतो तशीच पमू पण, नाहींतर तूं हायसच.

मी आपला हा असाच. माझं आपलं हें असंच चालायचं. आतां दोन वर्षं बाय काय येणार नाही. नि अवी नाही. पमू नाही. ती शिकतील सवरतील. पुन: पुढचं कुणाला काय ठाऊक. किती मजा आली महिनाभर. कसा महिना गेला पण भरकन् !

रात्रभर बांधाबांध चालली होती. दोन गांवांतले बापये पण धन्यानी बोलावले होते. दत्तू सुतार नि जगल्या पडवळ. लय बडबडे. त्यांचीं कामं पण चालली होती नि तोंडानं बडबड पण चालली होतीं.... 'काय समजलेत, धनी साहेब...' त्यांचं आपलं सारखं चाललं होतं. 'काय समजलांत ना जावई माणसानु ?...' त्यांची वटवट संपलीच नाही. मागील परसांत कोंबडा ओरडला. भिन भिन सुरू झाली. जाईब माणसानीं घड्याळ बघितलं नि म्हणाले चार वाजून गेले. चला निघा. अवी नि पमू झोपली होती आजीच्या खोलींत. त्यांना मीच जाऊन उठवलं. धनी मला म्हणाले जा उठव त्यांना. मी अवीला हातानं हालवलं. पमूला पण हातानें मी हळुहळू हलवली. मला वाईट वाटत होतं. नि गुदगुल्यापण होत होत्या. दोघीं कुरकुरत उठली. अवी तर माझ्यावर भडकलाच... इतक्यांत बायच तिथें आली. त्यांना जरा दरडावूनच म्हणाली. चला उठा रे. तोंड धुवा. कपडे बदला. आतां मुंबईला जायचं. झोपा कसल्या घेतां ?... माझ्याकडे बाय बघेल नि मला पण कांहींतरी म्हणेल असं आपलं मी मनांत म्हणत होतों पण ती माझ्यासमोर उभी होती. पण माझ्याकडे बघतच नव्हती. तिचं आपलं सारं लक्ष तिच्या अवीवर नि पमूवर होतं. मला खूप खूप वाईट वाटलं.

सगळी मंडळी नंतर खळ्यांत जमली. धनीन रडत होती. बाय पण रडत होती. धनी गंभीर झाले होते. जावईमाणूस पण चुरूट ओढीत कुणाशींच बोलत नव्हते. निघायची तयारी झाली होती. मी फटकूर खांद्यावर टाकलं होतं. हातांत काठी घतली होती नि दुसऱ्या हातात कंदील घेतला होता. दत्तूने व जगल्याने डोक्यावर बोझे घेतले होते. जावयांच्या हातात बॅटरी होती. अवी पमू छान कपडे घालून आजोबांना व आजीला नमस्कार करीत होती. येतो हं म्हणून पुन्हा पुन्हा म्हणत होती. धनी म्हणाले, 'चला...' मग सगळी जणं जड पावलांनीं खळ्याच्या बाहेर पडली. मग रस्त्यावर आली. मग आडवाटेला लागली. मग वाट कापूं लागली. मी आपल्या सगळ्यांच्या पुढें होतो. धनी माझ्या मागे होते. कुणी कुणाशीं नि बोलत नव्हतं. माझ्या हातांतला कंदील लटलटत होता नि











झाडांच्या सावल्या भुतं नि देवचार होऊन सभोंवार ह्डिीस थैमान घालीत होत्या. पमू अवीला घट्ट चिकटून चालत होती. बाय जावयमाणसाला अगदी बिलगून चालली होती. घरघन्यांनीं डोक्याला रुमाल बांधला होता. लांब कोट घातला होता. हातांत जाडजूड दांडा घेतला होता. नी तुरु तुरु ते चालले होते. मला पोटांतून हुडकून येत होतं. ओठावर ओठ थरथरत होते. डोळयांत पण माझ्या पाणी सांकळलं होतं. मी आपला काळोखांत तोंड खूपसून सारं लपवून ठेवीत होतो. कुण्णाला काहीं दिसूं नये म्हणून सारं लपवून घेत होतो. तोंडावर कांवळं लपेटीत होतो.

शेर्ले गांव आलं तसं बाळयाचं दुकान दिसूं लागलं. त्याची चूल पेटलीच होती. त्याची भजी कढईत सळसळत होती. चार बाकडी तशीच होती नि पांच दहा माणसं एस्टीची वाट पहात बसली होती. झुंजूमुंजू व्हायला लागलं होतं. देवळांत दोन कुत्रीं केकाटत होती. झाडाची पानं सळसळत होती. खालीं नदींत पाण्याचा चुबूक चुबूक आवाज होत होता. दूर डोंगराच्या कडेला तांबडं तांबडं दिसत होतं. आम्ही जवळ आलों तसे दत्त्या पहिल्यांदा बाळयाच्या दुकानांत डोक्यावरचा बोझा घेऊन शिरला.

'काय रे दत्त्या... कोण चालला मुंबईला?' बाळयानें आपल्या भसाडचा आवाजांत सरल ठोक सवाल केला...

'अरे मेल्या हळु बोल... घनी आहेत बरोबर त्येंची बाय नि जावय माणूस चालले मुंबईला..."

'अस्सं होय.. अरे परवां तर आले होते ना ? इतक्यांत दिवस सरले..?

इतक्यांत धनी पण तिथे आले. बाय आली. सगळीच जणं आली. तसा बाळया पंचा सावरीत नि झारा कढईवर ठेवीत अदबीनं उठला. म्हणाला, 'या धन्यानु.. बसा... बस गे बाये..बसा हो जावयानु...' सर्वांची सरबराई त्याने जातीने केली. माझ्या तोंडाला चळचळणाऱ्या भजांमुळें पाणी सुटलं होतं तर डोळयांतून सारखं पाणी येतच होतं.

'एस्टी यायचीच झाली...' बाळयानं म्हटलं नि तो पुनः कामाला लागला...

मी मनांत देवीला नवस केला. एस्टी येऊं देतच नको. चांगली महिनाभर आणखी एस्टी येऊं दे नको. माऊले मी तुला तूं मागशील तें देईन. पण एस्टी न येईल असं कर... पण कसंच काय नि कुठचं कोण ! हॉर्न वाजला. एस्टीची घरघर सगळयांच्या कानावर आली. घूळ उडली. बाकडयावरचे पासेंजर उठले. जो तो अंग झाडून उभा राहिला. 'घार' 'वुर' करीत एस्टी चव्हाटयावर शिरली. मागे पुढे झाली. थांबली. ड्रायव्हर भजीं खाण्यासाठीं खाली उतरला. कण्डक्टर पण बाळयाच्याच दुकानांत शिरला. तोंपर्यंत दत्तू एस्टीच्या टपावर चढला. जगल्याने त्याला खालून वर सामान दिलें. आवराआवर संपली. धन्यानी आंत एस्टींत जाऊन जावई माणसापासून तो अवी पमू पर्यंत सर्वांना नीट जागा करून दिल्या. जागेवर बसवलं. काय काय त्यांच्या गोष्टी पण चालल्या होत्या. बाय अगदी खिडकीकडे बसली होती. तिच्या खिडकीच्या खालीच मी आपला आंग चोरून नि मान वर करून मान दुखे-पर्यंत बायकडे बघत उभा होतो. अवी नि पमू मोटारींत चढण्यापूर्वीं माझ्याबरोबर खूब खूब बोलले. मला पुनः पुनः पमूनें 'पांडोबा' म्हटलं अवीनें खोटं खोटं मला 'पांड्या-लांड्या' म्हणून घेतलं. जावयानी पण मोटारींत चढण्यापूर्वीं 'काय मिस्टर पांडोबा' असं मला म्हणत माझ्या हातांत चक्क रुपयाची नोट दिली. नि बाय मात्र खिडकीजवळ बसून सुद्धां माझ्याकडे बघतच नव्हती. आंत शिरतांना सुद्धां तिनं मला समोर बघतलं तरी पण कांहीं नीट बघून घेतलं नाहीं. मी आपला कंदील हातांत वर धरून पुनः पुनः खिडकीकडे बघत होतो. बाय माझ्याकडे बघेल नि 'पांडू' म्हणून मला हांक मारील म्हणून ताटकळलो होतो. पोटांत कळ येत होती. छातींत धडधडत होतं. डोळयांत खुपत होतं नि डोक्यांत भणभणत होतं. इतक्यांत कण्डक्टर आंत चढला. तिकडून खाडकन् दार उघडून व तें बंद करीत ड्रायव्हर पण आपल्या जागेवर बसला—कण्डक्टरनें खण खण घंटा वाजविली. ड्रायव्हरनें इंजिनाची फर फर सुरू केली. एस्टी पुढें जात होती. मागें जात होती. मग वळली नि सरळ सावंतवाडीच्या रस्त्याला लागली. तशी धनी खाली उतरले. मी आपला एस्टीच्या या बाजूकडून त्या बाजूला वळत नि पळत होतों. कारण बायची खिडकी त्या बाजूला गेली होती. मी कधी नाय ते 'बाय आते' 'बाय आते' असं ओरडायला सुरवात केली. पण बायचं माझ्याकडे लक्षच गेलं नाहीं. ती खिडकींतून बाहेर बघत होती. पण मी तिला दिसतच नव्हतो. मी पांडू तिला दिसतच नव्हतो. मी तिचा पांडू तिला कसा दिसत नव्हतो. तेंच मला कळत नव्हतें. बाय आपली माझी आहे. माझी कुणीतरी आत्ते आहे. मामी आहे, थोरली वहीण आहे. मावशी तरी आहे असं आपलं मला वाटतच होतं. पण बायला कांहीं वाटतच नव्हतं. तिला तें मुळांतच वाटलं नसलं पाहिजे. नाहींतर तिनं एकदां तरी माझ्याकडे वळून पहायला हवं होतं. नि 'बरं रे पांडू येते हं' असं म्हणायला हवं होतं. पण तिनं तसं कांहीं म्हटलंच नाहीं नि झटकन एस्टी दूर दूर गेली सुद्धां. सावंतवाडीला चालती झाली. ...

घरांत कसं सामसूम आहे नि आढयाकडे बघत मी आपला हाच विचार मनांत सारखा घोळवतो आहे. बायने एकदां चुकून तरी माझ्याकडे बघायला हवं होतं. चुकून तरी ! ●●●



स्त्रियांना स्वावलंबी बनविणारा
कुटीर-उद्योग
लहानसा ग्रामोद्योग म्हणून सुरूवात केलेल्या व्यवसायाने आतां उद्योग समूहाचें भव्य स्वरूप धारण केलें आहे. तथापि, आजहि आपापल्या छोटेखानी संसाराला हातभार लावण्याऱ्या, दहा हजारांहून अधिक स्त्रिया, आमच्या कारखान्यांतून कामें करीत आहेत.
धूम्रपानाचा आनंद उपभोगणाऱ्या असंख्य हृदयांत 'उंट छाप' व 'कोंबडा छाप' विड्यांनी प्रेमाचें स्थान मिळविलें आहे.
बस्तीराम नारायणदास महेश्री
चांडक ब्रदर्स
सिन्नर (जि. नासिक)
TOM & BAY

